॥ ॐ नमः शिवाय ॥

अहिंसा परमो धर्मः

# विश्वधर्म



भारताचा शुद्धाशुद्ध इतिहास

: लेखक :

श्री का. शि. संकाये, आळंदी ( देवाची )

प्रकाशक : (प्रसिद्ध करणार)
विश्व प्रकाशन,
डबेवाले धर्मशाळा,
मुक्काम पो. आळंदी (देवाची)
ता. खेड, जि. पुणे





प्रथमावृत्ती : प्रती २०००




मुद्रक : श्री. श्रीराम शंकरराव चव्हाण
वैभव प्रिंटर्स,
२९० नारायण पेठ, पुणे ३०



श्री. का. शि. संकाये यांच्या 'विश्वधर्म' ग्रंथाचे प्रकाशन
महाराष्ट्र वीरशैव सभेच्या प्रथम अधिवेशनांत
श्रीसिद्धेश्वराच्या पावन योगभूमीत सोलापूर येथे
जानेवारी १९८५ मध्ये झाले.



किंमत : रु. ३५-००

# अर्पण-पत्रिका

ज्यांच्या अमाप वात्सल्याचें व निरतिशय प्रेमाचें मला उतराई होता आलें नाहीं त्या माझ्या पुनर्जन्मवासी माता-पित्यांस म्हणजेच प. पू. तीर्थरूप शिवमूर्तीअप्पा संकाये व प. पू. मातोश्री गुराबाई यांस ही 'विश्वधर्म' ग्रंथरूप पुष्पांजली सादर समर्पण.




## मुखपृष्ठावरील आकृतीची कल्पना

**प्रथम सृष्टी निर्माण होते वेळी प्रथम पाणी निर्माण होते. कालांतराने त्या पाण्याला चक्राकार गती मिळून मध्यभागात अंडाकृती घट्ट पदार्थ तयार होतो. त्याला प्रकृतीचे, ब्रह्माचें अंड अथवा हिरण्यगर्भ म्हणतात. आधुनिक विज्ञानभाषेत त्याला नेब्युला म्हणतात. त्या अंडाकृतीचे दोन भाग होतात. खालचा भाग पृथ्वी व वरचा भाग सूर्य बनतो.**

# शिवलिंग धारकाला वीरशैव कां म्हणतात ?

**लिंगवन्त (लिंगायत) आपणाला 'वीरशैव' का म्हणवून घेतात ?**

उत्तर : वीर म्हणजे योद्धा, क्षत्रिय; ते लढवय्ये होते, तसेच शिवोपासकही होते. म्हणून ते आपणाला 'वीरशैव' म्हणवितात.

**लिंगायत शिवलिंग शरीरावर कां धारण करतात ?**

उत्तर :–लढवय्ये असलेल्या लिंगायत क्षत्रियांना अनेक प्रसंगी घराबाहेर रहावे लागत असे. अशा वेळी त्यांना स्थावर लिंगाची पूजा करणे अशक्य असल्याने व लिंगपूजेविना अन्नग्रहण न करण्याचा त्यांचा नेम असल्याने ते शरीरावर लिंग धारण करीत. शिवाय––

(१) शिवलिंगाची केव्हाही व कोठेही, घरी–दारी, राना–वनात अथवा रणांगणावरही पूजा करता यावी;

(२) कोणतेही कर्म करताना आपला देव आपल्या समोर असावा;

(३) आपला देव आपल्या जवळ व समोर असल्यावर मनाला अयोग्य कर्म करण्याची भीती वाटते. हा शरीरावर लिंग धारण करण्याचा त्यांचा हेतु असतो.

वीरशैव क्षत्रियाप्रमाणेच ब्राह्मणही (जंगम) शरीरावर लिंग धारण करतात. कारण जंगमही सामान्य जनतेचे अधर्मापासून रक्षण करतात. अतएव तेही स्वतःला क्षत्रियाप्रमाणेच वीर समजून शरीरावर लिंग धारण करतात व स्वतःला वीरशैव म्हणवितात.

**हीं प्रथा (परंपरा) विश्वारंभापासून आजतागायत कमीत कमी २०० कोटी वर्षे चालत आलेली आहे.**

---

## शिवलिंगाची कल्पना

**आकाशंलिंगमित्याहुः पृथ्वीं तस्य पीठिका ।**
**आलयः सर्व देवानां लयनाल्लिंगमुच्यते ॥**

०

**लिंगमध्ये जगत्सर्वं मानवादि सचराचरम् ।**
**लिंगबाह्यात् परं नास्ति तस्मै लिंगाय ते नमः ॥**

**० चतुर्युगे लिंगार्चनं श्रेष्ठम् । * चतुर्युगे वीरशैवधर्मं श्रेष्ठम् ।**
**न भवति समतुल्यं वीरशैवधर्मं सनातनम् ॥**

## वीरशैव विश्वात्मरूपी आत्मलिंगाची पूजा करतात.

साकार मानवरूपी देहमंदिरात निराकार आत्मलिंगरूपी आत्मदेव रहातो. वीरशैव त्या आत्मलिंगाची पूजा करतात. देहाचेच देवालय बनवून, आपल्या हृदयस्थ पिंडात वास करणारा जो देही (परमात्मा) त्या परमात्म्याची पूजा करतात.

ब्रह्मा, विष्णु, महेश, राम, कृष्ण, गणेश, सरस्वती, पार्वती आदि देव सर्वांना पूज्य होऊ शकले नाहीत. यातून कोणीही जगातील सर्व मानवांना पूज्य होऊ शकले नाहीत. ते आपापल्या अनुयायांनाच पूज्य झाले आहेत. हा सर्वांचा सर्वत्र अनुभव आहे. मग अखिल जगतात सर्वांना पूज्य कोण हा प्रश्न उद्‌भवतो. याचे उत्तर :– हृदय पूज्य आहे. प्रत्येक प्राण्याच्या तसेच मानवाच्या हृदयात वास करणारा देव एकच आहे. तोच हृदयस्थ देव (आत्मा) सर्व मानवांना वंद्य, पूज्य आहे. तो विश्वव्यापी, विश्वात्मा, विश्वनिर्माता, सर्वांतर्यामी, सर्वप्रिय आहे. त्याचीच पूजा वीरशैव करतात.

प्रत्येक वीरशैव स्त्री–पुरुष, आबाल–वृद्ध आपापल्या शरीरावर धारण केलेल्या बाह्यलिंगाची (इष्टलिंगाची) पूजा करतात आणि ती आपण स्वतःच करतात. दुसऱ्या कोणांकडून करवून घेत नाहीत. ते आपणास सती आणि देव पती असे मानतात. शरण (संत) सती-लिंगपती मानून, ज्याप्रमाणे आपल्या पत्नीचे रतिसुख व आपले भोजन लोकांकडून करवीत नाहीत, त्याप्रमाणेच आपल्या देवाची पूजा–अर्चा वीरशैव दुसऱ्याकडून करवीत नाहीत. ती आपली आपणच करतात. हा वीरशैवांचा सर्वश्रेष्ठ, सर्वमान्य सिद्धांत आहे.

भक्तसती– देवपती या वीरशैव व संतोक्तीप्रमाणे महाराष्ट्रीय संतश्रेष्ठ श्रीतुकाराम महाराज म्हणतात– 'पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हा नारायण तैशापरी ॥ पतिव्रता नेणे आणिकाचीं स्तुतीं । सर्वभावे पती ध्यानी मनी ॥' या संतोक्तीप्रमाणे इष्टलिंगाला (आत्मलिंगाला) पती व आपण सती मानतात. आणि पूजा-अर्चा, स्तुती-स्तवन, ध्यान-चिंतन करतात. आणिकांची स्तुती आम्हा आत्महत्त्या । एकावाचुनी त्या आत्मलिंगा ॥ असे वीरशैव मानतात.

कोणत्याही देशातील, जातीतील, पंथातील, धर्मातील, जंगलातील

मानवाला मानावेच लागेल की, आपल्या पत्नीचे रतिसुख आपणच घेतो. त्याठिकाणी अन्य कोणाची नेमणूक करीत नाही. तसेच आपली भूक शमविण्यासाठी अन्य व्यक्तीला भोजन घालीत नाही. त्याप्रमाणे आपली आध्यात्मभूक शमविण्याकरिता आपल्या देवाची आपणच पूजा-अर्चा केली पाहिजे. ती अन्य व्यक्तीकडून (पुजाऱ्याकडून) पूजा करवून-आपली भूक शमवणे शक्य नाही. देवाला पूजारीरूपी कमिशन एजंटा-कडून विकत घेतले जाते कां ? कमिशनद्वारे देवाच्या खरेदीचा मूर्खपणा वीरशैवांना मान्य नाही. आत्मलिंग माझ्या हृदयात आहे आणि तेच माझ्या करतलातील इष्टलिंगात आहे असे मानून वीरशैव आत्मलिंगाची (इष्टलिंगाची) पूजा करतात.

पतिव्रता स्त्रीला एकच पती असतो, तसेच श्रद्धावान भक्ताला एकच देव असतो. शरण (संत) सती, लिंग पती या वीरशैव सिद्धां-ताला आत्मसात करून इष्टलिंग धारण केल्यावर अन्य देवतांची पूजा, आराधना करणे आध्यात्मिक व्यभिचार आहे. लिंगभक्त झाल्यावर आपल्या अंगावर धारण केलेल्या लिंगाचीच अनन्य निष्ठेने पूजा केली पाहिजे. लिंगच पती, मी सती हा भाव दृढ झाला पाहिजे.

इति शम्.

---

## वाचकवृंदास नम्र विनंती व सूचना

**या ग्रंथात काही चुका झाल्या आहेत. त्याची दुरुस्ती खालीलप्रमाणे :**

| चूक | बरोबर |
|---|---|
| पृ. ८ ओळ २४ कृष्णाच्या मुलाचे नाव अनिरुद्ध आहे. | कृष्णाच्या मुलाचे नाव प्रद्युम्न आहे. |
| पृ. २४ ओळ १३ हनुमंताची बायको | हनुमंताची आजी. |
| पृ. ४६ ओळ ११ मारुती पशू वानर नव्हते. वनात रहाणारे वन-मानव होते. | मारुती वानर समाजातील क्षत्रिय राजपुत्र होता. |
| पृ. १०९ ओळ २३ प्रलय काळात. | सृष्टी निर्माणारंभी. |
| पृ. २२२ ओळ १७ कृष्णाचा मुलगा अनिरुद्धाच्या | कृष्णाचा नातू अनिरुद्धाच्या. |

# लेखकाचा ऋण-निर्देश

प्रिय वाचकहो, मानवतावादी, अहिंसाचारी, एकेश्वरी, एकनामी या तत्त्वांना आधारभूत असलेल्या शैवागमे, शैवपुराणे, शैवोपनिषदे व प्रथम निर्माण झालेले आगम सिद्धांती वेद आदि ग्रंथांना मी गुरु मानतो. वरील ग्रंथात अहिंसा व मानवता या दोन गुणांना विशेष प्राधान्य देण्यात आले आहे आणि ते यथायोग्य होय. किंबहुना ह्या गुणांमुळेच सृष्टीच्या आदिकालापासून आजतागायत मानवाची उभारणी व प्रगती झाली आहे असे मी समजतो. त्या संदर्भातच या ग्रंथातील शुद्ध इतिहास आहे. आगम–निगमापासून अद्यावत धार्मिक ग्रंथापर्यंत शेकडो ग्रंथांचे आलोडन व अभ्यास मी केला आहे. त्यांत सर्वश्रेष्ठ आद्यग्रंथ मानलेले वेदग्रंथ, त्यावरील टीका, वेदांची भाषांतरे वाचीत असतांना त्यांत मला महान त्रुटी आढळून आल्या. वेद मूळ स्वरुपात फार श्रेष्ठ ग्रंथ आहेत. सर्व जगाला हे मान्य आहे व मीही तसेच मानतो. तथापि प्रथम वेद-रचनाकालानंतर वेदात बहुदेव, बहुनामी उपासनापद्धती व तिसऱ्या रचनाकालांत यज्ञयागात निरपराध पशुबळी व मानवबळींची प्रथा, ऋषीचे व देवतांचे हिंसाचारी आचार, त्यांची चमत्कारयुक्त असंभाव्य उत्पत्ती ह्या गोष्टी घुसडल्या गेल्यामुळे वेदांचे शुद्ध स्वरूप जाऊन, त्यातील अहिंसाचार व मानवता नष्ट झाली, हे कोणालाही मान्य करावेच लागेल. मानवसंस्कृतीचा ऱ्हास होण्यास वरील वेदातील अवगुणच मुख्यतः कारणीभूत असल्याने वेदातील हे महान मानवघातकी दोष मानवसमाजापुढे मांडण्याचे मी ठरविले. त्या दृष्टीने अनेक ग्रंथ पुनःपुन्हा पाहिले, त्यांचा संशोधकाची दृष्टी ठेवून अभ्यास केला. ह्या खटाटोपात मला जो बोध झाला, जी स्फूर्ती मिळाली, त्याची फलश्रुती किंवा परिपाक म्हणजेच प्रस्तुत 'विश्वधर्म' ग्रंथातील अशुद्ध इतिहास होय. मला जे प्रतीत झाले ते प्रांजळपणे कोणाचीही भीडभाड न धरता ग्रंथरूपाने जनतेपुढे ठेविले आहे. जनतेने त्याचा मागोवा घेतल्यास, त्यांचीहीं मजप्रमाणेच खात्री होईल. तेव्हा मी अभ्यासिलेल्या ग्रंथांनी मला स्वतंत्र ग्रंथलेखनाची जी स्फूर्ती दिलीं, त्यावद्दल त्या ग्रंथरूपी गुरूंचा मी ऋणीं आहे.

आळंदीचे माझे परम मित्र श्रीज्ञानेश्वर माऊलींचे पुजारी वे. शा. सं.

प. पू. श्री. भालचंद्र दत्तात्रय प्रसादे यांच्यावरोबर 'शतपथ ब्राह्मण' ग्रंथातील एका महत्त्वाच्या विषयावर चर्चा झाली होती. त्यावेळी मला वाटले की, धर्माधर्माच्या विषयावर एखादा ग्रंथ लिहावा. ह्या माझ्या विचाराला लातूरचे श्री. महेशशंकरअप्पा नागुरे वकील व परळी वैजनाथचे श्री. मिसाळ बंधुद्वय यांनी ग्रंथलेखनाचे कामी प्रोत्साहन दिले, त्यावद्दल मी त्यांचाही आभारी आहे. त्यांच्या प्रोत्साहनाविना हा ग्रंथ निर्माण झालाच नसता.

ग्रंथ लिहून झाल्यावर सर्वप्रथम पुण्याचे पंडित श्री. चंद्रकांतशास्त्री यांना हा ग्रंथ वाचावयास दिला व त्यावर अभिप्राय देण्याची विनंती केली. त्यांनी ग्रंथावद्दल गौरवोद्‌गार काढून अभिप्रायही लिहून दिला. त्यामुळे मला अधिकच हुरूप आला. पं. चंद्रकांतशास्त्री ह्यांनीच वार्शीचे प. ब्र. गुरुवर्य परंडकर महाराज यांचा परिचय करून दिला. गु. परंडकर महाराजांचे ग्रंथाविषयीचे विचार ऐकून मला फार आनंद झाला. त्यांना माझ्या ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्यावद्दल मी आग्रहाची विनंती केली असता ह्या उदारधी महात्म्याने लागलीच प्रस्तावना लिहून गुणग्राहकता व्यक्त केली, त्यावद्दल मी त्यांचाही अत्यंत कृतज्ञ आहे. गु. परंडकर महाराजांनी प. ब्र. गुरुवर्य अहमदपूरकर महाराजांची ओळख करून दिली. विद्वत्‌रत्न अहमदपूरकर महाराजांनीही माझ्या ग्रंथाचे कौतुक केले व विद्वत्तापूर्ण अभिप्राय लिहून दिला, त्यावद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

श्री गु. परंडकर महाराजांनी श्री काशीजगद्‌गुरु व श्री रंभापुरी जगद्‌गुरु यांचाही परिचय करून दिला. काशीचे जगद्‌गुरूंनी ग्रंथाला वहुमोल आशिर्वाद दिला आणि माझ्या व गुरुवर्य परंडकर महाराजांचे विनंतीवरून काशीपीठाला लाभलेल्या दानपत्राची छायाचित्रे स्वखर्चाने छापून पाठविली. तसेच भारताचे माजी उपराष्ट्रपती डॉ. बी. डी. जत्ती, महाराष्ट्राचे माजी मंत्री देशभक्त श्री. रत्नाप्पा कुंभार, 'ज्ञानप्रसाद,' 'वीरशैव दर्शन' मासिकांचे संपादक, 'कपीलधार' मासिकाचे सहसंपादक, 'जागते रहो' मासिकाचे सहसंपादक, 'ज्ञानप्रकाश' दैनिकाचे माजी सहसंपादक, महाराष्ट्र वीरशैव सभेचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्याध्यक्ष, सरचिटणीस, ख्यातनाम प्राध्यापक (त्यात काही 'डॉक्टरेट' मिळविलेले विद्वान आहेत), पदवीधर, वकील व मुंबई, पुणे, दापोडी (पुणे), पाईट,

औरंगाबाद, परळी–वैजनाथ, पूस, वर्दापूर, धर्मापुरी, अहमदपूर, चाकूर, नांदगांव, लातूर, औसा, वार्शी, सोलापूर, कोल्हापूर, बेंगलोर, संत-तुकाराम–श्री ज्ञानेश्वर महाराजांची पावनभूमी देहू–आळंदी येथील सर्व थरातील विद्वान् ज्ञात्यांनी ' विश्वधर्म ' ग्रंथाचे कौतुक करून ग्रंथानुकूल अभिप्राय दिले. पुण्याच्या श्रीसंत शिवगंगादेवी (माई) व वार्शीच्या समाजकार्यकर्त्या सौ. जं. ज. घाणेकर यांचाही त्या संदर्भात विशेष नामोल्लेख करणे आवश्यक आहे त्या सर्वांचा ऋणनिर्देश मी न केल्यास मला कृतघ्नतेचे पाप लागेल. तसेच ' विश्वधर्म ' ग्रंथाला आधार म्हणून घेतलेल्या सर्व अनुकूल व प्रतिकूल ग्रंथकारांचे ऋण मला मान्य केलेच पाहिजे.

' वैभव ' प्रेसचे मालक श्री. श्रीराम शंकरराव चव्हाण, त्यांचे सहकारी व 'हरिहर मुद्रणालया'चे मालक श्री. ग. द. वढे व त्यांचे सहकारी ह्यांनी ' विश्वधर्म ' ग्रंथाचे मुद्रण व जुळणी अत्यंत प्रेमाने व अल्पावधीत करून दिली, त्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे. शेवटी सत्-चित्-आनंद-घन प्रभूने ग्रंथलेखनाचे कामी मला स्फूर्ती देऊन मजकडून हे कार्य पुरे करून घेतले, त्याबद्दल हार्दिक कृतज्ञता व्यक्त करून ऋणनिर्देश पुरा करतो.

आपला कृपाभिलाषी
**का. शि. संकाये**

———

# विषयानुक्रमणिका

## पृष्ठांक १ ते ४०



## पृष्ठांक ४१ ते ८८



## पृष्ठांक १ ते ३२८

## प्रकरण सहावे

### भारताच्या अशुद्ध इतिहासाला मिळालेली पुष्टी
### ऋग्वेदातील ऋषींचे व देवतांचे आचार–विचार

विषय पृष्ठ

**पृष्ठांक ३८३ ते ४९६**

मागील पान क्र. ८८ वरून (अभिप्राय) पुढे चालू

# अगोदर हे वाचा

वाचक बंधु भगिनींनो सर्व धर्म, पंथीय, मित्रांनो, अगोदर हे वाचा.

या ग्रंथाचे नांव, विश्वधर्म आहे. या ग्रंथात कोणत्याही धर्म-पंथाच्या अध्यात्म तत्त्वज्ञानाचा फारसा विचार केलेला नाही. धर्मा-धर्माचा, आचार-विचारांचा, हिंसा अहिंसेचा, नीतीअनितीचा, सत्या-सत्याचा, सद्गती-अधोगतीचा, उत्तम वेद, शैवागमे, उपनिषद्दे, पुराणे तसेच आधुनिक पंडीत महापंडीताच्या ग्रंथाधारे साध्या बोल भाषेत चांगल्या वाईटाचा विचार करून सिद्धांत काढला आहे.

या ग्रंथातील पहिल्या प्रकरणातील, पहिला भाग वाचताना वाचकाला वाटेल की, लेखकाने वैदिक आर्य हिंदू धर्मावर सर्व प्रकाराने टीका केली आहे. पण लेखकाचा टीका करण्याचा हेतू नसून ती सत्य परिस्थिती आहे. आणि चालू काळातील उपासना व आचार विचारावर आधारित आहे. तो आधोगतीला नेणारा आहे.

जीव कसा शिव होईल. मानव कसा महादेव होईल.

नर कसा हर बनेल, भक्त कसा भगवान होईल.

अशा सद्भावनेने हा ग्रंथ लिहिला आहे. जो माणूस धर्माचरणाने वागेल त्याला मोक्ष मिळेल. अधर्माचरणाने वागेल त्याला अधोगती मिळेल हा सिद्धांत सर्व मानवाला मान्य आहे.

॥ धर्म ॥ अहिंसा परमो धर्मः आचार परमो धर्मः

खालीलप्रमाणे धर्म अधर्म प्रकार आहेत. तेच प्रकार उत्तम पुरुष आणि कनिष्ठ पुरुष यांना मानावे. धर्मांची तत्त्वे उत्तम पुरुषाला व अधर्माची तत्त्वे कनिष्ठ पुरुषाला मानावे, भारतीय आर्यउत्तम पुरुषाला आर्य मानतात व कनिष्ठ पुरुषाला अनार्य मानतात.

मानवाने अधर्माने वागून अधोगतीला जाऊ नये. धर्माने वागून मोक्ष मिळवावा. या सद्भावनेने मी हा ग्रंथ लिहिला आहे. प्रत्येक मानव, विचाराला स्वतंत्र असतो. पण आचाराला तो ज्या धर्मात असतो त्या धर्माच्या बंधनात असतो. मानवाने मानवता धर्माने वागणे श्रेष्ठ आहे. मानवतेला सद्ग्रंथांचा आधार आहे, आणि तो विश्वा-

रंभापासूनचा जुना आहे. तसाच अेकेश्वरी, निराकारी अहिंसा तत्वावर आधारित आहे. मानवतेत वर्णभेद नाही, जातपात नाही, उच्चनीचभाव नाही, तोच मानव धर्म आहे.

भारतात अहिंसातत्त्वी धर्म पंथ अनेक आहेत. परंतु त्यात वर्ण भेद, जातपात, उच्चनीच भाव आहेत. त्यामुळे मानव धर्माला उणीव येते. मानवतेची तत्त्वे विश्वारंभापासून आजतागायत वीरशैव धर्मात आहेत. आणि ती विश्वारंभापासून आहेत. हा वैदिक आर्यांच्या बळी पडला नाही !

भारतात उत्तर ध्रुवीय वैदिक आर्यांनी आपली सत्ता स्थापन करून हिंसेचा फारच विकास केला तो २५०० आडीच हजार वर्ष सर्व श्रेष्ठत्वाने भारतात चालू होता. त्या काळात भारतात अहिंसा, निराकारी, एकेश्वरी, एकनामी, उपासना आणि वर्णभेद, जातपात, उच्चनीचभाव नसलेला फक्त वीरशैवधर्मच अस्तित्वात होता. त्यातूनच वैदिक आर्यांच्या हिंसेला आळा घालण्याकरिता अहिंसा तत्त्वी अनेक धर्म पंथ निर्माण झाले आहेत.

१. भारतीय आर्यांचा आगमनिगमोक्त धर्म ?

अहिंसा परमोधर्मः ॥ आचार परमोधर्मः

१. मूर्तीपूजानिषेधः ॥ अन्धन्तमः पविशन्ति यऽसंभूति मुपासते ॥

ततोभूय इव ते तमो यउसम्भूत्यां रतः (यजु. ४०/९)

अर्थ—जे (असम्भूतिम्) अनुत्पन्न अनादि मूळ प्रकृतीची परमेश्वराच्या ठिकाणी उपासना करतात, ते अंधकारात प्रवेश करतात. तसेच जे (संम्भूत्याम्) मूळ प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या, कार्यरूप पृथिव्यादि भूतांना, पाषाण वृक्षादिकांना, किंवा मनुष्यादिकाच्या शरीरांना, तो परमेश्वर आहे असे समजून, (उपासते) भजतात ते जास्त अंधकारात प्रवेश करतात. याप्रमाणे इतर पदार्थांची उपासना करण्याने जीवाला दुःखच प्राप्त होते असे वेदात सांगितले आहे. आता त्या परमेश्वराची मूर्ती नाही या विषयी वेदांत सांगितले आहे ते पहा.

॥ न तस्य प्रतिमा अस्ति ॥ (यजु ३२/३)

जो परमेश्वर सर्व जगात व्यापलेला आहे, त्या निराकार परमेश्वराची प्रतिमा मुळीच नाही, त्याचे परिणाम, किंवा सादृश्यही नाही.

याप्रमाणे वेदांत सांगितले आहे. आता उपनिषदांत काय सांगितले आहे ते पहा. केनोपनिषद्—यद्वाचानाभ्युदितं येन वागभ्युद्यते ।

तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।३।।

जो परमेश्वर वाणीचा विषय नाही व ज्याच्या धारणेने व सत्तेने वाणीची प्रवृत्ति सुरू असते, त्यालाच तू ब्रह्म आहे असे जाणून त्याची उपासना कर. ।। यन्मनसानमनुते येनाहुर्मनोमतम् । तदेव ब्रह्मत्व विद्धिनेदं यदिदमुपासते ।।४।

जो परमेश्वर मनाने जाणला जात नाही, पण जो मनाला जाणत असतो, त्यालाच तू ब्रह्म समजून त्याचीच उपासना कर. त्याशिवाय इतर कशाचीही उपासना करू नको. असे उपनिषदात पुष्कळ आधार आहेत.

२. आगम नियमात जिवंत मानवाची पंचायतनपूजा आहे.

कोणतीही मूर्ती करून तिची पूजा करणे आगम निगम बाह्य असल्यामुळे अधर्म्य आहे. वेदामध्ये पंचायतन पूजा सांगितली आहे ती शंकराचार्यांच्या पंचायतन पूजेपेक्षा निराळी आहे. ही आगम निगमोक्त पंचायत पूजा प्रत्येकाने केलीच पाहिजे. ती कशी करावी, पहा यजुर्वेद. १६/१५

मा ना वधीः पितरं मोत मातरम् ।। यजु. (१६/१५)

आचार्यो ब्रह्मचर्येण ब्रह्मचारिण मिच्छते. ।। अथर्व ११।५।१७)

अतिथिर्गृहानागच्छेत् ।। (अथ. १५।१३।११) अर्चत प्रार्चत प्रियमेधासोअर्चत (ऋ ८।७।६९)

पहिली माता ही मूर्तीमती देवता सर्व संतानांनी पूजा करण्यास योग्य आहे. आपल्या तनमनधने करून तिची सेवा करावी व तिला प्रसन्न ठेवावे. त्याचप्रमाणे आपल्या पित्याची सर्व प्रकारे सेवा करावी. आपल्याला विद्यादान देतो त्या आचार्याची (गुरूची) तनमनधन करून सेवा व सत्कार करावा. अतिथीचा सत्कार करावा. जो धार्मिक, निष्कपटी विद्वान, सर्वमानवाचे कल्याण करण्यासाठी सत्याचा उपदेश करीत चोहोकडे भ्रमण करीत फिरत असतो त्या अतिथीचा सत्कार करणे प्रत्येकाचे कर्तव्य आहे. त्याचप्रमाणे स्त्रीला पती हा पूजनीय असून पतीला स्त्री ही पूजनीय आहे. तात्पर्य माता, पिता,

आचार्य, अतिथी व पती किंवा पत्नी या पाच मूर्तीमान देवता प्रत्येकाने पूजा करण्यास योग्य आहेत. हीच मूळची पंचायतन पूजा. या पाच मूर्तीमान देवतांच्या योगानेंच मनुष्यदेह प्राप्त होतो, त्याचे पालन होते, देहधारी जीवाला सत्य विद्याचे शिक्षण मिळते, सारासार विचार जागृत होतो, ज्ञान वाढते व शेवटी परमेश्वरप्राप्ती होते. जसे या पाच देवतांचा उल्लेख वेदामध्ये आहे त्याचप्रमाणे तो इतर वैकिद ग्रंथातही आहे.

२. इश्वर मानव देहधारी नाही.

को ददर्श प्रथमं जायमान मस्थन्वतं यद्नस्था बिभर्ति ॥
भूम्या असुरसृगात्मा क्वस्थित को विद्वांसमुपगात् प्रष्ठुमेतत् ॥
(ऋ १।१६४।४)

हा ईश्वर मानवदेहधारी नाही, त्याला आस्थिमास, इंद्रिय नाहीत, त्याचा जन्म कोणी पाहिला नाही, असा हा निराकारी ईश्वर चर्मचक्षूला दिसत नाही. त्यास अंतःचक्षुनेच पाहावे लागते. त्या निराकारी ईश्वराची उपासना केल्याने मानवाने कल्याण होते. निराकार एकेश्वरी उपासनेला आगम निगमात पुष्कळ आधार आहेत. येथे अशी शंका निर्माण होते की मानवासारखा आकार नाही, डोळयाला दिसत नाही, मनाला आकलन होत नाही. अशा निराकार ईश्वराची उपासना कशी करायची. याचा विचार चौथ्या प्रकरणात केला आहे. प्रस्तुत आपण निराकार एकेश्वराचा विचार करत आहो.

१) स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यष्टित् दशांगुलम् ॥
(ऋ. १०।९०।१) पुरुषसूक्त ॥

तो सर्व विश्व व्यापून दहा बोटे उरला.

२) इशावास्यम् इदं सर्वम् ॥ ईशावास्योपनिषद् ॥

तो सर्वत्र वास करतो.

३) एकमेवाद्वितीयं ब्रह्म छांदोग्योपनिषद् ॥

ब्रह्म एकच आहे तसे दुसरे नाही.

४) सर्वं खलु इदं ब्रह्म ॥ बृहदारण्यकोपनिषद् ॥

हे सर्व. ब्रह्म आहे.

५) यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वर गीता ।१५।१७।

तोच अव्यय ईश्वर त्रैलोक्यात भरलेला आहे.

६) ईश्वरः सर्व भूतानां हृद्देशोऽर्जुन तिष्ठति ।। गीता १८।६१
अर्जुना ईश्वर सर्वप्राणिमात्राच्या हृदयात वास करतो.

७) विश्वी विश्वंभर । बोले वेदान्तीचा सार ।। तुकाराम

८) जे जे देखिजे भूत । तेते मानिजे भगवंत ।। एकनाथ

९) ऐसी जडाजड व्याप्ती । रूप करिता कैवल्य पती ।।
ज्ञानेश्वर

१०) आदिमध्यअंती व्यापक सर्वाभूती । नामदेव

११) स्थिरचर व्यापुनी अवघातो जगदात्मा दशांगुळे उरला ।।
मोरोपंत

१२) पिंडी ते ब्रह्मांडी ।। ही एक म्हण आहे परंतु यावरील एकेश्वरी सिद्धांताचे सार आहे. ही म्हण आदि मानवाने निराकार एकेश्वराच्या उपासनेकरिता निर्माण केलेल्या निराकार प्रतीकाला (शिवलिंगाला) उद्देशून आहे. शिवलिंगाच्या पिंडीत संपूर्ण चराचर विश्वाची कल्पना आहे. निराकार ईश्वराच्या, निराकार प्रतीकाची (शिवलिंगाची) उपासना म्हणजे निराकार विश्वनिर्मात्या ईश्वराची पूजा, उपासना केल्या सारखे होते. हीच शिवलिंग उपासना भारतीय आर्यांची विश्वारंभापासूनची आहे. आतापर्यंत मूर्तीपूजानिषेधाचा विचार केला. आता भारतीय आर्यांच्या अहिंसा तत्त्वाचा विचार करू.

३. निरपराधी पशूंची हिंसा करून का हिंसकाला बंदुकीची गोळी घालून मारावे.

गायीचे रक्षण करा:—(ऋ. १०।१६९।२) (अथर्व ३।१४।२) (अर्थ. ३।१४।६) (अर्थ. ४।२१।६) (अथ. ४।२१।७) (अथ. १०।१०।३४) (अथ. १।१६।४)

गायीची हत्या करणाऱ्याला बंदुकीच्या गोळीने मारावे (ऋ. १।११४।१०) (यजु, १३।४३) गायीचे विविध प्रकारचे गुण आहेत. तिची हत्या करू नका. (यजु. १३।४४) मेन्ढे, वकरे मारू नका. (यजु. १३।४७) दोन पायाचे पक्षी, चार पायाचे पशू, एक खुराचे पशू, घोडा आदि निरपराधी यांना मारू नका. (यजु. १३।३९) (यजु. १३।५०)

(यजु. १।१ ) (अथ. २।२६।४ ) (ऋ. ८।११०।१५) गायमातेसमान अनंत उपकारी आणि निरपराध आहे, तिला मारू नका. (ऋ. ६। १०१।१६) हे अज्ञानी मानवा सर्व प्रकारचे हित करणारी गाय मारू नको. (अथ ३।१२।२) (ऋ. १।११४।८)(यजु. १२।४३) (ऋ. ८।१०१।१५)(ऋ. ६।४१।२) (ऋ. ८।१३।३२) (ऋ. १।१६४।४) (ऋ. १।११४।८) ( अथ. ११।१।३४) (ऋ. ८।४।१६) (ऋ. १।३२।१) वरील वेदमंत्रात गायीचे श्रेष्ठत्व आणि तिच्यापासून मानवाला फारच फायदे आहेत- असे वर्णन करून गायीला तसेच निरपराधी पशूपक्षांना मारू नका अशी भारतीय आर्यांच्या आगमन निगमाची आज्ञा आहे.

**४. भारतीय आर्यांच्या यज्ञात पशू बळी नाही.**

अनेक प्रकारच्या वनस्पतीच्या काष्ट औषधीं, तूप, काही धान्य [ मानवाच्या उपयोगात येण्यासारखे नसून जुने झालेले ] अशा निरुपयोगी झालेल्या धान्याची यज्ञात आहुती देतात. तसेच काही सुगंधी द्रव्यही असतात. यांचा यज्ञ करण्याचा हेतू आम्हाला आमच्या मुलाबाळांना, गुराढोरांना, कांहीही रोगराई न होता सुखाने १०० वर्षं आनंदाने जगावे असा हेतू असतो, यांच्या यज्ञाने सर्व प्रकारचे रोगराई निर्माण करणारे जीव जंतू नष्ट होतात. याला वेदमंत्राधार खालील प्रमाणे आहेत.

(यजु. १।१) (यजु. १।६) (अथ. १।३१।४) (ऋ. १०।११७।५) (अथ. १९।६३।१) (यजु, ९।२१) (यजु. १८।१) (यजु. १८।१५) (यजु. ३१।१६) (ऋ. ४।५८।३) (यजु. १७।९१) (ऋ. ४।५।३) (यजु. १७।९१) (अथ. १९।५५।३) (अथ. १९।५५।४) (यजु. ३०।१) (ऋ.१।१।७) (यजु. १८।२९) (यजु. ३१।१६) (ऋ. १०।६३।१० ) ( अथ. ३।११।३ ) ( ऋ. १०।१६१।३ ) (अथ. ३।११।१ ) (ऋ. १०।१६१।१) (यजु. १८।१) (अथ. ७।७६।५ ) ( अथ. ६।९७।१ ) ( यजु. ३।१६ ) ( ऋ. १।१०।४ ) ( ऋ. १।१२।१) ( साम. १।१।३) (ऋ. १।१७७।४) (ऋ. २।२।१ ) (यजु. ३१।१४ ) ( ऋ. १०।९०।६) (यजु. १।२) (यजु. ५।२५) ( यजु. १७।८८) (यजु. ३८।६) ( ऋ. १।१७७।४ ) ( ऋ. २।२।१ )

वरील वेदमंत्रांत भारतीय आर्यांच्या सर्व प्रकारच्या यज्ञाची

थोडक्यात माहिती आहे. विस्तार भयामुळे मंत्र किंवा मंत्रार्थ लिहिणे अशक्य आहे.

असा हा भारतीय आर्यांचा आगम निगम प्रतिपादित धर्म, मानव, परिवार, समाज, राष्ट्र आणि विश्वाचे कल्याण करणारा आहे. आणि तो विश्वारंभापासून ते द्वापार युगाच्या शेवटपर्यंत म्हणजे १९७२९८४१०० एक अब्ज, सत्याण्णव कोटी, एकोणतीस लक्ष, चौऱ्याऐंशी हजार, शंभर, इतके वर्ष व्यवस्थित होता. आणि तो शुद्ध होता, तसाच इतिहासही शुद्ध होता.

५. मानवाची जन्मसिद्ध नैसर्गिक प्रवृत्ति

प्रत्येक मानवाची जन्मसिद्ध नैसर्गिक प्रवृत्ति, आनंद व सुखग्राही असते. अहिंसा, सत्य; अस्तेय, अव्यभिचार, आदि प्रकार मानवाला सुख आनंद देणारे पर्यायाने मोक्ष देणारे आहेत. अहिंसा प्रकार तर मानवालाच काय पण कीट पतंगापासून दे मानव देवमानवाना सुद्धा सुख देणारा आहे. अहिंसादि प्रकारात सुख आहे. जीवाने शिव होऊन, मानवाने महादेव होऊन, नराने हर होऊन, भक्ताने भगवान होऊन, दुःख मुक्त सुख मोक्ष मिळवावा, ही मानवाची जन्मसिद्ध प्रवृत्ति आहे. हेच मानवाचे कर्तव्य आहे. आणि हाच मानव धर्म आहे. हाच विश्वधर्म आहे. विश्व धर्मांचे आचारविचार प्रकरण २।३।४ मध्ये सविस्तर लिहिले आहे. त्या आचार विचाराने मानवाने वागल्यास मानवाचे अंतिम साध्य मोक्ष मिळेल.

या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणातील पहिल्या भागांत लिहिलेल्या वैदिक अर्थे हिंदू धर्माच्या हिंसाचाराचे आचरण करून अधोगतीला जाऊ नये.

पहिल्या प्रकरणातील भाग २ व प्रकरण २-३-४ मध्ये लिहिलेल्या, अहिंसा, निराकार, एकेश्वरी एक नामी उपासना आणि अहिंसादि प्रकाराच्या आचरणाने मानवाने मोक्ष मिळवावा. असा भारतीयांचा आगम निगमोक्त सिद्धांत आहे. ॥ अहिंसा परमो धर्म ॥ आचार परमो धर्मं ॥

६. भारतातील अहिंसा तत्वी धर्म पंथ शैव वीरशैवातूनच निर्माण झाले आहेत.

बौद्ध, जैन धर्म निर्माण झाले त्या अगोदर भारतीय आर्यातील वैश्य वर्ण संपूर्ण वैदिक आर्यात समाविष्ट झाला होता. भारतीय आर्यातील फक्त ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन वर्ण अहिंसा तत्वावर आधारीत होते. तेवढेच वैदिक आर्यांत समाविष्ट झाले नव्हते. बुद्धाच्या अगोदर वीरशैवांनी उपनिषदे निर्माण करून त्याच्या प्रचाराने वैदिक आर्यांच्या हिंसेला चांगला तडाखा दिला होता. त्यानंतर बुद्ध धर्म वीरशैवातून वेगळा निर्माण करून वैदिक आर्यांची महाभयंकर पशू हत्या (यज्ञ) संपूर्ण बंद पाडले. बुद्धाबरोबरच जैन धर्म निर्माण झाला. तोही अहिंसा तत्वावर आधारीत आहे. त्यानंतर दत्त, गाणपत्य, वारकरी, वैष्णवादि अनेक पंथ अहिंसा तत्त्वावर आधारीत निर्माण झाले. आहेत.

हे सर्व धर्म पंथ जेवढे आहेत ते सर्व वीरशैवातूनच निर्माण झाले आहेत. त्याला आधार म्हणजे या पंथांचे उपास्य देव सर्व शिवोपासक आहेत. शिवलिंग धारक वीरशैव आहेत. कोणाच्या डोक्यावर, कोणाच्या कंठात, कोषाच्या हातात शिवलिंगे आहेत. राम कृष्णादि अवतारी देवही शिवोपासकच आहेत. भारतात अहिंसा तत्वावर जेवढे धर्म पंथ निर्माण झाले आहेत ते सर्व बुद्ध, जैना नंतरचे आहेत. कलियुगारंभापासून ते बुद्धा पर्यंतच्या दरम्यान कालात अहिंसा हा प्रकार शैव वीर शैवातच शिल्लक होता. बुद्धापासून पुढे बुद्ध जैन धर्माला विरोध आणि अहिंसेला बळकटी आणण्या करिता दत्त गाणपात्य, वारकरी, वैष्णबादि अनेक पंथ वीरशैवातूनच निर्माण झाले आहेत. वरील सर्व धर्म पंथ शैव वीरशैवातूनच निर्माण झाले हे खरे आहे परंतु यासर्व धर्म पंथाचा आणि वीरशैवांचा संबंध तुटला आहे. या धर्म पंथीयांनी निर्माण केलेले देव साकार (मूर्ती) आहेत. ते शैवागम बाह्य आहेत. त्यामुळे हे सर्व धर्म वीरशैवांना मान्य नाहीत. हा सिद्धांत देवमानव निर्मित आगम व मानव ऋषि मुनीने लिहिलेल्या वेद, उपनिषदे, शैव पुराणादि ग्रंथाधारे सिद्ध होते.

द्वापार युगाच्या शेवटच्या कालांत कौरव आणि पांडव या दोघात महायुद्ध झाले, त्याला भारतयुद्ध म्हणतात. त्या युद्धांत भारताची फारच मोठी हानी होऊन भारत दुबला झाला. आणि उत्तर ध्रुवावरून

आलेल्या वैदिक आर्यांनी भारतीय आर्यांचा धर्म आणि इतिहास अशुद्ध केला आहे त्या अशुद्ध प्रकाराने भारताची कशी दुर्दशा झाली आहे ते या ग्रंथातील, पहिल्या प्रकरणांतील, पहिल्या भागांत "भारताचा अशुद्ध इतिहास" लिहिला आहे. तो सर्व, भारतीयांच्या आगम निगम बाह्य आहे.

७. सत्य सनातन आगम निगम प्रतिपादित धर्माचे सिद्धांत.

१. ईश्वर निराकार, अमूर्त, अजन्म, सर्वव्यापक आणि सर्वज्ञ आहे.

२. आगम आणि भारतीय आर्यांचे वेद अनादि आणि सर्व श्रेष्ठ धर्म ग्रंथ आहेत.

३. वेदातील बहूईश्वरी बहूनामी आणि हिंसा त्याज्य आहे.

४. ईश्वर, जीव, प्रकृती, अविनाशी व अनादि आहेत.

५. ईश्वर, जीव, प्रकृती, हे तीन वेगवेगळे पदार्थ आहेत. कोणी कोणातून निर्माण व विलीन होत नाहीत.

६. श्राद्ध आणि तर्पण जीवंत माता पित्याचे करावे मृत माता-पित्याचे करू नये.
निगभोक्त आहेत.

७. अवतार वाद आगम निगम विरुद्ध आहे.

८. मूर्ती पूजा आगम निगम विरुद्ध आहे.

९. वर्ण व्यवस्था गुण, कर्म, स्वभावानुसार आहे. जन्माधारे नाही.

१०. परमेश्वराचे मुख्य नाव "शिव" किंवा "ॐ" आहे.

११. जाती, जनन, मरण आणि रज हे चार सूतक आगम निगम विरुद्ध आहेत.

१२. एकपती, एकपत्नी, एकपिता, एक ईश्वर, एक नाव आगम निगमोक्त आहेत.

हा वरील आगम निगम प्रतिपादित सिद्धांत, सृष्टीवर प्रथम निर्माण झालेल्या, मानव देवानी व मानव ऋषीमुनींनी निर्माण केले आहेत. आणि ते द्वापार युगाचे शेवटपर्यंत भारतीय आर्यांच्या चारी वर्णाच्या आचरणांत होते. या दरम्यान कालांत मानव ऋषी मुनीनी बहूदेव बहूनामी उपासना निर्माण करून वेदांत समाविष्ट केली आहे.

आणि कलियुगारंभी वैदिकांनी वेदात हिंसा घुसडली आहे. त्यामुळे सर्व श्रेष्ठ असलेले वेद हे धर्मग्रंथ निंद्य आणि अधर्मग्रंथ झाले आहेत.

उत्तर ध्रुवीय वैदिक आर्यांनी, भारतीयांची सत्ता नष्ट करून, महापापाचार निर्माण करून, भारताची सर्व श्रेष्ठ संस्कृती नष्ट प्राय केली आहे. भारतीय आर्यांचे ब्राह्मण आणि क्षत्रिय हे दोन वर्ण वैदिक आर्यांच्या पापाचारात समाविष्ट झाले नाहीत ते विश्वारंभापासून ते आज तागायत स्वतंत्र वेगळे आहेत. वैदिक आर्यांनी, भारतीय आर्यांचा धर्म आणि इतिहास अशुद्ध केला आहे.

## लेखकांचे हृद्गत

सुमारे तीस पस्तीस वर्षे झाले असतील. माझ्या मनाला विशेष करून माझ्या उपास्य देवतेच्या उपासकांना (वीरशैवांना) वैदिक आर्य लोक वीरशैव धर्म हा वेदबाह्य आहे असे म्हणतात. ही व्यथा माझ्या मनाला व्यथित करीत होती. ती मानसिक व्यथा दूर करण्यासाठी मी प्रयत्न सुरू केले. (वीरशैव धर्म कोणी केव्हा निर्माण केला आहे..)

वीरशैव धर्म वेदात नाही का ? शिव ही देवता वेदाला मान्य नाही का ? भारतीय लोक तर शिव उपासक फारच पुष्कळ संख्येनें आहेत. ब्राह्मणादि उच्च वर्णीय लोक शिव उपासना करतात आणि ब्राह्मणेतरादि समाजही शिव उपासक फारच मोठ्या संख्येने आहे. इतर सर्व देव देवी उपासकापेक्षाही शिव उपासना भारतात फारच मोठ्या प्रमाणांत आहे. शिव उपासना करून, विष्णूने शिवाला प्रसन्न करून घेऊन, त्याला पाहिजे ते वर मागून घेऊन, श्रेष्ठत्व मिळवून घेतलेल्या कथा अनेक ग्रंथातून वाचावयास मिळाल्या, शेवटी शिवाकडून विष्णूने, सर्वश्रेष्ठ देवत्वही मिळवून घेतलेल्या कथा, अनेक ग्रंथातून वाचायला मिळाल्या. ज्या विष्णूच्या मुलाने (ब्रह्मदेवाने) सुद्धा अनेकवेळा तपश्चर्या करून, शिवाला प्रसन्न करून घेऊन, अनेक वर मागून घेतले, आणि सृष्टी निर्माण करण्याचे सामर्थ्य मिळवून, सृष्टी

निर्माण केली. इतर देव देवींनी सुद्धा शिवारधना करून अनेक प्रकारचे वर मागून घेतलेल्या कथाही फार पुष्कळ वाचायला मिळाल्या. तसेच यक्ष किन्नर, गण गंधर्व, ऋषिमुनी, राजेमहाराजे सर्व, विश्वारंभापासून शिवाचीच उपासना करीत होते. ह्या वरील सर्व लोकांनी (देव, मानवांनी) शिवाची उपासना करून, शिवाला प्रसन्न करून घेऊन, आपल्या असुरी इच्छेप्रमाणे वर मागून घेतलेल्याही कथन पुष्कळ वाचावयास मिळाल्या. वरील शिवाविषयीची ही सर्व प्रकार (शिव-उपासना) विश्वारंभापासूनची आहे. शिव उपासना संपूर्ण भारतात, भारतातील सर्व जातीधर्मात खालच्या वर्गातील अन्त्यजापासून ते उच्चवर्णीय ब्राह्मण ज्ञातीच्या लोकापर्यन्त शिवाची उपासना आहे. तसेच शिव मंदिरे ही शेकडो हजारोने नव्हे लाखोने भारत भूमीवर आहेत. लहान लहान खेड्यापासून ते मोठ्या शहरात, रानावनात आणि लहान वाड्या खेड्यात नदी किनारी, दऱ्याखोऱ्यात, मानवाला अगम्य अशा हिमालयादि महापर्वताच्या वरच्या उंच शिखरावर शिवमंदिरे आहेत. शिवतीर्थ क्षेत्रेही भारतात फारच पुष्कळ आहेत. लहान देवापासून ते मोठ्या (विष्णूआदी) देवा पर्यन्त, ऋषीमुनीपासून ते राजे महाराजे, गणगंधर्वापासून ते रावणादी, दैत्य दानव राक्षसादी, सर्व लोक ज्या शिवाची उपासना करणारे ते शैव, शैवात आणि वीर शैवात एवढाच भेद आहे की, शैव स्थापर लिंगाची उपासना करतात आणि वीरशैव शरीरावर शिवलिंग धारण करतात. बाकी उपासनेचे सर्वच प्रकार शैवांचे तेच वीरशैवांचे एक आहेत. असे असून वीरशैवच तेवढे वेदबाह्य का ?' वीरशैव वेद बाह्य म्हटल्यास सर्व शैवच वेदबाह्य असले पाहिजेत, अशी शंका निर्माण होऊ लागली. परन्तु वेद हे आदी ग्रंथ आहेत ते शिवाच्या (इश्वराच्या श्वासातून निर्माण झाले आहेत.) वेदांच्या अगोदर दुसरे ग्रंथ नसतीलच असेही वाटत होते. या गोंधळाने तर माझे मंन अधिकच व्यथित झाले. अशा परिस्थितीत एका जुने ग्रंथ विक्रत्याकडे जीर्ण अवस्थेत असलेला एक लहानसा ग्रंथ (लहान पुस्तक) मिळाले. त्याचे प्रथम लेखक संपादक अनुक्रमणिका असलेले पाने नाहीत. तसेच शेवटची किती पाने नाहीत हे काही सांगता येत नाही. अशा अवस्थेत असलेल्या पुस्तकाचे नाव आहे "संस्कृत वाङमयाचा इतिहास"

ते पुस्तक वाचल्यावर थोडा आनंद झाला आणि नंतर एक वर्षाने जे ग्रंथ मी मिळविण्याचा प्रयत्न करीत होतो ते वैदिक ग्रंथ म्हणजे चार वेद, सहाशास्त्र, अठरा अधिक दहा असे आठावीस पुराणे, १८० उपनिषदे, २० स्मृति ग्रंथ असे बरेच ग्रंथ मिळाले. तसेच ऐतिहासिक ग्रंथही मिळाले. इतिहास ग्रंथातून असे सिद्धांत मिळाले की, वैदीक आर्य निराळे आणि भारतीय आर्य निराळे आहेत. वैदिक आर्य भारताबाहेरून आलेले आहेत आणि त्यांनी भारतीयांची सत्ता नष्ट करून, आपली सत्ता प्रस्थापित करून, या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणातील पहिल्या भागात लिहिलेला पापाचार निर्माण केला आहे. त्यांनी अनेक देवदेवी निर्माण केल्या आहेत. आणि महापाप करायला लावले आहे. भारतीय आर्यांची देवता विश्व निर्माता ईश्वर (शिव) आहे. वैदिक आर्यांच्या देवता काल्पनिक आहेत. भारतीय आगमनिगमाची धर्मतत्वे भारतीय आर्यांना मान्य आहेत. पण वैदिकांना मान्य नाहीत. वैदिकांचे वेदमंत्र निराळे आहेत. हिंसाप्रधान आहेत आणि भारतीय आर्यांच्या वेदात ते समाविष्ट केले आहेत.

वैदिक आर्य भारता बाहेरून आलेले आहेत, आणि त्यांच्या देवताही निरनिराळ्या आहेत. भारतीय आर्यांचा शिव वैदिकांना मान्य नाही. म्हणून ते शिवास वेद बाह्य मानतात. वैदीक आर्य, भारता बाहेरून केव्हा आले, आणि त्यांनी काय काय प्रकार केले आहे ते सर्व या ग्रंथात सविस्तर पण थोडक्यात लिहीले आहेत. या सर्व ग्रंथावलोकनात वैदीक आर्य भारतीय आर्यांच्या शैव धर्माला व शिव देवतेला आणि शिवोपासकाला वेद बाह्य का म्हणतात ते समजले. वैदिक आर्यांच्या हिंदू धर्मापेक्षा भारतीय आर्यांचा शैव धर्म श्रेष्ठ आहे हेही समजले. त्यामुळे माझ्या मनाची व्यथा बरीच कमी झाली. बरेच समाधान झाले. थोडीशी व्यथा राहिली होती वीरशैव शिवलिंग शरीरावर का धारण करतो. ही प्रथा केव्हा कोणी प्रचलित केली ते मात्र माझ्याकडे उपलब्ध असलेल्या कोठल्याच ग्रंथात सापडले नाही. वीरशैव सिद्धांताचे ग्रंथ मिळविण्याचा प्रथमपासून प्रयत्न केला होता. लातूर, सोलापूर, हुबळी, धारवाड, या शहरातील पुस्तक विक्रेत्याकडे, तसेच वीरशैवांचे मठाधिपत्याकडे पत्र व्यवहार करून वारंवार चौकशी करीतच होतो. पण त्या सर्वाकडून

सध्या शिल्लक नाहीत. उपलब्ध झाल्यावर आम्ही कळवू अशीच उत्तरे येत होती. मी ही पुन्हा पुन्हा पत्रव्यवहार करून चौकशी करीत होतो. ते सर्व व्यर्थच होत होते. तीस पस्तीस वर्षात वीरशैव सिद्धांचा एकही ग्रंथ मिळाला नाही.

इ. स. १९८१ वर्षी दसऱ्याला मी माझ्या मामांच्या गावी परळी वैजनाथला गेलो होतो. माझ्या मामेभावाला वाचायला पुस्तक मागितले धाकटचा मामे भावानी श्री. शंकरप्पा विरभद्रप्पा मिसाळ यांनी दोन पुस्तके मला वाचवयास दिली. ती दोन पुस्तके पाहून व वाचून फार आनंद झाला. तीस पस्तीस वर्षांची व्यथा नाहीशी होऊन मन आनंदाने तुटुंब भरले. मन मोकळे झाले. पस्तीत वर्ष शोधत होतो ते सापडले, अत्यानंद झाला.

त्या दोन पुस्तकांची नावे १. वीरशैव रत्न आणि २. लिंगतत्व दर्पण ।। वीरशैव रत्न या ग्रंथाचे लेखक वे. शा. संपन्न पंडीत काशिनाथ शास्त्री आहेत. या ग्रंथात वीरशैवाचे लिंग धारणेचे अनादितत्व श्रेष्ठत्व सिद्ध केले आहे. या सिद्धान्ता करिता आगम, निगम, उपनिषदे पुराणादी ग्रंथाचे आधार घेऊन हा ग्रंथ लिहिला आहे. दुसरा लिंगतत्व दर्पण हा लिंगानंद स्वामीने लिहिला आहे. या ग्रंथात तामिळ संताच्या वचनाधारे (ही संत वचने आगमोक्त आहेत.) लिंगाचार व लिंग संस्कारादि प्रकार महत्वाचे लिहिले आहेत. हे दोन्ही ग्रंथ वीरशैव सिद्धांताचे दृष्टिने फारच महत्वाचे आहेत. हे दोन्ही ग्रंथ वाचून माझी मनोव्यथा दूर झाली. तशीच सर्व वीर शैवांची व्हायला पाहिजे असे मला वाटू लागले. त्याकरिता एखादा वीरशैव सिद्धातांचा ग्रंथ लिहावा असे वाटू लागले. परंतु ते मला जमणार नाही असे वाटत होते. कारण मी मराठी सातवी शिकलेला, संस्कृत चांगल्या प्रकारे वाचायला येते पण अर्थ कळत नाही, व्याकरणांचे तर अजिवात ज्ञान नाही, असा मी अल्प शिक्षित असल्यामुळे, ग्रंथ लिहिणे हे मला जमणार नाही. म्हणून लिंगतत्व दर्पण. कानडी ग्रंथावर मराठी अनुवाद केलेले माझे परम मित्र, लातूरचे श्री. महेश शंकरप्पा नागुरे वकिल, यांचेकडे मी धाव घेतली, आणि त्यांना विनंती केली की, वीरशैव सिद्धांताचा एखादा ग्रंथ लिहा, तुम्हाला ग्रंथ लिहायला ग्रंथ [illegible] साहित्य मी शोधून पुरवितो. पण त्यांच्याकडून

माझी निराश झाली. ते म्हणाले कीं, माझ्या वृद्धापकाळामुळे मला ग्रंथ लिहिणे झेपणार नाही, आणि आपण दोघे एकमेकांपासून लांब अंतरावर राहतो तुम्ही माझ्याकडे किंवा मी तुमच्याकडे ग्रंथ लेखना पुरते तरी एका ठिकाणी राहणे शक्य नाही. हे त्यांचे म्हणणे ऐकून मी फारच निराश झालो. माझी निराश मुद्रा पाहून नागुरे साहेब, म्हणाले कीं, तुम्हीच कां लिहीत नाही. मी वरीलप्रमाणे माझी अल्पशिक्षीत बाजू सांगितली, व ते मला जमणार नाही असे सांगितले. माझे हे म्हणणे ऐकून ते म्हणाले, कीं, तुम्ही असे निराश होऊ नका व तुम्ही लिहीण्याचा प्रयत्न करा. प्रयत्न केल्यावर तुम्हांला ते जमेल, तुमच्या मनाचा दुबळेपणा काढून टाका आणि ग्रंथ लिहा.

माझ्या परम मित्राचा निरोप घेऊन परत निघालो, आणि त्यांना विचारले, कीं वीरशैव सिद्धांचे दुसरे काही ग्रंथ मराठीत किंवा हिंदित लिहिलेले आहेत. का ? त्यांनी मला त्यांचेकडे असलेला श्री. डॉ. फडके, यांनी लिहिलेला "शिवलींगोपासना" नांवाचा ग्रंथ दाखवला तो फारच महत्वाचा आहे. यांत शिवलिंग उपासनेचे अनादित्व, श्रेष्टत्व, शैवांचे आचार विचार, शैव वीरशैवांचे तत्वज्ञान, शिवलिंगाविषयीचे मूर्ख लोकांनी केलेले आरोपांचे खंडण आगम, निगम उपनिषदे पुराण ग्रंथांचे आधार घेऊन, महान ग्रंथ तयार केला आहे. श्री. डॉ. फडके, पंडीत काशिनाथ शास्त्री व प. पू. लिंगानंद स्वामी ह्या तिघांचे शैव वीरशैव समाजावर महान उपकार आहेत. वीरशैव समाज या तिघा पंडिताचा ऋणी आहे.

या तिघांचा व माझे मामे भाऊ श्री. शंकरप्पा मिसाळ आणि माझे परम मित्र श्री. महेश शंकरप्पा नागुरे वकील यांचा मी व्यक्तिशः शतशः आभारी आहे. श्री, मिसाळांनी, वीरशैवरत्न व लिंगतत्व दर्पण हे दोन ग्रंथ मला दिले नसते तर, आणि श्री. नागुरे वकिल यांनी ग्रंथ लिहीण्याची चालना दिली नसती तर हा ग्रंथ माझ्याकडून निर्माण झाला नसता.

हा सारा ग्रंथ त्यांचाच आहे. असे म्हणणे योग्य होईल. माझ्यातील वैगुण्य या ग्रंथात निर्माण झाली असतील तर ते दोष माझे आहेत आणि काही गुण असतील तर ते ह्या ग्रंथाला आधारभूत असलेल्या. सर्व ग्रंथकाराचे, महान पंडीतांचे आहेत. सुज्ञ वाचकांना अधिक काय सांगावे. हा ग्रंथच त्यांना (वाचकांना) सर्व काही सांगेल.

# लेखकाचे दोन शब्द.

हा विश्वधर्म ग्रंथ लिहिण्याची माझी पात्रता नसून मी हा ग्रंथ लिहिण्याचे धाडस केले आहे. कारण भारत भूमि विश्वारंभापासून पवित्र व शुद्ध होती. कृत, त्रेदा, द्वापार, या तिन्ही युगात चारी वर्णाचे आचार, विचार, उपासना पवित्र आणि शुद्ध होते. इतक्या पवित्र असलेल्या, भारत देशात कलियुगाच्या अरंभापासून. उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांनी, यज्ञयागाच्या, देवदेवीच्यां नावाने महाभयंकर हिंसा, महा अत्याचार, एकेश्वरा ऐवजी हजारो देवदेवी निर्माण करून त्यांनाही महापाप, महाहिंसा करायला लावून त्या देवदेवोंना अधोगतीला घातले आहे. हे कोणी आणि का निर्माण केला आहे. आणि पवित्र व शुद्ध भारत भूमिला अपवित्र व अशुद्ध बनवले आहे. ते या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणातील पहिल्या भागांत 'भारताचा अशुद्ध इतिहास' सविस्तर लिहिला आहे. व पहिल्या प्रकरणातील भाग दुसरा आणि प्रकरण २, ३, व ४ मध्ये भारताचा शुद्ध इतिहास व शुद्ध आणि पवित्र, उपासना लिहिला आहे. हा सर्व प्रकार लिहायला शिकवणारा गुरु म्हणजे माझ्या वाचनातील अनुकूल व प्रतिकूल वाङमय आहे.

मला माझ्या लहानपणापासून, म्हणजे मी शाळेत तिसरे पुस्तक शिकत होतो तेव्हापासून, धार्मिक ग्रंथ वाचायची अवड निर्माण झाली, तेव्हां पासून आजतागायत ती टिकून आहे. पहिल्याने शिवलीलामृत, रुक्मीणी स्वयंवर, रामविजय, पांडवप्रता वगैरे ग्रंथ वाचित होतो. नंतर वारकरी सांप्रदायाचे समग्र वाङमय, रामायण, महाभारत, पुराणे, उपनिषदे. शंकराचार्यांचे वेदांत वाङमय, बौद्ध, जैन, मुसलमान, ख्रिस्ती, अशा अनेक धर्मपंथाचे वाङ्मय. वैदिक शैवागमे, शैव, वीरशैवांचे वाङ्मय, भारताचा इतिहास, वैदिक वाङमयाचा इतिहास, संस्कृत वाङ्मयाचा इतिहास, असे इतिहास वाङमय, अनेक धर्मांचे, अनेक पंथाचे; अनेक विद्वान पंडित महा पंडिताने लिहिलेले, हिंदी, मराठी, असे अनेक प्रकारच्या वाङ्मयाच्या आधाराने हा 'विश्वधर्म' ग्रंथ लिहिला आहे. यात कटुता, पाल्हाळ, द्विरुक्ती, अपसिद्धांत, विसंगती

इत्यादि लेखकोपाधी प्रमाद कोठे घडले असतील, तर त्याबद्दल वाचक वृंदानी मला क्षमा करण्याची कृपा करावी ही नम्र विनंती.

एऱ्हवीतरी मी मुर्खु। जरी जहाला अविवेकु।
तरी संतकृपा दीपकु। सोज्वलु असे ॥ ज्ञानेश्वरी ॥
करविली तैसी केली कटकट। वाकडें की नीट देव जाणे. ॥
कोणा कारणे हे झालेसे निर्माण। देवाचे कारण देव जाणे ॥ तुकाराम ॥

जैसा स्वभावो माय बापाचा। अपत्य बोले जरी बोवडी वाचा।
तरी अधिकची तयाचा। संतोष अथी ॥ ज्ञा. ॥ तरी न्यून ते
पुरते। अधीकते सरते। करुनी घ्यावे तुमते। विनवितु असे ॥ ज्ञानेश्वरी ॥

या ग्रंथाला आधार असलेल्या ग्रंथाची यादी पाचव्या प्रकरणात 'संदर्भ ग्रंथ' या नावाने दिली आहे. त्या संदर्भ ग्रंथातील आधारानेच हा ग्रंथ लिहिला आहे. त्या ग्रंथातील प्रकार, या ग्रंथ लेखनाला ग्राह्य आहेत ते घेतले आहेत. आणि ग्राह्य नसतील ते सोडून दिले आहेत. या ग्रंथात निराधार असा एकही प्रकार लिहिला नाही. तसेच हा ग्रंथ लिहायला माझी (लेखकाची) जी कल्पना आहे, तिलाही आधार संदर्भ ग्रंथाचा आणि मी लहानपणापासून आतापर्यंत वाचलेल्या वाङमयाचा आहे. या ग्रंथ लेखनांत मी ज्या ज्या ग्रंथाचे आधार घेतले आहेत, त्या सर्व अनुकूल व प्रतिकूल ग्रंथकाराचा मी फार आभारी आहे. सूज्ञ वाचकास अधिक काय सांगावे. हा ग्रंथच त्यांना सर्व कांही सांगेल.

## (लेखकाचा) परिचय

जन्म भमी मुक्काम नांदगाव. तालुका अहमदपुर जि. लातूर इ. स. १९५४ च्या दसऱ्या पासून श्री. संत ज्ञानेश्वर महाराजाच्या (पुण्य नगरीत). मुक्काम. पोष्ट आळंदी देवाची तालुका. खेड. जि. पुणे, येथे राहात आहे.

ले. का. शि. शंकाये.
आळंदी देवाची.

॥ ॐ नमः शिवाय ॥



श्री. का. शि. संकाये, आळंदी देवाची.

लेखकाचा परिचय

जन्मभूमी मुक्काम नांदगाव, ता. अहमदपूर, जि. लातूर. इ. स. १९५४ च्या दसऱ्यापासून श्री संत ज्ञानेश्वर महाराजांच्या (पुण्यनगरीत) मुक्काम, पो. आळंदी देवाची ता. खेड, जि. पुणे येथे राहात आहे.

पहिल्या प्रकरणांत, ब्रह्म, विष्णु, महेश, सावित्री, लक्ष्मी, पावती, राम, कृष्ण, सीता, रुक्मिणी, विष्णुचे अवतार, शंकराचे अवतार, पार्वतीचे चरित्र गणपती, कार्तिकस्वामी या सर्वांची वाहने राहाण्याचे ठिकाण अंतराळांत स्वर्ग, पृथ्वीच्या खाली पाताळ. तपःश्चर्या करून देवां-कडून वर मिळवणे. ऋषीलोकांना राग आल्यावर महाभयंकर शापही देत होते. हे सर्वमोठ्या देवदेवीचा महापाचार व त्यांची अधोगती. तसेच क्षुद्रदेवदेवाचा प्रकार मी लिहिलेला फार अल्प आहे. क्षुद्रदेव-देवीचा सविस्तर प्रकार रामायणांत रामरावण युद्ध प्रसंगी, व महा-भारतात कौरव पांडव युद्ध प्रसंगी, युद्धांत मरण पावलेल्या शूर वीरांचे व हत्ती घोड्यांचे मांस खाण्याकरिता लाखो कोट्यावधी येत होत्या. ते मांसहार करताना एकमेकांत होणारी भांडणे. आणि आनंदाचे वेळी होणारे त्यांचे संवाद, वाचकाना वाचायला मिळतो. सर्वांत विशेष प्रकार श्रीएकनाथ महाराजांनी लिहिलेल्या 'भावार्थ रामायण' ग्रंथात फारच उत्तम प्रकारे लिहिला आहे.

यावर उद्धृत केलेल्या श्रेष्ठ देवदेवी मोक्ष देणाऱ्या आहेत. आणि क्षुद्र देवदेवी ऐहिक सुखे देणाऱ्या आहेत. मोक्ष मिळवण्याकरिता उपास-नेचे प्रकार, ऐहिक सुखे मिळवण्याकरिता उपासनेचे प्रकार, तसेच नव-ग्रह, शनी मंगळादि ग्रह मानवाला त्रास देतात. त्यांना प्रसन्न ठेवण्या-साठी उपासनेचे प्रकार असे हे हजारो देवदेवी आहेत त्याच्या उपासने-करिता लाखो ग्रंथही आहेत. हा वरिल प्रकार कलियुगांत सर्व श्रेष्टत्वाने भारतातील वैदिक आर्य (हिंदू) धर्मिय लोक मानतात,

यावर उद्धृत केलेल्या प्रकाराला आधार हजारो ग्रंथ आहेत त्यांत मुख्य ग्रंथ-नाथांच्या व रामदासस्वामिच्या शंभर कोटी श्लोकांचे 'रामायण' व्यासांचा सव्वालाख श्लोकांचा 'महाभारत' आठरा महापुराणे, १८ उपपुराणे. असे ३८ मुख्य ग्रंथ आहेत. यांचे शाखा ग्रंथ हजारो आहेत या सर्व प्रकाराला वैदिक आर्य (हिंदू) धर्मिय लोक फारच श्रेष्ठ मानतात या सर्व प्रकाराचे मी खंडण केले आहे. हे सर्व प्रकार कलियुगात भारता बाहेरून आलेल्या उत्तर ध्रुवीय वैदिक आर्या (हिंदू) ने कल्पना चातुर्याने कल्पित प्रकार निर्माण केला, आहे आणि तो कलियुगांत निर्माण केला आहे या सर्व प्रकाराचे मी खंडण केले आहे. कारण हा सर्व प्रकार मानवाला अधोगतीला नेणार आहे.

शंका–रामायण, महाभारत, पुराणे हे ग्रंथ कलियुगा अ गोदरचे आहेत. आणि त्या ग्रंथाधारे निर्माण केंलेला वरील प्रकार मानवाला घातक कसा होईल ?

समाधान–रामायण, शतकोटीचे बीज वाचे उच्चारी ! रघुकुल टिळक राम दासा अंतरीः। असे रामदास स्वामी म्हणतात. नांथांच्या भावार्थ रामायणात. शंकराने शंभर कोटी श्लोक त्रिभुवनाला ( स्वर्ग, मृत्यु, पाताळ) या तीन लोकांना वाटून दिले आहेत. वाटणीचा प्रकार.

३३ कोटी, ३३ लक्ष, ३३ हजार, ३३ शे, ३३, इतके श्लोक स्वर्गात, इतकेच मृत्युलोकात, इतकेच पाताळ लोकात वाटून देऊन एक श्लोक उरला होता. त्याचेही तीन भाग केले त्यात दोन अक्षरे उरली त्याची वाटणी तीन लोकात देतां येत नाही ती दोन अक्षरे ‘ राम ’ होती ती दोन अक्षरे शंकरानी आपणाला (वाटणी करणाऱ्याला वाटणी केल्याचा मोबदला म्हणून स्वतः आपण ठेऊन घेतली. आणि त्या दोन अक्षराचे चिंतन शंकर अखंड करतो. असा हा प्रकार शंभर कोटी रामायणाचा आहे, शंभर कोटी श्लोकाचे रामायण अजिबात अस्तीत्वात नाही. चालू काळात शेकडो रामायण, रामचरित्रपर ग्रंथ आहेत. त्या सर्वांची श्लोक संख्या शंभर कोटी होणार नाही. आणि एवढे मोठे रामायण महर्षि वालिमकीने लिहिले नाही. वालिमकीने फक्त २४००० चोवीस हजार श्लोक लिहिले आहेत. आणि ते सर्व मानवाचे कल्याण करणारे आहेत. तसेच महाभारत सव्वा लाख श्लोकाचा व्यासानी लिहिला नाही व्यासानी फक्त ८८०० आठ हजार आठशे श्लोक लिहिले आहेत.

पुराणे–व्यासाआगोदरच्या कालांत फक्त एकच पुराण होते. (शिवपुराण) व्यासांनी त्याचे दहा भाग केले होते. ते मानवाचे कल्याण करणारे होते. त्या दहा पुराणाच्या आधारे वैदिक आर्य हिंदूने १८–१८ असे छत्तीस पुराणे केली आहेत त्या व्यासाच्या १० पुराणांचा सत्यांश सोडून बाकीचे प्रकार मानवाला अधोगतीला नेणारे आहेत. वैदिक आर्यांनी निर्माण केलेले मानवाला घातक असलेल्या प्रकाराचे मी खंडण केले आहे, आणि मानवाला कल्याणकारक असलेल्या प्रकाराचे श्रेष्ठत्वाने मंडण केले आहे-

शंका–या खंडण प्रकारास आधार काय आहे ? असे वाटणे साहजिक आहे.

समाधान–वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या घातक प्रकाराला आधार विस्तारभायामुळे संक्षिप्त लिहित आहे सृष्टीवर प्रथम निर्माण झालेल्या देवमानवाने निर्माण केलेले २८ आगम, ऋषीमुनीने निर्माण केलेल्या, निराकारी, एकेश्वरी, एकनामी, अहिंसा तत्त्वी असलेले वेद, वालिमकीने लिहिलेल्या २४००० श्लोकाचे रामायण व्यासांनी लिहिलेल्या ८८०० श्लोकाचे महाभारत आणि व्यासांनी पुराणाची केलेली १० पुराणे तसेच कलियुगांत भारतीय आर्यांनी निर्माण केलेले मानवकल्याणपर असलेल्या उत्तम व सर्वश्रेष्ठ असलेल्या ग्रंथाचा आणि आधुनिक

पंडित महा पंडितांनी मानव कल्याणाकरिता निर्माण केलेल्या ग्रंथाचा आधार आहे.

## देव या शब्दाचा अर्थ

सृष्टीवर प्रथम मानव निर्माण झाले त्यांना पाच प्रकारची संज्ञा आहे. १) देव, २) नाग, ३) यक्ष, ४) गंधर्व, ५) किन्नर. ह्या पाचही प्रकारातील लोक मानवच होते. त्यात पहिल्या प्रकारातील मानवाला देव म्हणत होते. ते मानवच होते पण ते दिव्य गुण युक्त होते. दिव्य गुणाची व्याख्या पुढीलप्रमाणे आहे.

## २०. देवमानवातील दिव्यगुण :

१) आत्मवान–ज्याचे अंतःकरण आपल्या ताब्यात आहे.

२) नियतात्मा –ज्याने आपले अंतःकरण आपल्या ताब्यात ठेवले आहे.

३) अदीनात्मा– असाधारण तेजाने दीनता रहित, महासंकट प्रसंगी भीती उत्पन्न होत नाही. घावरत नाही, अथवा क्रोधित होत नाही.

४) सर्वसाधारण गुण– गुणवान, उत्तम, श्रेष्ठ, प्रशसनिय, गुणयुक्त.

५) सर्वगुणापेत– अनेक प्रशंसनिय गुणाने युक्त.

६) श्रेष्टगुणैर्युक्त– अनेक श्रेष्टगुण असलेला.

७) शुभलक्षण– अनेक प्रकारचे शुभगुण.

८) वशी– सर्व बाह्येंद्रियाला आपल्या आधीन ठेवणारा. तसेच–माता, पिता आचार्य गुरु देवासमोर विनम्र भाव धारण करणारा.

९) जित क्रोध– ज्याने क्रोधाला जिंकले आहे.

१०) साधु– ज्याचा गोड आणि मृदु स्वभाव आहे.

११) नीतिमान– मानवधर्म नीति, राजधर्म नीतिमध्ये चतुर.

१२) धर्मज्ञ– श्रौतस्मार्त धर्माचे रहस्य जाणणारा.

१३) कृतज्ञ– अपकाऱ्याकडे दुर्लक्ष करून उपकाराला फारच मानणारा.

१४) शुची– स्नानादि बाह्यकर्माने बाह्यशुद्धी आणि प्रणायाम, प्रत्याहाराने ज्याची अंतः शुद्धी झाली आहे.

१५) चारित्र्यसंपन्न– सदाचाराने युक्त.

१६) दृढव्रत– जो आपत्ति काळातसुद्धा धर्माचरणाचा त्याग करीत नाही.

१७) अनसूयक– विद्या, ऐश्चर्य तपादि प्रकारची दुसऱ्याची उन्नती सहन न होणे याला असूया म्हणतात. हे ज्याच्यात नाही, अर्थात जो दुसऱ्याची उन्नती पाहून संतुष्ट होतो.

१८) आर्य– सर्वांना आवडता, पूज्य.



१९) समाधीमान– समबुद्धीयुक्त.

२०) गंभीर– समुद्राप्रमाणे गंभीर.

२१ ) क्षमावान– पृथ्वीसारखा क्षमावान.

२२ ) त्यागवान्– कुबेरासारखा समान दाता.

२३ ) सत्यस्थित– धर्मासारखा सत्याचे पालन करणारा.

२४ ) सम– सुखदु:ख प्राप्त झाल्यावर, शत्रुमित्राशी संबंध आल्यावर, हर्ष विशाद न करता, विषमभाव प्रगट न करता समभावाने व्यवहार करतो (वागतो)

२५) सद्भक्त– सज्जनाचा आश्रय दाता. दुर्जनाचा त्याग करणारा.

२६ ) श्रीमान्– लक्ष्मीवान् (धनवान् )

२७ ) धाता– सर्व प्रजेचे धारण पोषण करणारा.

२८ ) सर्वभूत हितेरत:– सर्व प्राण्याचे हितकरणारा, सर्व प्रजेचे हित करण्यात दक्ष, सर्वप्राण्यांचे कल्याण करण्यात रममाण होणारा.

२९ ) सर्वलोक रक्षिता– सर्व जीवांचे, स्वजनाचे रक्षण करणारा.

३०) धर्मरक्षिता– धर्माचे रक्षण करणारा, अधर्माचा त्याग करणारा.

३१) सर्व लोकप्रिय– सर्व लोकांना आवडता असणारा.

३२) प्रजापतीसम (प्रजारक्षक)– प्रजेचे पालन करणारा.

३३) अरिन्द्रम–शत्रुंचा नाश कराणारा.

३४) प्रतापवान–केवळ ज्याचे नाव ऐकून शत्रुचे हृदय फाटून जाते असा पराक्रमी.

३५) यशस्वी–शत्रुचा पराभव करून ज्याने यश मिळवले आहे.

३६) महेष्वास–ज्याचे धनुष्य महान आहे. शस्त्रस्त्रे उत्तम आहेत.

३७) विद्वान – आत्मानात्म तत्त्वाला यथार्थ जाणणारा, ज्ञानयुक्त, सर्व प्रकारचे लौकिक, अलौकिक कर्म, आणि व्यवहार कुशल, अशा सर्व कर्मांत निपुण असलेला.

३७) बुद्धिमान् – उत्तम बुद्धियुक्त, उत्तम स्मरणशक्तियुक्त.

३९) आगम निगमोक्त तत्वज्ञ – आगम निगमाचे तत्व जाणणारा.

४०) वीर्यवान् – दिव्यशस्त्रास्त्र सामर्थ्याने शत्रुला परास्त करणारा.

४१) धर्यवान् – हिमालयासारखा धैर्यवान्.

४२) सत्य पराक्रमी – सत्याच्या रक्षणाकरिता महापराक्रम करणारा.

४३) समर्थ – लौकिक व्यवहारात तसेच प्रजा रंजनादि कार्यात चतुर.

४४) सत्यवान् – सत्य भाषण करणारा.

४५) वाग्मी – उत्तम वक्ता.

४६) समविभक्तांग – शरीराचा प्रत्येक अवयव ज्याचा सुंदर आहे, धष्टपुष्ट तसेच दर्शनीय (देखणा) आणि बलवान आहे

४७) सुशिरा – ज्याचे शिर उत्तम आहे, ज्याचे मस्तक उत्तम आहे.

४८) सुललाट – ज्याचे कपाळ उत्तम आहे.

४९) महाहनु – ज्याची हनुवटी मोठी आहे.

५०) कंबुग्रीव – शंखासारखा जयाचा गळा आहे.

५१) महाबाहु – (आजानुबाहु) ज्याच्या भुजा मोठ्या आहेत. गुडघ्यापर्यंत ज्याचे हात लांब आहेत.

५१) पीनवक्षा – ज्याचे वक्षस्थळ, छाती, आणि खांदे उत्तम बलयुक्त आहेत.

५२) विशालक्ष – ज्याचे डोळे मोठें आहेत.

५३) प्रियदर्शन – जो सुंदर आहे, सर्वांना प्रिय, ज्याची सुंदर आकृती आहे.

५४) द्युतिमान् – जो अत्यंत तेजस्वी आहे.

महादेव, ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र, स्कंद, गणपती, वीरभद्र, चंद्र, सूर्य, सोम, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहू, केतु, वेद, धर्म, वायु, अग्नि, पर्वत, स्वर्ग आदि पुष्कळ नावे पुरुषांची होती तसेच त्यांच्या स्त्रियांची नावे दुर्गा, सावित्री, लक्ष्मी, शची, आदि नावे होती. हे सर्व दिव्य गुण युक्त देवमानव होते. ते सर्व अयोनी संभव होते. सृष्टी वर प्रथम मानव निर्माण झालेल्या मानवातील दिव्यमानव होते. हे सर्व सत्य युगारंभी होते. यांच्यापासून पुढे मैथुनी प्रजा निर्माण झाली. त्रेता-युगांत दिव्यगुणयुक्त हनुमान आणि राम हे दोघे होते. द्वापारयुगांत एक श्रीकृष्ण होता.

वरील देवमानवांची नावे थोडी फार आगम निगमात आहेत. रामायण, महाभारत आणि पुराणांत पुष्कळ आहेत. यावरील सर्व देवमानवाला, वैदिक आर्य हिंदूंनी कसे भ्रष्ट केले आहे ते या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणांत पहिला भाग 'भारताचा अशुद्ध इतिहास' या नावाने लिहिला आहे.

## वाल्मिकी रामायणातील पात्र परिचय

रामायण ग्रंथ रामाच्या अगोदर १० हजार वर्षं लिहिला नव्हता. रामाला राज्यप्राप्ती झाल्यानंतर आणि अश्वमेध यज्ञाच्या अगोदर या काळात वाल्मिकीने रामायण रचना केली आहे. आणि ती २४००० श्लोकाची आहे.

१. दशरथाने पुत्रकामेष्ठी यज्ञ केला त्या यज्ञातून यज्ञनारायण प्रगट होऊन पायस (खीर) प्रसाद दिला, त्यामुळे दशरथाला मुले झाली, हा प्रकार खोटा आहे. शृंगऋषीने स्त्रीपुरुषाचे संतती प्रतिबंधक असलेले दोष नष्ट होण्याकरिता दिव्य वनस्पती औषधांचा पाक (खीर) करून राजाला व राण्याना खायला दिले होते त्या औषधी सेवनाने राजा राण्यांचे शारीरिकदोष नष्ट होऊन मुले झाली होती.

२. राम हा विष्णुचा अवतार नव्हता. दशरथ राजाचा मुलगा होता. तो तुम्हा सारखा मानव होता. परंतु तुमच्या आमच्या पेक्षा तो श्रेष्ठ होता म्हणने तो महामानव होता रामात दिव्य गुण होते तो दिव्य मानव होता.

३. सीता शेतनांगरताना शेतात सांपडली नव्हती, ती अयोनी संभव

नव्हती, ती जनकाच्या बायकोच्या पोटी जन्मली होती.

४. सीतेचे अग्नी दिव्य म्हणजे सीतेने अग्नित उडी टाकली नव्हती. रामाने अग्नि नावाच्या ऋषीकडून शास्त्र नियमाप्रमाणे शुद्धी संस्कार करून शुद्ध करून घेतली होती.

५. जटायु पक्षी नव्हता तो दशरथाचा मित्र होता तो ब्राह्मण होता. राजपुत्र होता. जटायु आणि दशरथ या दोघांचे विद्याध्ययन एका गुरुकडे झाले होते. त्याने वानप्रस्थ आश्रम स्विकारून वनांत राहात होता.

६. अहिल्या उद्धार:— अहिलेल्या गौतमाने शाप देऊन शिळा केली होती. आणि रामाच्या पादस्पर्शाने शिळेची अहिल्या झाली. हे सर्व खोटे आहे. अहिलेल्या गौतमाने शाप दिला नव्हता. पतित झालेल्या आहिलेल्या आपल्या आश्रमात तप करायला सांगून तिचा त्याग करून अन्य वनांत निघून गेला होता. पुढे काही दिवसाने विश्वामित्र ऋषी व रामलक्ष्मणादि मंडळी गौतम आश्रमजवळून जात होते. विश्वामित्राने रामाला अहिलेची भेट घेऊन जाऊ. असे सांगितले. रामासह सर्व मंडळी आश्रमांत गेले तपोबलाने दिव्य झालेल्या आहिलेला पाहून रामाला आनंद झाला. राम लक्ष्मणाने तिला नमस्कार करून कुशल विचारले. आहिलेनेही रामादिकांचा सत्कार केला. त्याचवेळी गौतमऋषीही योगायोगाने जवळपास आले होते. विश्वामित्राने आपला शिष्य पाठवून त्यांना बोलवून घेतले. सर्वांना आनंद झाला तपोबलाने पावन झालेल्या आहिलेचा गौतमाने स्विकार केला आशीही सत्य कथा आहे.

प्रल्हाद, बळी विभीषण, राक्षस होते ते सद्धर्मी होते परंतु चिरंजीव नव्हते. चिरंजीव हा प्रकार निसर्ग नियमाविरुद्ध आहे.

७. हनुमान माकडाच्या जातीचा वानर नव्हता. तो मानव होता. तो पवन राजाचा मुलगा होता. तो राजपुत्र होता.

८. मारुती उडी मारून लंकेत गेला नव्हता, पोहून गेला होता. तसेच द्रोणागिरी पर्वतावरून औषध आणले त्या वेळी तो विमानात बसून गेला होता. त्याने पर्वत उचलून आणला नव्हता. तसेच तो चिरंजीव नव्हता. त्याला कोणी वर देऊन शक्तीसंपन्न केले नव्हते तो स्वतंत्र शक्तीसंपन्न होता.

९. रामाला समुद्र हात जोडून शरण आला हा प्रकार काल्पनिक आहे. सागर नावाचा एक मानव होता. तो समुद्र किनारी राहात होता. त्याला समुद्राचे खोल उथळ ज्ञान होते. त्याने पूल बांधण्याकरिता ज्या ज्या ठिकाणी पाणी उथळ होते, असा मार्ग दाखवला होता. आणि पूल बांधण्याचे ज्ञान नलाला आहे असे सांगितले होते.

१०. रावणाला १० तोंडे नव्हती एकच तोंड होते.

११. कुंभकर्ण रामायणातील वर्णनाप्रमाणे ३२०० बत्तीसशे मैल उंच

नव्हता. रावण, बिभीषण, कुंभकर्ण आदि राक्षस, दानव, असूर यक्ष, दैत्य आदि सर्व मानवच होते. मानवासारख्या आकाराचेच होते त्यांचे म्हणजे सर्वांचेच आचार विचार अधर्माचे नव्हते रावणासारखे काही थोडे लोक अधर्मी, अत्याचारी होते. बिभीषण, बळी, आदि अनेक लोक सद्धर्माचारी होते.

१२. रावणाची लंका सोन्याची नव्हती.

१३. रामायण काला अगोदर व नंतर मानवाचे चार वंश होते. देव, आर्य (नरमानव), वानर आणि राक्षस. पाचवा पिशाच. पिशाच हे लोक शंकराच्या राज्य कक्षेत होते. शंकराचे गण, सैन्य, प्रजा, पिशाच्च, पिशाच्च नावाचे मानवच होते.

१४. शंकर हा देवमानव होता, तो राजा होता. त्याचे राज्य, नगरी हिमालय पर्वतावर कैलास नावाने होती. त्याचे सहकारी सर्व पिशाच्च नावाच्या वंशाचे मानत होते. त्यांच्या भाषेला पैशाचीक भाषा म्हणत होते. पैशाची भाषेचे काही धर्म ग्रंथ होते.

१५. विष्णु—हाही देवमानव होता त्याचे राहाण्याचे ठिकाण हिमालयावरच होते. त्याच्या नगरीचे नाव वैकुंठ होते.

१६. ब्रह्मदेव, हाही देवमानव होता त्याचेही ठिकाण हिमालयावरच होते. त्याला ब्रह्मपुरी किंवा सत्यलोक म्हणत होते.

१७. इंद्र, हाही देवमानव होता, त्याची अमरपुरी (अमरावती) नगरी हिमालयवरच होती. तो त्या काळात सर्वभौम राजा होता.

१८. ३३ कोटी देव नव्हते, सगराला २० हजार बायका नव्हत्या, एका बायकोला ६० हजार मुले नव्हती, कार्तिक स्वामीला सहा तोंडे नव्हती आणि सहा माता नव्हत्या, वीरभद्र, जटेतून निघाला नव्हता, पार्वती हिमालय पर्वताची मुलगी नव्हती, दक्षाला मेंढ्याचे तोंड नव्हते. गणपतीला हत्तीचे तोंड नव्हते. बैल, सिंह, मोर, उंदीर वाहने नव्हती.

हा सर्व प्रकार वैदिक आर्य हिंदू पुरोहितांनी काल्पनिक प्रकार निर्माण केला आहे.

## महाभारतातील पात्र परिचय

१) श्री कृष्ण विष्णु अवतारी देव नव्हता तो वसुदेवाचा मुलगा होता. महामानव रामासारखा दिव्य पुरुष होता.

२) पांडुराजाची मुले (पांडव) नियोग पद्धतीने निर्माण केले होते.

३) पांडुच्या मृत्युला कारण कोणाचा शाप नव्हता. त्याला क्षयरोग, म्हातारपण, तपचरणाने शारीरिक दुर्बलता आणि हिमालयावरील थंड हवा या कारणाने पांडुचा मृत्यु झाला.

४) धृतराष्ट्राला शंभर मुलगे आणि एक मुलगी अशी एकशे एक मुले

नव्हती. दोन मुलगे आणि एक मुलगी अशी तीनच मुले होती.

५) कर्णाचा बाप आकाशातील तारा 'सूर्य' नव्हता तो सूर्य नावाच्या ऋषीपासून निर्माण झाला होता. त्याला अभेद्य कवच-कुंडले नव्हती. त्याचे सर्व प्रकारचे विद्याध्ययन द्रोणाचार्याकडेच झाले होते. त्याला कोणीही शाप दिला नव्हता.

६) एकलव्याने द्रोणाचार्यांच्या मातीच्या पुतळ्यापासून धनुर्विद्या शिकली नव्हती. त्याचा गुरू दुसरा होता. त्याच्याकडून द्रोणाचार्यांच्या शिष्यांनी म्हणजे कौरव पांडवानी पशूमुखबंधन विद्या शिकली होती.

७) सत्यवतीही माशाच्या पोटात सापडली नव्हती. ती उपरीचर नावाच्या राजाची मुलगी होती. उपरीचराने आपला मित्र 'दाश' राजाला दत्तक दिली होती.

८) परिक्षितीला कृष्णाने जीवंत केले नव्हते. तो जन्मला तेव्हा मेलेला नव्हता.

९) भिष्माचार्य गंगा नदीच्या पोटी जन्मला नव्हता. त्याची आई मानव स्त्री होती. तीचे नाव गंगा होते. ती जन्हु राजाची मुलगी होती.

१०) द्रौपदी यज्ञातून जन्मली नव्हती. तिच्या वडलांचे (द्रुपदाचे) नाव यज्ञसेन होते. तसेच ती पाच जणांची बायको नव्हती. ती एकट्या धर्माची बायको होती, आणि तीचे वस्त्र हरण झाले नव्हते.

११) शिखंडी हा स्त्रीचा पुरुष झालेला नव्हता. तो जन्मतच पुरुष होता. तो महारथी योद्धा होता.

१२) कृष्णाची द्वारकानगरी सोन्याची नव्हती. तसेच समुद्रात नव्हती.

१३) कृष्णाला १६१०८ बायका नव्हत्या तसेच त्याने गौळणीबरोबर व्यभिचार केला नव्हता. त्याला एकच बायको होती. 'रुक्मीणी' आणि एकच मुलगा होता 'अनिरुद्ध'.

१४) कृष्ण जार, चोर, नव्हता तसेच गौळणी व्यभिचारी नव्हत्या.

१५) ५६००००००० छपन्न कोटी यादव नव्हते.

१६) गोकुळातील लोकाचे पर्जन्य वृष्टी पासून रक्षण करण्याकरिता कृष्णाने गोवर्धन पर्वत करांगळीवर उचलून धरला नव्हता. गोकुळातील लोकांच्या सहकाराने गोवर्धन पर्वत पोखरून गोकूळवासी लोकांचे रक्षण केले होते. ही पर्जन्यवृष्टी इंद्राने करविली नव्हती. ती नैसर्गिक मेघ वृष्ठी होती.

१७) ब्रह्मदेवाने गोप, गायी, वासरे चोरून नेलेली कथा निव्वळ खोटी आहे.

१८) ब्रह्मदेव विष्णुच्या बेंबीतून निघालेल्या कमळातू निर्माण झाला नाही.

१९) ब्रह्मदेव देवमानव होता. त्यांने कन्या गमानाचा प्रयत्न केला नव्हता. तसेच त्याने सृष्टी निर्माण केली नाही.

२०) परिक्षितीला सर्पदंशाने मरण आले नव्हते. त्याला सर्प जातीच्या मानवाने मारले होते.

२१) सहस्त्रार्जुनाला तसेच बाणासुराला एक एक हजार हात नव्हते. बाणासुराचे रक्षणासाठी कृष्णाचे आणि शंकराचे युद्ध झाले नाही.

२२) राम आणि कृष्ण हे ऐतिहासिक महापुरुष होते. महापुरुषाची चरित्र पूजा (त्यांच्या पवित्र चरित्राचे अनुकरण), केल्याने होते. चित्र पूजा, मूर्ती पूजा करणे आणि त्यांना अवतारी देवमानणे पाप आहे. अवतारवाद विनाशकारी मिथ्या कल्पना आहे तसेच चमत्कार वाद सर्व नाशाचा मार्ग आहे. अवतार, चमत्कार, आलंकार वादाने महामानवाचे पावन चरित्र नष्ट केले. आहे.

२३) कल्पवृक्ष, अमृत, परिस, चिरंजीव. चिंतामणी, कामधेनु, अंतराळात २१ स्वर्ग. पृथ्वीच्या खाली ७ पाताळ, शनि मंगळादि ग्रह पीडा, मानवाला अनेक तोंडे, अनेक हात, अनेक डोळे, मासा, कासव, डुक्कराचे पोटी मानवाचा जन्म (विष्णुचे अवतार) मानवाला घोड्याचे, सिंहाचे तोंड, महादेव स्मशानात राहातो, त्याचे सैन्य भूत पिशच्च, वर देणे, शाप देणे, अनेक पती, अनेक माता, अनेक बाप हे सर्व काल्पनीक आहे खोटे आहे. निसर्गनियमा विरुद्ध आहे.

ह्या वरील शुद्ध प्रकाराच्या विरुद्ध प्रकार, रामायण, महाभारत, पुराणे आदि ग्रंथात कोणी आणि का निर्माण केला आहे, अशी शंका सहजच उद्भवते. त्याचे. समाधान असे.

हे सर्व उत्तर ध्रुवावरून आलेल्या वैद्धिक आर्यांनीं मुद्दाम निर्माण केले आहे असे करण्यांचा त्यांचा हेतू भारतीय मानव व त्यांचे उपास्य देव जंगली, मूर्ख, पाप करणारे आत्याचारी आहेत असे भासवून भारतातील म्हणजे त्याच्या कक्षेत गेलेल्या सर्व लोकांना महापाप करायला लावले आहे. या पापकर्माचा विचार या ग्रंथातील प्रकरण एक मधील पहिल्या भागात 'भारताचा अशुद्ध इतिहास' लिहिला आहे.

वाचकवृंद ह्या अशुद्ध इतिहास आणि अशुद्ध देवीदेवतांच्या उपासनेचा त्याग करतील. आणि पहिल्या प्रकरणांतील भाग २ मधील 'भारताचा शुद्ध इतिहास' तसेच प्रकरण २–३–४ मधील विश्वनिर्मात्या विश्वपित्याच्या शुद्ध उपासनेचा अंगीकार करून आत्मोद्धार करून घेतील अशी ईश्वराजवळ प्रार्थना करून निवेदन संपवीत आहे

ॐ शांतिः शांतिः शांतिः

---

# प्रकरण पहिले विषयानुक्रमणिका

भाग २ भारताचा शुद्ध इतिहास

## प्रकरण दुसरे

## प्रकरण तिसरे

### भारतीय आर्य वीरशैवांच्या लिंग धारणेचे प्राचिनत्व

| अनुक्रमांक | विषय | पृष्ठांक |
| --- | --- | --- |

## प्रकरण चौथे

### वीर शैवांचा लिंगाचार व लिंगसंस्कार

## प्रकरण पाचवें

----

# धर्मांचे महत्त्व

**॥ अहिंसा परमो धर्मः ॥** **॥ आचारः परमो धर्मः ॥**

धर्म करतो चित्त पवित्र धर्म देतो उच्च चरित्र
धर्म आहे सदा सर्वांचा मित्र धर्म देतो फल सुविचित्र
धर्म करतो विपत्तीचा नाश धर्म करतो सर्व पाप-विनाश.
धर्म करतो विज्ञान-प्रकाश धर्म भरतो जीवन उल्हास
धर्म आहे सर्वांचा आधार धर्म आहे जीवनाचे सार
धर्म करतो सर्वांचा उद्धार धर्म आहे विशुद्ध आचार
धर्म हरण करतो कलह-क्लेश धर्म हरण करतो राग द्वेष
धर्म हरण करतो हिंसा निःशेष धर्म उपजवितो दया विशेष
धर्म हरण करतो सारी भ्रांति धर्म हरण करतो मोह-अशांति.
धर्म हरण करतो सारी भ्रांति धर्माने मिळते शाश्वत शांति
धर्माने वाढतो सात्त्विक भाव धर्म करवतो त्याग-भाव
धर्माने मिळते इच्छित काम धर्माने मिळते अर्थोत्तम
धर्माने मिळते पद निष्काम धर्माने मुक्तिलाभ सुख-धाम.
धर्मांत सहज अहिंसा-सत्य धर्मांत सदाचार सर्व नित्य
धर्मांत आहे गुण अचिंत्य धर्मांत मिटतो भाव अनित्य
धर्मात नाही निंद्य स्वार्थ धर्माचे लक्ष्य एक परमार्थ
धर्मात सकल सर्व पुरुषार्थ धर्मात पूर्ण ब्रह्म एकार्थ
धर्मात नाही कुमतीला स्थान धर्म आहे शुद्ध बुद्धीची खाण
धर्माने होते नित्य उत्थान धर्माने मिळतो श्रीभगवान्
धर्मात पापाचा सहज अभाव धर्म उपजवितो पवित्र भाव
धर्माने वाढतो सेवाभाव धर्म वाढवितो शिवभाव
धर्म करतो दिव्य विवेक-विकास धर्म करतो त्रितापांचा नाश
धर्म उपजवितो प्रभु-पदविश्वास धर्म बनवितो प्रभूचा दास
धर्म उपजवितो विषय-विराग धर्म देतो प्रभु-पद-अनुराग.

अहिंसा लक्षणो धर्मः। हिंसाचाराधर्म लक्षणा ॥
अहिंसा परमो धर्मः। आचारः परमो धर्मः ॥
अहिंसा परमो धर्मः। न हि सत्यात् परो धर्मः। आचारः प्रथमो धर्मः
अहिंसा परमो धर्मः। यतो धर्मस्ततो जयः ॥
धर्म एव हतो हन्ति। धर्मो रक्षति रक्षितः ॥

चलं चित्तं चलं चित्तं। चले जीवनयौवने। चलाचलेहि संसारः— धर्म एकोहि निश्चलः ॥

# प्रस्तावना

॥ न संतोषात्परं सुखम् ॥

**षटस्थळ ब्रह्मी गुरुवर्य श्री १०८ रेवणसिद्ध शिवाचार्य परंडकर महाराज,**



श्रीमदुज्जयिनी सद्धर्मसिंहासन दारुकशाखीय नंदिगोत्रीय शिवतत्त्वनिष्ठ, पंचाचार्य तत्त्वप्रचारक, परंडा बृहन्मठाध्यक्ष षटस्थळ ब्रह्मी गुरुवर्य श्री १०८ श्रीगुरु रेवणसिद्ध शिवाचार्य गुरुराचलिंग शिवाचार्य परंडकर महाराज, परंडकर बृहन्मठ, १९२२ लोखंड गल्ली, बार्शी ४१३४०१ जि. सोलापूर (महाराष्ट्र).

(ट्रस्टी–परंडकर बृहन्मठ, परंडा व बार्शी; संपादक–साप्ताहिक वीरशैव गर्जना, बार्शी; प्रोप्रायटर–गुरुवर्य प्रिंटिंग प्रेस, बार्शी; सरपंच–श्री मन्मथस्वामी संस्थान, श्रीक्षेत्र कपिलधार, जि. बीड; पंचकमिटी बार्शीकर; कार्यवाह–श्रीमद् वीरशैव चरपट्टाधिकारी संस्था; विश्वस्त–अखिल भारतीय अखंड शिवनाम सप्ताह मंडळ; मॅनेजर–श्री जगद्गुरु विश्वाराध्य विद्यार्थी निलयं, पुणे) हे प्रस्तुत ग्रंथास लिहिलेल्या आपल्या प्रस्तावनेत म्हणतात :

“ विश्वधर्म ” हा महान् ग्रंथ आळंदीचे श्री. कों. शि. संकाये

यांनीं गेल्या ४०–४५ वर्षांच्या वाङ्मय. तपश्चर्येतून निर्माण केला असून त्यांस आम्ही प्रस्तावना लिहावी अशा शुद्ध सात्त्विक भावनेनें, निश्चयात्मक निष्ठेने, वारंवार आत्मियतेने आग्रह धरल्यानें जाडचा पांडित्यपूर्ण सकलशास्त्रनिपुणांकडून पूर्णत्व पावणाऱ्या प्रस्तावनेचे ओझें, केवळ त्यांच्या मानसिक विचारसरणीला दुखवू नये म्हणून आनंदाने शिरोधार्य केले आहे.

'विश्वधर्म' या ग्रंथाचे वाचन झाल्यावर आम्ही ठाम निश्चयाप्रत पोहचलो आहोत की, या ग्रंथाचे निर्माण सूर्यप्रकाशा इतके स्पष्ट झाले आहे. ग्रंथकर्त्यांनी याला 'विश्वधर्म' हे नांव ठेवून मोठे औचित्य साधिले आहे. त्यांनी जेवढे वाङ्मय उपलब्ध केले आहे, त्याहून कितीतरी वाङ्मय विश्वाच्या कुशीत अज्ञात अवस्थेत व अप्रकाशित असावे असे या ग्रंथावलोकनानंतर अनुमान निघते. श्री. संकाये यांनी कळतेपणापासून आजवर कामिकादि वातुलागम, वेदोपनिषदे, पुराणे, सर्वधर्मीय प्राचीन व अर्वाचीन ऐतिहासिक ग्रंथ, विविध भाष्ये, सूत्रे, तंत्रे आणि निरनिराळया ३१२ ग्रंथांचा आधार घेऊन 'विश्वधर्म' ग्रंथाचा प्रचंड प्रपंच उभ्या आयुष्यांत उभारला आहे, हे सहज नजरेत भरते. या संदर्भ ग्रंथाशिवाय त्यांनी हजारो ग्रंथ हाताळले असावेत, हे त्यांच्या जवळच्या ग्रंथ-संपत्तीवरूत कळून येते. पूर्वी समुद्रमंथनातून अनेक रत्ने निघाली, अमृत निघाले, ही कथा आपण ऐकतो. पण आज आपणास ते सर्व ज्ञानामृत प्रत्यक्ष वाङ्मय-मंथनातून निघाल्याचे, या ग्रंथात पाहायला, वाचायला व त्याची अवीट गोडी चाखायला मिळते, असे स्पष्ट म्हटले तर वावगे होणार नाही.

अशा या अमृतरूपी 'विश्वधर्म' ग्रंथामध्ये अनेकविध मते आली आहेत. मात्र 'गंतव्यस्थान' निश्चित स्वरूपाचे रेखाटले गेले आहे. तरीहि लेखकाची सर्वच मते सर्वांना पटतील असे नाही. 'पिंडे पिंडे मतिर्भिन्ना' या न्यायाने प्रत्येकाच्या अभिरुचीप्रमाणे जो तो 'हें मला मान्य आहे, ते मला पटत नाही,' असे म्हणेल; किंवा 'तेच खरे आहे, हे खोटे आहे,' असा निर्वाळाहि देईल. अशी मतभिन्नता होणे किंवा असणे अव्यवहार्य मुळीच नाही. अशा या कांहींच्या कल्पना उजेडात येणारच आणि त्या

याव्यात, जगाला कळाव्यात अशा सुप्त इच्छेनें प्रस्तुत ग्रंथ-लेखन झाले असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. एखादा विषय एकाला पटतो, तो दुसऱ्याला पटत नाही; सर्वच विषय सर्वांना पटतील असे होणे नाही. दुसऱ्याला जे विषय पटतात ते पहिल्याला पटत नाहीत, असे प्रत्येक ठिकाणी आपणास पाहावयास मिळते. नेमका तोच प्रकार 'विश्वधर्म' ग्रंथावलोकन केल्यावर, जनसामान्यात उलट सुलट मतभिन्नता होण्याची शक्यता नाकारता येत नाही. हे ओळखूनच वाचक हा ग्रंथ हाताळतील यांत संदेह नाही.

हा '**विश्वधर्म**' ग्रंथ विसाव्या शतकाच्या शेवटच्या टप्प्यामध्ये प्रसिद्ध होत आहे. तेव्हा अशा या धर्मग्रंथाची चालू विज्ञानयुगांत काय आवश्यकता होती, असेहि अनेकांना वाटणे साहजिक आहे. परंतु पूर्वी अशी वस्तुनिष्ट माहिती निर्धारपूर्वक मांडण्याचा प्रयत्नच कोणी केला नाही, म्हणून याची आजहि जरूरी आहे.

श्री. संकाये यांनी जगाला दिपविणारे, वाचकांच्या विचाराला चालना देणारे, संशोधकांना अधिक बारकाईने संशोधन करण्यास उद्युक्त करणारे प्रगल्भ विचार मनोधैर्याने मांडल्यामुळे आम्ही त्यांना धन्यवाद देत आहोत.

**॥ न वीरशैवसदृशं मतमस्ति जगत्त्रये ॥** (परमेश्वरागम—पटल १) जगाचे पाठीवर कोठेंहि वीरशैव मतासारखे मत नाही, असे घंटाघोष करून सांगणाऱ्या पारमेश्वरागमाचा आधार घेऊन विचार केल्यास, सर्व भाषांची जननी जशी संस्कृत भाषा आहे, तद्वत्च सर्व धर्मांची माय म्हणून वीरशैव संस्कृती आहे, अशी ओळख होते. आणि हाच 'विश्वधर्म' ग्रंथाचा गर्भित मतितार्थ असल्याचे स्पष्ट सत्य होय. मत, धर्म, संस्कृती हे शब्दप्रयोग एकाच अर्थी असल्याचे अनेक ठिकाणी दिसून येते. वीरशैवांची तत्त्वे उच्च विचारांची व प्राचीन आहेत. म्हणून वीरशैव धर्माला विश्वधर्म म्हणून संबोधिले गेले आहे. हे हेरूनच ग्रंथकारांनी आपल्या पहिल्या ग्रंथापत्याचे नांव 'विश्वधर्म' ठेविले ते यथायोग्यच होय.

कर्नाटकातील एक थोर तत्त्ववेत्ते, मोठे अभ्यासक, प्राचीनतेचे संशोधक म्हणून प्रसिद्धी पावलेले श्री. ज. च. नि. यांनी नुकताच या वर्षी 'आदिरेणुक' नावाचा महत्त्वपूर्ण उद्‌बोधक ग्रंथ प्रकाशात आणला

असून, त्यास त्यांनी केवळ वीरागमाचा आधार देऊन श्री जगद्गुरु रेणुकाचार्य हे ३५०० वर्षांपूर्वीचे असल्याचे स्पष्ट केले आहे. तसेच शिवैक्य श्री. म. पु. पाटील यांनी मोहोंजोदारो उत्खननावरून वीरशैव धर्म ५००० वर्षांपूर्वीचा आहे असे म्हटले आहे. म्हैसूरच्या पंडित शिवैक्य श्री. काशीनाथशास्त्रींनी तर वीरशैव धर्म आणि त्याचे संस्थापक श्री जगद्गुरु रेणुकादि पंचाचार्यांना 'वीरशैव रत्ना 'मध्ये चतुर्युगात नेऊन सिद्ध केले आहे व संख्याशास्त्राचे आधारे श्री. संकाये यांनी देवगुरु श्रीरेणुकादि पंचाचार्यांचा कालनिर्णय देतांना तो दोन अब्ज वर्षांचा असल्याचा उल्लेख केला आहे. त्यासंबंधांत ते म्हणतात, "वीरशैव संस्कृती अति प्राचीन म्हणजे जगदारंभापासूनची आहे आणि ती पंचाचार्यांनी स्थापिली (मांडली) असून तिचे संरक्षण केले आहे. त्या बरोबरच संपूर्ण विश्वकल्याणार्थ महर्षीश्रेष्ठ अगस्तीला तिचा बोध केला आहे."

'अगोदर हे वाचा' या शिर्षकाने या 'विश्वधर्म' ग्रंथाचा आरंभ झाला आहे. त्यांतील सकृद्दर्शनी विचार वाचू लागल्यावर एक प्रकारची उत्कट जिज्ञासा निर्माण होते. कोणतेही प्रकरण पूर्ण झाल्याविना पुढचे पान उलटण्याची इच्छाच होत नाही. क्रमाक्रमाने सर्व प्रकरणे हातावेगळी केल्यावर ग्रंथकर्त्याचा अभिप्राय स्पष्ट होतो. त्यांनी ग्रंथाची रचना सहा प्रकरणातून केली आहे. पहिल्या पृष्ठावरच 'जीव हा शिव कसा होईल ?', 'मानव हा महादेव कसा होईल ?', 'नर हा हर कसा होईल ?', 'भक्त हा भगवान कसा होईल ?', अशी ही प्रश्नात्मक तळमळ उराशी बाळगून, 'विश्वधर्म' ग्रंथाचा येवढा मोठा प्रपंच-विस्तार केला आहे. याबाबत शंकेला थाराच नाहीं. धर्माचरण करणाऱ्याला मोक्ष व अधर्माचे आचरण करणाऱ्याला अधोगती (नरक) प्राप्त होते हे सूत्र धरूनच या ग्रंथात सांगोपांग उहापोह केलेला आहे. तसेच त्यांनी **मानवाला एकेश्वरी उपासना किती योग्य व श्रेष्ठ आहे, आणि बहुदेव उपासना कशी निकृष्ट व अयोग्य आहे,** त्याबाबतचे विवेचन करून ते मांडण्याचा धैर्यशाली प्रयत्न केला आहे.

अत्यंत प्राचीन काळा- (जगदारंभ) पासून भारतभूमीला आर्यावर्त हे नामाभिधान बऱ्याच कालपर्यंत होते. पण जेंव्हां उत्तरध्रुवीय

अवैदिक (अनार्य) लोक भारतात घुसले, त्यावेळेपासून ह्या नावांत बदल घडण्यास आरंभ झाला. निरनिराळे राजे-महाराजे यांचे काळांतही कसे कसे बदल होत गेले त्याचेही चित्र श्री. संकाये यांनी प्रस्तुत ग्रंथात रेखाटले असून त्यामध्ये भारतीय आर्यांची ससेहोलपट कशी होत गेली तेही दाखविले आहे.

**अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं दया क्षमा ।**
**दानं पूजा जपोध्यानमिति धर्मस्य संग्रहः ।।** (सि. शि. प.१६)

(१) हिंसा करू नये; (२) खरे बोलावे, खोटे बोलू नये; (३) चोरी करू नये; (४) ब्रह्मचर्य पाळावे; (५) दया दाखवणे; (६) क्षमा करणे (७) दान देणे, (८) पूजा करणे, (९) जप करणे, (१०) ध्यान करणे. ही धर्माची दहा अंगे असलेला शिवाद्वैत धर्म जगदारंभाचे वेळी दिव्य देह धारण करणाऱ्या अयोनीसंभव अशा प्रमुख पाच गणाधीश्वरांपैकी एक श्री जगद्गुरु रेणुकाचार्य यांनी विश्वकल्याणार्थ महर्षिश्रेष्ठ अगस्तीमुनीला सांगितला. तो धर्म वीरशैव धर्माच्या 'सिद्धांत-शिखामणि' नामक प्रमाण ग्रंथात आहे. त्या सर्व धर्मतत्त्वांचा आधार घेऊनच जैन, बुद्धादि (अहिंसावादी) धर्मगुरूंनी आपापल्या धर्माचा प्रचार व प्रसार करण्यासाठी त्यात अनुकल असा फेरफार केलेला आहे. भारतीय आर्य शुद्ध वैदिक परंपरा चालवीत होते. त्यांच्यात वैदिक आर्य नसणाऱ्या पण स्वतःला वैदिक आर्य म्हणवून घेणाऱ्या अनार्यांचा भरणा झाल्यावर त्यांनी देवांच्या व यज्ञयागाच्या नावावर हिंसाचार सुरू केला आणि वीरशैव धर्माची जीं विश्वमान्य तत्त्वे होती, ती धर्मग्रंथातून बाजूला सारली. त्यामुळे ती लोकाभिमुख होऊ शकली नाहीत. या त्यांच्या निंद्य प्रयत्नांचे स्वरूप 'भारताच्या अशुद्ध इतिहास' या प्रकरणात उघड करून अनेक देवतांबाबत असलेल्या अंधश्रद्धेचे उच्चाटन केले व भ्रामक कल्पनांचा निरास केला आहे.

प्रजोत्पत्ती कशी व केव्हा झाली याबाबतचा श्री. संकाये यांनी स्वतःचा अभिप्राय प्रमाणपूर्वक (पृष्ठ पाचवर) स्पष्टपणे मांडला आहे. देवमानवांसंबंधीच्या ज्या कल्पना रूढ झाल्या आहेत, त्या किती चुकीच्या आहेत, हे स्पष्ट करतांना ते म्हणतात, "भारतीय आर्य लोक केव्हाही पाप करीत नव्हते. पण अनार्यांनी त्यांच्याच माथीं खापर

फोडले आहे. भारतीय आर्यांची यज्ञांत कसलाही बळी देण्याची प्रथा नव्हती. ती अनार्यांनी धर्मग्रंथात गोवली आणि अत्याचाराला, तसेच मद्यप्राशनाला, मांसभक्षणाला उत्तेजन दिले. खरे तर त्यांना भारतीय आर्यांनी आपल्यात सामावून घेतले हेच मूलतः शुद्ध चुकीचे झाले आहे, असे मोठ्या खेदाने म्हणावे लागते. अनेक देवमानवांनी पशूंचे रूप (अवतार) घेतल्याचे दाखवून भारतीय आर्यांची त्यांनी मतीच गुंग केली, असे म्हटल्यास वावगे होणार नाही. कारण त्यांनी पृथ्वीवरील देव-मानवांवर ह्या सर्व गोष्टी स्वार्थापोटी लादल्या आहेत. त्या सत्य नसून कल्पित आहेत. " हे जे ग्रंथकर्त्यांचे अनुमान आहे ते विज्ञानयुगातील तज्ञ मंडळींना पटण्यासारखे व तर्कशुद्ध आहे.

पूर्वी आर्यावर्तातील सर्व मानव एकमेकांशी समानतेच्या भावनेने नांदत होते. त्यांच्यात श्रेष्ठ, कनिष्ठ असा भेदभाव केव्हाही नव्हता. तो द्रोणाचार्यांनी प्रथम निर्माण केला. एवढेच नव्हे तर असत्याची बाजू घेऊन त्यांनी फार मोठे पाप केले आहे. त्यामुळे देशांत जो अनर्थ ओढवला त्याचे घोर परिणाम सद्य:कालातहि आपण भोगीत आहोत. भारतीय आर्य लोक रानटी आहेत. ते लिंग म्हणजे शिश्न व योनी पूजक आहेत, अशा प्रकारचा धांदांत खोटा व खोडसाळ आरोप करून अनार्यांनी अपप्रचार व प्रसारही केलेला आहे. पातिव्रत्याने जगत अस-लेल्या आर्य स्त्रियादेखील त्यांनी भ्रष्ट केल्या आणि त्याच नराधमांनी पूजनीय अशा गायीचे मांस भक्षण्याचे हिडीस प्रकारहि सुरू केले. अशा अनेक कारणावरून परम पवित्र असलेले मूळचे आर्यांचे वेद निंदनीय झाले. सत्य वैदिक धर्म कलंकित झाला. त्यामुळे या ग्रंथातील तुलना-त्मक प्रकारात इस्लाम धर्मापेक्षा हिंदु धर्म कनिष्ट होण्याची अनेकानेक उदाहरणे दिली आहेत.

अनार्य हे शुद्ध वैदिक नसतांना स्वतःला वैदिक म्हणविणाऱ्या अनार्यांच्या यज्ञादि क्रिया बुद्धाने बंद पाडल्या; कारण ते अहिंसेचे उपा-सक होते. त्यांना अनार्यांची यज्ञातील हिंसा तिरस्करणीय वाटली, म्हणून त्यांनी प्रभावशाली अहिंसेचा प्रचार व प्रसार सर्व जगभर केला. श्री जगद्गुरु रेणुकाचार्यांचे 'अहिंसा परमो धर्मः' हे सर्वशक्तिमान तत्त्व सर्व अहिंसावादी धर्मीयांनी स्वीकारले होते. सद्गुरु त्या तत्त्वाचा

कर्नाटकांतील अनेक शिवशरणांनी व संतांनी त्यांच्या मातृभाषेत 'सत्यवे स्वर्ग असत्यवे नर्क' (सत्य तेच स्वर्ग असत्य तोच नरक), कायवे कैलास (शरीर हेच कैलास) आहे वगैरे वचने लिहून फार मोठा प्रचार व प्रसारही केलेला आहे. महाराष्ट्रातील सर्वधर्मीय संतांनीहि त्याच तत्त्वाचा अभंगाद्वारे सूत्रात्मक प्रचार व प्रसार केला आहे. त्यामुळे लोकांत स्वधर्मजागृती झाली. अनार्यांनी सर्वश्री राम, कृष्ण, लक्ष्मी, विष्णु, शारदा, सीता, द्रौपदी यांसारख्या अनेक देवमानवांचा व दैवी स्त्रियांचा शुद्ध इतिहास न मांडता क्षुद्र करून ठेविला आहे. श्रीशिवाने, श्रीकृष्णाने महाभयंकर अत्याचार व हिंसा केल्याचे रसभरित वर्णन ग्रंथांतरीं करून ठेवलेले वाचून व ऐकून परधर्मीय परदेशीय लोक जी निंदा करतात यास जबाबदार अनार्यच होत. (पृष्ठ–७९).

हे सर्व प्रकार चुकीचे आहेत. ते दुरुस्त करण्याचे ग्रंथकर्त्यांनी बुद्धिजीवी लोकांना, संशोधकांना एक प्रकारे आवाहनच केले आहे. ते स्वीकारून भारतीय शुद्ध आर्य वैदिक धर्माच्या सत्यस्थितीची असलेली मूळ बैठक जनसामान्यासमोर ते ठेवतील तो सुदिन समजावा लागेल.

याच प्रकरणातील दुसऱ्या भागांत सृष्टीचा, मानवोत्पत्तीचा तसेच त्यांच्या स्थानमानाचा सविस्तर स्तुत्य विचार मांडण्यात आला आहे. आगमोपासनेचे औचित्य बहारदार वर्णन करून ठेवले असून, वेद अपौरुषेय कसे नाहीत, याबाबतचा श्रीं. संकाये यांचा अभिप्राय लक्षणीय आहे. दुसऱ्या प्रकरणात भारतीय आर्यांच्या शैव आणि वीरशैव धर्म व त्यांच्या शिवलिंग उपासनेचे महत्त्व, तसेच प्राचीनत्व स्पष्ट करतांना ती बाब सत्ययुगापासूनची असल्याचे स्पष्ट केले आहे. त्यासाठी वायुसंहितेचा आधार देऊन ते म्हणतात कीं, (पृष्ठ एकशे एक) शैव आणि वीरशैव धर्माचा उगम न सापडण्याइतका प्राचीन आहे. विश्वोत्पत्ती झाल्यापासूनचा इतिहास शोधूनही नेमका तो किती प्राचीन आहे, हे कोणत्याही आधारे सिद्ध झालेले नाही.

जगाच्या आरंभापासून ते द्वापार युगापर्यंत मानवांची, देवमानवां- 'शिव' ही एकच देवता होती. त्याचीच ते उपासना करीत असत. त्याकरिता पंच ब्रह्ममंत्रातील 'तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि तन्नो

रुद्रः प्रचोदयात्' या मंत्राचा व पंचाक्षर महामंत्राचा आधार मांडला आहे.

कालहस्ती क्षेत्रातील शिवाद्वैतसिद्धांती पंडित श्री. हरदत्ताचार्य यांनी 'पंचश्लोकी' नावाचा ग्रंथ लिहिला असून त्याचे 'श्रेष्ठत्व व सर्वोत्तमत्व' लालभडक होईपर्यंत तप्त केलेल्या लोखंडी शिडीच्या पाच पायऱ्यांवर एकेक श्लोक म्हणत एकेक पायरी चढून सिद्ध करून सर्वांना चकीत केले आहे. ते श्लोक अवलोकनार्थ खाली दिले आहेत.

गायत्र्या बोधितत्वादपि नमक सुखैः राघवस्थापितत्वा-
च्छौरेः कैलासयात्राक्रमुदिततयाऽभीष्ट सन्तानदानात् ।।
नेत्रेण स्वेन साकं दशशतकमलैर्विष्णुना पूजितत्वा-
त्तस्मै चक्रप्रदानादपि च पशुपतिस्सर्व देवप्रकृष्टः ।। १ ।।

कंदर्पध्वंसकत्वाद्गरल कवलनात्कालनर्वापहेत्वा
द्दैतेयावासभूत त्रिपुरविदलनाद्दक्षयागे जयित्वात् ।।
पार्थाय स्वास्त्रदानान्नरहरिविजयान्माधवस्त्रीशरीरे
शास्तुस्संपादकत्वादपि च पशुपतिस्सर्वदेवप्रकृष्टः ।। २ ।।

भूमौ लोकैरनेकैस्सतत विरचिताराधनत्वादमीषा
मष्टैश्वर्यप्रदानाद्दशविधवपुषा केशवेनार्चितत्वात् ।।
हंसक्रोडाङ्गधारिद्रुहिणमुरहराद्दृष्टशीर्षाङ्घ्रिकत्वा-
ज्जन्मध्वंसाद्य भावादपि च पशुपतिस्सर्वदेवप्रकृष्टः ।। ३ ।।

वाराणस्या च पाराशरिनियमितभुजस्तंभकत्वात्पुराणाम्
प्रध्वंसे केशवेन श्रितवृषवपुषा धारितक्ष्मारथत्वात् ।।
अस्तोक ब्रह्मशीर्षास्थ्युप कलितगलालङ्क्रिया भूषितत्वा-
द्दातृत्वात् ज्ञानमुक्त्योऽरपि च पशुपतिस्सर्वदेवप्रकृष्टः ।। ४ ।।

वैशिष्ट्याद्योनिपीठायित नरकरिपुश्लिष्टभावेन शंभोः
स्वस्यैवार्धप्रतिकायितहरिवपुषा लिंगतत्वेनयद्वा ।।
अप्राधान्याद्विशिष्टद्वयसमधिगमे केशवस्येशनिंदा-
युक्तैर्दोषावहत्वादपि च पशुपतिस्सर्वदेवप्रकृष्ट ।। ५ ।।

हे पाच श्लोक म्हणून पाचव्या पायरीवर जेव्हा हरदत्तार्य निश्चलपणे उभे राहिले तेव्हा त्याना कसलीच इजा झाली नाही. तेव्हा आर्य व अनार्य पंडितवर्ग त्यांना शरण गेल्याचे सर्वश्रुत आहे. (विस्तारभयास्तव श्लोकांचा अर्थ दिला नाही.) असा सर्वोत्तम एकच एक देव 'शिव'

हा आहे. त्याचे शिव हे नाव देखिल सर्व अमंगलाला मंगल करणारे आहे. तसेच ते परम पवित्र, पूजनीय, उपासनीय आणि मंत्रमय आहे.

श्रेष्ठ धर्म व कनिष्ट धर्म कोणता याबाबत (पृ. १८७–१९५) मध्ये तुलत्नामक केलेले स्पष्टीकरण विचारात घेण्यासारखे आहे.

तिसऱ्या प्रकरणात वीरशैवांच्या लिंगधारणेचे महत्त्व आणि त्याचे प्राचीनत्व या संदर्भात खूपच खूप आधारग्रंथ धुंडाळलेले दिसतात; त्यास कोठेच तोड नाही. विश्वारंभापासून शिवलिंगधारकाला वीरशैव का म्हणतात, याबाबतची माहिती (पृ. २०१ वर) सरळ, साध्या भाषेत दिली आहे, ती मननीय व योग्य आहे. वीरशैव विश्वपूजक आहेत. कारण त्यांच्या हृदय-सिंहासनावर विराजमान असलेल्या शिवलिंगात विश्वाची कल्पना आहे. याचसाठी ते सदासर्वकाळ शरिरावर लिंग धारण करून राहतात. त्यांच्या मातेच्या गर्भालाच लिंगधारणा केली जाते.

वेदशास्त्र पुराणेषु कामिकाद्यागमेषु च।
लिंगधारणमाख्यातं वीरशैवस्य निश्चयात् ॥ ५७ ॥ (सि. शि. प. ६)

वेदांत, पुराणांत, उपनिषदांत आगमादी ग्रंथात वीरशैवांची लिंगधारणा वर्णिली आहे. त्यांच्या षोडश् संस्कारामध्ये हा पहिला संस्कार होय. सूक्ष्म विचारांती निश्चित होते की, जे लिंगासह जन्म घेतात, आपल्या शरिरावर अखंड जीवनभर ते लिंग धारण करितात आणि शेवटी लिंगैक्य (लिंगात ऐक्य) पावतात तेच वीरशैव होत, असा स्पष्ट अभिप्राय दिसतो, यांत संदेह नाही.

ब्रह्म विष्ण्वादयो देवा मुनयो गौतमादयः।
धारयन्ति सदा लिंगमुत्तमांगे विशेषतः ॥ ५५ ॥
लक्ष्म्यादि शक्तयः सर्वाः शिवभावविभाविताः।
धारयंत्यलिकाग्रेषु शिवलिंगमहर्निशम् ॥ ६ ॥ (सि. शि. प. ६)

या प्रमाणानुसार सर्व श्रीब्रह्मा, विष्णु, राम, विठ्ठल, भगवंतादि देवमानव आणि महालक्ष्मी, अंबाभवानी, सरस्वती, विशालाक्षी आदिं देवी स्त्रिया शिवलिंगधारी वीरशैवच होत्या. अगस्ति गौतमादि अनेक ऋषीमुनी शिवलिंगधारी वीरशैव होते, याला अनेक पुरावे आहेत. त्या सर्वांची अव्यभिचारी एकेश्वरी शिवभक्ति जगप्रसिद्ध आहे. पण

अनार्यांनी त्यांना आपलेसे करून त्यांच्या माथी हिंसेचे व अत्याचाराचे आरोप केले आहेत. ते अक्षम्य व निंद्य असून सद्सद्विवेक बुद्धीला पटण्यासारखे निश्चितच नाहीत. आजवरच्या विद्वानांनी यावर लक्ष द्यावयास पाहिजे होते, पण ते दिले गेले नाही.

असे त्यांचे दुर्लक्ष होण्याचे कारण काय असावे याचे कोडेच उलगडत नाही. तथापि सद्य:परिस्थितीत त्याबाबत अत्यंत धैर्याने आपले निर्णायक मत मांडून श्री. संकाये यांनी चैतन्य निर्माण केले असल्याने सामान्य मुमुक्षूंना अंधश्रद्धा दूर करण्यास मार्ग मोकळा झाला आहे.

शिवलिंगाचे पीठ म्हणजे सपाट भाग पृथ्वी आहे. आकाशरुपी अर्धगोलाकार लिंग (पिंडी) आहे. पीठाच्या डाव्या बाजूला चिचोळा (वारिक) भाग गोमुख आहे. त्यास अनार्यांनी खोडसाळ अर्थ योजला आहे. (पृ. २०३) तसा अर्थ करताना या शब्दाचा विपरित समास केला असल्याचे दिसून येते. तो असा ' शिवस्य लिंगं शिवलिंगम् ' म्हणजे शिवाचे लिंग (शिश्न) ते शिवलिंग. पण हे शुद्ध चुकीचे आहे. शिवलिंग या शब्दाचा खरा अर्थ " शिव एव लिंगं शिवलिंगम् " म्हणजे शिवच लिंग आहे, हे सूर्य प्रकाशाइतके स्पष्ट सत्य असलेले न समजण्याएवढे ते कांही अज्ञ निश्चित नाहीत. ते त्यांचे कृत्य द्वेषाधारित आहे.

शिवलिंगाला दगड समजणे हास्यास्पद, ज्ञानसभ्यतेच्या पलिकडचे आहे. कारण ' ब्रह्मेति लिंगमाख्यातं ब्रह्मणः पतिरीश्वरः (सि. शि. पृ. ६) लिंग ब्रह्म आहे. लिंग शिव आहे. शिव ब्रह्म आहे. शिव लिंग आहे. म्हणून शिवच लिंग आहे, असा अर्थ करून शुद्ध भाव ठेवणे, त्यास दगड न म्हणणे हितावह होय.

अनार्यांनी अनेकानेक धर्मग्रंथातील वीरशैवपर असलेली उच्च तत्त्वे वगळून वीरशैव धर्माची व धर्मग्रंथाची फार मोठी हानी केली आहे, गळचेपी केली आहे. अलिकडील उदाहरण द्यायचे झाले तर स्कंदपुराणांतर्गत काशीखंडाचेच पहाना. त्याचे मूळचे १०० अध्याय आहेत. पण आजचा काशीखंड ८० अध्यायावर आणून ठेवला आहे. याप्रमाणे संशोधनानंतर अनेक प्रकार उजेडात येतील. त्यांनी मंत्रामध्ये पण सोयिस्कर बदल केले आहेत.

पुरुषाप्रमाणे स्त्री देखील चैतन्य मानव संपत्ति आहे; ती केवळ भोग्य वस्तू नाही. हे जाणूनच वीरशैव धर्मसंस्थापक श्रीजगद्गुरु पंचाचार्यांनी वीरशैव मुमुक्षू जीवांच्या कल्याणासाठी सर्व स्त्री-पुरुषांना समान संस्कार दिले आहेत. ते आजकालचे नाहीत. ज्या संस्कारामुळें पूजाअर्चा करण्याचा अधिकार प्राप्त होतो, त्या संस्कारास वीरशैव शास्त्रांत 'शिवदीक्षा' असे नाव आहे. तो संस्कार सर्व संस्कारांचा राजा आहे. असा संस्कार वयाच्या ७ व्या वर्षी सर्व स्त्री-पुरुषांना करण्यात येतो. म्हणून वीरशैव स्त्रिया लिंगपूजा न चुकता करतात. इतर स्त्रियांना संस्कार नसल्याने त्या शूद्र गणल्या आहेंत; हे काही योग्य वाटत नाही. संस्काराने स्त्री-पुरुष शुद्ध होतात. अशा संस्कार-शुद्ध स्त्रियांना पूजेसाठी कोणतेहि सूतक पाळण्याची आवश्यकता नाही. त्यासंबंधी 'सिद्धांतशिखामणि' ग्रंथात प्रमाण दिले आहे. हा उपदेश श्रीरेणुकाचार्यांनी मुनिवर्य अगस्तीला केलेला आहे :

न तस्य सूतकं किंचित् प्राणलिंगांगसंगिनः ।
जननोत्थं मृतोत्थंच विद्यते परमार्थतः ॥ ४३ ॥
लिंगार्चन रतायाश्च ज्ञातौ नार्या न सूतकम् ।
तथा प्रसूतिकायाश्च सूतकं नैव विद्यते ॥ ४४ ॥
गृहे यस्मिन् प्रसूता स्त्री सूतकं नात्र विद्यते ।
शिवपादांबुसंस्पर्शात् सर्वं पापं प्रणश्यति ॥ ४५ ॥ (सि. शि. प. ८)

श्रीजगद्गुरु रेणुकाचार्यांनी, श्राद्ध सूतकादि प्रकार वीरशैव लिंगांगींना नाहीत असे स्पष्ट केले आहे. त्यांना षोडश् संस्कार आहेत. षटस्थलांतर्गत एकोत्तर शत स्थले आदेशिली आहेत. अष्टावरण, पंचाचार ही मुख्यत्वे प्रमाणभूत आहेत. त्यांनी हरगुरुतीर्थ स्वीकारले की त्यांच्या पापाचा नाश होतो. तीर्थाविना ते प्रसादरूपी अन्न भक्षण करीत नाहीत. परान्न न घेणे ते कटाक्षाने पाळतात.

वीरशैव धर्माची स्थापना रेणुकादि पाच आचार्यांनी मिळून केली आहे व त्याच्या रक्षणासाठी उत्तरप्रदेश, हिमालय, मध्यप्रदेश, कर्नाटक, आंध्र या प्रांतात सर्वोत्तम स्थानी पीठे स्थापून भारतभर प्रचार व प्रसार केला आहे. स्वगोत्रीय मठांचीं सर्व भागांत स्थापना करून वैशिष्ट्यपूर्ण परंपरा निर्माण केली आहे. त्यासाठी मठाधिपति,

मठपति, शेटे, महाजन, पाटील या पंचांची योजना करून पंचायत धर्म समाजाची घटना प्रसृत केली आहे. असे हे पंचाचार्य जगदारंभापासूनचे आहेत. ते धर्मसंस्थापक आहेत. इत्यादि गोष्टी ग्रंथकर्ते मानतात पण ते लिंगोद्भव होऊ शकत नाहीत, असा त्यांचा स्वाभिप्राय आहे.

'सर्वं लिंगमयं जगत्'-चराचर सर्व जगच्च लिंगमय आहे. लिंग परब्रह्म असल्याने त्यापासून सर्वोत्पत्ति झाली आहे. त्यात प्रजोत्पत्तीहि झाली. शिव आणि शक्ति अविनाशभाव संबंधाने एकत्र असतात. त्यांना विभक्त मानणे उचित नाही. ते विभक्त मानण्यास मानवी पुरुष नाहीत. ते निराकारी आहेत. शिवाचे पशुपति असे दुसरे नाव आहे. पशू म्हणजे पाहाण्याची इच्छा करणारा जीव होय. जो त्याचा पति (स्वामी, मालक) तो पशुपती, असा स्पष्टार्थ आहे. त्याच्या इच्छामात्रें या विश्वाची उत्पत्ति झाली आहे. तर मग पंचाचार्यांचा उद्भव परशिव ब्रह्माच्या पांच मुखांपासून झाला असल्यास त्यात वावगे काय आहे? तथापि हा भाग वादातीत संशोधकांचा असल्याने त्यांनी तो हाताळावा. आम्ही हे कार्य त्यांचेवर सोपवित आहोत.

**तस्मात्तस्माच्च गिरजे पंचानन समुद्भवः ।**
**मदादि सर्व लोकांना जगद्गुरु वरोत्तमाः ।। (सुप्रबोधागम)**

माझ्या पंचमुखातून उद्भव पावलेले रेणुक, दारुकादी पाचहि जगद्गुरु हे संपूर्ण विश्वाचे गुरु आहेत. हे माझेही गुरु आहेत. हे परब्रह्म परमात्म्याच्या सुप्रबोधागमाच्या आदेशाप्रमाणे त्यांना गुरु मानल्यावर त्यांना मानव संबोधणे अयोग्य असल्याने वीरशैव तत्त्वास ते मान्य नाही.

गुरु न म्हणावा मानव । म्हणता दोष घडे अभिनव । सत्य जाणा ।। १०५ ।। (प. र. अ. ३) गुरु देहधारी मानिता माणूस । ब्रह्मत्वे न वसे विश्वास । तरी तो केवी पावे परब्रह्मास । गुरु मानिना माणूस ।। ३८ ।। हे गुरु देहधारी न म्हणावे । ब्रह्म अगोचर तया जाणावे । तरीच परब्रह्माला पावावे । येणे भावे करूनिया ॥ ४१ ॥ (प. र. अ. ५) याच अध्यायांत संतशिरोमणी श्रीमन्मथ माऊली म्हणतात की,

**एकमूर्ति त्रयोभागः गुरुर्लिंगं तु जंगमः ।**
**जंगमश्च गुरुर्लिंगम् त्रिविध लिंगमुच्यते ।। १३ ।।**

एक मूर्ती त्रिभागा आली। गुरुलिंग जंगम भासलीं। तिन्ही मिळुनी एकरूप जई झाली। तेचि जंगम अथवा लिंग ॥ ४५ ॥ जो गुरु तोचि जंगम। जंगम तोचि लिंग उत्तम। त्रिविध ऐसा नेम। असि जो ओ पार्वती ॥ ४६ ॥ जो भाव गुरुसी पाही। तोचि असावा लिंगाचे ठायी। तोचि भाव जंगमाच्या पायी। विश्वासे असावा ॥ ४९ ॥ (प. र. अ. ५)

**गुरुदेव महादेवमेको भावेन भावयेत्।**
**भावद्वय विभागेन नरके कालमक्षयम् ॥ १४ ॥**

श्रीगुरुसी सदाशिवासी ऐक्य भावे। भजिजे तरी गुरुरूपचि व्हावे। द्वैतभावे निरयासी जावे। कल्पांतवरी ॥ ५० ॥ गुरुदेव महादेव। उभयी नसे भेद भाव। म्हणूनी असे श्रेष्ठ प्रभाव। गुरु पूजनी ठेविला ॥ ५१ ॥ गुरुरूप सवराभरित। त्याचा नलगे मानवा अंत। अदृश्य अगोचर अतीत। असे जाण सर्वा ठायी ॥ ५२ ॥ (प. र. अ. ५) यास्तव गुरु मानव नाही. तो देवगुरु आहे. म्हणून त्यास मानव म्हणू नये.

वीरशैवमत संस्थापनाचार्य जगद्गुरु पंचाचार्य हे ऋषि मुनीश्वर, धर्मगुरु, प्रमथ गणाधीश्वर, महान् शिवयोगी, महातपस्वी, सामर्थ्यशाली व सर्व विद्यापारंगत होते, हे त्रिकालाबधित सत्य कोणालाहि नाकारता येणार नाही. (पृ. २२४) भारतीय युद्धानंतर ब्रह्मा, विष्णु, विठ्ठल, राम, पद्मनाभ, लक्ष्मी, सरस्वती, भवानी, विशालाक्षी वगैरे देवदेवी अनार्यांनी निर्माण केल्या आहेत. त्यांच्या गळचांत, हातांत, मस्तकावर वगैरे ठिकाणी लिंगधारणा केलेली दिसून येतें, याचे कारण, लिंगधारण पद्धति वहु प्राचीन आहे: ती त्या सर्वांनी अनुसरली व वीरशैव झाले इतकेच. पण अलीकडील त्या देवदेवींच्या हातात, मस्तकावर कोठेच लिंग धारणा दिसून येत नाही. त्यामुळे त्यांच्या देवत्वाला व प्राचीनत्वाला वाधा निर्माण होण्याचा संभव आहे.

**अन्तर्लिंगानुसंधानमात्मविद्या परिश्रमः।**
**गुरूपासनशक्तिश्च कारणं मोक्ष संपदाम् ॥ ४२ ॥** (सि. शि. प. ६)

लिंगधारणा मोक्षाला कारण आहे. म्हणून सर्व देवतांनी लिंगधारणा केलेली आहे. हे तत्त्व ओळखून अकराव्या शतकांत जन्मलेल्या कर्नाटकातील बागेवाडीच्या श्रीबसवेश्वरांनी व्रतबंध करून घेण्यास

विरोध केला आणि कुंडल संगम क्षेत्रातील श्रीमदुज्जयिनी सिंहासन दारुक शाखीय मठाधीश्वर प्रकांड पंडित आस्थान विद्वान थोर तपस्वी पट्टाधिकारी गुरु श्रीजातवेद मुनी शिवाचार्य यांचेकडून शिवदीक्षा पूर्वक शिवलिंग धारण करून शिव पंचाक्षर महामंत्राचा उपदेश घेऊन वीरशैव धर्म स्वीकारला. त्यावेळी लिंगासंबंधीचे विचार ते आपल्या वचनांत मांडून जगाला सांगतात:–

अपरिच्छिन्नमव्यक्तं लिंग ब्रह्मसनातनम् ।
उपासनार्थमंतःस्थं परिच्छिन्न स्वमायया ।। ३५ ।। (सि. शि. प. ६)

ब्रह्मलिंग सनातन आहे. ते मोठ्यात मोठे व लहानात लहान रूप धारण करते. ते जगायेवढे आहे. आकाशायेवढे आहे. त्याहि पलिकडे तेच आहे. त्याचे चरण पाताळाच्या पलीकडे आहेत व मस्तक ब्रह्मांडाच्या पलीकडे आहे. ते अगम्य असून अगोचर आहे. असे असूनसुद्धा ते ' अंगुष्ट मात्र पुरुषः' सूक्ष्मातिसूक्ष्म रूप घेऊन माझ्या हृदय सिंहासनावर विराज-मान होते, करतलात येऊन पूजा होते. ते कूडल संगम देव आहेत. हे माझे परम भाग्य होय. या सर्व कारणाने माझी भावभक्ति त्यावर जड-लेली आहे. अशी त्यांची अनेक वचने आहेत. श्रीजगदगुरु रेणुकाचार्यांनी महर्षिश्रेष्ठ अगस्तीला उपदेशिलेल्या शिवाद्वैत सिद्धांतातील षट्स्थल, पंचाचार, अष्टावरणाचे महत्त्व बसवेश्वरांनी आपल्या वचनांत घेऊन त्याचा प्रचार व प्रसार मोठ्या हिरिरीने केला. तो अजोड आहे. इतर प्रांतापेक्षा कर्नाटकात वीरशैव वहु संख्येने दिसतात. याचे कारण प्रचारच होय. त्यांच्या हातात राजसत्ता असल्याने त्यांच्या प्रचाराचा सर्वधर्मीयांवर प्रभाव पडून फार मोठा प्रसार झाला, हेंहि एक कारण मानावे लागते. कर्नाटकातील लोक त्यांना महात्मा म्हणून ओळखतात. ते मोठे शस्त्र व शास्त्रधुरंधर होते. आईला आई, बापाला बाप, गुरूला गुरु मानणारे होते. ते वीरशैव धर्माचे संस्थापक नव्हते. स्वीकृत वीरशैव धर्माचे थोर प्रचारक व प्रसारक होते. त्यांना धर्मसंस्थापक संबोधून अज्ञान्यांनी आपले अज्ञान प्रगट करून त्यांचे जीवन कलंकित केले आहे, हे निःसं-दिग्ध सत्य होय.

ज्याप्रमाणे देवदेवींनी शिवलिंगधारणा केली, त्याप्रमाणे थोरथोर ऋषिमुनींनी, [illegible] राक्षसांनी, यक्षगंधर्व,

किन्नरांनी शिवलिंग धारणा करून घेऊंन, निष्ठेने शिवभक्ति केल्याचे सर्वश्रुत आहे. त्यावरून सुरासूर, मानव सर्वच लिंगधारी होते असे सिद्ध होते. जे लिंगधारी ते वीरशैव असा सिद्धांत असल्याने विश्वारंभापासून असलेला वीरशैव धर्म म्हणजे विश्वधर्म हे निर्विवाद होय हे श्री. संकाये यांचे मत कोणालाच नाकारता येणारे नाही.

'युगे अठ्ठावीस विटेवरी उभा.' अठ्ठावीस युगें होऊन गेली तरी पंढरपूर येथे श्री विठ्ठल विटेवर उभाच आहे असे म्हटले जाते. ते सत्य गृहित धरले तर त्यांच्या मस्तकावर शिवलिंगधारणा आहे, ती पाहता ग्रंथनिर्मातें श्री. संकाये यांच्या अनुमानापेक्षा लिंगधारणा पद्धती अति प्रचीन आहे हे सिद्ध होण्यास पुरेसे आहे. तर मग कृत, त्रेता, द्वापार आणि कलि या चार युगातील देवदेवी, ऋषिमुनी, राजे–महाराजे, यांनी लिंगधारणा केली असल्यास त्याचे नवल कसले मानायचे ?

चौथ्या प्रकरणांत श्री. संकाये यांनी शिवलिंगाबाबतचे यथायोग्य वर्णन वर्णिले आहे. करिता विस्तारभयास्तव आणि पुनरुक्ती नको म्हणून त्यासंबंधी आम्ही उहापोह केलेला नाही. पाचव्या प्रकरणांत आधार व रचना संबंधीचे विचार आहेत. त्यानंतर संदर्भग्रंथांची यादी क्रमवार दिलेली आहे. यानंतर सहाव्या प्रकरणांत " भारताचा अशुद्ध इतिहास " या अनुमानाला (१) पंडित म. म. डॉ. चित्रावशास्त्रींचा 'ऋग्वेदाचे मराठी भाषांतर,' (२) श्री. कोलंगडे यांचे 'ऋग्वरत्न भांडार (लघु–ऋग्वेद,) (३) ऋग्वेददर्शन, (४) श्रीमद्‌योगेश्वर याज्ञवल्क्य, (५) श्री सायणाचार्य चरित्र, आणि (६) श्री बाळशास्त्री हरदास यांच्या "ऋवेदातील राष्ट्रदर्शन", या ग्रंथाची पुष्टी मिळाल्याने श्री. संकाये यांचा "विश्वधर्म" ग्रंथ गौरवास पात्र होणार आहे. या सहाव्या प्रकरणामध्ये वेद भाष्यकर्ते, त्यांचा रचनाकाल लक्षात घेता वेदांत बदल कसा व केव्हा होत गेला हे सहज कळते. या प्रकरणात एकोणसत्तर उपप्रकरणे मांडली आहेत. त्यांचा निष्कर्ष इतकाच की, उत्तरध्रुवीय अनार्यांच्या भारतातील आगमनापूर्वी वेदांत अहिंसेला आधार होते. ते त्यांनी नष्ट केले व निरनिराळ्या नांवांने हजारो देवता निर्माण करून भारतीयांना हिंसेला प्रवृत्त केले. याबाबतचे विधान आम्ही पूर्वीच स्पष्ट केले आहे.

ऋग्वेदातल्या दार्शनिक सूक्तांत, देवांची उत्पत्ती जलतत्त्वापासून झाल्याचे तर काही ठिकाणी त्यांना अदितीचे पुत्र, ब्रह्मणस्पतीचे पुत्र म्हटले आहे. त्यामुळे त्यांना जन्ममृत्यू आहे, असे मानले आहे. मग ते देव कसे ? ज्याला जन्ममृत्यू नाही तोच देव खरा. असा देव एकच आहे आणि तो म्हणजे "श्रीशिव" बाकी सर्व मानव आहेत. ऐतरेय व शतपथ ब्राह्मणांतही देव मर्त्य असल्याचा संदर्भ पंडित श्रीमहादेवशास्त्री जोशी यांनी "पूजाविधान" नामक ग्रंथांत दिला आहे. ते पुढे म्हणतात: (ऋ. १।१३९।११) "यास्काने एकच देव मानला आहे. तो भिन्न भिन्न रुपाने स्वर्ग, पृथ्वी, जल या ठिकाणी राहतो. त्याला कल्पनाचातुर्याने अनार्य वैदिक आर्यांनी, निरनिराळी नावे देऊन अनंत देवता निर्मिल्या. त्यास वैदिकांनी कल्पनेतूनच जोड दिली आणि त्याचेच पुराणिकांनी अनुकरण केले. त्यामुळे वैदिक देवता लोप पावल्या असल्याची माहिती मिळते. पुराणांच्या समन्वयी भावनेतून पुढे अवतारवाद आला. त्यामुळे कर्मकांड आणि ज्ञानकांड बाजूला फेकले गेले आणि तेथे भक्तीचे साम्राज्य आले."

ऋग्वेदातील मंत्ररचना ३९० ऋषीमुनींच्या चातुर्याने झाली आहे. त्यात २५ स्त्रिया मंत्र रचणाऱ्या आहेत. त्यांतील संभोगाचे अश्लील वर्णन आजच्या पिढीने वाचले तर त्यांचे डोळे भडकतील इतके ते भयंकर आहे. त्या अश्लील वर्णनाची बरोबरी आजचे कादंबरीकार देखील करू शकणार नाहीत. तसेच यजुर्वेदातील देवताप्रीत्यर्थ पशू हत्याकांड व मानव हत्याकांड वाचून वाचकांची मती गुंग होईल. एवढे महाभयंकर हत्याकर्म जगातील कुठल्याही धर्मग्रंथात नाही.

ज्या वेदांत मांसाहार, पशूहत्त्या व मानवहत्त्या श्रेष्ठ मानली जाते व केली जाते, त्याला वेद म्हणावे तरी कसे ? त्यांत याज्ञवल्क्य महर्षींनी 'मांसान्न हेच परमान्न' होय असे म्हणावे आणि तसे करायला अखील मानव जातीला वेदाधारे करायला लावावे, ही लाजीरवाणी, शरमेची व अती निंद्य गोष्ट होय. या प्रकरणातील तुलनात्मक विचार पाहिल्यास मती गुंग होऊन जाते. हे सर्व प्रकार पाहिल्यावर म्हणावे लागते की, श्रीः संकाये यांचा हा ग्रंथ प्रकाशात आल्याने भारतवासीयांवर त्यांचे अपार उपकार होणार आहेत. या एका वाक्यांत या सहाव्या प्रकरणाचे

सार जाणून घ्याल असा विश्वास वाटतो.

वीरशैव लिंगोपासक, हरगुरुभक्तिपरायण, तत्त्वनिष्ठ श्री. का. शि. संकाये यांनी 'विश्वधर्म' ग्रंथलेखनासाठी ४०-४५ वर्षांहून अधिक काळ खर्चिला आहे. लागेल तेवढा पैसा खर्च करून, मिळेल ते वाङ्मय हस्तगत करून त्याचे वाचन, मनन करून त्यातून स्वाभिप्रायाप्रमाणे सर्वधर्मीय मानवांना बोध देणारा ग्रंथ निर्माण केला, प्रकाशांत आणला म्हणून आम्हास होणाऱ्या आनंदाचे शब्दचित्र कितीहि रेखाटले तरी ते अपुरेच होणार आहे.

सा माजिक व धार्मिक क्रांति घडवून आणणाऱ्या या ग्रंथांचे-मराठी वाङ्मयाचे अभ्यासक व संशोधक स्वागत करतील यात संदेह नाही. अनार्य पंडितांनी आर्यांची (वीरशैवांची) तत्त्वे मुळांतून वगळल्याने ती पुन: प्रस्थापनेची आवश्यकता या ग्रंथात प्रतिपादिली आहे, ती वस्तुस्थितींस धरून आहे. तिची आजच्या काळांत नितांत गरज आहे असे आम्हासही वाटते. या ग्रंथास शुद्धिपत्रक जोडूनही जे काही मुद्रण-दोष आहेत ते पुन्हा सुधारता येतील. विषयाची मांडणी क्रमवार असणे अगत्याचे झाले आहे. शब्द तोडतांना व खोडतांना विशेष करून संस्कृतातील दोष सुधारावे लागतील. पुनरुक्तीला स्थान नसावे. अशा कांही सूचना कराव्या लागल्या आहेत. ग्रंथकार्याकडे पाहिल्यावर, या सर्व गोष्टीबद्दल वाचक त्यांना क्षमा करतील यात शंका नाही. प्रचंड विस्तारपूर्वक अभ्यसनीय ग्रंथ लिहून प्रकाशित केल्याबद्दल त्यांना कितीहि हार्दिक धन्यवाद दिले तरी ते थोडेच होणार आहेत. त्यांचे हातून याहीपेक्षा अलौकिक ग्रंथसंपदा प्रकाशात येवो अशी अपेक्षा ठेऊन त्यांना शुभाशिर्वाद देत आहोत.

या प्रकारचे साहित्य प्रकाशित झाल्याने जनमानसात खळबळ उडेल ! तरी पण संशोधन होण्यास संधी मिळेल, अध्ययन होईल, सर्व प्राचीन साहित्यांतील महत्त्वपूर्ण दालनावर प्रकाश पडेल हे कार्य काय थोडे आहे ! श्री. मन्मथ माउलीने प्रसाददानात म्हटलेच आहे की,

जे जे अमंगळ या भुवनी । ते ते लोपो शूळपाणि । सुमंगल भाव या जनी । उपजो सदा ॥ ९ ॥ वाढो लोकीं सदाचार । सद्विद्येचा भडिमार । होवो सर्वत्र साचार । हाचि प्रसाद आवडे ॥ १० ॥ आणिकहि

ऐसे करावे। सुखाचे मळे पिकवावे। आमूलाग्र नासून जावे। विघ्न वाधा ॥ ११ ॥

माऊलीच्या आशिर्वादाप्रमाणेच या ग्रंथातील अमृतमय तत्त्वे आत्मसात करून धर्मजिज्ञासूंची मने शांत, तृप्त व पावन होवोत. नराचा हर होण्याची प्रवृत्ती वाढो अशी अपेक्षा करून ही लांबत चाललेली प्रस्तावना आवरती घेत आहोत. इति शिवार्पणमस्तु.

दि. १५–८–१९८३ ष. ब्र. श्रीगुरु रेवणसिद्ध शिवाचार्य,

परंडकर बृहन्मठ, वार्शी. परंडकर महाराज

शिवतत्त्वनिष्ठ पंचाचार्य तत्त्वप्रचारक

———

## (१) श्री. श्री. श्री. १००८ ज. विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी



(श्रीमद्वाराणसी ज्ञानसिंहासनाधीश्वर श्रीजगद्गुरु परंपरागत श्री. श्री. श्री. १००८ ज. विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी, जंगमवाडी मठ यांचा 'विश्वधर्म' ग्रंथास शुभाशिर्वाद.)

## शुभाशिर्वाद

'आळंदी देवाची येथील श्री. का. शि. शंकाये यांनी 'विश्वधर्म' ग्रंथ लिहिण्याचे कारण स्पष्ट करून, त्यासाठीं ३१२ ग्रंथांचे आधारे, वीरशैव हेच मूळचे भारतीय वैदिक आर्य आहेत; वैदिकांचा अधिकार त्यांचाच खरा–पण भारतीय वैदिक आर्यात, अवैदिक आर्यांचा प्रवेश होऊन हिंसक प्रकार वाढल्याने त्यापासून आपल्या संस्कृती रक्षणासाठी ते बाजूला झाले. या वीरशैव 'विश्वधर्म' संस्कृतीची स्थापना जगदादि जगद्गुरु पंचाचार्यांनी केली आहे. या तत्त्वाचा 'विश्वधर्म' ग्रंथाने अंगिकार केला आहे. अनवधानानें कांही ठिकाणीं वेगळ्या प्रकारची

माहिती देण्यात आली आहे. ती ग्रंथकर्ते पुनर्मुद्रणांत दुरुस्त करतील आणि तदनुषंगिक कांही ज्या अपूर्णता राहिल्या असतील त्या दुरुस्त होतीलच.

श्री. संकाये यांची संशोधन व संकलन तपश्चर्या वाखाणण्यासारखी आहे. वीरशैव मताची थोरवी गाणारा हा ग्रंथ वीरशैवांच्या प्रत्येक घरांत असला पाहिजे असा झाला आहे. या ग्रंथाला जगद्‌गुरूंचा आशिर्वाद, श्री. डॉ. ष. ब्र. शिवलिंग शिवाचार्य अहमदपूरकर महाराज यांचा अभिप्राय, तसेच श्री. ष. ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य परंडकर महाराज यांची प्रस्तावना, तसेच अनेकांचे अभिप्राय लाभल्याने हा ग्रंथ गौरवप्राप्त झाला आहे.

श्री. संकाये यांना जगदादि जगद्‌गुरु पंचाचार्य, श्रीपार्वती परमेश्वर यांच्या कृपेने संपूर्ण आयुरारोग्य लाभून असे अनेक उत्तम ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ति प्राप्त होवो. इत्याशिस् ''

---



शिवयोग

पान क्र. २६१ ते २९५ पहा

(२) वीर तपोनिधी श्री. ष. ब्र. डॉ. शिवलिंग शिवाचार्य महाराज



(न्यायशास्त्री, काव्यतीर्थ, एम्. बी. बी. एस., वीरमठ संस्थान, अहमदपूर, जि. लातूर; अध्यक्ष, मध्य दक्षिण वीरशैव परिषद, उदगीर; अध्यक्ष, टागोर शिक्षण समिती, अहमदपूर; अध्यक्ष, महादेव शिक्षण संस्था, धनेगाव; अध्यक्ष, राष्ट्रीय वीरशैव संघ, उदगीर; अध्यक्ष, वीरशैव समाज, अहमदपूर; माजी उपाध्यक्ष, अखिल भारतीय वीरशैव महासभा, बेंगलूर) यांचा

## ग्रंथाभिप्राय

" प्रिय संकाये यांसी आशिर्वाद ! आपले पत्र आणि ' विश्वधर्म ' ग्रंथ मिळाला. आपण या ग्रंथावर अभिप्राय मागितला आहे. विश्वधर्मासारख्या ग्रंथावर अभिप्राय देणे महाकठीण कर्म होय. यात आलेले

विविध विषय आणि त्याबाबतची साधकबाधक मते या सर्वांचे आकलन झाल्याशिवाय अभिप्राय देणे म्हणजे 'अव्यापारेषु व्यापार' होय, असे आम्हास वाटते.

आपण केलेला प्रदीर्घ पण प्रांजळ प्रयत्नच अत्यंत महत्त्वाचा आहे. धर्ममार्तंडानी शास्त्राच्या नावाखाली घातलेले अव्यवहार्य प्रकार आपल्या ह्या प्रयत्नातूनच उघडकीस आले आहेत.

धर्ममार्तंडांनी काहीही लिहावयाचे व काहीही करावयाचे व त्याचे समर्थन "एषः धर्मः सनातनः" म्हणून करावयाचे आणि ते सर्व भोळयाभावडया भक्तांनी 'जी हां' म्हणून पाळावयाचे हा प्रकार धर्मतत्त्वाप्रमाणे किती गर्ह्य आहे याचा विचार केला पाहिजे.

धर्म म्हणजे मानवाच्या ऐहिक व पारलौकिक उन्नतीचे व्यवहार्य साधन होय. ते स्तुत्य, स्वार्थविरहित व अनुभूतियोग्य असले पाहिजे. परंतु त्या त्या काळातील लोकांनी आत्मसुखाकरिता, स्वतःच्या स्वार्थाकरिता नाना प्रकारच्या, नाना स्वभाव व गुणांच्या दैवतांच्या कल्पना करून त्यांना आपल्या इच्छेप्रमाणे आकार–प्रकार देऊन राबवले आहे.

वेळोवेळी झालेल्या समाजसुधारकांनी या प्रकाराचे खंडन स्वच्छंदपणे केले असले, तरी ते अंधश्रद्धावंत समाजपुरुषाच्या गळी उतरले नाहीत. तसे असले तरी आज घटकेस ते जनसामान्याच्या गळी उतरविण्याचा आपला प्रयत्न अत्यंत महत्त्वाचा आहे.

कुठल्याही मत-पंथाच्या आहारी न जाता आपल्या बुद्धिशाली कौशल्याने अनेक ग्रंथांचे अध्ययन, मनन करून आपण जे निष्कर्ष काढले आहेत, ते त्या पद्धतीने बरोबरच म्हणावे लागतील. आपल्या अध्ययनाची कक्षा अतीव विशाल असल्याचे दिसून येते. मराठी चौथ्या इयत्तेपर्यंत शिकलेल्या माणसाने 'विश्वधर्मा'सारखा ग्रंथ लिहिण्याचे धाडस करणे आश्चर्यजनकच नव्हे तर अनुकरणीय पण आहे.

वेद, आगम, उपनिषदे, पुराणग्रंथ तसेच नूतन अभिजात साहित्य यांचा ठायी ठायी असलेला उल्लेख पडताळून पाहताना अत्यंत समाधान वाटले, आनंद झाला.

आपण काढलेल्या निष्कर्षाविषयी मतभेद असू शकतात, नव्हे असतीलही; म्हणून या आपल्या प्रयत्नांचे मूल्य कमी लेखता येणार नाही.

काहीच्या मते विषय सुसंगत मांडला गेला नाहीं; असे जरी असले तरी या आपल्या परिश्रमाचा उपयोग हाडाच्या चिकित्सकाला खचितच झाल्याशिवाय राहाणार नाही.

रावणाची दहा शिरें, मारुतीचे शेपूट इत्यादि विषय, त्यावरोबरच हिंसा-अहिंसेची व्याप्ती वगैरे विषय खरोखरच बुद्धीला चालना देणारे, विचारज्योत प्रज्वलित करणारे आहेत.

स्वत:ची पत्नी देण्याइतका शिवाचा भोळेपणा, तसेच शिवाचे भिल्लिणीचे पाठीमागे लागणे इत्यादि अव्यवहार्य विषयांचे सम्यक परिमार्जन करणे आवश्यकच होते. त्यांत वावगे असे काय आहे ?

आपल्या लिखाणांतून समाजकल्याणाच्या आत्यंतिक तळमळी-बरोबरच धर्ममार्तंडाच्या भोंदुगिरीची चीड येऊन काही कठोर शब्द-प्रयोग आले आहेत; ते बऱ्याच लोकांना जाचकहि वाटतील; पण तसे होणे अपरिहार्य नव्हे तर, स्वाभाविकहि आहे. ते सर्व चिडेपोटी आहेत, ते द्वेषमूलक मुळीच नाही, असे आम्हास वाटते.

आपले प्रयत्न अत्यंत स्तुत्य आहेत. आपण केलेल्या या कार्यांत जरी कांही उणेपणा, अव्यवस्थितपणा कोणाला भासत असला किंवा तसा तो असेलही. तथापि हा आपला लेखनांचा प्रथम प्रयास आहे आणि प्रथम प्रयासामध्ये उणीवा ह्या असू शकतात, येवढे लक्षांत घेऊन ग्रंथाचे वाचन केल्यास चिकित्सक जिज्ञासूंची अध्ययन-लालसा वाढल्याशिवाय खचितच राहणार नाहीं. याचे श्रेय केवळ निष्काम बुद्धीने केलेल्या या आपल्या प्रयत्नास राहाणार आहे.

' विश्वधर्म ' ग्रंथ नावाप्रमाणे आहे. तो उत्तम असल्याने सर्व-धर्मीय संग्रही ठेवतीलच. पण त्याचप्रमाणे वीरशैव लोकांच्या प्रत्येक घरांतही तो असणे आवश्यक आहे. हा आमचा अभिप्राय.

परमेश्वर याहीपेक्षा सुसंगत मांडणी असलेल्या उत्तम कृती लिहि-ण्याची सद्प्रवृत्ती आपणास देवो ही अपेक्षा. "

राजूर, जि. लातूर.

एस्. एस्. स्वामी

---

(३) श्री. चंद्रकांत नारायणराव भोसले



[ आळंदी देवाची, ता. खेड, जि. पुणे; सभापती, नगरपालिका शिक्षण मंडळ, आळंदी; माजी सदस्य, नगरपालिका, आळंदी; सभासद, ज्ञानेश्वर विद्यालय, आळंदी. ]

## विश्वधर्म ग्रंथाबद्दल विचार

**श्री. भोसले म्हणतात, ' गेले ते पाणी राहिली ती गंगा '**

श्री. संकाये यांचा " विश्वधर्म " ग्रंथ वाचून अति आनंद झाला. ग्रंथ वाचला तसेच या ग्रंथावर आलेले अभिप्रायही पाहिले. या ग्रंथावर वीरशैव धर्मगुरु, जगद्‌गुरु, महाराष्ट्र वीरशैवसभा, पुणे या संस्थेतील मान्यवर कार्यकारी मंडळींचे, कांही मंत्र्यांचे, विद्यापिठीय पदवीधर विद्वानांचे, पदवीधर नसलेले परंतु धार्मिक विद्वान मंडळींचे, वकीलमंडळींचे, मुसलमान, जैन, बौद्धधर्मीय विद्वानांचे, खंडोबा, देवी आदि देवतांच्या उपासकांचे, शैव–नाथपंथीय, वारकरी सांप्रदायी, विद्वान् कीर्तन–प्रवचनकार व महिन्याची वारी करणारी काही विद्वान मंडळी या सर्वांचे, वैदिक शब्दांत सांगायचे म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अतिशूद्र या सर्वांचे-अभिप्राय संपूर्ण ग्रंथानुकूल आहेत. कांहीनी किरकोळ मतभेद दाखवले आहेत की, हा ग्रंथ संदर्भ ग्रंथांत विलीन होण्यासारखा नसला, तरी यांत भरपूर माहिती आहे, त्यामुळे तो वाचनीय व मननीय खचितच झाला आहे. एका धर्मगुरूंनी, ' हा ग्रंथ ' पतीविना पत्नी, ' ' मालकाविना घर ' याप्रमाणे आहे असा अभिप्राय व्यक्त केला असला तरी तो पठनीय, वाचनीय, सर्व शिवभक्तांनी तो संग्रही ठेवावा असे म्हटले असल्याचे

**श्री. का. शि. संकाये, नांदगांवकर (आळंदी) यांच्या अति परिश्रमाने व अमोघ अभ्यासाने "विश्वधर्म" ग्रंथ सजीव साकार झाला आहे.**

**आमचा (बहुजन समाजाचा) क्रांतिजनक, अविट गोडीचा हा ग्रंथ, सर्वांगसुंदर नि संग्राह्य झाला आहे. महाराष्ट्रांतीलच नव्हे तर भारतातील समाजक्रांतीचे दर्शन घडविणारा हा अनमोल ग्रंथ उत्तम, वाचनीय, उद्‌बोधक नि स्फूर्तिदायक आहे.**

**ह्या "विश्वधर्म" ग्रंथाचे चरित्र महाराष्ट्रातील विचारवंतांना, समाजसेवकांना, राष्ट्रीय कार्यकर्त्यांना, धर्माधिकाऱ्यांना, धर्मगुरूंना जगद्‌गुरूंना, तसेच विद्यापिठीय पदवीधरांना मार्गदर्शनपरच ठरेल.**

समजते. एक दोघांनी ग्रंथात नसलेलीच विधाने लेखकाच्या माथी मारलीं आहेत !

हे सर्व वाचून "विश्वधर्म" ग्रंथ-वाचकांना सुचवावेसे वाटते की, हा ग्रंथ अनेक ग्रंथाधारे लिहिला गेला आहे. लेखकाने तिनशे बारा ग्रंथांचा संदर्भ दिला आहे. संदर्भांतील सर्वच ग्रंथ वाचकांनी वाचले असतीलच असे वाटत नाही. हजारो ग्रंथ वाचलेल्या एखाद्या वाचकाच्या सुद्धा, 'विश्वधर्म' ग्रंथाच्या संदर्भातील कांही ग्रंथ वाचण्यात आलेले असतील, कांही वाचलेले नसून त्यांची नावेच फक्त ऐकण्यात असतील; आणि कांही ग्रंथांची नावे वाचनात वा ऐकण्यातही नसतील ! अशा अनेक व विविध धर्मग्रंथाधारे लिहिलेल्या, विविध विषयांच्या ह्या ग्रंथावर आपला अभिप्राय देतांना आपले विचार चुकीचे ठरू नयेत, अशी दक्षता घेणे आवश्यक आहे.

लेखकाचे कांही विचार, कोणाही विद्वान, पंडित, धर्मगुरू, जगद्‌गुरू, विद्यापीठीय पदवीधर, वैदिक, पौराणिक, साहित्यिक या सर्व मंडळीच्या कल्पनेच्या बाहेरचे आहेत असे वाटते. पण लेखकाच्या विचारातून त्याचा विचार केल्यास आणि संदर्भ ग्रंथांचा धांडोळा घेतल्यास या ग्रंथांतील विषय व विचार चुकीचे, अयोग्य, निराधार, त्यांना इतिहासाचाहि आधार नाही, तसेच कांही विषय लेखकाच्या स्वकल्पनेतील आहेत, असे मत मांडल्यास चुकीचे ठरेल; नव्हे ते हास्यास्पद होईल.

या ग्रंथांतील विचार विविध धर्म ग्रंथांधारे लिहिले आहेत, आणि

ते साधार आहेत असे वाटते. ग्रंथ वाचतांना वाचकाला त्याचा ठायीठायी प्रत्यय येतो.

लेखकाच्या खालील स्वतंत्र कल्पना (तुलनात्मक आणि शुद्धाशुद्ध) विशेष मननीय आहेत :

| | |
|---|---|
| १) भारताचा शुद्ध इतिहास. | १) भारताचा अशुद्ध इतिहास. |
| २) भारतीय आर्य निराळे. | २) उत्तरध्रुवीय वैदिक आर्य निराळे |
| ३) भारतीय आर्य विश्वारंभापासून भारतीयच आहेत. | ३) वैदिक आर्य सहा हजार वर्षांपूर्वी भारतात आले आहेत. |
| ४) भारतीय आर्य सद्धर्माचारी आहेत. | ४) उत्तरध्रुवीय वैदिक आर्य अधर्माचारी आहेत. |
| ५) यांचा इतिहास विश्वरंभापासूनचा व तो शुद्ध आहे. | ५) यांचा इतिहास कलियुगारंभापासूनचा व अशुद्ध आहे. |
| ६) यांचे धर्मग्रंथ शुद्ध व कल्याणकारी आहेत. | ६) तेच ग्रंथ वैदिकांनी अशुद्ध बनवून मानव–अकल्याणकारी बनवले आहेत. |
| ७) यांचे धर्म-ग्रंथ विश्वारंभापासून ते द्वापार युगांतापर्यंत निर्माण झाले आहेत. | ७) यांनी भारतीयांच्या मूळ ग्रंथांत भ्रष्टाचाराची भेसळ करून कलियुगारंभापासून स्वतःच्या स्वार्थी दूषित कल्पनेतून हजारो नवीन ग्रंथ निर्माण केले आहेत. |
| ८) यांच्या आचारविचारांत मानवता आहे. | ८) यांच्या आचारविचारांत मानवता नाही. |
| ९) यांच्या आचार-विचाराने मोक्ष मिळेल. | ९) यांच्या आचारविचाराने अधोगती होईल. |

या वर उद्‌धृत केलेल्या कल्पना लेखकाच्या कल्पनाचातुर्यातून निर्माण झालेल्या आहेत. अशा कल्पना आत्तापर्यंत कोणाही लेखकाने निर्माण केलेल्या नाहीत, कुठल्याही धर्मग्रंथांत नाहीत, अतएव नवीनच वाटतात. तरी त्या कपोलकल्पित आणि निरर्थक मात्र खचितच नाहीत. त्या वाचकांच्या मनाला चालना देणाऱ्या नि बोधप्रद आहेत.

तसेच खालील तुलनात्मक विचारांत " विश्वधर्म " ग्रंथाचे संपूर्ण तात्पर्यच साठवले आहे असे मला वाटते.

१) पार्शी, मुसलमान व ख्रिस्ती धर्म श्रेष्ठ आणि उत्तरध्रुवीय वैदिक आर्य (हिंदु) धर्म कनिष्ठ.

२) शैव-वीरशैव धर्म श्रेष्ठ आणि वैदिक आर्य (हिंदु) धर्म कनिष्ठ

३) वेदांत हिंसा व अहिंसा असे दोन प्रकार का ? जुने ऋषी आणि नवे ऋषी.

४) आद्य वीरशैव धर्म व नूतन रामानुजाचार्यांचा वैष्णव पंथ.

५) साकारापासून निराकाराचे ज्ञान. निराकार श्रेष्ठ, साकार कनिष्ठ.

६) आत्मा श्रेष्ठ, देह कनिष्ठ. पण दोन्हीही सत्य आहेत.

७) लिंग पूजा श्रेष्ठ. मूर्तिपूजा कनिष्ठ.

८) स्थावर लिंगपूजा कनिष्ठ, इष्ट लिंगपूजा श्रेष्ठ.

९) दैत्य, दानव, राक्षस ( असूर ) श्रेष्ठ आणि वैदिक ऋषी व देवता कनिष्ठ

वरील तुलनात्मक प्रकार महत्त्वाचे असून लेखकाचा हा प्रयत्न वाचकांना थक्क करण्यासारखा व अवाढव्य आहे. अभिजात वाङमयाचा अभ्यास कसा करावा लागतो याचा हा आदर्श आहे.

संस्कृत विद्येच्या गहन गुहेत दडून असलेले, अल्पज्ञान्यांना अनाकलनीय असलेले, महाधूर्त, स्वार्थी बुद्धिवंत वैदिक आर्यांनी लपवून ठेवलेले, भारतीय आर्यांची मानवताधर्माची ज्येष्ठ, श्रेष्ठ, अमूल्य, अनुपम धर्मतत्त्वे साध्या सोप्या बोलभाषेत निर्माण करून लेखकाने अखिल मानवसमाजावर महान् उपकारच केले आहेत असे म्हटल्यावाचून राहावत नाही.

ग्रंथाची सुरुवात " अगोदर हे वाचा " या शिर्षकाने झाली आहे. या लेखांत मानवाला महादेव बनवण्याची लेखकाची आंतरिक शुद्ध तळमळ स्पष्ट दिसून येते. त्यांनी भारतीय आर्यांच्या ज्येष्ठ आणि श्रेष्ठ मानवताधर्माचे विवरण साधार केले आहे, ते चिंतनीय, मननीय आहे. नंतर " लेखकाचे दोन शब्द " यात लेखकाने आपले अल्प ज्ञान सांगून, या ग्रंथातील उणीवा, कटुता, पाल्हाळ अशा चुकांबद्दल वाचकांची क्षमा मागितली आहे. आणि " लेखकाचे निवेदन " यास भारतीय दिव्य—

महामानवांचे (ब्रह्मा, विष्णु, महेश, राम, कृष्णादींचे) सत्य स्वरूप कसे होते, ते अगदी योग्य व साधार दाखविले आहे. ते वाचकांना दिङ्मूढ करणारे आणि स्तुत्य आहे.

ग्रंथाची मांडणी दोन विभागांत केलेली आहे. 'भारताचा अशुद्ध इतिहास' व 'भारताचा शुद्ध इतिहास.' शुद्ध इतिहास भारतीय आर्यांचा आहे आणि अशुद्ध इतिहास उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांनी निर्माण केला आहे.

प्रकरण एक मधील भाग एकमध्ये 'अशुद्ध इतिहास' व भाग दोनमध्ये आणि प्रकरण तीन व चारमध्ये 'भारताचा शुद्ध इतिहास' अनेक धर्मग्रंथाधारे वर्णिला आहे. प्रकरण पांच मध्ये धर्मग्रंथाचे, जैन बौद्धादि धर्मांचे, गणपती, विठ्ठल, दत्त आदी देवांची, वैष्णव-वारकरी आदी पंथांचे उदयकाल आणि संदर्भ ग्रंथांची यादी दिली आहे. सहाव्या प्रकरणांत सर्वधर्मांत ज्येष्ठ आणि श्रेष्ठ म्हणून प्रसिद्धी पावलेला, असंख्य ग्रंथ-संपत्ती निर्माण करून वळकट केलेला, भारतीय आर्यांच्या सर्वश्रेष्ठ मानवताधर्माला नष्ट, भ्रष्ट, निंद्य बनवून, आपला टेंभा मिरवणारा, भारतांतील अहिंसाचारी धर्मपंथांना वेदबाह्य म्हणणारा, तसेच जगातील सर्व धर्मपंथांना हीन व वेदबाह्य म्हणणारा, वेद ईश्वरप्रेरित, ईश्वर-निश्वसीत, ईश्वर मुखोद्भव, अपौरुषेय आणि ते सर्वांत ज्येष्ठ आहेत असे म्हणणाऱ्या वैदिक आर्यांचा वैदिक धर्म, वैदिक ऋषी व वैदिक देवता आणि त्यांचे आचारविचार, उपासना व वेद, भारतासह जगातील सर्व धर्मांपेक्षा, उपासनांपेक्षा आचारविचारांपेक्षा किती कनिष्ठ आहेत. ते वेदांच्याच आधाराने सिद्ध करून जगाला दाखवणारे धाडसी लेखक फक्त श्री. संकायेच एक आहेत.

सहाव्या प्रकरणाचे तात्पर्य वैदिक धर्माइतका कनिष्ठ धर्म वैदिक धर्मच आहे आणि वेदाइतके कनिष्ठ ग्रंथ वेदच आहेत, हे अत्यंत कटू पण सत्य आहे.

हा महान् ग्रंथ सनातन्यांना धक्का देणारा, विचारवंताना विचार-चक्रांत गुंतविणारा, संशोधकांना अधिक संशोधनाला प्रवृत्त करणारा, अज्ञान्यांना ज्ञान देणारा, मुमुक्षेच्छू मंडळींना मोक्ष मार्ग दाखविणारा, मानवाला महादेव बनवणारा असून बुद्धिनिष्ठ, तर्कशुद्ध, सुसंगत,

सुबोध, पण तरीही साध्यासोप्या बोलभाषेतील शैलीदार विवेचन हा या ग्रंथाचा विशेष गुण आहे व तो महाराष्ट्राला व मराठीला नि:संशय भूषणावह आहे. या ग्रंथाचें प्रांतीय अवतरण होणे आवश्यक आहे.

या ग्रंथांत एकही विषय निराधार नाही, असे लेखकाने ' लेखकाचे दोन शब्द ' या लेखांत स्पष्ट सांगितले आहे. या ग्रंथांत अनेकविध मते आहेत, तरी गंतव्य ठिकाण निश्चित स्वरूपाचे रेखाटले आहे. पण लेखकाची सर्वच मते वाचकांना पटतील असे नाही. ' पिंडे पिंडे मतिर्भिन्ना ' या उक्तीप्रमाणे मतभिन्नता असणे अपरिहार्य असते. हे जरी खरे असले तरी मतभेद वाटत असलेले विषय लेखकाच्या स्वत:च्या कल्पनेतील असतील तर लेखक त्यावद्दल बांधलेला राहील. परंतु त्यांनी दुसऱ्याच्या ग्रंथातून घेतलेले विषय असतील तर ते लेखकाच्या माथी मारणे योग्य ठरेल का ? याचाही वाचकांनी विचार करावा असे मला वाटते.

शेवटी लेखकाचे जीवनचरित्र व त्या घरातील पुनर्जन्माच्या सत्य घटनांचा ग्रंथात समावेश करून ग्रंथ संपविला आहे.

उत्तरध्रुवीय वैदिक आर्य हिंदू धर्माचे व त्यांनी निंद्य बनवून वंद्य मानलेल्या धर्मग्रंथ वेदाचे, लेखकाने केलेले विश्लेषण व निर्गुणत्वाचे दिग्दर्शन करणारा, आणि भारतीय आर्यांनी (देव-मानवांनी) विश्वारंभी निर्माण केलेल्या शिवोपासनेचे अनादित्व व श्रेष्ठत्व गाणारा, जनजागृती व मानवताधर्माची सर्वश्रेष्ठ शुद्ध तत्त्वे दाखवून, मानवाचा महादेव बनवणारा असा महान् " विश्वधर्म " ग्रंथ आहे, असे माझे स्पष्ट मत आहे.

### ग्रंथातील काही वैशिष्ठ्ये

१) विश्वमान्य 'अहिंसा परमो धर्म:' सूत्रावर आधारलेला विश्वधर्म ग्रंथ.
२) विश्वारंभापासूनची सत्यासत्य परंपरा सांगणारा ' विश्वधर्म ' ग्रंथ.
३) विश्वातील धर्म-अधर्मांचा इतिहास गाणारा ' विश्वधर्म ' ग्रंथ.
४) विश्वविख्यात भारतीय देव-देवींचे सत्य स्वरूप दाखवणारा ' विश्वधर्म ' ग्रंथ.
५) विश्ववंद्य 'वेद' ग्रंथाचे श्रेष्ठत्व कनिष्ठत्व दाखवणारा 'विश्वधर्म ' ग्रंथ.
६) विश्वमान्य एकेश्वरी उपासनेचे श्रेष्ठत्व गाणारा ' विश्वधर्म ' ग्रंथ.

७) विश्वमान्य अहिंसाचाराचे श्रेष्ठत्व शिकवणारा 'विश्वधर्म' ग्रंथ.
८) विश्वातील मानवाला मानवताधर्म दाखवणारा 'विश्वघर्म' ग्रंथ.
९) मानवाला महामानव बनविण्याचा मार्ग दाखवणारा 'विश्वधर्म' ग्रंथ.
१०) विश्वातील मानवाला मोक्षाचा मार्ग दाखवणारा 'विश्वधर्म' ग्रंथ.
११) मानवाला अंधःकारातून प्रकाशाकडे नेणारा 'विश्वधर्म' ग्रंथ.
१२) मानवाला प्राणिमात्रावर प्रेम करायला शिकवणारा 'विश्वधर्म' ग्रंथ.
१३) विश्वमानवाची जागृती करून ज्ञानप्रकाश देणारा 'विश्वधर्म' ग्रंथ.
१४) विश्वमानवात नवचैतन्यरूपी ज्ञानज्योत प्रज्वलित करणारा 'विश्वधर्म' ग्रंथ.
१५) विश्वमानवाची जीवनरूपी नौका यशस्वीपणे पैलतीरावर घेऊन जाणारा 'विश्वधर्म' ग्रंथ.
१६) तुलनात्मक विचाराने भक्कम केलेला 'विश्वधर्म' ग्रंथ.
१७) सत्याचे अधिष्ठान लाभलेला 'विश्वधर्म' ग्रंथ.
१८) भक्कम पुराव्यावर आधारलेला 'विश्वधर्म' ग्रंथ.
१९) स्वतंत्र संशोधनावर उभारलेला 'विश्वधर्म' ग्रंथ.

"प्रवृत्तीकडून निवृत्तीकडे जाणारा माणूस, ज्ञान संपादलेला असेल तर जीवनातील 'सोपान' चढून गेल्यावर मुक्ती मिळविण्यास त्यास सहज शक्य असते; याचे दर्शन या 'विश्वधर्म' ग्रंथात मिळाल्याशिवाय राहाणार नाही."

एकमेवाद्वितीय 'विश्वधर्म' ग्रंथ व या ग्रंथाचे लेखकही एकमेवाद्वितीयच. श्री. संकाये यांना हार्दिक शुभेच्छा व धन्यवाद."

दि. १५ ऑगस्ट ८४ चंद्रकांत भोसले

---

भारताचे माजी उपराष्ट्रपति व अ. भा. बसव समिती (बंगलोर) चे अध्यक्ष

## (४) डॉ. बी. डी. जत्ती यांचा शुभसंदेश



सु-क्षेत्र आळंदीकर श्री. का. शि. संकाये, यांनी मला आग्रहाचे पत्र पाठवून आपल्या 'विश्वधर्म' ग्रंथास शुभसंदेश लिहून पाठविण्यास विनंती केली त्याबद्दल मी आभारी आहे.

लेखकांनी या ग्रंथामध्ये वैदिक काळ, यज्ञकाळ, पौराणिक काळ, ऐतिहासिक व भौगोलीय परिस्थितीविषयी उल्लेख करून कांही सनातन व रूढ विचारांवर टीकाही केलेली आहे. कांही पौराणिक विधानांवर आपले काहीं स्वतंत्र विचारही मांडलेले आहेत. प्राचीन व अर्वाचीन वीरशैव धर्माच्या स्थिति-गतीवर आपले म्हणणे त्यांनी स्पष्ट केले आहे. महात्मा बसवेश्वराच्या सुधारणावादी, मानवतावादी व विश्ववादीं तत्त्वज्ञानावर लेखकांनी वचन शास्त्राधारे जास्ती प्रकाश पाडला असता व त्यांचा समतावादी संदेश व त्यांची धार्मिक, अध्यात्मिक व सामाजिक, साहित्यिक शिकवण विस्ताराने मांडली असती तर आजच्या लोकशाही-प्रधान लोकांना ते अधिक उपयोगी पडले असते. तरीपण माहितीं व ज्ञान या दृष्टीकोनांतून हा 'विश्वधर्म' ग्रंथ वाचनीय, मननीय व संग्राह्य झाला आहे, यांत संदेह नाही.

" धर्मेण हीनः पशुभिः समानः " जो धर्महीन असतो तो पशुवत् होय. म्हणजे कोणत्याहीं स्त्री-पुरुषाने, व्यक्तीने मनास वाटेल तसे स्वैर वागू नये; तर संयमाने, सदाचाराने, सरळपणाने व व्यवहारानें वागावे; आपल्या सारखेंच इतरांना वागवावे. स्वैर अवस्थेत समाज विस्कळीत होतो. मानवाच्या जीवनाला चांगले वळण लावावयाचे असेल तर चांगले ऐकावे, चांगले वाचावे, चांगले करावे. धर्माचे व सुंस्कारांचे बंधन नित्य पाळून वाईट मार्गापासून अलिप्त राहण्याचा माणसाने सतत प्रयत्न

करीत राहिले पाहिजे. न्याय, नीति, शील, प्रामाणिकपणा या सर्व सामान्य तत्त्वांचाही समावेश धर्माचारांत होतो. "कनिष्ठ परधर्माचा स्वीकार करण्यापेक्षा, श्रेष्ठ स्वधर्मातच राहणे श्रेयस्कर" असल्याचे जे सगळे म्हणतात, त्याचा खरा अध्यात्मिक व पारमार्थिक अर्थ असा आहे की, देह व इंद्रिये ( प्रकृति ) यांना फाजिल महत्त्व न देता ( परधर्म ), स्वस्वरूप (स्वधर्म) जाणून घेऊन आत्मज्ञान प्राप्त करून घेणे, हेच अंतीम इष्ट आहे, असे मला वाटते.

जगात एकच धर्म नाही; अनेक धर्म आहेत. ते सर्व मानवनिर्मित आहेत. सर्व धर्मांचे अंतिम सार एकच आहे. पण देश, काल, परिस्थिती-नुरूप, जगांत अनेक धर्मसंस्थापक व उद्धारक होऊन गेले. त्यांनी आपल्या स्वानुभवातून व अनुभूतीतून निरनिराळे धर्म स्थापन केले. परिस्थितीप्रमाणें कांही तत्त्वे स्वीकारली, कांहीं तत्त्वांना झिडकारले व कांही नवीन तत्त्वांचा समावेशहि केला. कांही स्वतःच्या नावावरूनहि त्या धर्मांची नावे पडलेली आहेत. स्वधर्माचे आचरण करताना, पर-धर्माची हेटाळणी करू नये. ती आपली संस्कृती नाही. भारतियांनी सहिष्णुतेला जपले पाहिजे. भारतांतील धर्मास 'देव-धर्म', 'ऋषि-मुनींचा धर्म,' 'संत-महंताचा धर्म' मानतात. प्राचीन काळांत ज्ञान-योग, यज्ञयाग, जप, तप, अनुष्ठान व सदाचरण यांना महत्त्व होते. पुढे यज्ञ-यागांत वैभवाला, हिंसेला, शत्रुत्वाला उत्तेजन मिळाले. त्याकाळी बौद्ध व जैन धर्म उदयास आले. समाज व राजे लोकांना त्या सुटसुटीत धर्माचे आकर्षण वाटू लागले. नंतर कुमारिल भट्ट, शंकराचार्य, मध्वाचार्य यांनी जैन व बौद्ध धर्मांतील सत्य, अहिंसा, अपरिग्रह इत्यादि गोष्टींचा स्वीकार केला. परंतु वैदिक व सनातनी आर्य लोकांच्या चातुर्वण्याच्या व जातीभेदाच्या वैषम्यामुळे समाजात वर्गभेद राहून गेले, आणि उच्च नीच भाव उद्योगधंद्यामुळे व समाजाच्या राहणीमानामुळे अनेक पोटजाती निर्माण होत गेल्या. त्या सर्व राष्ट्रीय भावैक्यतेला घातक ठरल्या गेल्या. भाषाभेद व कठीण संस्कृत भाषेचा तेव्हा साहित्यात वापर, त्यामुळे सामान्य लोक अडाणी व अज्ञानीच राहिले.

दहाव्या ते सोळाव्या शतकापर्यंत देशावर सुलतानांच्या, मुसल-मानांच्या व मोगलांच्या स्वाऱ्या होत राहिल्यामुळे जनतेचे जीवन

अस्थिरच होते. तेव्हां धर्मावर मोठे संकट कोसळले होते. त्यानंतर सतरा ते एकोणीसाव्या शतकापर्यंत डच, पोर्तुगीज, इंग्रजांच्या म्हणजे परकीयांच्या राज्यविस्तारामुळे देशातील लोक धार्मिक, सामाजिक व राजकीय पारतंत्र्यात खिचपत राहिले. भारतीय लोकांत संघटनेचा प्रयत्न झाला नाही. देशांतील धर्मभेद, जातिभेद, वर्णभेद व वर्गभेदांचा परकीय लोकांनी पुरेपूर फायदा घेतला. यात भारताचे फारच नुकसान झाले, त्याला इतिहास साक्ष आहे. दहाव्या ते अठराव्या शतकापर्यंत देशात सर्वच प्रांतांत समाज, धर्म व संस्कृति टिकविण्याचे महत्त्वाचे कार्य थोर संत-महंतांनी, शूर स्वातंत्र्य-अभिमान्यांनी केले हे विसरून चालणार नाही.

पण बाराव्या शतकांत म्हणजे आठशे वर्षांपूर्वी दक्षिण भारतात महात्मा बसवेश्वरादि शिवशरण जे होऊन गेले ते धर्माने जगले. त्यांनी धर्मावर प्रेम केले. श्रम करून शिव-जीवन जगतांना मानवतावादाचा, विश्वबंधुत्वाचा त्यांनी प्रचार व प्रसार केला. त्यांची समाजक्रांती यशस्वी झाली असती तर आज भारताचे चित्र वेगळेच दिसले असते. पण कर्मठ व सनातनी अंधरूढीच्या लोकांकडून शिवशरणांच्या समाजवादाला व समतावादाला विरोध झाल्यामुळे व तेव्हा राज्यकर्त्यांनीही भिवून सुधारणावादाला विरोध केल्यामुळे शिवशरणांची ( संतांची ) क्रांती रोडावली. पुढे तर राजकीय पारतंत्र्यामुळे भारतीय लोकांचे जीवन चिंताजनक झाले. भारतियांना पुढे पांचशे वर्षे निकृष्ट जीवन जगावे लागले.

पुढे २० व्या शतकांत महात्मा गांधींच्या धार्मिक, सामाजिक व राजकीय संघटनेच्या व जागृतीच्या क्रांतिमुळे देशांतील सारी जनता एक झाली. जगांत सर्वत्र लोकशाहीचे वारे वाहू लागले. त्यांतच भारत स्वतंत्र झाला. देशातील लोकांना राजकीय, सामाजिक, औद्योगिक, धार्मिक व वैयक्तिक स्वातंत्र्य मिळाले. पण आपल्या देशांत हिंदू, जैन, बौद्ध, मुसलमान, शीख, ख्रिश्चन व पारशी असे जे प्रमुख धर्म आहेत त्यांत वीरशैव धर्माचाही एक स्वतंत्र सुधारीत मानवतावादी धर्म म्हणून समावेश झालेला नाहीं. या धर्माचे लोक देशांत सर्वत्र आहेत. त्यांची संख्या मोठी आहे. पण त्यांच्यात एकी नाहीं. संघटना नाहीं. जागृती

नाही. त्यांच्यांत पुनः जातीभेद, पोटजाती भेद, उच्च–नीच भेद आहेतच. ते सर्व दूर सारून देशांत एक मजबूत संघटना उभारली पाहिजे. सनदशीर मार्गाने आग्रहाने शासनापुढे आपले गाऱ्हाने मांडले पाहिजे. त्यासाठी देशांत व प्रत्येक प्रांतांत गुरु–विरक्त विविध नावांच्या लहान मोठ्या धार्मिक व सामाजिक संस्था एक झाल्या पाहिजेत. त्यासाठी आपल्या समाजात वृत्तपत्राची, धर्मग्रंथ प्रकाशनाची व उत्तमोत्तम साहित्य प्रकाशनाची आज फारच गरज आहे. ज्या समाजाचे साहित्य विपुल असते तो समाज समृद्ध बनतो. त्या दृष्टीने श्री. काशिनाथ शिवमूर्तीअप्पा संकाये यांनी 'विश्वधर्म' नावाचा धार्मिक ग्रंथ लिहून साहित्यक्षेत्रांत मौलिक भर घातली आहे. लेखकाने हा ग्रंथ प्रथमच लिहिला आहे. त्यामुळे त्यात कांही दोष आहेत ते दुसऱ्या प्रकाशनाच्या वेळी दुरुस्त होतीलच. लेखक श्री. संकाये यांना धन्यवाद.

बसवभवन, बसवेश्वर सर्कल,
बेंगलोर (कर्नाटक) ता. १–३–८४

डॉ बी. डी. जत्ती.

———



(५) देशभक्त मा. रत्नाप्पा कुंभार,
बी. ए; (एक्स.) एम, एल्. ए; (एक्स्.) एम्. पी.



(महाराष्ट्र राज्याचे माजी मंत्री, म. प्र. (आय) काँग्रेसचे उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य ग्रंथालयाचे अध्यक्ष, चौथी गल्ली, राजारामपुरी, कोल्हापूर) यांचा

## शुभसंदेश

सुसंस्कारसंपन्न चांगले साहित्य नेहमीच सर्वांच्या मनाचे, बुद्धीचे व अंत:करणाचे सकस खाद्य असते व ते सर्वांनाच आवश्यकही असते. त्यामुळे मानवी मनाची जडण-घडण बनत जाते. चांगल्या धार्मिक, नैतिक व बोधपर साहित्य-वाचनाने मानवाचे मन विशाल व उदार बनते. कलापूर्ण संस्कारानेच दगडाची मूर्ती बनते. तसेच चांगल्या साहित्य-वाचनाने मानव महामानव बनतो, हा अनुभव आहे.

पैसा व सत्ता यांच्या प्रभावनेतून धर्माचे पालन-पोषण करता येत नाही. तर माणसाच्या मनाच्या सांस्कृतिक मोठेपणातून धर्माचे पालन होत असते. धार्मिक तत्त्वें मूलत: चांगलीच असतात. पण ती तत्त्वें प्रत्यक्षांत, दैनंदिन जीवनांत आचरणांत आणली पाहिजेत. बसवादि शिवशरणांचे वचन-साहित्य वाचल्यास आपणास दिसून येईल की, त्यांच्या साहित्यांत धार्मिक तत्त्वज्ञानाबरोबरच सामाजिक, व्यावहारिक व लौकिक बऱ्याच चांगल्या गोष्टी आढळून येतात. लौकिक व पारलौकिक दृष्टया व्यवहारी दृष्टीकोनातून ताळमेळ असला पाहिजे, तरच सामाजिक व धार्मिक क्षेत्रांत नैतिक पातळीवरील साहित्यवाचनाने मानवी मन प्रफुल्लीत होते.

सर्व धर्मांची तत्त्वे चांगली व ती जवळ जवळ सारखीच असतात. त्यांचा सारांश एकच असतो. मानवी मनाला चांगले वळण लावण्याचा त्या तत्त्वांचा उद्देश असतो. परंतु आपण जीवनांत ती

मौलिक तत्त्वे किती प्रमाणांत उपयोगांत आणतो ते प्रत्येकाने तपासून पाहिले पाहिजे. विश्वातील सर्व धर्मांचे सार मनाला पटण्यासारखे असते. पण मानव मात्र त्यातील शिकवणीप्रमाणे वागतो असे दिसत नाही. वरवरच्या धर्माच्या गोष्टी न करता आपल्या साधुसंतांनी व महात्म्यांनी सांगितलेल्या गोष्टी जर आम्ही जींवनांत आचरण करीत गेलो व सदाचाराने वागलो तर खऱ्या अर्थाने जीवन समृद्ध होण्यास सहाय्य होईल.

धर्म म्हणजे तरी काय ? तर प्रत्येक माणसाने इतर माणसावरोवर व जगाच्या पाठीवरील इतर जीवांशी माणुसकीने वागून मोठ्या मनाने, विशाल अंतःकरणाने दैनंदिन व्यवहार करीत गेले पाहिजे. अशा वेळी स्वार्थ वाजूला सारला पाहिजे. सत्य बोलणे, हिंसा न करणें, दुसऱ्याच्या वस्तूवर नजर न ठेवणे, शेजारधर्म पाळणे, चोरी न करणे, द्वेष, मत्सर व अहंकार मनांतही न वाळगणे, दुसऱ्याचे हित चिंतणे, इतरांची निंदा–स्तुती न करणें, परोपकाराने वागणे, ह्या सर्व गोष्टी धार्मिक तंत्रांत मोडतात. ह्या सर्व चांगल्या गोष्टी आम्हाला धार्मिक ग्रंथातून व चांगल्या लोकांच्या संगतीतून शिकण्यास मिळतात. अशा चांगल्या गोष्टींमुळे माणसांचे जीवन सुखाचे, समाधानाचे व समृद्धीचे वनत जाते. अशा वेळी 'हे कलियुग आहे,' 'धर्म बुडत चालला आहे' ह्या म्हणण्याला अर्थ राहत नाही. धर्म राखणे किंवा बुडविणे हे देखील बऱ्या वाईट संस्कारामुळेंच घडत असल्याने जीवनामध्ये वाईट विचार दूर सारून, चांगल्या गोष्टी अंगवळणी पाडून घेण्याचे कार्य ही धार्मिक उच्च तत्त्वे व सुविचार नेहमी करीत असतात. आपल्या लेखन केलेल्या माध्यमातून व ग्रंथातून ग्रामीण व शहरी भागांतील सर्वसामान्य लोकांना मनोरंजनावरोवरच लेखकांनी, कवींनीं व कलाकारांनी नीति, शील, प्रामाणिकपणा, कृतज्ञता व शिष्टाचार समाजात रुजविण्यासाठी समता, बंधुता, भावैक्यता व मानवतावादाचे लोकशिक्षण देऊन, त्यांच्यावर सतत सुसंस्कार घडविण्याचे महत्त्वाचे कार्य करीत राहिले पाहिजे. आपले लिखाण प्रत्येक माणसाच्या हृदयाला जाऊन भिडले पाहिजे. त्यांच्या अंतःकरणात सुविचारांचा उगम झाला पाहिजे. त्यांच्याकडून चांगल्या गोष्टीवद्दल चिंतन व मनन होत राहिले पाहिजे. सुसंस्कारसंपन्न साहित्य

नेंहमीच सुखाची शुद्ध गंगोत्री असते. त्या गंगोत्रीचा पावन-प्रवाह गढूळ होता कामा नये, हे लेखकांनी, प्रकाशकांनी पाहिले पाहिजे. लेखकांच्या लेखणीत सुप्त सामर्थ्य असते. आधुनिक शस्त्रास्त्रापेक्षा साहित्याची शक्ती कांही और असते. जगातील अनेक क्रांत्या लेखणीद्वारा झाल्या आहेत, हे आपण वाचतो. समाजाला चांगले किंवा वाईट वळण लावण्याची ताकद साहित्यांत जरूर आहे. तेव्हां समाजाच्या व पर्यायाने देशाच्या व जगाच्या कल्याणासाठीच साहित्यनिर्मिती करावी हे पथ्य त्यांनी पाळले पाहिजे.

आळंदी सारख्या संतशिरोमणि श्रीज्ञानेश्वर माऊलींच्या पुण्यभूमीत दीर्घकाळ वास्तव्य करून 'विश्वधर्म' नावाने साहित्यपूर्ण, वाचनीय, मननीय व संग्राह्य महान् ग्रंथ प्रकाशात आणण्याचे प्रयत्न श्री. का. शि. संकाये हे करीत आहेत. म्हणून त्यांच्या या मौलिक 'विश्वधर्म' ग्रंथास अभिप्राय लिहितांना त्यांचे अभिनंदन करण्यास मला मनस्वी आनंद होत आहे. समाजप्रबोधनांच्या त्यांच्या कार्यास व प्रयत्नास मी सुयश चिंतीत आहे.

रत्नाप्पा कुंभार

कोल्हापूर.

---



(६) **श्री. मल्लिकाअर्जुन महादेव स्वामी (जंगम) मु. वाचोटी जि. नांदेड, बी. ए; एल्,एल्. बी; डी. पी. एम्.; एम्. बी. ए.; कोविद आगम निगम शैवपुराण इतिहासादि सकलशास्त्रसंपन्न.**



श्री. का. शि. संकाये रचित "**विश्वधर्म**" हा ग्रंथ आमचे हितैषी माहेश्वरमूर्ती श्री. उद्धव विरुपाक्ष जंगम मास्तर शिगणापूरकर यांनी आणून दिला. हा ग्रंथ मी वाचावा व अभिप्राय लिहावा असा त्यांचा आग्रह होता.

"**विश्वधर्म**" हा ग्रंथ मी मनः-पूर्वक वाचला. हा ग्रंथ कुठल्याही धर्माचा, मताचा अथवा ग्रंथाचा द्वेषभाव मनात वाळगून लिहिलेला नसून "विश्व-कल्याण" हा सद्धेतू नजरेसमोर ठेवून संशोधनपूर्ण असा ग्रंथ निर्माण केला आहे.

श्री. संकाये यांची तळमळ देव व इतर धर्मग्रंथ खरे किंवा खोटे हे सिद्ध करण्याची नसून, 'जीव कसा शिव होईल,' 'मानव कसा महादेव बनेल,' 'नर कसा हर होईल,' 'भक्त कसा भगवान बनेल' ह्या कळकळीतून निर्मिलेला 'विविध धर्मग्रंथरूपीसागरातून शोधून काढलेला एक 'अनमोल हिरा' होय असे मला वाटते. हा ग्रंथ डेमी साईजच्या ५५० पानांचा, ४०० शीर्षकांचा, तसेच ३२० जुन्या-नव्या ग्रंथांच्या आधारे लिहिलेला आहे. सनातनी विद्वान पंडितांना जरी यातला काही भाग आवडला नाही, तरी पण हा संपूर्ण ग्रंथ विचारांना चालना देणारा व उद्‌बोधक असल्याचे जाणवेल. याच्या विरुद्ध आधु-निक सुशिक्षित, विशेषेकरून विद्यापिठीय पदवीधर मंडळींनी, 'विश्वधर्म' या ग्रंथाचे लेखकाने अभ्यासिलेल्या ३२० ग्रंथांपैकी निम्मे ग्रंथ सुद्धा वाचलेले नसतील. कारण ते ग्रंथ फारच दुर्मीळ असे आहेत. तेव्हा अशी मंडळी या ग्रंथांत बरेच दोष व शंका-कुशंका काढणार हे अटळ आहे. असे विद्वान लेखक, साहित्यिक लोक या महाप्रयासाने लिहिलेल्या

ग्रंथाबद्दल आपले मत खालीलप्रमाणे प्रगट करणे शक्य आहे. जसे–" हे संकलन चुकीचे आहे, हें इतिहासाविरुद्ध आहे, कारण याला सरकारमान्य इतिहासाचा आधार नाही, यातील मुख्य विषय निराधार आहे. किंवा लेखकाच्या कल्पनेतला हा खेळ आहे." परंतु ज्या विषयाचे त्यांना सखोल ज्ञान नाही, त्याबद्दल असे काहीतरी लिहिणे वा टीका करणे योग्य न होता ते हास्यास्पद ठरेल. कोणाही वाचकाने अगोदर अनुक्रमणिका पहावी, त्याच्या आधारे ग्रंथाचे अवलोकन करावे आणि उपसंहारही वाचावा व नंतर जे आपणास पुरेपूर समजले, त्याबद्दल आपले विचार मांडावेत. स्वतःस विदीत नसलेल्या विषयावर काहीतरी तर्कवितर्क करून उगीच नावे ठेवणे योग्य होणार नाही, असे मला वाटते.

श्री. संकाये यांना हा ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा का व कशी झाली हे त्यांनी 'लेखकाचे हृद्गत' या लेखात नमूद केले आहे. ते म्हणतात की, 'वीरशैव धर्म' हा वेदबाह्य आहे आणि म्हणून तो धर्म गौण आहे, अशा कुप्रचाराची व्यथा आम्हा मराठवाडावासियांना फार तिव्रतेने जाणवत होती. कारण आम्हाला वेदाच्या श्रेष्ठत्वाविषयी फारच आदर होता. ती आदरभावना ह्या 'विश्वधर्म' ग्रंथाने नाहीशी केली याबद्दल फारच आनंद होतो. कारण वेद धर्मग्रंथ नाहीत हे त्यावरून कळले.

कर्नाटक, तामिळनाडू, आंध्र आदी प्रदेशात शैव-वीरशैव मतानुयायांना पोषक असे वातावरण आहे, तसे मराठवाड्यांतील वीरशैवांना नाही. एक तर मराठवाड्यात वीरशैव संख्येने कमी आहेत. तसेच वीरशैवमत संवर्धक व धर्माचे प्रचारक, प्रसारक अथवा मठाधिपती भरपूर आहेत. जे कोणी आहेत त्यांत वीरशैवधर्म संवर्धनाकरिता चालू असलेले प्रयत्न तुल्यबळ नसल्यामुळे ते औदासिन्य प्रदर्शित करतात. जर कोणी विचार केला की, ग्रंथसंशोधन करावे, सखोल अभ्यास करावा व वीरशैव धर्म सर्वश्रेष्ठ धर्म आहे, हे प्रकर्षानें सिद्ध करावे, तर त्या व्यक्तीला धर्मग्रंथ मिळत नाहीत आणि मिळालेच तर ते मराठी भाषेत मिळणे कठीण.

मराठवाड्यात विशेषेकरून वीरशैवांना तसेच गुरुवर्गांना संस्कृत भाषेचे ज्ञान अल्प आहे, हे ग्रंथकारांनी स्पष्ट केले आहे, आणि ते

बरोबर आहे. या अडचणीमुळे वीरशैवसमाजबंधू किंकर्तव्यमूढ होऊन बसतात. पण श्री. संकाये यांचा पिंड अशा वर्गातला नसून, शतकोटी अडचणींना अनंतकोटी उपाय शोधणाऱ्या जिज्ञासूचा आहे. त्यांनी अत्यंत परिश्रमाने सतत चार तपे झिजून 'विश्वधर्म' हा ग्रंथ निर्माण केला आहे. तो ग्रंथ सामान्य नसून वीरशैवधर्म साहित्यरूपी कोंदणातील एक अनमोल असे रत्न आहे. या ग्रंथाचे वाचन व मनन केल्यास जीवाचा शिव, मानवाचा महादेव; नराचा हर, आणि भक्ताचा भगवान् बनण्यास निश्चितच सहाय्य व प्रेरणा मिळेल यात शंका नाही.

शैवागमग्रंथ हे अति प्राचीन व वेदांच्याही फार अगोदरचे आहेत. यात शुद्ध आचार–विचार, मानवकल्याणकारी मानवतेचे ज्ञान, आणि नीतितत्त्वे यावर विशेष भर आहे. प्रपंच करून परमार्थ कसा करावा, मानवजन्माचे सार्थक कसे करून घ्यावे याचा त्यात प्रकर्षाने उहापोह केला आहे.

भारतीय आर्यांनी रचलेले मूळ वेद शैवागम तत्त्वाप्रमाणेच होते. परदेशातून ( उत्तरध्रुवावरून ) आलेल्या आर्यांनी भारतावर आक्रमण करून आपले दुराचरणच योग्य हे सिद्ध करण्याकरिता भ्रष्ट साहित्याचा अत्यंत धूर्तपणे वेदांत समावेश केला. रामायण, महाभारत, पुराणादीं शुद्ध धर्मग्रंथातही असे भ्रष्ट व निंद्य वाङमय मिश्रित केले आहे, असें श्री. संकाये याचे ठाम मत आहे. वैदिकांनी भ्रष्ट बनवलेल्या रामायण, महाभारत, पुराणादी धर्मग्रंथाद्वारे 'भारताचा अशुद्ध इतिहास' लिहिला आहे, आणि निव्वळ वेदांचे कनिष्ठत्व दाखविण्याकरिता वेदाधारेच सहावे प्रकरण लिहून, वेद किती कनिष्ट आहेत, हे अखिल भारतीय मानव समाजाला सिद्ध करून दाखविले आहे. ते साधार असल्यामुळे कोणीही विचारवंतांना नाकारता येणार नाही.

'विश्वधर्म' ग्रंथातील पान १४४ मध्ये लेखकाने नमूद केले आहे की, वैदिक आर्यांनी आगमाला निंद्य बनवले. लेखकाचे हे मत बरोबर आहे. वेदांतील हिंसात्मक विषय सोडून अवतार, चमत्कार आगमादी शैव-वीरशैव ग्रंथांत घातले असावेत. ते केव्हा तर वैदिक आर्यांवर बौद्धांचे, जैनांचे हल्ले झाले तेव्हा. आपला वैदिक धर्म टिकवण्याकरिता त्यांनी शैव-वीरशैवांत प्रवेश केला असावा. त्या कालापासून वैदिक व आगमिक

पूजाअर्चा याची भेसळ झाली असावी आणि बाराव्या शतकात सोमनाथ नावाच्या पंडिताने वीरशैव मताला वैदिक रूप देऊन त्यानुसार ग्रंथरचनाही केली. त्या काळात त्याला त्याच्या 'वीरशैव ज्ञानपीठ धर्माचार्य' असे मानीत होते. त्याने आपल्या विद्वत् चातुर्याने आपले मत आगमादी ग्रंथात घुसडले असावे. त्या काळात वेदाला फार श्रेष्ठत्व होते. त्यामुळे त्याला शैव-वीरशैवांनीही मान्यता दिली असावी आणि तेव्हापासून वीरशैव आपणाला वैदिक म्हणवून घेत असावेत असे वाटते.

पुढे संकाये म्हणतात् की, वैदिक आर्यांनी निरनिराळचा देवता व त्यांच्या कपोलकल्पित कहाण्या भारतीयांच्या शुद्ध धार्मिक साहित्यात भाषाचातुर्याच्या सहाय्याने समाविष्ट करून, जनमानसांत भ्रम व अंधःश्रद्धा निर्माण केली. त्यांना अंधारात ठेऊन, 'आम्ही म्हणतो तेच खरे' हे सिद्ध करण्यासाठी त्यांनी हा विपर्यास केला आहे.

असे निंद्य व कुटिल कारस्थान लेखक श्री. संकाये यांनी उघडकीस आणून, सत्य जे की 'शिव' अर्थात कल्याणप्रद आहे, असे अनन्य प्रयासाने 'विश्वधर्म' ग्रंथात, 'शुद्ध इतिहास' लिहून केवळ वीरःशैवांचाच नव्हे तर अखिल मानव समाजाच्या कल्याणाचा प्रयत्न केला आहे. तो आचरणीय असून कल्याणकारी आहे, हे निर्विवाद. 'त्यांचा हा उपक्रम वीरशैव ( मानवता ) धर्माभिमानी व्यक्तीस साजेसा व अभिमानास्पद नव्हे तर गौरवास्पदहि आहे. लेखक श्री. संकाये यांची या ग्रंथात अशी वृत्ती दिसून येते की, "जग काहीही म्हणो आम्हासी, आम्ही न सोडू स्वधर्मासी ( मानवता )" ही मराठवाड्यातील चिकट, चिवट व मोडेल पण वाकणार नाही, ह्या वृत्तीची जाणीव सर्व जगाला करून द्यावी. "कुणी निंदा कुणी वंदा, परी आम्ही न सोडू स्वहित धंदा" हा त्यांचा बाणा आहे.

ह्या बाणेदारपणामुळे स्वधर्माभिमानाचे (मानवता वादाचे) वारे अंगात शिरल्यामुळे त्यांनी आपल्या जन्मभूमीचा त्याग करून श्रीज्ञानेश्वरांची पावन भूमी जी आळंदी ह्या पवित्र स्थळी, जेथे ग्रंथरचनेस प्रेरणा मिळते, अशा ठिकाणी वास करून निःस्वार्थभावनेने हा ग्रंथ निर्माण केला. त्यांनी वीरशैव (मानवता) धर्माची जी श्रेष्ठता सिद्ध केली आहे, त्याला आपल्या देशातीलच नव्हे तर पुष्कळशा पाश्चात्य देशातील

विद्वानांचा पुरेपूर पाठिंवा आहे. हे डॉ. पोप यांच्या खाली दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येईल. डॉ. पोप म्हणतात:

"The Saivism had elaborated a distinctive philosophy called the Saiva Siddhant. It is the most elaborate, influential and undoubtedly, the most intrinsically valuable of all the religions of India.—Tiruvasagam P. XXVI

अर्थ—शैविझम या धर्माने, शैवसिद्धांताच्या रूपाने स्पष्ट सविस्तर व निर्णायक असे तत्त्वज्ञान प्रतिपादन केले आहे. भारतात जे काही धर्म म्हणून मानले जातात, त्यापैकी सर्वात श्रेष्ठ, सविस्तर, प्रभावशाली व निःसंशय परंपरागत धर्म म्हणजे " शैविझम " होय.

डॉ. वारनेट्ट ( Barnett) यांनी आपल्या (The Heart of India) ( भारताचे हृदय ) ह्या संशोधनात्मक ग्रंथात शैवमतप्रणालीवद्दल लिहिताना आपले स्पष्ट मत खालीलप्रमाणे व्यक्त केले आहे:—

No cult in the world has produced a richer devotional literature, or one more instinct, with brilliance of imagination, furvour of feeling and grace of expression.

अर्थ—जगात कुठल्याही पंथाने " शैविझम " सारखे उच्च श्रेणीचे भक्ती साहित्य किंवा तेजस्वी विचारसरणीने सिद्ध केलेली समर्पक मार्गदर्शिका, तीव्र भावना व आकर्षक वर्णनशैलीने ओतप्रोत असे साहित्य केलेले नाही.

डॉ. तिरुमूलर (Dr. Tirumular) यांनी आपला ग्रंथ ' सिद्धांत दीपिका ' पृष्ठ २०५ मध्ये " शिवज्ञान सिद्धियार " या विषयाची हाताळणी करताना स्पष्ट उल्लेख केला आहे की, " शिवागम " हेच खरे साहित्य होय. की, जे ईश्वरनिर्मित आहे व विशेषे करून भाग्यशाली वरद भक्तांच्या कल्याण हेतुनिर्मित अमृतमय साहित्य आहे.

कांजीवरम येथील काशिनाथ मंदिरातील शिलालेखांत २८ आगमांचा उल्लेख आहे. त्यात मुख्यत्वेकरून ' कामिकागम ' व ' मृगेंद्रागम ' याचा उल्लेख आहे. ' शिवज्ञानबोधागम ' व ' रौरवागम ' चा पण उल्लेख आहे. त्याच मंदीरात ' शिवज्ञान सिद्धी, ' ' शिवप्रकाश ' ' सिद्धांत दीपिका, ' ' तिरु-अरुल-पायम ' आदी प्रसिद्ध संस्कृत

व तामिळ ग्रंथ आहेत, ज्यात शैवसिद्धांताचे श्रेष्ठत्व सिद्ध करणारे भरपूर साहित्य आहे. 'श्वेताश्वेतर' उपनिषदांत व शैवागमाबद्दल भरपूर उल्लेख आहेत. या उपनिषदातील ज्ञानयोग हा विषय शैवसिद्धांताधारे पटवून दिला आहे. 'शिवार्कमणिदीपिका' हा अप्पय्या दीक्षित यांनी लिहिलेला ग्रंथ असून त्यात सर्वात्मा 'शिव' साक्षी या विषयाचे प्रतिपादन केले आहे. त्यांनीच लिहिलेला दुसरा ग्रंथ 'आनंदलहरी' हा पण उल्लेखनीय आहे. ज्यात शिवधर्माच्या प्राचीनतेचे प्रतिपादन आहे.

श्री. नल्लास्वामी पिल्ले यांच्या "शिवप्रकाशम्" हा शैव सिद्धांत पा. क्र. २२७ मध्ये खालील उल्लेख आहे:

"Siva is not only the Absolute of Metaphysics, but the God of religion. He is the Saviour and Guru, and He assumes this form out of his great love for mankind. Therefore, he is the God of love"

शिव दैवत पूर्ण सत्य तत्त्वप्रणालीच नसून शैवधर्माची देवता आहे. शिवच गुरु व माता असून भक्ताच्या कल्याणास्तव त्याचे अस्तित्व आहे. म्हणून शिव हे प्रेम-दैवत आहे. 'मृगेंद्रागमा'च्या सातव्या अध्यायात असा श्लोक आहे:

निरंतरं शिवोऽहं इति भावना प्रवाहेण शिथिलितपाशया ।
प्रगत पशुभाषा उपासका शिव एव भवति ॥

श्री. संकाये यांच्या नराचा हर, मानवाचा महादेव होणे शक्य आहे, या मतास हा आधार होय.

अन्य आधार इशावास्योपनिषदांत मिळतो. वेदांत शिवाला 'ईश्वर,' 'ईश' हे संबोधन दिल्याचे तर सर्वांना ज्ञात आहेच.

ईषावास्यं इदं सर्वं यत्किंचित्जगत्यां जगत् । ही ऋचा सिद्ध करते की, जगातील प्रत्येक "अणु अणुयान् महतो महियान्" वस्तूमध्ये तो सर्वात्मा 'शिवसाक्षी आहे. तर मग '

वेदशास्त्रपुराणेशु कामिकाद्यागमेषु च ।
लिंगधारणमाख्यातुं वीरशैवस्य निश्चयांतु ॥

अशा वीरशैव धर्माला 'विश्वधर्म' हेच संबोधन योग्य होय, हे श्री. संकाये यानी महाप्रयासाने सिद्ध केले आहे, यात शंका नाही. वैदिक

आर्य ( हिंदू ) धर्मातील व वेदग्रंथातील अनिष्ट रुढीविरुद्ध माहिती देऊन वीरशैव आपणाला वैदिक म्हणवून घेतात, ते अगदी चुकीचे आणि महापापमय आहे असे योग्य ते दाखवून, वीरशैव समाजाला त्यांनी जागे केले आहे. त्यांनी आपण (वीरशैव) वैदिक नसून आगमोक्त आहोत असे स्पष्ट व निर्भीडपणे सांगितले आहे, ते अगदी योग्यच आहे, असे माझे स्पष्ट मत आहे. त्यांची तळमळ प्रामाणिक आहे. कारण कोणी तरी, केव्हा तरी अप्रियतेला, लोकापवादाला पत्करून स्पष्टपणे बोलायला, सांगायला हवेच होते. ते दिव्य श्री. संकाये यांनी महान धाडसाने केले आहे. या प्रयासामुळे पुष्कळाच्या म्हणजे सनातन्यांच्या, ' जुने तें सोने ' मानणारांच्या भावना दुखावल्या जातील व संधी सापडताच ते प्रतिप्रहार करतील, वादळ उठवतील अशी कल्पना असूनही, लेखकाने धैर्य दाखवले आहे. त्यांचे मत असे आहे की, ' हृदयाचे आक्रंदन ' हेच आयुष्याचे, जीवनाचे खरे लक्षण होय. हृदय शांत ठेवून जुन्या, चुकीच्या रुढीच्या आहारी जाणारांचे जीवन जगणे श्री. संकाये यांना मान्य नाहीं. म्हणून त्यांनी जुन्या व चुकीच्या विरुद्ध सत्य ते दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. तो स्तुत्य व योग्य असून अखिल मानवकल्याणकारीं आहे, असे कोणाही विचारवंताना मानावेच लागेल.

तरी हा अमूल्य ग्रंथ वाचून फक्त वीरशैवच नव्हे तर अखिल विश्वातील मानव-महादेव, नर-हर, जीव-शिव व भक्त भगवान झाल्या शिवाय राहाणार नाही अशी अशा बाळगून श्री. संकाये यांना दीर्घायु-आरोग्य चिंतितो आणि शुभाशीर्वाद देवून धन्यवाद देतो.

२१ ऑगस्ट ८३ मल्लिकार्जुन स्वामी

---

### (७) श्री. शि. बा. संकनवाडे पाटील

(संपादक – ज्ञानप्रसाद मासिक, कोल्हापूर; जनरल सेक्रेटरी – अखिल भारत वीरशैव संघ, वीरशैव धर्म; व्हिजिटिंग सहसंपादक – मराठी विश्वकोष, वाई. महाराष्ट्र )

## पुरस्काराचे दोन शब्द

लिहिताना म्हणतात: अध्यामिक साहित्याचे एक गाढे अभ्यासू,



पारमार्थिक वाङमयाचे व्यासंगी वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध, अनुभववृद्ध व संत-साहित्यामध्ये सातत्याने रस घेणारे आमचे जुने हितचिंतक व 'विश्वधर्म' या मौलिक ग्रंथाचे लेखक, संपादक, प्रकाशक श्री. का. शि. संकाये, नांदगावकर यांचेकडून नुकतीच 'विश्वधर्म' ग्रंथाची एक प्रत मिळाली. डेमी साईजच्या या ग्रंथात सुमारे ३५० पृष्ठ संख्या असून दोन भागात विस्तारलेल्या एकूण शीर्षकाची संख्या तीनशे दहा आहे.

संपूर्ण ग्रंथ वाचून झाल्यावर काही वेद, आगम, रामायण, महाभारत, उपनिषदे, पुराणे, इतिहास इत्यादी साहित्याची भरपूर ओळख झाली. अनेक संतांचे अनुभव अवलोकनात आले. काही अनिष्ठ रुढी, सनातन परंपरा, अंधसमजुतीवर लेखकाने कडक शब्दात कोरडेही ओढले आहेत. आणि त्यावर बुद्धीला पटणारे आपले सडेतोड विचारही साधार मांडले आहेत. अनेक जुन्या व नव्या ग्रंथांचे आपल्या विचाराच्या पुष्टीप्रित्यर्थ पुष्कळ आधारही दिलेले दिसतात. जगामध्ये अनेक धर्म आहेत, विविध भाषा आहेत, प्रत्येक धर्माच्या चालीरीती व मार्ग भिन्न असले तरी प्रत्येकाने ईश्वराचे अस्तित्व मान्य केले आहे व ईश्वराची उपासना करण्याचे विविध मार्ग सांगितले असले तरी, सर्व धर्मांचे सार व शिकवण शेवटी एकच असल्याचे लेखकाने ठिकठिकाणी सोदाहरण स्पष्ट

केले आहे.

आगम, निगम, उपनिषदे, स्मृती, पुराणे इत्यादी ३२० ग्रंथांच्या आधाराने विविध विषयांवर लेखकाने आपले साधार स्वतंत्र विचार मांडले आहेत. कृतयुग, त्रेतायुग, द्वापारयुग व कलियुगातील धार्मिक व सामाजिक परिस्थितीचा विचार करून प्रत्येक युगाची माहिती पण वाचकांना प्रस्तुत ग्रंथात वाचण्यास मिळते. स्वदेशीय व परदेशीय धर्म-वेत्त्यांचे विचारही या ग्रंथात वाचण्यास मिळतात. संस्कृत श्लोक ठिकठिकाणी विपुल उध्दृत केलेले आहेत आणि सहावे प्रकरणावरून असे वाटते की, जगात श्रेष्ठ मानलेल्या वेदांचे कनिष्ट स्वरूप दाखवण्याचे महान् धाडस लेखकाने केले आहे. ' विश्वधर्मा ' विषयी सांगोपांग विचार करीत असताना वीरशैव धर्माविषयी लेखकाने सविस्तर लिहिण्याचा आगम निगम पुराणादी ग्रंथाद्वारे प्रयत्न केलेला आहे. कै. काशिनाथ शास्त्रीलिखित ' वीरशैवरत्न ' व श्री. लिंगानंद स्वामी आणि श्री. अॅड. नागुरे अनुवादित ' लिंगतत्त्व दर्पण ' हे दोन मराठी वीरशैव ग्रंथ लेखकाने वाचलेले आहेत. त्याशिवाय डॉ. फडके लिखित ' शिवलिंगो-पासना ' हा ग्रंथही वाचला आहे. श्री. सुरेश हिरेमठ लिखित ' वीरशैव एक मानवधर्म ' श्री. म. पु. पाटील लिखित ' वीरशैव धर्मामृत ' आणि ' लीला विश्वंभर 'मधील शंभर पानी वीरशैव धर्मावरील प्रबंध, मराठीत आहे तो वाचला असता तर या ग्रंथात अधिक मोलाची भर पडली असती. पुढे दुसऱ्या आवृत्तीच्या वेळी लेखकाने याचा जरूर विचार करावा.

' विश्वधर्म ' या ग्रंथातील वीरशैव धर्माच्या प्रकरणांतून वीरशैवांचे तत्त्वज्ञान, अष्टावरण, पंचाचार, षट्स्थल यावर लेखकाने सविस्तर माहितीपूर्ण नि मननीय विचार मांडले आहेत. इष्टलिंग व स्थावर लिंगाविषयी माहिती वाचकांना विशेष आवडेल. शिवाय वीरशैव धर्माचे प्राचीनत्व, श्रीजगद्गुरु पंचाचार्य, श्रीजगज्योति बसवादि शिवशरण यांच्या कार्याविषयी व तत्कालीन देशाच्या व समाजाच्या परिस्थिती-विषयीं लेखकाने माहिती देण्याचा पुरेपूर प्रयत्न केला आहे. अनेक शंकांचे निरसन करण्याचे प्रयत्न केले आहेत ते स्तुत्य होय. ग्रंथामध्ये पाहिजे त्या ठिकाणी आकडेवारीने आपले म्हणणे मांडले आहे. काल-

मानाचे, स्थळ वर्णनाचेही उल्लेख आलेले आहेत. सारांश ग्रंथाचे लेखक, संपादक व प्रकाशक श्री. का. शि. संकाये, आळंदी यांनी स्वर्गतुल्य महत्त्वाच्या अलंकापुरी, (आळंदी) क्षेत्रात, श्रीसंतशिरोमणी ज्ञानेश्वर महाराजांच्या पांढरीत, पुण्यभूमीत वसून हा " विश्वधर्म " ग्रंथ लिहून पुरा केला आहे. ग्रंथ वाचनीय, मननीय व संग्राह्यच असा आहे. (काही किरकोळ दोष आहेत ते पुढे दुरुस्त होतीलच) पुनश्च श्री. का. शि. संकाये या ग्रंथकर्त्यांचे साभार अभिनंदन करून ग्रंथाबद्दलचे पुरस्काराचे माझे दोन शब्द पुरे करतो. धन्यवाद"

कोल्हापूर. शि. बा. संकनवाडे पाटील

दि. १९-२-८४

(यापुढील अभिप्राय पान क्रमांक ३८३ वर पाहणे.)



प्रकरण पहिले

# भारताचा अशुद्ध इतिहास
## भाग १

भारत ही भूमी विश्व निर्माण झाल्यापासून सर्व सुखसोयींनी समृद्ध आहे, हे सर्व जगाला माहीत आहे. भारतात ऐहिक व पारमार्थिक सुखे अनादी कालापासूनच (विश्वारंभापासून) भरपूर आहेत. ऋषि-मुनी राजा-प्रजा सर्व प्रकारच्या सुखांत आनंदी होते. विश्व निर्माण झाल्यापासून ते भारतीय युद्धाच्या कालापर्यंत म्हणजे १, ९७, २९, ८१, १०० (एक अब्ज सत्त्याण्णव कोटी एकोणतीस लक्ष एक्याऐंशी हजार एकशे वर्षपर्यंत) सुखात होते. वैदिक आर्य उत्तर ध्रुवावर राहात होते. अशा दुःखमय प्रदेशात जन्मलेले, तेथील दुःखमय यातनेला कंटाळलेले, वैदिक आर्य सुखाचा शोध करण्याकरिता आपला देश सोडून निघाले, त्यांना घरून निघाल्यापासून भारतात यायला काही हजार वर्षे लागली, हजारो वर्षे ज्या प्रवासाला लागले त्या प्रवासात अनेक अडचणी, अनेक संकटे आली असतील आणि प्रवासाचे अंतरहीं फारच मोठे आहे. एवढ्या लांबीच्या प्रवासात पुष्कळ प्रदेश लागले असतील. प्रत्येक प्रदेशात सुखाचा शोध करण्याकरिता थांबत असतील, येथे ही सुखे नाहीत असे वाटल्यावरून पुढे निघत असतील. असे अनेक देश ओलांडून भारतात पोचले.

१) आणि त्यांना समाधान वाटले म्हणून पुढचा प्रवास बंद करून भारतात थांवले.

२) प्रवासातील अनेक देशांत भारताइतके सुख दिसले नाही. ते भारतात दिसले म्हणून भारतात थांबले.

३) त्यांच्या जन्मभूमीत सुख नव्हते. म्हणून जन्मभूमीचा त्याग करून सुखाचा शोध करीत करीत ते भारतात आले. पुढे न जाता ते

भारतात थांबले. भारतात आलेले हे आर्य तामसी स्वभावाचे होते असे त्यांच्या आचारावरून वाटते. ते मांसाहारी होते. तसेच (दारू) पीत होते. त्यांना ऐहिक सुखाची अपेक्षा होती. ते सुख त्यांच्या देशात नव्हते. ते त्यांना भारतात सापडले. मागे वर्णन केल्याप्रमाणे भारत सर्व सुखी देश होता आणि आहे म्हणून ते भारतात थांबले आणि स्थायिक झाले.

१. भारतात आलेले हे उत्तर ध्रुवीय सात्त्विक नव्हते.

भारतात आलेले हे लोक (उत्तर ध्रुवीय) सात्त्विक नसावेत कारण सात्त्विक लोकांना ऐहिक सुखाची गरज नसते. सात्त्विकांचे सुख परमेश्वर प्राप्ती असते. सात्त्विक लोकांनी ऐहिक सुखाचा त्याग केला असतो. विचार केला तर भारतात आलेले हे लोक सात्त्विक सुखाचा शोध करीत भारतात आले नव्हते असे सिद्ध होते. भारतात आलेले हे वैदिक आर्य राजसी, तामसी स्वभावाचे होते म्हणजे या राजसी लोकांना ऐहिक (प्रापंचिक) सुखाची आवड असते. ते सुख त्यांच्या देशात नव्हते म्हणजे त्यांचा देश ऐहिक सुखसमृद्धीचा नाही. त्यांच्या देशात त्यांना पाहिजे ते सुख असते तर ते व तो देश (आपली मायभूमी) सोडून भारतात आले नसते आणि येथे स्थायिक झाले नसते. भारताच्या सुखसमृद्धीला पाहून ते मोहित झाले म्हणून ते भारतात थांबले, स्थायिक झाले. भारत देश ऐहिक सुखसमृद्धीचा तर होता तसाच अध्यात्म सुखसमृद्धीने तुडुंब भरलेला होता.

इतका ऐहिक व आध्यात्मिक सुखसमृद्धीचा देश सर्व विश्वात एकच आहे आणि तो भारत देश आहे.

२. भारताचे प्रथम नाव आर्यावर्त होते नंतरचे भारत आहे.

भारताचे भारत नाव मूळचे नव्हते, विश्व निर्माण झाल्यापासून ते भरत नावाच्या राजाच्या कालापर्यंत आर्यावर्त होते. भरत राजा हा फारच चांगला होता. म्हणून या आर्यावर्त देशाला भारत हे नाव प्राप्त झाले आहे. देशाचे नाव आर्यावर्त होते. भारतीय लोक आपल्याला आर्य म्हणवून घेत होते म्हणून भारत निवासी लोकांना भारतीय आर्य म्हणतात.

भारताबाहेरून आलेल्या वैदिक लोकांना वैदिक आर्य आपण

म्हणू. भारतात येताना त्यांनी काही वेदमंत्र बरोबर अणले होते म्हणून त्या लोकांना वैदिक आर्य म्हणू. भारतीय आर्य अनादीकालापासून विद्वान होते, गुणवान होते, वर्णभेद नव्हता. जातपात भेद नव्हता. चार वर्ण होते परंतु वर्णभेद नव्हते. एकमेकांत रोटीबेटी व्यवहार होता. चारी वर्ण सहभोजन करीत होते. शाकाहारी होते, मांसाहार अजिबात नव्हता. जंगलात राहणारे जंगली लोकांना दस्यू म्हणतात, ते मात्र मांसाहारी होते. भारतीय आर्य यज्ञयाग करीत होते. परंतु त्यांच्या यज्ञात पशू बळी नव्हता. भारतीयांच्या यज्ञात आहुतीच्या वस्तूंत मुख्य तूप होते. बाकी काष्ठ औषधींचे काष्ठ होते. अश्वमेध यज्ञात अश्व बळी देत नव्हते. गोमेध यज्ञात गाय बळी देत नव्हते. तसेच नरमेध यज्ञात मानव बळी देत नव्हते. या सर्व प्रकारावरून भारतीय आर्य मांसाहारी नव्हते. शाकाहारी होते, आहेत.

**३. वैदिक आर्यांच्या यज्ञात मानव, घोडा, गाय, बोकड आदी १४ जातींचे पशू बळी देत होते.**

वैदिक आर्यांच्या यज्ञात सर्व प्रकारचे पशू बळी देत होते. तसेच अश्वमेध यज्ञात घोडा बळी देत असत. गोमेध यज्ञात गायीचा बळी देत असत. नरमेध यज्ञात मानव बळी देत असत. वैदिक आर्य त्या काळच्या लोकांना असे भासवीत होते की, तुमच्या आवडीचे जे जे असेल ते यज्ञनारायणाला बळी दिल्यास तुम्हांला त्याच्या हजारोपटीने अधिक मिळेल. स्वर्गात गेलात तर स्वर्गात मिळेल, मृत्यु लोकात जन्मला तर मृत्यु लोकात मिळेल. असे सांगून अंधश्रद्धेच्या लोकांकडून त्यांच्या आवडीच्या वस्तू म्हणजे कोणाला गायी आवडतात, कोणाला म्हशी, कोणाला रेडें, कोणाला हरणे, कोणाला मानव अशा अनेक लोकांच्या अनेक आवडीच्या जिवंत चालत्या फिरत्या मानवादी सर्व-प्रकारचे बळी यज्ञात देत होते. इतर वेळीही खाण्याकरिता सर्व प्रकारचे पशू स्वतः मारून अगोदर त्यांच्या उपास्य देवाला अर्पण करून खात होते. सर्व पशुपेक्षा गाईचे मांस त्यांना फारच आवडत होते. वैदिकांच्या भोजनात सर्वांत उत्तम म्हणजे गाईचे मांस होते. त्यांच्याकडे पाहुणे आल्यावर पाहुण्यांच्या भोजन सत्काराच्या समयी कोवळचा गायीच्या

मांसाचे भोजन सर्वश्रेष्ठ होते असे ब्राह्मण, पुराणादी ग्रंथांत पुष्कळ आधार सापडतात. अशा त्यांच्या आचारावरुन वाटते की, त्यांच्या देशात मांसाहाराशिवाय त्यांना जगता येत नसावे. त्यांच्या देशात अन्न-धान्याचे उत्पन्न होत नसावे म्हणून मांसाहार करीत असतील.

**४. भारतात चारी वर्णात आदिकालापासून मांसाहार नव्हता.**

भारतात मात्र अनादी कालापासून मांसाहार नव्हता कारण ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्यादी तिन्ही वर्णांत मांसाहार नव्हता शूद्र वर्णाच्या लोकांना मांसाहार करण्यास संधी मिळत नव्हती. ते तीनही वर्णांच्या सेवा-चाकऱ्या करीत होते. बाहेरची सर्व कामे पुरुष करीत आणि घरातील सर्व कामे शूद्र स्त्रिया करीत होत्या. त्यांचे खाणे पिणे सर्व ज्यांच्याकडे कामास असत तिथेच होत होते. त्यामुळे त्यांना मांस खाण्यास वाव मिळत नव्हता. भारतातील फक्त जंगली लोक मांस खात होते.

**५. भारतात विश्वारंभापासून सर्व सुखसोयी आहेत.**

भारतात विश्वाच्या प्रारंभापासून ते आतापर्यंत चालू कालात जेवढ्या प्रकारचे अन्नधान्य, फळफळावळ आहेत तेवढे सर्व होते. अनादी काली व चालू कालात अन्नधान्याच्या नावात बदल होता. आता चालू कालात जे अन्नधान्य आहे ते सर्व विश्वारंभापासून होते. भारतीय लोक चालू कालातल्याप्रमाणे शेती करीत होते. चालू काळात जशी शेतीची अवजारे आहेत तशीच अनादी कालांत होती. चारी वर्णांचे लोक शेती स्वतः करीत होते. श्रीमंत लोक तेवढे काही चाकर ठेवून शेती करीत होते. चालू कालात भोजनाचे जेवढे प्रकार आहेत, तेवढे प्रकार भारतात अनादी कालापासून आहेत. स्त्रियांचे वस्त्राचे रंगी-बेरंगी, हलके, भारी, लोकरी, रेशमी सर्व प्रकार अनादीकालापासून आहेत आभूषणे (दागदागिने) चालू कालातल्याप्रमाणे अनादीकालातही होते. सोने, चांदी, रुपे, तांबे, पितळ, लोखंड ह्या सर्व वस्तू अनादी-कालात होत्या. वरील सर्वच प्रकारची संपूर्ण माहिती वेदांत आहे. चालू कालात जे विज्ञानाचे प्रकार आहेत, ते सर्व भारतात आदी काला-तही होते. पुराणादी ग्रंथांत ज्या स्वर्गातल्या सुखाचे वर्णन आपण

वाचतो ती सर्व सुखे भारतात आदी कालातही होती. भारतीय लोकांना अध्यात्माचे ज्ञान होते. विश्व निर्माण करणाऱ्या ईश्वराशिवाय दुसरे कोणतेही देव त्यांना माहीत नव्हते.

विश्व निर्माण करणाऱ्या ईश्वराने निर्माण केलेले विश्व हेच त्यांचे सगुण साकार रूप आहे. विश्व हेच देवाचे सगुण रूप आहे हे जाणून ते विश्वाची पूजा करीत होते. म्हणजे जी सृष्टी आहे, त्यातील जेवढे सजीव प्राणी आहेत ते ईश्वराचे सगुण साकार रूप आहे असे जाणून ते विश्वाची पूजा करीत होते. विश्वातील सर्व जीव ईश्वराचे सगुण साकार रूप आहे. म्हणून त्यांना मारून खात नव्हते. भारतीय आर्यांना विश्वातील सर्व जीवांत ईश्वर आहे हे ज्ञान होते म्हणून ते पशूहत्या करीत नव्हते. भारतीयांना अन्नधान्यादी सर्व प्रकार भरपूर माहीत होते. म्हणून त्यांना मांस खाण्याची गरज भासली नाही. म्हणून ते मांसाहार करीत नव्हते. विश्वातले सर्व जीव विश्व निर्माण करणाऱ्या ईश्वराची मुले आहेत; त्यांना मारून खाल्ले तर ते ईश्वराला आवडणार नाही म्हणून ते मांसाहार करीत नव्हते.

हे मागे वर्णन केलेले सर्व ऐहिक सुख, आध्यात्मिक सुख, अहिंसादी प्रकार, सत्य-असत्य, निती-अनीती, सुख-दुःख, धर्म-अधर्म, एक पतीव्रत, एक पत्नीव्रत अशा अनेक प्रकारचे ज्ञान भारतीयांना अनादी कालात होते. हे ज्ञान आगमनिगमात आहे. ते आतापर्यंत आहे. असा हा आध्यात्मिक सुखसंपन्न, ऐहिक सुखसंपन्न, फक्त एक भारत देशच अनादीकालापासून आजतागायत आहे. असा सर्व सुखसंपन्न जगात एकही देश नव्हता आणि नाही.

६. भारतीय सुखाची आणि आचारविचाराची कल्पना उत्तर ध्रुवीय आर्यांना नव्हती.

१) आतापर्यंत भारतातल्या सुखाचे वर्णन केले त्या सुखाची कल्पनासुद्धा उत्तर ध्रुवावरून भारतात आलेल्या उत्तर ध्रुवीय वैदिक आर्यांना नव्हती.

२) आध्यात्मिक सुखाचे त्यांना अजिबात ज्ञान नव्हते म्हणून ते

मांसाहार करीत होते. दुसरे कारण त्यांच्या देशात अन्नधान्याचे उत्पन्न नसावे म्हणून ते मांसाहार करीत होते.

३) त्यांना सर्व जीवांत ईश्वर असतो हे ज्ञान नव्हते म्हणून ते मांसाहार करीत होते.

४) पशू मारून खाल्ल्याशिवाय त्यांना जगता येत नव्हते म्हणून ते पशू मारून खात होते.

५) सर्व जीवांत परमेश्वर आहे हे त्यांना माहीत नसावे म्हणून ते मांसाहार करीत होते.

६) अन्नधान्याची रुची त्यांना माहीत नसावी म्हणून ते मांसाहार करीत होते.

७) पापा-पुण्याचे त्यांना ज्ञान नसावे म्हणून ते मांसाहार करीत असावेत.

८) त्यांना हिंसा-अहिंसा याचे ज्ञान नव्हते म्हणून ते मांसाहार करीत होते.

९) त्यांना चांगल्या-वाईटाचे ज्ञान नव्हते. असते तर ते पशूला मारणे वाईट आहे म्हणून पशु-हिंसा केली नसती.

१०) एक पती-व्रताचे त्यांना ज्ञान नव्हते म्हणून एका स्त्रीला एकाच वेळी अनेक पती करीत होते.

११) त्यांना एक पत्नीत्वाचे ज्ञान नव्हते म्हणून ते हजारो बायका करीत होते.

१२) त्यांना मातेचे ज्ञान नव्हते, असते तर त्यांनी खंडोबा, ज्योतिबा आदी देव निर्माण करून लाखो मुरळ्या (देवदासी) निर्माण करून त्यांची विटंबना केली नसती. स्त्रीची विटंबना म्हणजे मातृत्वाची विटंबना असते हे ज्ञान वैदिक आर्यांना नव्हते.

१३) विश्व निर्माण करणाऱ्या परब्रह्म परमेश्वराचे त्यांना ज्ञान नव्हते, असते तर अवतारादी देव निर्माण करून देवांना मासा, कासव, डुक्कर आदी योनीत जन्म दिला नसता. तसेच देवाला सिंहाचे, घोड्याचे तोंड निर्माण केले नसते.

१४) त्यांना निराकार परमेश्वराचे ज्ञान असते तर त्यांनी दगड-

घोंड्याचे तांब्या-पितळेचे देव निर्माण केले नसते. आणि हे देव मोक्ष देतात असे त्यांना वाटले नसते आणि हे देव मोक्ष देणारे आहेत असा प्रचारही केला नसता.

वरील सर्व वर्णन केलेले प्रकार ज्ञानी माणूस करणार नाही आणि अज्ञान्याला ते जमणार नाही. हे वैदिक आर्य ज्ञानी तर नव्हतेच परंतु अज्ञानीही नव्हते. ते फारच चतुर तसेच ते बुद्धिमान होते. मात्र त्यांना चांगले ज्ञान मिळाले नव्हते. कारण भारताबाहेरील सर्व देश भारता-इतके विकसित नव्हते असे अनेक विद्वान पंडितांचे मत आहे आणि चालू कालातही अनुभव येतो हे सर्वांना माहित आहेच.

**७. भारताची सर्व सुखे आपल्या मालकीची असावी असे उत्तर ध्रुवीयांना वाटू लागले.**

उत्तर ध्रुव हा प्रदेश भारतापासून फारच दूर आहे. भारत पृथ्वीच्या दक्षिण टोकाला आहे आणि उत्तर ध्रुव हा उतर टोकाला आहे. भारतापासून इतक्या दूर असलेला उत्तर ध्रुव प्रदेश फारच अविकसित असावा असे वैदिक आर्यांच्या आचारविचारावरून वाटते.

मागे लिहिल्याप्रमाणे वैदिक आर्य भारतात आले. त्यांना भारतीय आर्यांनी आश्रय दिला, आपल्यांत समावून घेतले. वैदिक आर्यांना, भारतीय आर्यांनी आपल्या बरोबरीने आपल्या सर्व प्रकारच्या सुखांत सहभागी केले. सर्व काही व्यवस्थित चालले होते. वैदिक आर्यांना मात्र समाधान वाटत नव्हते. कारण भारतीय आर्यांची ही सुखे आपली नाहीत. त्यांच्यावर जेवढा भारतीयांचा हक्क आहे तेवढा आपला नाही. आपण परके आहोत. भारतीयांची ही सुखे आपल्या मालकीची असावीत असे त्यांना वाटू लागले. तसे ते प्रयत्न करू लागले.

**८. विश्वारंभापासून सर्व सुखी भारत, भारत युद्धानंतर दुबळा झाला.**

भारतात अनादी कालापासून ते कौरव-पांडवांच्या कालापर्यंत म्हणजे १,९७,२९,८१,१०० (एक अब्ज सत्त्याण्णव कोटी एकोणतीस लक्ष एक्याऐंशी हजार एकशे) वर्षापर्यंत स्वर्गातल्या सुखापेक्षाही अधिक सुखात असलेल्या भारतात, सोम वंशात राजा धृतराष्ट्राच्या पोटी दुर्योधन नावाचा भारताच्या सर्व सुखांचा नाश करणारा मुलगा जन्मला

राज्याचे खरे वारस पांडव होते. पांडवांत व दुर्योधनादी कौरवांत भांडणतंटे सुरू झाले. त्या दोघांनाही साहाय्य करण्याकरिता सर्व जगातले राजे-महाराजे आले होते. भारतातल्या राज्याच्या युद्धाला जगातील राजे लोक का आले असतील, याचे कारण, विश्व निर्माण झाल्यापासून भारतीय युद्धाच्या कालापर्यंत सर्व जगातल्या सर्व देशांतील राजे भारतीय राजांचे मांडलिक होते म्हणून कौरवांनी, पांडवांनी आपापल्या साहाय्याकरिता सर्व जगातील राजांना बोलाविले होते.

सर्व जगातले राजे आपापले निवडक सैन्य घेऊन कोणी पांडवांना साहाय्य करण्याकरिता तर कोणी कौरवांना साहाय्य करण्याकरिता आले होते. भारतातले व भारताबाहेरून आलेले राजे यांचे सर्व सैन्यासह-कौरव पांडवांच्या त्या युद्धात नष्ट झाले (मारले गेले). भारतात हाहाकार उडाला. सर्व निवडक लोक मारले गेले. भारतीयांचे सर्व सामर्थ्य नष्ट झाले. भारत दुर्बल झाला. भारतीय युद्धांत भारताचा सर्वनाश व्हायला मुख्य कारण महायोद्धे द्रोणाचार्य व त्यांचा मुलगा अश्वत्थामा हे दोघे पितापुत्र आहेत. अश्वत्थामा चिरंजीव होता आणि महायोद्धा होता. तसेच द्रोणाचार्यांच्या हातात शस्त्र असल्या वेळी त्याला कोणीही मारू शकणार नव्हता, अशी त्याची ख्याती होती. हे दोघे पितापुत्र व या दोघांपेक्षाही कर्ण महायोद्धा होता. या तिघांचे कौरवांना साहाय्य होते म्हणून महायुद्ध झाले आणि भारत दुबळा झाला. या संधीचा फायदा घेऊन वैदिक आर्यांनी मुसलमानांपेक्षाही महाभयंकर हल्ला करून भारतात आपली सत्ता प्रस्थापित केली.

## ९. भारतीयांची ब्राह्मणांविषयी पूज्य भावना होती आहे.

वैदिक आर्य भारतात येण्याच्या अगोदरपासून ते अद्यापपर्यंत ब्राह्मणांविषयी ब्राह्मणेतर समाजाची पूज्य भावना होती, आहे. प्राचीन काळातील भारतीय ब्राह्मण ज्ञानी होते. तपस्वी होते आणि सर्व जगाच्या कल्याणाकरिता ते जगत होते. जगाचे कल्याण करणे आमचे पवित्र कर्तव्य आहे असे ते मानीत होते. म्हणून त्यांना देव मानीत होते. ते सांगतील त्यात आपले कल्याण आहे असा तिन्ही वर्णांचा दृढ विश्वास होता. ते सांगतील ते आनंदाने करीत होते. भारतीय युद्धांच्या थोडे

अगोदर म्हणजे कौरव-पांडवांच्या वेळी वैदिक ब्राह्मणांनी वर्णभेद सुरू केला. सर्व विद्या पारंगत असलेले श्रीद्रोणाचार्य व त्यांचे चिरंजीव श्री. अश्वत्थामा हे पितापुत्र श्रेष्ठ भारतीय ब्राह्मण होते. आणि त्यांनीच चारी वर्णांत श्रेष्ठ असलेल्या ब्राह्मणांचे ब्राह्मणत्व त्यांच्या हयातीतच नष्ट केले. उच्च-नीच प्रकार त्यांनीच निर्माण केला.

**(अ) द्रोणाचार्यांनी प्रथम वर्णभेद आणि उच्च-निच प्रकार निर्माण केला.**

त्याचे उदाहरण कौरव पांडवांपेक्षा, एकलव्य व कर्ण यांच्यात काय उणे होते ? त्यांना क्षत्रियापेक्षा नीच मानून त्यांचा द्रोणाचार्यांनी धिक्कार केला. धिक्कारिलेल्या एकलव्याने द्रोणाचार्यांच्या आकाराचा मातीचा पुतळा बनवून त्यांच्या पुतळ्याला गुरू द्रोण मानून त्या पुतळ्या-कडून धनुर्विद्या शिकून द्रोणाचार्यांना चकित केले. त्या वेळी तरी आचार्यांनी एकलव्याचे कौतुक करावयाला हवे होते. पण नीच जातीच्या एकलव्याचे ते सामर्थ्य आचार्यांना आवडले नाही. एकलव्याकडून गुरु-दक्षिणा म्हणून अंगठा मागितला आणि एकलव्याने आनंदाने आपला उजव्या हाताचा अंगठा आपल्या हाताने तोडून गुरुदक्षिणा दिली. गुरुदक्षिणा दिल्याचा सात्त्विक आनंद एकलव्याला झाला आणि आचार्यांना असुरी आनंद झाला.

**१०. गुरू द्रोणाचार्यांचे अज्ञान व महा पापारंभ.**

गुरू द्रोणाचार्यांनी एकलव्याबरोबर केलेल्या कृत्याइतके नीच कृत्य विश्व निर्माण झाल्यापासून ते विश्वांतापर्यंत द्रोणाचार्यांशिवाय कोणीही करणार नाही. ते फक्त द्रोणाचार्यांनीच केले. त्यांनाच ते जमले. उजव्या हाताचा अंगठा गेला म्हणून एकलव्याला दु:ख तर झाले नाहीच. तर गुरु दक्षिणा दिल्याचा आनंद झाला. द्रोणाचार्यांच्या आनंदाचा व एकलव्याच्या आनंदाचा वाचकानी तुलनात्मक विचार केल्यास एकलव्याचा आनंद सात्त्विक होता आणि द्रोणाचार्यांनी सत्याला तिलांजली दिली. ऐकलव्य शूद्र होता. द्रोणाचार्य ब्राह्मण होते. सत्याचा सांभाळ करणे हे ब्राह्मणाचे कर्तव्य असूनसुद्धा ते द्रोणाचार्यांनी केले नाही. ऐकलव्याबरोबर द्रोणाचार्यांनी इतके नीच कृत्य केले तरी

एकलव्याला त्याचे दु:ख न होता त्याने सत्याचा सांभाळ केला. त्याच्या निर्मल अंत:करणात द्रोणाचार्यांविषयी, ब्राह्मण, गुरू ही पूज्य भावना होती तीच पूज्य भावना आतापर्यंत ब्राह्मणेतर समाजाच्या अंत:करणांत होती. आहे.

**११. द्रोणाचार्यांचा मुलगा अश्वत्थाम्याइतके महा पाप कोणीही केले नाही.**

कर्णाविषयी तर द्रोणाचार्यांनी ब्राह्मणत्व तर सोडलेच पण मानवत्वही सोडले. (कर्ण द्रोणांचा प्रकार मृत्युंजय नावाच्या कादंबरीत वाचकांनी वाचावा) तसेच त्यांचे चिरंजीव अश्वत्थामा यांनी भारतीय युद्धाचे शेवटी जे कर्म केले ते कर्म ब्राह्मणाचे तर नव्हेच पण क्षत्रिय, वैश्य, शूद्रानेही केले नसते. नव्हे राक्षसांनीसुद्धा केले नाही आणि पुढे विश्वांतापर्यंतही कोणी करणार नाही. कुठे आढळले नाही. त्याच्याही आगोदर परशुराम ब्राह्मण होते. त्यांनी तर एकवीस वेळा पृथ्वी नि:क्षत्रिय केली होती. किती हत्या, किती हिंसा, अमर्याद. हा सर्व प्रकार मानवाला कानानेसुद्धा ऐकणे सहन होत नाही. धन्य त्यांच्या ब्राह्मणत्वाची ! ब्राह्मण असून इतके पाप करणे ब्राह्मणेतरांना कधीच जमले नाही. तसेच ब्राह्मण सोडून इतराने अनादी कालापासून आतापर्यंत कोणी केले नाही. तरी त्यांना ब्राह्मणेतर समाज ब्राह्मण मानीत होते, मानतात. ते परशुरामाला विष्णूचा अवतार मानतात. वैदिक आर्यांनी विष्णूला एवढे मोठे पाप करायला लावले आहे. ब्राह्मणाने ब्राह्मणत्व सोडले, पण क्षत्रियांदी तिन्ही वर्णांनी आपले वर्णत्व सोडले नाही. ब्राह्मण असून इतके पापी होते. तरी त्यांना ब्राह्मणेतर समाज देवच मानीत होते.

**१२. सत्याच्या बाजूला राक्षसादि शूद्र होते आणि असत्याच्या बाजूला द्रोणाचार्यादी ब्राह्मण होते.**

भारतीय युद्धात पांडवांची बाजू सत्याची होती व कौरवांची असत्याची होती हे सर्व जगाला माहीत आहे. सत्याच्या बाजूला घटोत्कवादी राक्षस होते आणि असत्याच्या बाजूला दोणाचार्यादी ब्राह्मण होते. सत्याच्या रक्षणासाठी प्राण पणाला लावून राक्षसांनी

मोक्ष मिळविला. आणि असत्याच्या रक्षणासाठी द्रोणाचार्यादी ब्राह्मणांनी अधोगती मिळविली. मोक्ष मिळविणारा राक्षस श्रेष्ठ की, अधोगती मिळविणारा ब्राह्मण श्रेष्ठ याचा विचार वाचकांनीच करावा. याच कालात वैदिक ब्राह्मणांचे ब्राह्मणत्व गेले. वैदिकत्व गेले.

**१३. उत्तर ध्रुवीय आर्य. भारतीय आर्यांना वेद बाह्य, जंगली, योनीलिंग उपासक म्हणतात.**

उत्तर ध्रुवीय वैदिक आर्य, भारतीय आर्यांना वेदबाह्य, आर्येतर, जंगली, योनीलिंग उपासक अशा हीन प्रकाराने संबोधीत होते. धार्मिक ग्रंथांतही असे हजारो उल्लेख आहेत. (वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या) व चालू कालातही तसाच प्रकार वैदिक आर्यानी (हिंदूंनी) चालू ठेवला आहे. ही वैदिक आर्याची फारच मोठी चूक आहे.

**१४. आर्य हे नाव विश्वरंभापासून भारत निवासी मानवाचे आहे.**

वैदीक आर्यानी भारतीय आर्यांना अशा हीन उपमा देणे म्हणजे मुर्ख मुलाने सर्वश्रेष्ठ बापाला मुर्ख म्हटल्याप्रमाणे आहे. कारण आर्य हा शब्द (उपमा, भूषण) विश्वरंभापासून भारतीय आर्याचा आहे. भारताचे नाव विश्वरंभापासून ते आता पर्यन्त आर्यावर्त आहे. हे सर्व जगाला माहीत आहे. भारताच्या आयार्वत नावावरून भारतीयांना आर्य हे नाव आहे. भारतात विश्वारंभापासून रहात असलेले चारी वर्ण, तसेच जंगली म्हणजे भारतातील जंगलांत रहाणारे, सर्वच विश्वारंभापासून ते आता पर्यन्तच्या कालांत सुद्धा आर्यच आहेत.

**१५. भारतीय संस्कृती सर्व जगातील संस्कृतींपेक्षा श्रेष्ठ आहे. तसेच विश्वरंभापासून आहे.**

भारतीय आर्याची संस्कृती वेद कालाच्याही अगोदर (आगमकालापासून) म्हणजे विश्वारंभापासून चालू कालापर्यन्त सर्व जगातील संस्कृतींपेक्षा श्रेष्ठ आहे, हे भारतीय आर्यांनी केलेल्या वेदमंत्ररचनेवरून सिद्ध होते. (भारतीय आर्याचे वेदमंत्र पाचव्या प्रकरणात पाहावे )

**१६. भारताबाहेरचे लोक आपणांला आर्य का म्हणतात ?**

भारताबाहेरचे लोक आपणांला आर्य का म्हणवून घेतात. आर्यावर्ताच्या (भारताच्या) बाहेरचे असूनसुद्धा आपणांला आर्य

म्हणवून घेतात. त्याचे कारण विश्वारंभापासून ते भारत महायुद्धाच्या दरम्यानच्या कालात आर्यावर्तीय (भारतीय) आर्यांची सार्वभौम सत्ता सर्व जगातील देशांवर होती. त्याला आधार महाभारतात पुष्कळ आहेत. ज्याप्रमाणे भरत राजाच्या नावाने भारत म्हणतात त्याप्रमाणे आर्यावर्तीय राजसत्तेखाली सर्व देश होते. म्हणून भारताबाहेरचे लोक आपणांला आर्य म्हणवून घेतात. भारताबाहेर गेलेले सर्व लोक मूळ भारतीयचे होते.

**१७. भारताचे वैशिष्टय निराकार एकेश्वरी उपासना, सदाचारसंपन्नतादी आहे.**

आर्यावर्त (भारत) आदिकालापासून सर्व सुखाने सुखसपन्न, सर्व प्रकाराने विकसित, निराकारी, एक देव उपासना आणि अहिंसा ही भारताची मुख्य वैशिष्टये आहेत. वैदिक आर्य आदिकालापासून अविकसित होते. त्यांचे आचारविचार भारतीयांच्या जंगली आर्यापेक्षाही फारच हीन होते. ते आपल्या कल्पनेने देव निर्माण करून त्याची उपासना करीत होते. त्यांना हिंसान्नाशिवाय जगता येत नव्हते म्हणून मांसाहार व मद्यपान करीत होते. अशा अविकसित भारताबाहेर अती दूर अंतरावर उत्तर ध्रुवावर राहात होते असे हे हिंसक जंगली वैदिक आर्य भारतात आले.

**(१८) भारतीय आर्यांनी उत्तर ध्रुवीय वैदिकांना भारतात आश्रय दिला व आपल्यात सामावून घेतले.**

भारतीय आर्यांनी त्यांना आपल्या मायभूमीत आर्यावर्त भारतात आश्रय दिला. आपल्यात त्यांना सर्व प्रकारांनी सामावून घेतले. त्या वेळी भारतीय आर्यांची सर्व जगावर सत्ता असल्यामुळें सर्व जगातल्या लोकांचे आचारविचार व गुण-दुर्गुण, खान-पान, उपासना दैवते इत्यादी सर्व प्रकारचे संपूर्ण ज्ञान भारतीय आर्यांना होते. त्याप्रमाणे उत्तर ध्रुवावर राहणाऱ्या लोकांचेही सर्व प्रकारचे ज्ञान होते. सर्व जगातल्या देशांपेक्षा उत्तर ध्रुवावर किती अविकसित प्रकार आहेत, तेथील लोकांना किती दुःख भोगावे लागते हेही ज्ञान होते. तेथील लोक किती अज्ञानी व मूर्ख आहेत हेही भारतीयांना माहीत होते.

यांना आपल्यात सामावून घेतल्यास ते आपल्याप्रमाणे सर्व सुखसंपन्न होतील या उदार भावनेने उदाहरणार्थ एका पित्याला १० मुले आहेत. त्यांत ९ मुले बापाला अनुकूल आहेत व एक मुलगा बापाच्या विरुद्ध आचारविचारांचा असला तरी पित्याचे पुत्रप्रेम सर्वांवर सारखेच असते. त्याप्रमाणे वैदिक आर्य हे आपले मूलच आहेत. अशा पितृरूपी उदार भावनेने आपल्यात सर्व प्रकारांनी सामावून घेतले.

अशा उदार पितृरूपी भारतीय आर्यांना वैदिक आर्य आर्येतर, जंगली म्हणतात म्हणजे आपल्या बापाला विसरलेल्या मूर्ख मुलाप्रमाणे आहे असे म्हणायला काय हरकत आहे ?

**१९. उत्तर ध्रुवीय वैदिक, पौराणिक हिंदूंच्या पापाचाराला वेदमंत्रधार**

भारताबाहेरून आलेल्या वैदिक आर्यांचे आचार, विचार, उपासना किती कनिष्ठ आहे ते त्यांनी भारतात येताना त्यांच्या आचार, विचार व उपासनेला अनुकूल असलेल्या वेदमंत्राधारे विचार करू.

भारताबाहेरून ( उत्तर ध्रुवावरून ) आलेल्या वैदिक आर्यांनी येताना बरोबर आणलेल्या आणि भारतीयांच्या वेदांत समाविष्ट केलेल्या वेदमंत्रांच्या आधारे विचार करू.

वैदिक संस्कृतीचा विकास : लेखक– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.

**(अ) वैदिक आर्यांनी भारतीयांचे लाखो लोक मारले, लाखो स्त्रिया भ्रष्ट केल्या, हजारो गावे नष्ट केली.**

१२४ पान :– गाई, घोडे यांना यज्ञांत बळी देत होते. ही प्रथा वेदांनी वर्णिली आहे. तसेच पान १३६ :–वेद ही मनाने रचलेली भाषा आहे, ती वाणी आहे. ज्याची यज्ञात उपासना चालते ते ब्रह्म नव्हे, अग्नी, इन्द्र, वायू इत्यादी यज्ञाचे उपास्य देव आहेत, असे वेद सांगतात. परंतु हे सर्व खोटे आहे. इंद्र इत्यादी देवांचे ठिकाणी मोठे सामर्थ्य आहे असे वेद सांगतात परंतु हे सर्व खोटे आहे. इन्द्र इत्यादी देवांचे ठिकाणीं मोठे सामर्थ्य आहे. हा केवळ भ्रम आहे. ४१ पान :–ऋग्वेदांतील वैदिक आर्यांनी वारंवार हल्ले करून दस्यु, दास व पाणी यांचे पशुधन, अन्न, सुवर्ण, क्षेत्र, स्त्रिया, मुले व माणसे लुटण्याचा अनेक शतके उद्योग केला. या युद्धांना दस्युहत्य व पुरभिद्य अशी नावे ऋग्वेदात

आहेत. हे पदोपदी लक्षात येते. दस्युहत्य व पुरभिद्य असे निर्देश ऋग्वेदात वारंवार येतात. दस्यूंची पुरे म्हणजे नगऱ्या (अश्मनमयी (ऋग्वेद ४।१३०।३०) आणि दृढ (ऋग्वेद १।३।१२, ६।२०।७, ६।३२।३) असत व आर्यांचे दुसरे शत्रुपणी होते त्यांच्या नगऱ्या आयसी (ऋग्वेद २।२०।८ ४।२६।३) व दृढीत ऋग्वेद १।५१।११, ७।९९।५, ७।१८।१३) असत. अश्मनमयी म्हणजे दगडांची बांधलेली व आयसी म्हणजे ब्राँझ धातूच्या दरवाजांनी मजबूत केलेली. दस्यूंची पुरे फोडणे हा ऋग्वेदातील आर्यांचा कायमचा व्यवसाय होता. पुर शब्दाच्या संबंधात उल्लेख येत असतःना तो बहु वचनी येतो. उदाहरणार्थ : शंवर या दस्यू राजाची नव्याण्णव पुरें फोडली आणि त्याचे एक लाख लोक मारले. १,००,००० (ऋग्वेद ७-९९-५) असा उल्लेख आहे. दुसरीकडे शंबराची अप्रतिम अशी शेकडो पुरे नष्ट करून त्यांच्या हजारो साथीदारांना ठार करून शंबराला पर्वताखाली लोटले आणि दीवोदास राजाला संपत्तीच्या राशी प्राप्त झाल्या असा निर्देश आहे (ऋग्वेद ६-३१-४). विप्रु, मृगय, कवच, वर्चि, शुशुवांस इत्यादी शत्रू व त्यांचे ५०,००० काळे साथीदार यांना कापून काढल्याचा (ऋग्वेद ४-१६-१३) मोठ्या अभिमानाने उल्लेख करून ज्याप्रमाणे जरा तारुण्यातील स्वरूपांचा नाश करते, त्याप्रमाणे तू शत्रूच्या पुरांची म्हणजे नगरांची दशा केलीस असे काव्यमय भाषेत मोठ्या डौलाने वसुदेव, गौतम ऋषी वर्णन करतात. हे आर्यांचे शत्रू अयज्यू म्हणजे यज्ञ न करणारे. शिश्न देवाचे पूजक म्हणजे आर्यांच्या यज्ञ संस्थेच्या बाहेरचे होते. त्यांची पुरे समृद्ध होती. त्यांच्यांत कृष्ण म्हणजे काळे लोकही होते. ते शेती, व्यापार व पशुपालन करणारेही होते. हे सगळे वर्णन सिंधू संस्कृतीच्या लोकांना, नगरींना लागू पडेल. दस्यू हे पर्वतवासी होते असा कयास ऋग्वेदातील शंबराख्यानावरून करता येतो. सिन्धू संस्कृतीचे लोक लढाऊ जमातीचे नव्हते. ते शांततामय जीवन जगत होते. सिंधू संस्कृतीचे साम्राज्य मोठे होते. वैदिक आर्य व भारतीय आर्येतर दस्यू, दास, पणी इत्यादी जमाती संस्कृतीच्या समान पातळीवर असताना आर्येतरांवर मात कशी केली याचे उत्तर अधिक विचार करता

मिळते. वैदिक आर्य प्रथम अश्वप्रिय होते. अश्वरथ व अश्वारोहणाची कला त्यांना अवगत होती. वैदिक आर्यांचे भारत आगमनापूर्वीचे अश्वी देव हे अश्वरथ प्रिय देव आहेत. शस्त्रक्रियेच्या वैद्यकात ते निष्णात देव होते. अश्वशक्ती ही दिव्य शक्ती असे प्रजापतीचे प्रतीक होय, अशी वैदिक आर्यांची श्रद्धा होती ही गोष्ट त्यांच्या अश्वमेध संस्थेवरून नितांत सूचित होते. अश्वमेधाची दोन सूक्ते ऋग्वेदाच्या प्रथम मंडलात आहेत. त्यांतील दुसऱ्या सूक्तात (१-१६३) अश्वाबद्दल म्हटले आहे. अश्वमेधाचे प्राथमिक स्वरूप मानसशास्त्राच्या दृष्टीने म्हणजे फलन क्रिया आदीम आर्य जमातीत प्रचलित असावी. ही फलन क्रिया जमातीचा प्रमुख स्वतः करीत असावा. वैदिक आर्यांची जमात आदीम अवस्थेत अश्वमांस भक्षक असावी, असे अश्वमेध सूक्तातील १२ व्या मंत्रावरून (१-१६२-१२) दिसते. त्यात म्हटले आहे. जे अश्व शिजला आहे असे पाहातात ते म्हणतात की याला आता चांगला सुगंध येतो. याला काढा आणि जे अश्व मांसाची वाटणी मिळावी म्हणून वाट पाहात असतात त्यांच्या प्रयत्नांची साथ आम्हाला मिळो. कालांतराने यजुर्वेदकाली वैदिक आर्यलोक साम्राज्य पसरविण्यास लागले, तेव्हा साम्राज्य अभिषेकाचे प्रधान कर्म म्हणून अश्वमेधाची महती वाढली.

अश्वारूढ दले व अश्वरथ दले यांचे बलामुळे वैदिक आर्यांची आर्येतरांवर (भारतीयांवर) विजय मिळविण्याची महत्त्वाकांक्षा वाढली. भारताच्या वैदिक कालापासून ते यादवांच्या राजवटीच्या अंतापर्यन्त भारतीय राजवटीच्या पराभवास कारण वेगवान, सुसंघटित, शूर, निर्दय व असंतुष्ट अशा परकीय मानवगणांचेच आक्रमण होय. येथे जे जे बाहेरून येऊन व शांत सांस्कृतिक जीवनपद्धती निर्माण करून स्थिरावले व समाधान पावले त्यांचा आक्रमकांनी पराभव केला. दस्यू यांची संस्कृती आर्यांपेक्षा उन्नत होती असे ब्राह्मण ग्रंथातील असुरांच्या कथांवरून सूचित होते.

## २०. वेदांतील अग्नी उपासना

पान ८ ते १८ :— प्राचीन काली जगातील अनेक लोक अग्नि-उपासक होते. तसेच वैदिक आर्यंही अग्नी उपासक होते. अग्नी उपासनेत वैदीक आर्यांचा सूक्ष्म बुद्धीचा आणि तरल भावनेचा प्रत्यय जागोजागी येतो. त्यांची अग्नी उपासना वैयक्तिक आणि सामुदायिक अशी उभयविध आहे. वैदिक उपासना म्हणजे स्मार्त किंवा गृह्य कर्म आणि सामुदायिक अग्नी उपासना म्हणजे श्रौत कर्म आहेत.

अग्नी उपासना यज्ञाच्या प्रकारांत आहे. यज्ञ हे एक फार थोर कृत्य आहे. ते हातांनी करावयाचे असते. डोळ्यांनी पाहावयाचे असते. कानांनी ऐकावयाचे असते आणि बुद्धीने मनन करावयाचे असते. यज्ञ म्हणजे वेदांनी सांगितलेल्या विधीला अनुसरून देवतेप्रीत्यर्थ विशिष्ट द्रव्य अग्नीमध्ये अपर्ण करणे. अग्न्यागारामध्ये गार्हपत्य दक्षिणाग्नी, अहवनीय सभ्य अवसथ्य या अग्नींची उपासना करावयाची असते. गार्हपत्य, अग्नी गृहाचा स्वामी आहे अहविनय अग्नी हा यज्ञातील प्रमुख आहुती देण्यासाठी स्थापन केला जातो. दर्शपूर्ण मासेष्टित अन्वाहार्य चरू ऋत्विजांना दक्षिणा म्हणून देण्यात येतो. तो दक्षिणाग्नि· चरू शिजविला जातो. म्हणून त्याला अन्वाहार्यपचन असे नाव आहे. तो दक्षिण बाजूकडे असतो म्हणून त्याला दक्षिणाग्नी म्हणतात. सभ्य आणि अवसथ्थयांचे नित्य धारण केलेच पाहिजे असा नियम नाही. सभागृहातील अग्नी तो सभ्याग्नी आणि अवसथातील म्हणजे राहाण्याच्या जागेतील असतो. वेदांनी सांगितलेल्या यज्ञांची संख्या शेकडयांनी आहे. तितक्या सगळ्या यज्ञांची स्वरूपे वेगवेगळी आहेत. इष्टी, पशुयाग, सोमयाग, चयन, सव, सत्र या यज्ञाच्या प्रमुख जाती आहेत. वेदमंत्राचा अधिकार ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रिवर्णिकांना आहे. याचप्रमाणे यज्ञाचे अधिकारीही हे तिन्ही वर्ण आहेत. तसेच रथकार (सुतार) आणि निषादस्त पती म्हणजे निषादांचा प्रमुख यांनाही यज्ञाचा अधिकार आहे. फक्त वेदांचे अध्यापन आणि यज्ञ-यागातील पौरोहित्य हीं ब्राह्मणांची कर्मे होती. परंतु मंत्र म्हणण्याचा आणि यजमान या नात्याने यज्ञ करण्याचा अधिकार क्षत्रिय—वैश्यांनाही होता. स्त्रियांना वेदाधिकार

नाही, ही स्मृती कालातील रूढी यज्ञ धर्माशी सुसंगत नाही. यज्ञामध्ये पत्नीला यजमानाइतकाच अधिकार आहे. यज्ञप्रसंगी पत्नीनेही हजर राहून मंत्र म्हणावयाचे असतात आणि इतर काही विधी करावयाचा असतो. होम प्रसंगी यजमान हजर नसला तरी चालेल पण यजमान पत्नी अवश्य उपस्थित असली पाहिजे. पुढे स्त्रियांचा वेदाधिकार नाहीसा होत गेला. याची कारणे सामाजिक आहेत. यज्ञामध्ये विशिष्ट देवतेसाठी हवन करावयाचे असते. या देवतेचे स्वरूप वेदामध्ये वर्णिलेले असते अग्नी, इन्द्र, विष्णू, अदिती, प्रजापती इत्यादी देवतांना हवी दिले जातात.

यज्ञातील हविर्द्रव्यांत अनेक प्रकार आहेत. मुख्य तूप, गायीचे दूध, ताक, नासलेल्या दुधाचा चोथा आणि उरलेले पाणी, धान्यामध्ये व्रिही म्हणजे भात, भाताच्या पिठाचा कासवाच्या आकाराचा गोळा करून तो खापरावर ठेवून भाजावा. अशा भाजलेल्या गोळ्याला पुरोडाश म्हणतात.

**२१. यज्ञात बळी द्यायच्या पशूला त्याचा श्वास कोंडून मारतात. चौदा जातींचे पशू यज्ञात बळी देतात.**

वाजपेय आणि सौत्रामणि या यज्ञांत सुरेचे (दारूचे) हवन सांगितले आहे. पशु-यागात अज म्हणजे बोकड याचा उपयोग सर्वांत अधिक प्रमाणात सांगितला आहे. निरनिराळ्या रंगांचे बोकड असतात. याखेरीज मेंढा, गाय, बैल, अश्व (घोडा) इत्यादिकांचेही याग सांगितले आहेत. सात ग्राम व सात अरण्य पशूंचा यागाशी संबंध आहे. पशूचा श्वास कोंडून त्याला मारले जाई. नंतर शरीराचे छेदन करून कोठ्यावर वेष्टनासारखा असलेला वपा नावाचा पापुद्रा अग्नी-वर भाजून त्याची आहुती देत होते. नंतर पशूची विशिष्ट अंगे काढून ती शिजवून त्याचा याग करीत असत. या एकंदर प्रकारावरून हे स्पष्ट दिसते की, आपण जे पदार्थ खातो ते देवालाही आवडतात, या कल्पनेनें देवतांना अर्पण केले जात होते. अनेक पशुयाग निरनिराळ्या कामनेच्या पूर्तीसाठी करण्याची योजना श्रुतींनी आखली आहे. सोमयागात पशूयागाचे तंत्र अंतर भूत असते.

## वैदिक वाङ्मयातील भागवत धर्माचा विकास

लेखक : डॉ. शं दा. पेंडसे,
वेदान्त तीर्थ शास्त्री.

पान ९१– वैदिक आर्यांना स्थायिक होण्याकरिता जेव्हा लढाऊ देवतांची आवश्यकता होती, तेव्हा इंद्राला प्राधान्य येणे स्वाभाविक होते. ते स्थायिक होऊन कृषि कर्म करू लागल्यावर त्यांना विष्णू देवता विशेष आवडू लागली.

## २२. वेदांत इंद्राइतके विष्णूला प्राधान्य नाही

पान ९२– वैदिक आर्यांपैकीच एका फार मोठ्या जमातीची विष्णू ही सर्वश्रेष्ठ देवता होती. ऋग्वेदात विष्णु–सूक्तांची संख्या कमी असल्यामुळेही वैदिक ऋषींच्या दृष्टीने या देवतेचे स्थान गौण होते. वैदिक कालात विष्णूचाही एखादा विशिष्ट पंथ अस्तित्वात असला पाहिजे.

पान १३६– ऋग्वेदात जिद्राला जितके प्राधान्य आहे तितके विष्णूला नाही. ऋग्वेद संहितेतील प्रधान देवता इंद्र आहे, विष्णू नाही. इंद्राला वत्रासुर वधाचे वेळी विष्णूने सहाय्य केले म्हणून त्याला इंद्राचा सखा किंवा उपेन्द्र म्हणतात. आरंभी श्रेष्ठ असणाऱ्या ऋतवान धृतव्रत वरुणाला मागे सारून इंद्र हा श्रेष्ठ झाला व त्यानंतर इंद्राला मागे सारून विष्णू श्रेष्ठ झाला.

पान १३८– वेदकाली ऋग्वेद संहितेत इंद्राच्या मानाने विष्णूची सूक्ते अगदी थोडी असली तरी त्यांत इंद्राचे सर्व सद्‌गुण विष्णूच्या ठिकाणी असल्याचे व त्यामुळे विष्णूवरील प्रेमभावासारखे असल्याचे स्पष्ट दिसते इंद्राचे सद्‌गुण विष्णूच्या ठिकाणी आहेत. पण दुर्गुण मात्र त्यांत दिसत नाहीत. कारण विष्णू हा सूर्य देव आहे तर इंद्र हा ऐतिहासिकांच्या दृष्टीने विजिगीषु आर्यांचा मानवी पुढारी आहे. स्वतःच्या पराक्रमाने तो देवांचा राजा बनला होता. तो खूप खाणारा व भरपूर सोमपानयू (दारू) करणारा होता.

**सखा सख्ये अपचत्तूयमग्निरस्य क्रत्वा महिषा त्रिशतानि त्री साकमिन्द्रो मनुषः सरांसि सुतं पिबद्-वृत्रहत्याय सोमम् (ऋग्वेद ५–२९–७)**

**२४. इंद्राला तीनशे रेड्यांचे मांस व तीन हंडे दारू एका वेळेला लागत होती.**

मित्र अग्नीने इन्द्राकरिता तीनशे ३०० रेडे शिजविले. वृत्रावधाकरिता इंद्राने सोमरसाचे (दारूचे) भरलेले तीन हंडे पिऊन टाकले. स्वतःच्या त्वष्टाच्या मुलाला मारून मी ब्रह्महत्या केली आणि यतींना मारून रानातील कुत्र्यांपुढे टाकले तरी माझा केसही वाकडा झाला

**तस्य मे तत्र लोम च न मीयते.**

नाही, असे त्याने प्रतर्दनाला सांगितल्याचे कौशितकी उपनिषदांत वर्णन आहे.

**त्वं तां इंद्रामयां अमित्रान्दासा वृत्राण्यार्या च शूर (ऋग्वेद ६-३३-३)**

**२५. इंद्र परस्त्रीगमन व चोऱ्या करीत होता.**

दस्यूप्रमाणेच तो शत्रुपक्षीय अनार्यांनाही (भारतीय आर्यांना) ठार करीत असे. स्त्रीविषयी त्याचे मत आणि वर्तन ठीक नसे. (ऋग्वेद ८-३३-१७). स्त्रियांना बुद्धी कमी असते व त्यांच्या मनावर नियंत्रण घालणे कठीण आहे, असे तो म्हणतो. दासनमुचीच्या दोन सुंदर स्त्रिया त्याने आपल्या अंतःपुरात घातल्या (ऋग्वेद ५-३०-९) (ऋग्वेद ५-३४-४) संपत्तिमान इंद्र पापाला भीत नाही, असे त्याच्या विषयी म्हटले आहे. (ऋग्वेद १-१३१-४) यज्ञ न करणाऱ्या माणसांना तो शिक्षा करीत असे. दस्यूंना मारून त्यांची लोखंडी नगरे त्याने नष्ट केली (ऋग्वेद २-२०-८) दास वर्णाचे पांच लक्ष लोक चाकाच्या आऱ्याप्रमाणे त्याने (इंद्राने) कापून काढले. (ऋग्वेद ४४-३०-१५) यज्ञ न करणाऱ्या लोकांचे धन लुटून किंवा चोरून यज्ञ करणाऱ्यांना तो देत असे. (ऋग्वेद ५-३४-६) यावरून असे दिसते की इंद्र अग्नीमध्ये पशुमांसादिकांचे हवन करून देवतांना संतुष्ट करणाऱ्या स्थूल स्वरूपाचा पुरस्कर्ता होता. ऋग्वेदकालीन इंद्र आणि वेदोत्तर कालीन कृष्ण यांच्यात मोठे वैषम्य आहे. ऋग्वेद संहितेत तर इंद्र आणि कृष्ण या सामान्य नावाने ओळखले जाणारे लोक यांचे वैर असल्याचे दाखवले आहे.

( ऋग्वेद १।१३०।८ ) इंद्राने मानवाच्या हिताकरता यज्ञ न करणाऱ्या लोकांना शिक्षा केली. त्याची काळी कातडी सोलून त्यांना ठार मारले. दहा हजार १०,००० सेनेसह चालून येणाऱ्या कृष्णाला अंशुमतीच्या तीरावर इंद्राने सेनेसह. ठार केले. ( ऋग्वेद ८।९३।१३) पंचाशत्कृष्णा नि वपः सहस्रात (ऋग्वेद ४।१६।१३) इंद्राने पन्नास हजार (५०,०००) कृष्णांना ठार मारले असे उल्लेख ऋग्वेदात आहेत देव आणि असुर या शब्दांना आज आलेले अर्थ, वेद काळी नव्हते. देव म्हणजे द्युतिमान तेजस्वी आणि असुर म्हणजे शक्तिमान हे विशेषणात्मक अर्थ पुढे नामात्मक झाले. ऋग्वेदकाली इंद्राचा उत्कर्ष झाल्यानंतर हे दक्ष, अंश, इत्यादी आदित्य काही काल मागे पडले पण हे आदित्य पूर्व देव आहेत, इंद्रापेक्षाही प्राचीन आहेत. मनु प्राचीन काळी आपल्या यज्ञात या देवांना बोलावीत असे (ऋग्वेद १।२६।४) ऋग्वेद काली हा मनुही मागे पडला होता.

॥ महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास ॥

२६. शतपथ ब्राह्मणांत गायींचे मांस खाण्याविषयी चर्चा.

पान ३७ :- शतपथ ब्राह्मणांत गोमांस खावे किंवा नाही याची चर्चा करून ब्राह्मणांनी ते खाऊ नये असे ठरविले. तथापि ते चांगले असेल तर ते मी खाईन असे याज्ञवल्क्याने उद्‌गार काढले आहेत. याच कालात यज्ञाचे पूर्वीचे साधे स्वरूप जाऊन मानमुडीचे व मोठे स्वरूप आले. त्याचे वेगळे शास्त्रच बनवले हे वर सांगितलेच आहे. कित्येक यज्ञ सत्रे एक एक वर्ष चालत होते. या यज्ञांत पशूंची हत्या बेसुमार होई. अश्वमेध यज्ञांत घोडे, गायी बकरे, बैल, हरणे इत्यादी १८० (एकशे ऐंशी) पशू मारावयास सांगितले आहे. यज्ञाचे सर्व प्रकार एक हजाराहून जास्त होते. एक एक वर्ष यज्ञ करणे, त्यात निरनिराळ्या देवतांना उद्देशून शेकडो पशूंचे बलिदान करणे हे सर्व हजारो वर्षे चालत होते.

२७ अतिथी सत्काराकरिता बैल किंवा बकरा मारून भोजन देणे.

पान ११२ :- श्रोत्रीय अतिथी घरी आला असता त्याच्या स्वागताकरिता मोठा बैल किंवा बकरा मारून त्याच्या मांसान्नाने

अतिथीचा भोजन सत्कार करावा. पान ११३ :– गृहस्थाने पितरांना उद्देशून नित्य नैमित्यिक श्राद्धे करावीत. सतत वेदाध्ययन करणारे ब्राह्मण यांना श्राद्धाला बोलवावे. तील, व्रिही, यव, माश, जलमूल, फल इत्यादी हविशान्नाने पितर एक महिनाभर तृप्त होतात. गायीच्या दुधाच्या पायसाने, त्यांची एक वर्षभर तृप्ती होते. मासे, निरनिराळ्या जातींची हरणे, मेन्ढा, काळवीट, सांवर, रानडुक्कर व ससे यांचे मांस ब्राह्मणास दिले असता पितर अधिक तृप्त होत. वसू, रुद्र, आदित्य देवतांचा समावेशही पितरांतच होतो या देवता पितरांना व श्राद्ध करणाऱ्या त्यांच्या प्रजेला संतुष्ट करतात.

पान ११६ :– कोणते अन्न पशू व पक्षी खावे याचे विस्तृत विवेचन याज्ञवल्क्य स्मृतीत आहे. कांदा, लसूण, रान डुक्कर, लाल माजर, गावातील कोंबडे, खाऊ नये. घोरपड, कासव, ससा हे खाण्यास हरकत नाही. सिंह, उंट मासेही खाण्यास योग्य आहेत. प्राण जात असला तर किंवा श्राद्धांत पितरांना अर्पण करून मांस भक्षण केल्यास दोष नाही. दर्भ, भाजी, दूध, मासे, फुले, दही, मांस जल हे पदार्थ कोणी दिल्यास स्वीकार करावा. यावरून शाकाहाराबरोबर मांसाहार त्या वेळेचे लोक करीत होते. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांमध्ये खाण्याचा व्यवहार निष्प्रतिबंधक चालत होते. पण शूद्रांमध्ये वरील लोकांचे अन्न स्नातकांनी खाल्लेले चालत होते. ब्राह्मणांपासून शूद्रांपर्यंत सर्वच लोक मांसाहार करीत होते.

याज्ञवल्क्य स्मृति भक्षाभक्षा प्रकरण. पान ५६.

मराठी भाषांतरकार (वे. शा. सं. रा. रा. विष्णूशास्त्री बापट) २८ मांसाहाराकरिता कोणते पशू, पक्षी खावे व कोणते खाऊ नये, याची चर्चा केली आहे.

श्राद्ध समयी पित्रस्थानी ब्राह्मणांना मांसाचे दान दिल्याने पितरांना पुष्कळ दिवस तृप्ती मिळते. गया, हरिद्वार, पुष्कर इत्यादी तीर्थक्षेत्री पितरांना उद्देशून दिलेल्या मांसदानाचे फल अनंत पटीने मिळते. या मांसदानात लाल रंगाच्या बकऱ्याने आणि पांढऱ्या म्हाताऱ्या लांब केसाच्या बकऱ्याचे मांसदान विशेष आहे. शिवाय नित्य वेदपठण करणाऱ्या ब्राह्मणाला मांसदान दिल्याने विशेष पुण्य

फल मिळतें, असा उत्तर ध्रुवीय आर्य पौराणिक हिंदू धर्माचा सिद्धांत आहे. खाली नमूद केलेल्या २९ जातींच्या पशू-पक्षांचे मांसदान ब्राह्मणाला द्यावे व ते सर्व ब्राह्मणांनी मांसदान घ्यावे. १ गाय, २ बैल, ३ घोडा, ४ सांबर, ५ सिंह, ६ उंट, ७ रेडा, ८ गेंडा, ९ हरणे, १० मेंढा, ११ रानडुक्कर, १२ काळवीट, १७ पाच जातींचे मासे, १८ ससा, १९ लाल रंगाचा बकरा, २० पांढऱ्या रंगाचा म्हातारा लांब केसाचा बकरा, २१ तांबडा मृग, २२ काळा मृग, २३ घोरपड, २४ लावा, २५ मोर, २६ साल, २७ शिंदक, २८ कासव, २९ शललकी.

मांसाहाराकरिता कोणते पशु-पक्षी योग्य व कोणते अयोग्य ते याज्ञवल्क्य ऋषी आपल्या याज्ञवल्क्य स्मृतीत लिहितात :

क्रव्याद पक्षिदात्यूह शुक प्रतुदटिट्टिभान् ।
सारसैक शाफान्हं सान्सार्वाश्व ग्रामवासिन ।। १७२ ।।

गृध्रादि : अपक्व मांस खाणारे पक्षी, चातक, पोपट, चोचीने तोडून खाणारे, श्येनादि पक्षी, टिटवी, सारस, घोडा, गाढव, हंस व पारव्यासारखे सर्व ग्रामवासी पक्षी अभक्ष्य होत.

कोयष्टि प्लवचक्राह्वा बलाकाबक विष्किरान् ।
वृथा ऋसर संयावपाय सापूप शष्कुलीः ।। १७३ ।।

क्रौन्च पक्षी, कोंबडा, चक्रवाक, वलाका, बगला व नखांनी उकरून खाणारे चकोरादी पक्षी वर्ज्य आहेत. लावा पक्षी व मोर हे भक्ष्य असून गावकोंबडा निषिद्ध आहे. देवता, पितर, अतिथी यांच्या-करिता तयार केलेली खिचडी क्षीर, गूळ व घृत इत्यादिकांच्या योगाने केलेला गव्हाचा शिरा, दुधात शिजवलेला भात (तांदळाची खीर), पुऱ्या, अनारसे, करंज्या इत्यादी अमक्ष होत. आपल्या जिव्हेच्या तृप्ती-करिताच तयार केल्यास अधिक प्रायच्छित्त सुचवले आहे.

कालविकं सकाकोलं रज्ज्युदालकान् ।
जलपादान्स्व जरी टान ज्ञातांश्च मृग द्वीजान । १७४ ।

चिमणी, डोंब कावळा, कुरर, सुतार पक्षी, बदकासारखे पक्षी (ज्यांचे पाय जाळयासारख असतात) व खंचन पक्षी आणि अप्रसिद्ध पशु-पक्षी वर्ज्य करावेत. वर ग्राम्य पशु-पक्षांचा निषेध केला आहे खरा.

पण चिमणी हा प्राणी ग्रामात व अरण्यातही असतो म्हणून येथे त्याचा निषेध केला आहे. । १७४ ।

चापाश्च रक्तपादांश्च सौनं वल्लूरमेवच ।
मत्स्यांश्च कानतो जग्ध्वा सोमवास स्त्रहं वसेत ।। १७५ ।।

चाप, कादंब, इत्यादी लाल पायाचे पक्षी, हिंसास्थानचे (कसाई-खान्यातील) मांस, सुकलेले मांस व मासे वर्ज्य करावे. (वांगी, राळे, कुसुंभा, अपक्व झालेली फळे व फुले, विकार उत्पन्न करणारा प्रत्येक पदार्थ, वड, पिंप्री, अश्वत्थ, कवठ, निर्पे व महाळुंगी यांची फळे इत्यादी अन्य स्मृतींत निषिद्ध मानलेले पदार्थ वर्ज्य करावेत). १७० व्या श्लोकापासून येथपर्यंत सांगितलेले पदार्थ बुद्धिपूर्वक व कामतः (इच्छापूर्वक) खाल्ल्यास तीन दिवस उपवास करावा व कामतः न खाल्ल्यास एक दिवस उपवास करावा. बकादी पक्ष्यांचे मांस खाल्ल्यास बारा दिवस उपवास करावा असे जे शंख स्मृतीत सांगितलेले आहे. ते दीर्घकाल बुद्धिपूर्वक खात राहिल्यास त्याकरिता आहे, असे समजावे.
।। १७५ ।।

पलांडु, विड, वराहं च छत्राक ग्राम कुक्कुटम् ।।
लशुन, गृंजनं चैव जग्ध्वा चांद्रायणं चरेत् ।। १७६ ।।

कांदा गावातील डुक्कर, छत्री, गावातील कोंबडे, लसूण, लाल गाजरे हे सहा पदार्थ स्वच्छेने एकदा खाल्ल्यास चांद्रायण करावे. चांद्रायण कसे करावे, ते पुढे (३ अध्यायांत) सांगितले आहे. गाव कोंबडे व छत्री यांचा निषेध एकदा वर केलेला आहे. तरी पण कांदा, लसून इत्यादिकांच्या बरोबरीने त्याचे प्रायश्चित्त केले पाहिजे. असे सुचविण्याकरिता पुन्हा निर्देश केलेला आहे. हे पदार्थ बुद्धिपूर्वक दीर्घकाल खात राहिल्यास द्विज पतित होतो असे मनुस्मृतीत सांगितले आहे. अर्थात अशा प्रसंगी सुरापान प्रायश्चित्त केले पाहिजे. पण ते अबुद्धिपूर्वक दीर्घकाल खाल्ल्यास कृच्छ्रसांतपन अथवा याती चांद्रायण प्रायश्चित्त करावे.

अशा प्रसंगी बारा दिवस दूध प्यावे असे शंखाने सांगितले आहे. ।। १७६ ।।

भक्ष्या: पंचनखा: सैधागोधा कच्छप शल्लका: ।
शशश्च मात्स्येश्वपि ही सिंहतुंडी करोहिता: ।। १७७ ।।
तथा पाठीनराजीवसशल्काश्च द्विजातिभिः ।
अतःशृणुध्वं मांसस्य विधिं भक्षण वर्जिते ।। १७८ ।।

कुत्रे, मांजर, वानर इत्यादी पाच नखांच्या प्राण्यांतील सेधा म्हणजे साल, शिंदव, गोधा म्हणजे घोरपड, कासव, शल्लकी, व ससा हे पाच प्राणी खावेत. गेंडाही भक्ष्य आहे. त्याचप्रमाणे मांसातील सिंहतुंडादीक मासे भक्ष्य आहेत. ज्यांचे तोंड सिंहाप्रमाणे असते त्या माशांस सिंहतुंडक असे म्हणतात. जो लाल असतो त्यास रोहीत आणि चंद्रक व पद्मवर्ण माशांस क्रमाने पाटीन व राजीव म्हणतात.

शिपाच्या आकारानें असणाऱ्या माशास शल्लक म्हणावें १६७ व्या श्लोकापासून येथपर्यन्त द्विजांच्या मांसाशनाविषयी नियम सांगून आता येथून पुढे प्रकरण समाप्त होईतो चारी वर्णांच्या लोकांचे धर्म सांगतात. अगोदर भक्षण विधी सांगतात.

प्राणात्यये तथा श्राद्धो प्रोक्षितं द्विज काम्यया ।
देवान्पितॄन्समभ्यर्च्य खादमांस न दोषभाक् ।। १७९ ।।

अन्न न मिळाल्यामुळे प्राण जाण्याचा प्रसंग आल्यास मांस भक्षण करावे तसेच एखाद्या रोगावर मांस हेच औषध असल्यास व त्यावाचून प्राण रक्षण होणे अशक्य झाल्यास मांस खाऊन प्राण वाचवावे. कारण जीव संरक्षण हा परम धर्म आहे. त्याप्रमाणे श्राद्धामध्ये निमंत्रण घेतलेल्या ब्राह्मणाने नियमाने मांस खावे ( कलियुगात ते निषिद्ध आहे.). प्रोक्षण हा एक श्रुतीप्रणोत संस्कार आहे. त्या संस्काराने संस्कृत केलेल्या यज्ञोपयोगी पशूचे होम केल्यावर राहिलेले मांस खावे, भक्ष्य आहे. कारण ते न खाल्ल्यास यागाची निष्पत्ती होत नाही. ब्राह्मणांच्या इच्छेने त्यांच्या भोजनार्थं किंवा देव–पितर यांच्याकरिता तयार केलेले मांस त्यास अर्पण करून त्यातून राहिलेले मांस खाणारा यजमान दोषी होत नाही. द्विज काम्यया, याचा अर्थ अपरार्कात – तू हे मांस खावेस असे विद्वान ज्यांस सांगत असेल त्याने ते खाल्ल्यास, त्यांत तो दोषी होत नाही, असा केला आहे. ज्याचे पोषण करणं अवश्य आहे,

अशा गृहातील मनुष्यांस अर्पण केल्यावर राहिलेले मांस खाणे प्रशस्त नाही यातील प्रोक्षित व श्राद्धीय मांस अवश्य खाल्लेच पाहिजे. पण द्विज काम्यादी निमित्तानें प्राप्त मांस खाल्ले तरी चालते. त्याचप्रमाणे ज्याचा निषेध केलेला नाही असे ससा इत्यादिकांचे मांस खाऊ नय.

२९. देवादिकांच्या उद्देशा वाचून पशू मारल्यास त्या पशूच्या अंगावरील केस सगळे वर्षनरक भोगावा लागतो.

वसेत्स नरके घोरे दिनानि पशुरोमभिः ।
संमितानि दुराचारो यो हन्त्यविधिना पशून् ॥ १८० ॥

देवादिकांच्या उद्देशा वाचून जो दुराचारी पशूस मारतो तो त्या पशूच्या अंगावर जितके केस असतात तितके दिवस घोर नरकांत रहातो. येथे पशूस मारणाराच नरकांत पडतो असेसमजु नये तर मुनींनी सांगितल्याप्रमाणे अनुमोदन देणारा स्वतः मारणारा, तुकडे करणारा, क्रय विक्रय करणारा व खाणारा असे आठ पुरुष नरकात पडतात.

सर्वान्कामानवाप्नोति हयमेध फलं तथा ।
गृहेऽपि निवासन्विप्रो मुनिर्मांस विवर्जनात् ॥ १८१ ॥

प्रेषिवादी मांसा व्यतिरिक्त मांस मी खाणार नाही असा संकल्प करून त्याप्रमाणे जो चालतो त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. हे मांस त्यागाचें फल आहे.

॥ श्राद्ध प्रकरण ॥

३०. श्राद्धांत पितरानाही मांस आर्पण करावे. व ब्राह्मणानाही मांस दान द्यावे.

हविषान्नेन वै मांस पायसेन तु वत्सरम् ।
मात्स्याहारिण कौरभ्रशाकुनच्छागपार्षतैः ॥ २५८ ॥
एणरौरव वाराहशाशैर्मांसैर्यथाक्रमम् ।
मासवृद्धयाऽभितृप्यंति दत्तैरिह पितामहाः ॥ २५९ ॥

तीळ, पीठ, यव, सारा, जल, फूल, फल इत्यादी हविष्यान्नानें पितर एक महिनाभर तृप्त होतात. गाईच्या दुधाच्या पायसाने त्यांची एक वर्षभर तृप्ती होते. पाठीनादी मासे, ताम्रमृग, कृष्णमृग, मेंढा, भक्षण करण्यासारखे पक्षी, चित्रमृग, काळवीट, सांबर, अरण्यातील डुक्कर व ससे यांचे मांस पितरांस उद्देशून पितृस्थानीय ब्राह्मणांस दिले असता पितर क्रमाने दोन महिने, तीन महिने इत्यादी उत्तरोत्तर एक एक महिना अधिक दिवस तृप्त होतात. २५९-२५८. त्याचप्रमाणे.

खड्ग गामिषं महाशल्कं मधुमुन्यन्नमेवच।
लोहामिषं महाशाकं मांस वार्ध्रिण सस्य च ॥ २६० ॥
यद्ददाति गयस्थंच सर्वमानंत्य मश्नुते।
यथा वर्षा त्रयोदश्यां मघासूच विशेषतः ॥ २६१ ॥

गेंड्याचे मांस, महा-शल्क नावाचा मासा, मध, अरण्यात होणारे मुनीचे अन्न, लाल बकऱ्याचे मांस, पांढऱ्या म्हाताऱ्या व लांब कानाच्या बकऱ्याचे मांस व गया, हरिद्वार पुष्कर इत्यादी स्थळी पितरांस उद्देशून दिलेले पत्र-पुष्पादी अनंत फळ देते.

श्राद्ध समयी पित्रस्थानो ब्राह्मणांना मांसाचे दान दिल्याने पितरांना पुष्कळ दिवस तृप्ती मिळते. गया, हरिद्वार, पुष्कर इत्यादी तीर्थक्षेत्री पितरांना उद्देशून दिलेल्या मांसदानाचे फल अनंत पटीने मिळते. या मांसदानात लाल रंगाच्या बकऱ्याचे आणि पांढऱ्या, म्हाताऱ्या, लांब केसाच्या बकऱ्याचे मांसदान विशेष आहे, असा उत्तर ध्रुवीय पौराणिक हिंदू धर्मांचा सिद्धांत आहे. खाली नमूद केलेल्या २९ जातींच्या पशुपक्षांचे मांसदान ब्राह्मणाला द्यावे. ते मांसदान सर्व ब्राह्मणांनी घ्यावे. १ गाय, २ बैल, ३ घोडा, ४ सांबर, ५ सिंह, ६ उंट, ७ रेडा, ८ गेंडा, ९ हरणे, १० मेंढा, ११ रानडुक्कर, १२ काळवीट, १७ पाच जातीचे मासे, १८ ससा, १९ लाल रंगाचा बकरा, २० पांढरा म्हातारा लांब केसाचा, बकरा, २१ तांबडा मृग, २२ काळामृग, २३ घोरपड, २४ लावा, २५ मोर, २६ साल, २७ शिंदव, २८ कासव, २९ शल्लकी,

हा श्राद्धाचा प्रकार मेलेल्या आई-बापाला उद्देशून आहे. मेलेले आई-बाप अंतराळातील पितृलोकांत राहतात. अंतराळात राहाणाऱ्या मेलेल्या आई-बापाला पृथ्वीवर राहणारी त्यांची मुले त्यांना खायला

प्यायला आणि त्यांच्या सुखसोयीकरिता लागणाऱ्या सर्व वस्तू देतात. मुलानी दिलेले ते त्यांना अंतराळातील पित्र लोकांत मिळते. आणि ते सुखात राहातात. मेलेल्या आईबाबाला द्यायच्या सर्व वस्तू पृथ्वीवर राहणाऱ्या जिवंत ब्राह्मणांना दान दिल्याने मेलेल्या आईबापाला अंतराळात मिळतात, हा प्रकार फारच विचित्र आहे.

या श्राद्ध कार्याच्या वेळी मेलेल्या आई बापाचा मुलगा आपला बाप सुखाने राहावा म्हणून श्राद्धाच्या वेळी जितक्या ब्राह्मणांना वरील-प्रमाणे दान, भोजन देतो ते आणि इतर गोते म्हणून काही लोकांना भोजन देतां त्या वेळी श्राद्धकर्त्या मुलाची भावना अशी असते की हे सर्व ब्राह्मणादि लोक माझे बाप आहेत. मुलगा जर श्रीमंत असेल तर दर श्राद्धाला (दर वर्षाला) शेकडो ब्राह्मण व शेकडो गोते (ब्राह्मणेतर) जेवू घालतो. दर वर्षाला शेकडो लोक तर दहा वर्षांचे हजारो लोक होतात. या सर्वांना आपले बापच आहेत असे समजतो शास्त्रीय दृष्टीने विचार केल्यास मेलेल्या बापाच्या जिवंत मुलाला जिवंत बाप हजारो आहेत, असा अर्थ होतो. बाप हे नाते आपल्या आईच्या नवऱ्याला असते. (बाप म्हणजे आईचा नवरा असतो.)

बाप मेल्यानंतर एखाद्या मुलाची आई जिवंत असेल तर आपल्या मुलाचे हजारो बाप ते माझे हजारो नवरे आहेत, असे आईला मानावे लागेल. तसेच मुलाने आपल्या जिवंत आईला हजारो नवरे करून दिले असे होईल. कारण आपल्या मुलाचा बाप म्हणजे आपला नवरा आहे, हे नाते जगातील सर्व मानवांचे आहे. तसेच आपला बाप म्हणजे आईचा नवरा असतो हेही नाते जगातील सर्व मानवांचे आहे. या नात्याला सर्व जगातील मानव मानतात. हा अती निंद्य श्राद्धाचा प्रकार उत्तर ध्रुवीय हिंदू धर्मातच आहे. हिंदू धर्म सोडून जगातील कोणत्याही धर्मात नाही. भारतातील लिंगायत (वीरशैव) धर्मातही नाही. तसेच भारतीय आर्यांचे मूळ धर्मग्रंथ आगम आणि निगमातही नाही. मेलेल्या आई-बापाचे श्राद्ध करणे जिवंत आपल्या आईला जिवंत तेही हजारो नवरे करून दिल्यासारखे महापाप होते. हे पापकर्म पुरोहित वर्गाने निर्माण केले आहे.

## वारकरी सांप्रदाय उदय व विकास

लेखक : मा. पं. बहिरट
प्र. ता. भालेराव

३०. ब्राह्मण कालात हजारो यज्ञ निर्माण झाले. घोडे, गाय, बैल, बकरे, हरणे आदी १४ जातींचे पशू बळी देत होते.

पान २६२ :– ब्राह्मण कालात यज्ञाचे महत्त्व अधिक वाढले. आर्यांनी पंजाबबाहेर वसाहती करीत करीत सर्व दुआब व्यापून टाकला. पूर्वीची लहान राज्यें जाऊन कुरू, पांचाल, कोसल, विदेह, विदर्भ इत्यादी प्रदेश व्यापून मोठाली राज्ये स्थापली. या वैभवशाली परिस्थितीत पुढे यज्ञाचे साधे स्वरूप जावून थाटमाट सुरू झाला. सर्वांनी मिळून करण्याचे मोठाले यज्ञ सुरू झाले. ब्राह्मण-ग्रंथातून त्यांची वर्णने येऊ लागली. यज्ञीय पशु हिंसाही वाढली. कित्येक यज्ञ सत्रे वर्षभर चालत. अश्वमेध यज्ञात घोडे, बैल, गायी, बकरे इत्यादी १८० (एकशे ऐंशी) पशू मारावयास सांगितलेले आहे. हजारांहून अधिक यज्ञांचे प्रकार अस्तित्वात आले.

भारतीय आर्यांची एक ईश्वरी व अहिंसाचार आणि वैदीक आर्यांची दैवते :काही इन्द्रादी मानव व काही स्वकोलकल्पित अशी बहुईश्वरी उपासना व महाभयंकर निरपराधी अनेक जातीच्या पशूंची महाभयंकर हिंसा याचा वेदातून वेदमंत्राधारे काढलेल्या सिद्धांतावरून तुलनात्मक विचार केल्यावर भारतीय अरण्यवासी जंगली लोकांपेक्षाही वैदिक आर्यांचा दर्जा फारच कनिष्ठ आहे असे सिद्ध होते. पारशी, मुसलमान व ख्रिस्ती लोकापेक्षाही कनिष्ठ दर्जाचे हे वैदिक आर्य आहेत. कारण पारशी, मुसलमानादी लोक स्वत: खाण्याकरिता पशुहिंसा करतात. त्यांचे देव मांसाहारी नाहीत.

आर्य हे उत्तम पुरुषाला म्हणतात. भारतीय आर्य उत्तम पुरुष आहेत व वैदिक आर्य हे महाभयंकर पाप करणारे पापी, क्रूर, अत्याचारी, लटारू, दरोडेखोर, जगातील सर्प हिंसकापेक्षा महाभयंकर हिंसक, असुरापेक्षाही हलक्या आचारविचाराचे होते. रावण, बाणादी राक्षसांपेक्षाही महाभयंकर पाप करणारे, सर्व दुर्गुणसंपन्न आहेत. त्यांचा मुख्य देव इन्द्र यांच्यापेक्षाही महानिर्दय, पापी, मांसाहारी, दारू पिणारा,

परस्त्री गमन करणारा (मात्रा गमन करणारा) आहे. पुढे या अतिमूर्ख इंद्राला वैदिक आर्यांनी त्रिभुवनाचा राजा केला आहे. भारतीय आर्य शैव आहेत. भारतीय आर्यांना विश्व निर्माण झाल्यापासून ते भारत युद्धापर्यंत परब्रह्म परमेश्वरा (शिवा) शिवाय दुसरी देवता अजिबात माहीत नव्हती. भारत युद्धानंतर आतापर्यंत भारतीय आर्य शैवच आहेत. तसेच भारतीय दस्यू (जंगली) लोकसुद्धा विश्वारंभापासून ते आतापर्यंत शिवाची उपासना करतात, हे सर्व जगाला माहीत आहे.

**३१. भारतीयांचे वेद बाधक आहेत म्हणून उत्तर ध्रुवीय वैदिकांनी भारत युद्धानंतर ब्राह्मणेतरांपासून गुप्त ठेवले.**

भारत युद्धानंतर वैदिक आर्यांनी भारतीय आर्यांनी रचना केलेले वेद त्यांच्या अत्याचारी व हिंसक अत्याचाराला बाधक होते म्हणून ब्राह्मणेतरांपासून पाच हजार वर्षे (५००० वर्षे) गुप्त ठेवले होते. ते महापुरुष टिळकांनी प्रथम वेदांचा चांगला अभ्यास करून 'वेदामधील उत्तर ध्रुवा वरचे घर' हे पुस्तक लिहिले. तेव्हा सर्व जगाचे नेत्र दिपून गेले. टिळकांपासून पुढे भारतीय आर्य पंडितांनी वेदाभ्यास करून ते भारतीय जनतेपुढे गुप्त असलेले वेद प्रकट करून दिले. हे महान उपकार भारतीय जनतेवर केले आहेत

**३२. भारतीय आर्यांचे वेद वैदिक आर्यांनी निंद्य बनवले.**

पाच हजार वर्षे गुप्त असलेले वेद प्रथम प्रकट केले दयानंद सरस्वतींने पाच हजार वर्षे ब्राह्मणेतरांपासून गुप्त ठेवलेल्या वेद ग्रंथात फार मोठी उणीव आहे. त्यामुळे श्रीज्ञानेश्वर तुकाराम, नामदेव, एकनाथादी संतमहात्म्यांनी वेदांची निंदा केली आहे. त्याचे कारण (उणीव) म्हणजे वेदांत घुसडलेले वैदिक आर्यांचे वेदमंत्र आहेत. त्या उणीवेमुळे, या कालीमेमुळे वेदांची निंदा होत आहे तर आधुनिक पंडितांनी वेदांत असलेले भारतीय आर्यांच्या वेदाला कलंक लावणारे वैदिक आर्यांचे जेवढे मंत्र वेदांत आहेत तेवढे काढून टाकून नष्ट केल्यास ग्रहणनंतर उदय पावलेल्या सूर्यासारखे वेद प्रकाशमान होतील. ज्या संत-महात्म्यांनी व इतर धर्म-पंथीयांनी वेदांची निंदा केली आहे. त्या संत-महात्म्यांना वेद वंद्य होतील. इतर धर्म-पंथीयांची तोंडे बंद होतील. तसेच ज्या आमच्या (भारतीयांच्या) पूर्वजांनी स्वतः वेदमंत्र रचना

करून तयार केलेल्या वेदांत वैदिक आर्यांनी आपले वेदमंत्र घुसडले आहेत ते काढून टाकल्यास भारतीय आर्य ऋषि-मुनींनाही अत्यानंद होईल.

**३३. वेदाला पापमुक्त करावे म्हणून वैदिक विद्वान पंडितांना लेखकाचे आवाहन व विनंती.**

आधुनिक पंडित, महापंडित विद्वान सद्‌गृहस्थांनो वेदाला निंदेतून मोकळे करा. डुक्करखाऊ दारुड्या, असुरी लोकांचे वेदांत असलेले मंत्र काढून टाका. मगच आपल्या भारतीय आर्यांच्या वेदांना मान्यता मिळेल. वैदिक आर्य त्यांच्या वेदबाह्य असलेल्या सर्व धर्मीय लोकांना कनिष्ठ समजतात. वैदिक आर्यांची ही फार मोठी चूक आहे सर्व धर्मापेक्षा वैदिक आर्यांचे आचारविचार आणि उपास्यदैवते (हजारो अधिक लाखो) फारच कनिष्ठ आहेत. वैदिक, व वैदिकांचे देव महाभयंकर हिंसक आहेत, हे सर्व धर्मीयांना व जगातील लोकांना माहीत आहे. वैदिक, अवैदिकांना वेदबाह्य म्हणतात. ते वेदबाह्य लोकांना वाईट वाटत नाही. त्यांना अवैदीक म्हणवून घेणे आवडते, त्याचे कारण वेदांत असलेला हिंसक प्रकार आहे.

मी (लेखक) व माझा सुशिक्षित मित्र मुसलमान आम्हा दोघांत झालेली चर्चा संक्षिप्त प्रकारात पुढे लिहीत आहे.

**३४. आमचा देव (मुसलमानांचा) मांस खात नाही. हिंदूचे सर्व देव मांस खातात.**

माझा मित्र म्हणतो की, वैदीकांपेक्षा आमची (मुसलमानांची) हिंसा फारच कमी दर्जाची आहे आम्ही हिंसा करतो ती आम्हांला स्वतःला खायला करतो. ते मांसान्न आम्ही स्वतः खातो. आमच्या देवाला खाऊ घालीत नाही. वैदिकांच्या देवासारखा आमचा देव मांस खात नाही. मुसलमान धर्मतत्त्वे आमच्या धर्मगुरूवर्गाच्या आचरणात आहेत. आमच्या धर्माचे मुख्य तत्त्व अहिंसा आहे. आमचे धर्मगुरू मांसाहार करीत नाहीत. दारूही पीत नाहीत. वैदिकाइतके हजारो लाखो देव मुसलमानांत (धर्मात) नाहीत. आमचा देव एकच आहे. तो आकाशात किंवा भक्ताच्या हृदयात राहातो. वैदिकाचे देव काही मोठे देव देवळांत राहातात. काही देव उघड्या ओट्यावर राहातात. काही नदी-नाल्याच्या

कडेला राहातात. आणि काही देव हागणदारीत राहातात. देवळातील देवाला पुजारी सांभाळतात. ओटयावरच्या देवाला सांभाळण्याची गरज पडत नाही. नदी नाल्याच्या देवाचीही तीच परिस्थिती असते. वैदिकांच्या हागणदारीतील देवांनी फार महाभयंकर पापे केली असतील म्हणून त्यांना अखंड नरकात राहावे लागत आहे. त्यांच्यापेक्षा कमी पाप केलेल्या देवांना नदी-नाल्याच्या किनारी राहावे लागत आहे. त्यांच्यापेक्षा कमी पाप केलेले देव ओटयावर राहातात. ओटयावरच्या देवांपेक्षा कमी पाप केलेले मोठे देव देवळात राहातात. वैदिकांचे देव जितक्या जातींचे पशू खात होते तितक्या पशूंच्या योनीत जन्म घ्यावा लागला आहे. वैदिकांचे देव मासे, कासव, डुक्कर, घोडे इत्यादी नीच योनीत जन्म घेऊन पापांची फेड करीत आहेत. त्या पशू योनीत जन्म घेतलेल्या देवांना वैदिक देवांचा अवतार मानतात,

**३५. हिंदूंचे मत्स्य कासवादी देव मुसलमान कापून खातात.**

मत्स्य अवतार, कच्छ अवतार, वराह अवतार, हयग्रीव अवतार अशी त्यांची शास्त्रीय शब्दांत नावे ठेवून त्यांची उपासना करतात. आम्ही (मुसलमान) एक डुक्कर देव सोडून वैदिकांचे सर्व देव आम्ही कापून खातो. आम्ही मुसलमान वैदिक भारतात येण्याच्या अगोदर भारतीय आर्य होतो. भारतीय आर्यांची जी विश्वारंभापासून शिव ही देवता आहे, त्याच देवाची आम्ही उपासना करीत होतो. आमच्या मुसलमान राष्ट्रांत आमच्या पूर्वजांनी बांधलेली हजारो शिवमंदिरे आजतागायत आहेत. हिन्दुस्थानातील काशीपेक्षाही महान विशाल शिवमंदिरासह पूर्वीच्या कालांत बांधलेली क्षत्रे आहेत. ती आम्ही, आमच्या पूर्वजांनी लाखो रुपये खर्च करून तयार केली. आहेत. ती नष्ट न करता सांभाळीत आहोत. जशी मुसलमान राष्ट्रांत शिवमंदिरे आहेत, तसेच सर्व जगातील राष्ट्रांत आहेत म्हणजे सर्व जगात भारतीय आर्यांच्या उपास्य देवाची विश्वारंभापासून ते भारत युद्धापर्यंत उपासना होती. आम्ही मुसलमान त्यांतलेच आहोत. म्हणजे भारतीय आर्यच होतो. चालू कालातील लिंगायत व त्यांचे धर्मगुरू (जंगम) हे विश्वारंभापासून भारतीय आर्यातील क्षत्रिय व ब्राह्मण होते. ते आदिकाला-

पासून लिंगायत आहेत. भारतीय आर्यांचे क्षत्रिय व ब्राह्मण वैदिक आर्यांच्या बळी पडले नाहीत. ते स्वतंत्रच आहेत.

**३६. मुसलमान मित्र म्हणतो की ५००० वर्षांपूर्वी उत्तर ध्रुवीयांनी आमची फारच हानी केली.**

पाच हजार वर्षांपूर्वी उत्तर ध्रुवावर राहाणारे मांसाहारी, मद्यपी, क्रूर लुटारू निर्दय जंगली वैदिक आर्य भारतात आले आणि या महामूर्ख राक्षसीवृत्तीच्या लोकांची आमच्या पूर्वजांची लाखो, कोटयवधी लोकांची कत्तल केली. आमच्या धनदौलती लुटल्या. आमच्या माय-बहिणी भ्रष्ट केल्या. आमची हजारो गावे उद्ध्वस्त केली. आम्हाला हीन-दीन करून भारतावर आपली सत्ता प्रस्थापित केली आणि महाभयंकर हिंसाचार सुरू केला. पुढे कांही कालाने आमचे धर्मसंस्थापक महंमद पैगंबराने मुसलमान धर्म निर्माण केला. त्याची अनेक कारणे असतील पण मुख्य कारण या वैदिक असुरांनी आमच्या लाखो पूर्वजांच्या केलेल्या कत्तलीचे सूड घेणे हे होते. आमच्या त्या कालच्या लोकांनी जबरदस्त संघटना करून वैदिक आर्यांवर वारंवार हल्ले करून आम्ही बदला घेतला.

**३७. वैदिकांची आम्ही राखरांगोळी करून आमचे राज्य स्थापन केले.**

या वैदिक-असुरांची आम्ही राखरांगोळी केली आणि भारता-वर आमची या लोकांनी घेतलेली सत्ता परत आम्ही घेतली आणि भारताला हिंदुस्तान व वैदिकांना हिन्दू हे नाव आम्ही ठेवले आहे. हिंदू हा शब्द किंवा नाव फारच हलक्या दर्जाचे आहे. आम्ही हिंदूंना फारच हलक्या दर्जाचे समजतो. आमच्या उपास्यदेवापेक्षा हिंदूंचे लाखो देव फारच कनिष्ठ आहेत. आमचा मांसाहार हिंदूंच्या मांसाहारात फारच फरक आहे. आम्ही हिंसा करून आम्ही स्वतःच खातो पण हिंदू देवाच्या नावाने हिंसा करून आपण खातात. आमचा देव निराकार आहे यांचे दगड-धोंडयांचे. तांब्या-पितळेचे यांनी तयार केलेले देव आहेत. हिंदू व हिंदूंचे देव देवीही महा पाप करतात. माझ्या मित्राचे बोलणे ऐकून मी ( लेखक ) थक्क झालो. मला त्याच्या विरुद्ध काहीच बोलता आले नाही. कारण तो जें बोलत होता, ते सर्व सत्य होते. तसेच पारशी, ख्रिश्चनही म्हणतात आणि बौद्ध, जैन,

महानुभाव आदी अहिंसक धर्म पंथ भारतातील भारताबाहेरील वेदांना व वैदिकांना फारच निंद्य मानतात आणि शैव वीरशैव उत्तर ध्रुवीय वैदिक हिंदूंना त्यांच्या देवदेवतांना आचार-विचारांना फारच निंद्य मानतात. भारतीय वैदिक आर्यांनी केलेली वेद मंत्र रचना (शैव वीर-शैवांची) आहे. शैव, वीरशैवांचे वेदांच्या अगोदरचे अगमादी धर्मग्रंथ उत्तर ध्रुवीय वैदिक आर्यांनी नष्टप्राय केले आहेत.

३८. द्वापारयुगाच्या अंतापर्यंत वेद-ज्ञान चारी वर्णांना मोकळे होते.

भारतीय युद्धाच्या अगोदर वैदिक ज्ञान सर्व वर्णांना मोकळे होते. भारतीय युद्धानंतर वैदीक आर्यांनी, वैदिक ज्ञान फक्त त्यांच्या ब्राह्मण वर्णातच ठेवून, ब्राह्मणेतर समाजाला वैदिक ज्ञानापासून वंचित ठेवले. वेदांचे ज्ञान न मिळाल्यामुळे ब्राह्मणेतर समाजाने दुसऱ्या मार्गाचा अवलंब केला. ते वेद ज्ञानापासून वंचित होते. वेद हा शब्द त्याच्या फक्त ऐकित्रात होता. प्रत्यक्ष वेद म्हणजे काय आहेत, वेदात काय आहे, हे त्यांना पाहायला, ऐकायलासुद्धा मिळत नव्हते. अशा परिस्थितीत त्या वेळी त्यांना जे सुचले, चांगले वाटले, ते त्यांनी केले. त्यांना चांगल्या-वाईटाचा निर्णय करायला वैदिक लोकांचे जे चांगले होते ते त्यांना माहीत नव्हते, ते वैदिक लोकांनी ब्राह्मणेतर समाजापासून गुप्त ठेवले होते. वैदिकांनी ब्राह्मणेतरांना अज्ञानात ठेवून वैदिकांनी वेद विरुद्ध मार्ग निर्माण करून अनेक देवी देवता, अनेक यज्ञयाग निर्माण केले ते फारच पुष्कळ भयंकर केले आहे. कारण ते ज्ञानी होते. बुद्धिमान होते. त्यात स्वार्थही होता. त्या स्वार्थापोटी भारतीय वेदांच्या शिकवणुकीला ते मानीत नव्हते. त्यांना सत्य कशाला म्हणतात ते माहीत नव्हते. भारतीयांचा आचार, विचार, दैवत, उपासना, कर्म त्यांना मान्य नव्हते त्यांनी भारतीयांच्या वेदाला मान्य नसलेले सर्व निर्माण केले आहे. ब्राह्मणेतर समाज ब्राह्मणाला अनादि कालापासून देव मानतात. चालू काळातसुद्धा ब्राह्मणांना देवाप्रमाणेच मानतात आणि ब्राह्मण सांगतील तेच करतात. जुन्या लोकांची एक म्हण आहे. भट सांगेल तो पर्वकाळ. म्हणजे आपणाला भटच देवरूपाने सांगतो अशी त्यांची भावना, निर्मळ अंतःकरणाची आहे, होती.

भारतीय युद्धाच्या अगोदर, विश्व निर्माण झाले तेव्हापासून वैदिक आर्य इ. स. पूर्व ४००० वर्षे भारतात आले. त्या कालापर्यंत भारतीय आर्यांचे आचार विचार, उपासना, सर्व चारी वर्णात सारखेच होते.

**३९. हजारो यज्ञांत कोटचवधी पशू बळी देण्याची प्रथा वैदिक हिंदूंनी सुरू केली.**

भारतीय युद्धानंतरच्या कालात यज्ञाचा प्रकार वैदिक आर्यांनी सुरू केला. तोही फारच मोठ्या प्रमाणात. हजारो प्रकारचे यज्ञ निर्माण केले. आणि भारतात एकाच वेळी हजारो ठिकाणी यज्ञ चालत होते. त्या यज्ञात हजारो निरपराधी पशू बळी देत होते. हे सर्व करायला कारण मोक्ष, मुक्ती, स्वर्ग, वैकुंठ, कैलास, इंद्र लोक प्राप्ती असे होते. त्यांच्या लोकांत कोणकोणती सुखे मिळतात याचे वर्णन कल्पनातीत केलेले आहे. विस्तारभयामुळे येथे देत नाही. हा यज्ञाचा प्रकार पुष्कळ दिवस चालू होता. या सर्व पापकर्मांत भारतीय आर्यांनी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णाने अजिबात भाग घेतलेला नाही. भारतीयांचा फार मोठा शूद्रवर्ण वैदिक आर्यांत समावीष्ट झाला होता.

**४०. यज्ञाच्या विधी विधाना करिता हजारो ब्राह्मण ग्रंथ निर्माण केले. पुढे उपनिषदाने व बुद्धाने यज्ञ बंद केले.**

वैदिक आर्यांनी यज्ञाचा प्रकार अवाढव्य निर्माण केला. त्या यज्ञाच्या विधिविधाना करिता ब्राह्मणादि ग्रंथ फारच पुष्कळ निर्माण केले आहेत. हे वेदिक आर्यांचे पापकर्म भारतीय आर्यांना पहावत नसे. ह्या पापकर्माला कांही आळा घालावा म्हणून भारतीय आर्यांनी शैव वीर शैवांनी उपनिषद ग्रंथ निर्माण करून त्याचा प्रचार केला. या उपनिषद प्रचारामुळे यज्ञ कार्यावर बराच आघात होऊन यज्ञकर्म कमी पडले. पण संपूर्ण बंद पडले नव्हते. तशात गौतम बुद्ध निर्माण झाले. त्यांनी मात्र उरला सुरला यज्ञ प्रकार बंद पाडला. वैदिकांचे महत्त्व कमी झाले. सर्व लोक बौद्ध सांप्रदायात भराभर प्रवेश करू लागले. नंतर वैदिकांनी निराळाच प्रकार निर्माण केला.

**४१. यज्ञ बंद पडल्यावर देवदेवी लाखो निर्माण केल्या त्याच्या विधिविधाना करिता अगणित ग्रंथ निर्माण केले.**

वैदिक आर्यांचे यज्ञ बंद पडल्यावर देवी देवता निर्माण केल्या. त्यात कांही देवता शाकाहारी आहेत, तर कांही मांसाहारी आहेत. शाकाहारी पेक्षा मांसाहारी हजारो पटीने जास्त आहेत. जसे देवी देवता निर्माण केले तसेच त्या देवी देवतांच्या उपासनेकरता ग्रंथही फारच पुष्कळ निर्माण केले आहेत. त्यांचे महात्म्य वर्णना करिता, त्यांच्या पूजा अर्चाकरिता, स्तुती स्तोत्राकरिता, मांसाहारी देवांना बळी देण्याकरिता, त्यांच्या विधिविधानाकरिता मांसाची आहुती देताना म्हणण्याच्या मंत्राकरिता, असे एका एका देवाकरिता पांच–सहा प्रकारचे ग्रंथ निर्माण केले आहेत. देवी देवता लाखो आहेत तर ग्रंथ किती असतील हे सांगणे अशक्य आहे. वैदिकांच्या सर्व देवी देवता करिता पुराणे उपपुराणे हे ग्रंथ तयार केले आहेत. अठरा महापुराणे व अठरा उपपुराणे आहेत. दोन्ही मिळून ३६ आहेत. (या अठरा पुराणांत भारतीय आर्यांचे शैव सिध्दांताचे १० पुराणें आहेत.) या छत्तीस पुराणांचे लेखक वेगवेगळे आहेत. परंतु पुराण लेखकाचे नाव गुप्त ठेवून ती सर्व पुराणे व्यासांनी लिहिली आहेत असे भासवितात व तसा प्रचारही करतात. व्यासांनी फक्त एकच ग्रंथ लिहिला आहे. त्याचे नाव जय असे आहे. त्यात कौरव पांडवाच्या युध्दाचे वर्णन आहे, जयग्रंथ सोडून जेवढे ग्रंथ आहेत त्यातला एकही ग्रंथ व्यासांनी लिहिला नाही. असे पुष्कळ विद्वान पंडितांचे मत आहे आणि ते सत्य असावे. ह्या छत्तिस पुराणामध्ये दहा पुराणे सोडून बाकीची सहवीस पुराणे व्यास कालानंतर चार हजार वर्षांनी लिहिली आहेत, याचा विचार पुढे केला आहे. या पुराणातील प्रकार फारच विचित्र आहे. ह्या पुराणकारांनी जे निर्माण केले आहे ते विश्व निर्माण करणाऱ्या परमेश्वराला करता आले नाही. विश्व निर्माण करणाऱ्या परमेश्वराने विविध प्रकारची सृष्टि निर्माण केली आहे. या सृष्टित सर्वात श्रेष्ठ मानव निर्माण केले आहेत, मानवापेक्षा श्रेष्ठ फक्त ज्याने विश्व निर्माण केले तोच एक सर्वश्रेष्ठ आहे. पुराणकारांनी मात्र हजारो देव देवी निर्माण केल्या आहेत. त्यात हजारो देव देवीत मुख्य तीन देव आहेत. या तिन्ही देवांना रहा-

ण्याची ठिकाणे वेगवेगळी आहेत. ब्रह्मदेवाकरिता सत्यलोक, विष्णूकरता वैकुंठ, महेशाकरिता कैलासलोक निर्माण केले आहेत. ही ठिकाणे पृथ्वीवर नाहीत, तर ती अंतराळात आहेत. याच अंतराळास मुख्य नाव स्वर्ग दिले आहे. त्या स्वर्गात एकवीस भाग आहेत. त्याप्रमाणे सृष्टिचे खाली त्यांनी पाताळ निर्माण केले आहे. त्यात सात भाग आहेत. त्याला सप्त पाताळ असे म्हणतात. एकवीस स्वर्गांत एकवीस देव स्थापन केले आहेत. तसेच सप्त पाताळात सात देवांची स्थापना केली आहे. पौराणिकांनी विश्व निर्माण करणाऱ्या इश्वराने जी सृष्टि निर्माण केली आहे त्या सृष्टिला मृत्युलोक असे नांव ठेवले आहे. त्यांनी निर्माण केलेले स्वर्ग पाताळ दोन आणि इश्वराने निर्माण केलेल्या सृष्टिला दिलेले नांव मृत्यु लोक असे तीन भागास स्वर्ग, मृत्यु, पाताळ नांवे ठेवून या तिन्ही प्रकाराचे संक्षिप्त नांव त्रिभुवन असे (पौराणिकांनी) ठेवले आहे.

**४२. त्रिभुवनाच्या समर्थनाकरिता अगणित ग्रंथ संपत्ती निर्माण केली आहे.**

या त्रिभुवनाचे संरक्षण करण्यासाठी इंद्र नावाचा एक राजा त्यांनी निर्माण करून त्याला रहाण्याकरिता अमरपुरी नांवाची राजधानी अंतराळातच निर्माण केली आहे. स्वर्गांत व पाताळात राहणाऱ्या देवांकरिता अनेक प्रकारच्या मोयी निर्माण केल्या आहेत. त्यांचे वर्णन त्यांनी (पौराणिकांनी) निर्माण केलेल्या ग्रंथातच वाचकांनी पहावे. त्यांचे ग्रंथ वाचायला शतायुषी मानवाचे काही जन्म खर्ची घालावे लागतील एवढी प्रचंड ग्रंथ संपत्ती पौराणिकांनी निर्माण केली आहे. मग या माझ्या छोट्याश्या पुस्तकात ते सर्व लिहिणे शक्य नाही. तरी पौराणिकानें निर्माण केलेल्या देवदेवीचा थोडक्यात विचार करू. तसेच ग्रंथ संपत्तीचीही थोडक्यात मीमांसा करू.

**४३. महापापाच्या समर्थनाकरिता निर्माण केलेल्या ब्राह्मणग्रंथास वेदाचा विकास म्हणतात.**

भारतीय युध्दानंतर वेदाच्या शाखा म्हणून ब्राम्हणादी ग्रंथ निर्माण केलें आहेत. या ग्रंथात त्यानीच निर्माण केलेल्या यज्ञ यागादि कर्मांचे विधिविधान लिहिले आहे. हजारो प्रकारचें यज्ञाचे विवेचना

करिता हजारो ग्रंथ त्यांनी निर्माण केले आहेत आणि हे सर्व प्रकार वेदाचा विकास आहे असे म्हणतात. हा सर्व प्रकार भारतीयांच्या वेदबाह्य आहे. यांच्या यज्ञांत हजारो पशुबळी लागत होते. असे हजारो यज्ञ एकाचवेळी हजारो ठिकाणी चालत होते. दररोज संपूर्ण भारतात यज्ञाच्या प्रकरणांत लाखो पशुबळी पडत होते. असा हा यज्ञाचा काळ, भारतीय युद्धानंतर दोन हजार वर्षं चालू होता. या पापाला उपनिषदकाराने थोडा आळा घातला होता. नंतर गौतम बुद्धाने मात्र यांच्या यज्ञाचा बिमोड केला.

**४४. वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या पुराणातील काल्पनिक देवदेवीचा विचित्र प्रकार.**

यज्ञयाग बंद पडल्यावर त्यांची (वैदिक आर्यांची) अनादिकालाची परंपरेने असलेली हिंसक वृत्ती यांना त्रास देऊ लागली. मग या बुद्धिमान वैदिक आर्यांनी देवदेवता निर्माण करून आपल्या हिंसक वासनेला तृप्ती मिळविली. त्यांच्या वैदिक (पौराणिकांच्या) देवदेवींचा हिंसक प्रकाराचा नंतर विचार करू. अगोदर पुराणांचा विचार करू. पुराण ग्रंथ जेवढे आहेत त्यांची एकवाक्यता नाही. एका देवाचे किंवा मानवाचे राजांचे वर्णन अनेकांनी अनेक प्रकाराचे वेगवेगळे केले आहे. पौराणिकांच्या देवांची संख्या फारच पुष्कळ आहे.

**४५. राजा सगराचे चरित्र.**

पौरणिकाच्या मृत्युलोकांच्या राज्याच्या कुटुंबावरून देवांच्या कुटुंबाचा विचार करू. उदाहरणार्थ मृत्यु लोकातील सूर्य वंशातील सगर राजाला २०,००० (वीस हजार) बायका होत्या. त्या वीस हजार बायकांपैकी एका बायकोला ६०,००० साठ हजार मुले होती. बाकीच्या बायकांना प्रत्येकी पहिलीच्या अर्धी म्हणजे तीस हजार तरी मुले असतील. एका बायकोची ६०,००० आणि उरलेल्या एकोणीस हजार नऊशे नव्याण्णव (१९,९९९) बायकांचे प्रत्येकी तीस हजार मुलाप्रमाणे ५७ कोटी साठ हजार मुले सगराला होती. सगर राजाने एवढ्या मुलांना जन्म दिला व लगेच मेला नसेल. त्याने आपल्या मुलांची लग्ने केली असतील. बापाला (सगराला) वीस हजार बायका

होत्या त्याच्या मुलांना बापाच्या विसावा हिस्सा इतक्या म्हणजे वीस हजाराच्या विसावा हिस्सा दोन हजार बायका असतील प्रत्येक मुलाला दोनहजार बायका धरल्यास सगराच्या सुना एकशे पंधरा कोटी वीस लाख होत्या. (१,१५,२०,००,०००) आणि सत्तावन्न कोटी साठ लक्ष मुले होती. एकशे त्रेसष्ट कोटी तीस लाख व सगराच्या बायका वीस हजार मिळून एकशे त्रेसष्ट कोटी तीस लक्ष सहवीस हजार (१,६३,३०,२६,०००) इतके लोक एका सगर राज्याच्या घरात राजवाड्यात रहात होती. तो राजवाडा केवढा होतो हे पौराणिकाला सांगता आले नाही. कारण पुराणात सगराच्या कुटुंबाचा विस्तार लिहिला नाही.

सगराच्या कुटुंबातील लोक सोडून त्याच्या नगरीतील लोक वस्ती किती असेल आणि राजवाड्यासह सगराची राजधानी केवढी असेल किंवा होती हेंही पुराणात पौराणिकांनो लिहिले नाही. सगरराज्याच्या कालात सगर सार्वभौम राजा होता. मांडलिक राजेही भारतात हजारो होते. त्यावेळी सगरासह रहावयाला भारतात भारतभूमी पुरत होती का ? हे पौराणिकाने पुराणात लिहिलेले नाही, मृत्यु लोकातील एका सगर राज्याच्या कुटुंबावरून इंद्राचा विचार केल्यास इंद्राचे कुटुंब केवढे असेल याचा विचार करू.

॥ त्रिभुवनाचा राजा इंद्र ॥

पौराणिकांचा इंद्र हा त्रिभुबनाचा राजा आहे. अमरपुरीत राहतो. तेहतीस कोटी देवासहित व सहकाऱ्यासहित ते अमरपुरीत आहेत. ते सर्व अमर आहेत. त्यांना मृत्यु नाही. मृत्युलोकातील सगराला वीस हजार बायका होत्या मग त्रिभुवनाचा राजा असलेल्या अमर असून अमरपुरीत राहणाऱ्या इंद्राला किती बायका असाव्यात. मृत्युलोकापेक्षा लाखो पटीने इंद्रादि देव सुखात होते. मृत्युलोकातल्या राजापेक्षा लाखो पटीने बायका असल्या पाहिजेत. लाखोपटीचा हिशेब करणे मला (लेखकाला) जमणार नाही. कारण पौराणिका इतका मी बुद्धीमान नाही. माझ्या बुद्धीला झेपेल इतका विचार करून पाहतो.

सगर राज्यापेक्षा इंद्राला अगदी कमीत कमी सगराच्या शंभर

पटीने अधिकचा विचार केल्यावर सगराला वीस हजार बायका होत्या त्याच्या शंभरपट म्हणजे वीस लाख बायका इंद्राला होत्या असे म्हट-ल्यास अतिशयोक्ती होणार नाही. सगराला २०,००० बायका होत्या व एका बायकोला साठ हजार मुले होती. पण इंद्राला प्रत्येक बायकोला सगरापेक्षा दहा हजार मुले कमी धरून प्रत्येक बायकोला पन्नास हजार मुलाप्रमाणे १०,००,००००,००० इतकी (अगणित) मुले होती आणि इंद्राचे सहकारी तेहतिस कोटी लोकांच्या कुटुंबाचा विचार केल्यास इंद्रपुरीतील लोकवस्ती किती होती हे पौराणिकाला सांगता येईल कां ? इंद्रपुरीतील लोकवस्ती अगणित होती, प्रथम पिढितील लोकांना राहता येयील इतकी मोठी इंद्रपुरी अंतराळात असेल का ? आणि असलीच तर आतापर्यंत तिची लोकसंख्या किती झाली असेल. प्रथमापासून आतापर्यंत त्या लोकसंख्येतील एकही व्यक्ति कमी झाली नाही. कारण ते अमर आहेत. वैदिक आर्य (पौराणिक) म्हणतात की इंद्र त्याचे सहकारी व इतर देव देवी विश्व निर्माण झाले तेव्हापासून आहेत. त्यांच्या (पौराणिकांच्या) म्हणण्याप्रमाणे इंद्राचा इंद्रपुरीचा तसेच त्याच्या सहकाऱ्यासह अमर असलेल्या सर्वांच्या विस्तारांचा विचार केला तर आतापर्यंत इंद्र आणि त्याचे सहकारी तेहतीस कोटी अमर असलेल्यांची लोकसंख्या किती झाली असेल आणि त्यांना राहा-यला संपूर्ण अंतराळ पुरण्याइतके आहे का ? असल्यास पृथ्वीपेक्षा ती लाखोपटीने मोठी झाली असेल. आणि हा सर्व प्रकार खरा असल्यास सूर्याच्या आणि पृथ्वीच्या आंत एक पडदा तयार होऊन सर्व पृथ्वीवर अंधार झाला असता. परंतु आतापर्यंत तसे काही झाले नाहीत, तसे कोणाला दिसत नाही. मग हा इंद्र आणि इंद्रपुरी सत्य असेल का ? आणि सत्य असल्यास ती कुठे आहे हे वैदिक पौराणिक सांगतील कां ? ज्यांनी पुराणे लिहिली ते आता जिवंत नसतील. परंतु वैदिक पौरा-णिकांनी निर्माण केलेल्या भाकड कथा सत्य मानणारे भारतात फारच पुष्कळ लोक आहेत. त्यांच्यातून एखादा तरी महात्मा सत्पुरुष दाखविल कां ? शक्य नाही. अंतराळात तारका शिवाय कांहीच नाही. कांहीच दिसत नाही. आणि चालू शतकातील लोक आधुनिक संशोधनाच्या आधारे (दुर्बिणीच्या) आधाराने सर्व अंतराळात काय आहे ते पाहतात.

सर्वात उंच तारा सूर्य आहे. त्या सूर्याच्या खाली सर्व जग आहे. पौराणिकांच्या २१ स्वर्गाला सुद्धा सूर्याचाच प्रकाश आहे. असे असून त्यांचे स्वर्ग मात्र कोठेही दिसत नाही. ते पौराणिक दाखवू शकतील कां ?

पौराणिकांच्या मृत्युलोकांतील एका राजाचा व त्रिभुवनाच्या एका राजाचा असा दोघांचाच विचार केला आहे. त्यांनी निर्माण केलेल्या त्रिभुवनांचा विचार करून ग्रंथ लिहिला तर सर्वात मोठा असलेल्या महाभारतापेक्षा हजारोपट मोठा होईल. आणि ते लिहायला कोणालाही शक्य नाही. असो. आता पौराणिकांच्या मुख्य तीन देवांचा विचार करू. प्रथम ब्रह्मदेवाचा करू.

**४७. कन्या गमन करणारा महापापाचारी**

**॥ ब्रह्मदेवाचे चरित्र ॥**

पौराणिकांनी 'ब्रह्मदेवा' कडून सृष्टी निर्माण करून घेतली आहे. दुसरे त्यांनी निर्माण केलेल्या राक्षसांना तपश्चर्या करावयाला लावून ब्रह्मदेवाकडून वर मागून घ्यायला लावले आहे. ही दोन कामे करवून घेऊन त्याला (ब्रह्मदेवाला) मानवाने न केलेले. राक्षसानीही न केलेले, पाप ब्रह्मदेवा कडून करवून घेतले आहे. हे दोन काम करून घेऊन त्याला भ्रष्ट केले आहे. वाचकांना वाटेल की, ज्याने चराचर सृष्टी निर्माण केली आहे, त्या ब्रह्मदेवाने कोणते पाप केले असेल असे वाटणे साहजिक आहे. ब्रह्मदेवानें जे पाप केले आहे तसे पाप त्याने निर्माण केलेल्या सृष्टीत कोणीही केले नाही. आणि कोणी करितही नाही. ब्रह्मदेवाने आपल्या स्वतःच्या मुलीला (सरस्वतीला) तरुण दशेत आलेली पाहून, काम मोहीत झाला व त्यानें कामेच्छा तृप्तीची मागणी केली. ती मागणी मुलीनें नाकारली. कामविव्हल झालेल्या ब्रह्मदेवाने बलात्कार करण्याचा प्रयत्न केला. बापाचा (ब्रह्मदेवाचा) विपरित विचार जाणून मुलगी (सरस्वती) पळू लागली. बाप तिला पकडण्यासाठी मुलीच्या मागे धावू लागला, मुलगी पुढे बाप मागे असे धावत त्रिभुवनांत कित्येक हजार वर्षे फिरत होते. हा सर्व प्रकार त्रिभुवनातील लोक पहात होते. वाचक बंधूनो विचार करून पहा

इतक्या उघडपणे इतके महापाप ब्रह्मदेवाशिवाय दुसऱ्या कोणी केलेले पाहण्यांत, वाचण्यांत, ऐकिवात तरी कोठे आहे कां ? असे कोणाला सांगता येईल कां ? पौराणिकांनी ब्रह्मदेवाला असे हे महापाप करावयाला लावून भ्रष्ट केले आहे. (अधोगतीला घातले आहे.)

**४८. इ. स. सहाव्या शतकात निर्माण झालेला त्रिभुव पूज्य गणपती रावणाघरी गाढव राखतो.**

॥ गणपतीचे चरित्र ॥

**॥ श्री गणेशाय नमः ॥**

देव, दानव, मानवात सर्वश्रेष्ठ सर्वांना पूज्य असलेल्या गणपती देवाला रावणाने लंका नगरीतले गाढव राखायला लावले होते. दिवसभर गाढव चारून संध्याकाळी परत घरी येताना गाढवांना चारा घालण्यासाठी गणपती गवत आणित होता. हजारो गाढवांना पुरेल इतका गठ्ठा बांधून खांद्यावर घेवून यावे लागत होते. रावणा घरी गाढवा करीता गवत खांद्यावर घेउन यावे लागत होते. ती खूण चिरंतन रहावी म्हणून गणपतीच्या पुजेत मुख्य दूर्वा (गवत) नसेल तर गणपतीला राग येऊन भक्ताला अनेक प्रकारचा त्रास देतो.

सज्जन वाचक मित्रानो त्या पौराणिकात किती सामर्थ्य होते. पहा, गणपती देवाला सर्व त्रिभुवनांत पूज्य केले. नंतर रावणासारख्या महादुष्ट राक्षसाच्या घरी गाढवं राखायला लावले. गाढवांकरीता गवत वाहण्यास लावले. गणपतीनें असे रावणाकडे दास्य केले हे सर्व जगाला अनंत काल पर्यन्त माहित रहावे म्हणून गणपतीच्या पुजेत (दुर्वा) गवत मुख्य ठेवले आहे. पौराणिकांनी गणपतीला प्रथम त्रिभुवन पूज्य करून त्याला गाढवं राखायला लावले आणि पूज्य गणपतीने ते आनंदाने केले आहे. रावणा घरी अशी दुर्दशा झालेली गणपतीला आवडली नसती तर दुर्वा वाहिलेल्यांचा राग आला असता. दुर्वा न वाहिली तर राग येतो म्हणजे ते गणपतीला फारच आवडते. अशाप्रकारे गणपतीला पौराणिकांनी अधोगतीला घातले आहे.

गणपतीच्या जन्माच्या कथा पौराणिकानी अनेक ग्रंथात निरनिराळ्या लिहिल्या आहेत. त्यातील खरी कोणती व खोटी कोणती

याचा योग्य निर्णय आतापर्यंत कोणीही केला नाही.

**४९. महाविष्णू व त्याचे अवतार.**

विष्णुला रहावयाला जागा वैकुंठ आहे आणि दुधाच्या समुद्रात शेषाच्या शय्येवर विष्णू विश्रांती घेतो. (झोपतो). विष्णूला दोन ठिकाणी वास्तव्याला जागा आहे. विष्णूला ब्रह्मदेवाचा बाप बनविण्यांत आले आहे. मुलापेक्षा बाप श्रेष्ठ असतो हे सर्वांनाच माहित आहे. ब्रह्मदेवाकडून काही त्यांच्या इच्छेप्रमाणे चांगले काम करून घेऊन त्याला महापाप करावयाला लावून अधोगतीला घातले आहे. त्याच· प्रमाणे त्याच्या (ब्रह्मदेवाच्या) बापाकडून काही चांगली कामे करून घेऊन विष्णूला अधोगतीला घातले आहे विष्णू हा मोठा देव असून मोक्ष देणारा आहे. त्याच्याकडून अनेक भक्तांनी मोक्ष मिळवून घेतला आहे. पुढे त्याला (विष्णूला) अवतार घ्यावयाला लावले आहे. विष्णूच्या अवताराचा थोडा विचार करू.

**(अ) मासा, कासव, डुकराचे पोटी महाविष्णूचे तीन अवतार चरित्र.**

विष्णूला प्रथम तीन योनीत अवतार घ्यावयास लावले आहे. १) मासा २) कासव, ३) डुक्कर. अशा नीच योनीत जन्म घ्यावयाला लावून त्याच्याकडूनही त्रिभुवन, वेद, शास्त्र, पुराणादी ग्रंथ, पौराणिक देवी देवता, तीर्थक्षेत्रे असे नानाविध प्रकार निर्माण करून घेतले आहे. या तिन्ही अवतारी देवाकडून चांगले तेवढेच करून घेतले आहे. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे सर्व विश्व निर्माण करून घेतले आहे. त्यांच्याकडून वाईट मात्र कांहीच करून घेतले नाही चांगले मात्र विश्व निर्माणकरणाऱ्या ईश्वराला जे करता आले नाही ते विष्णू अवतारी मत्स्य, कच्छ वराहाकडून करून घेतले आहे.

**५०. माणूस नाही पशूही नाही असा विचित्र ॥ महाविष्णूचा चौथा नरसिंह अवतार चरीत्र ॥**

विष्णूचा चौथा अवतार नरसिंह आहे. त्याच्याकडून मात्र महान काम करून घेतले आहे. पौराणिकांनी निर्माण केलेला दैत्य हिरण्यकश्यपू नावाचा होता. त्याने तपश्चर्या करून ब्रह्मदेवाकडून वर मागून घेऊन वराच्या सामर्थ्याने त्यांच्या (पौराणिकांच्या) त्रिभुवनांतल्या लोकांना

तो त्रास देऊ लागला. त्याला मारण्यासाठी विष्णूला मानव नाही, पशु नाही, असा अवतार घ्यावयाला लावून त्याला (दैत्याला) मारावयाला लावले आहे.

**५१. ॥ बळी दैत्याचा द्वारपाळ पाचवा अवतार वामनाचे चरित्र ॥**

पाचवा अवतार वामन. वामन अगदी लहान वटु. याच्याकडून कपट कारस्थान करून बळी नावाच्या दैत्याला पाताळात घालायला लावले आणि बळीकडून वामनाला द्वार रक्षक करवून घेऊन त्याला (वामनाला) कायमचा बळी दैत्याचा द्वारपाळ करून ठेवले आहे. हा दैत्य चिरंजीव आहे. याला मरण नाही, या विश्वाचा अंत होईपर्यंत बळी जिवंत रहाणार आहे. बळीबरोबर पौराणिकांचा देव विष्णू अवतारी वामन सुद्धा बळीचा द्वारपाळ राहणार आहे. वामनाकडून काम करवून घेऊन त्यालाही अखंड बळीचा बंदीवान करून टाकला.

**५२. निरपराधी कोटयावधी क्षत्रियांचा संहार करणारा सहावा अवतार परशुरामाचे चरित्र.**

सहावा अवतार परशुराम, परशुरामाकडून वैदिकाच्या पाप-कर्माला अडथळा करणाऱ्या क्षत्रियांचा निःपात करून घेतला, कारण क्षत्रिय भारतीय आर्य होते. भारता बाहेरून येऊन वैदिक आर्यांनी चालविलेला अत्याचार त्यांना आवडत नव्हता. म्हणून वैदिकांना ते सतत त्रास देत होते. परशुरामाकडून एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करून घेतली. ब्राह्मण कुळात उत्पन्न झालेल्या परशुरामाने पौराणिकांच्या भुल थापांना बळी पडून लाखो क्षत्रियांना मारले. धन्य त्या परशुराम ब्राह्मण वीराची.

ब्राह्मणाचे कर्म तपःश्चर्या आणि इतर क्षत्रियादि वर्णातल्या लोकांना धर्माचा उपदेश करून, त्यांना सत्कर्म आचरण शिकवून, पाप कर्मापासून निवृत्त करून, सन्मार्गाचा उपदेश करून त्यांचा उद्धार करणे हे सोडून एवढे मोठे पाप रावणादी राक्षसांनीही केले नाही. ते परशु-रामाला करावयाला लावलेले आहे. रावणादि राक्षसांनी त्यांना (राक्षसांना) आड येणाऱ्या क्षत्रियाला एकाला आणि त्याच्या साथी-दारांना मारले असेल. परंतु सर्व क्षत्रियांना एकाचवेळी मुलाबालांसह

त्यांनी मारलेले कोठेच आढळले नाही. इतके महापाप कोणीही करणार नाही. केले नाही' परशुरामाचा गुन्हा एकाच क्षत्रियाने केला होता. हे सर्वांना ठाऊक आहे. व ज्याने गुन्हा केला त्याला शासन करावे. त्या गुन्हेगाराला शासन करणे म्हणजे आपल्या तपःसामर्थ्याने आपल्या उपदेशरुपी महाशस्त्राने त्यांच्या अंतःकरणातील गुन्हेगारी वृत्ती नष्ट करून त्याचा उद्धार करणे. हे ब्राह्मणाचे कर्तव्य सोडून त्यांनी गुन्हेगारी जिवांना जीवनाशि मारणे तेही एका ऐवजी लाखोना एकदाच नव्हे तर त्यांच्या पुत्रपौत्रांसहित एकवीस वेळा मारणे म्हणजे केवढा अधर्म, अनीति तेही परशुरामासारख्या शिवभक्त ब्राह्मणाने करावे, हे एक आश्चर्य आहे. पौराणिकांनी परशुरामांसारख्याकडून आपले इच्छित काम करून घेऊन त्याला पापकर्म करावयाला लावून अधोगतीला घातले आहे.

## ५३. सातवा अवतार श्री रामाचे चरीत्र

सातवा अवतार श्रीराम हा सूर्य वंशातील दशरथ राजाचा मुलगा होता. तो दैवी पुरुष होता. त्याने आपल्या काळात अधर्माचे बंड मोडून सद्धर्माची स्थापना केली. हे श्रीरामाने महान कार्य केले होते. तो राजा होत. शूर वीर होता. त्याला धर्मा अधर्माचे ज्ञान होते. त्याचे हातून चुकूनसुद्धा अधर्म होणे शक्य नव्हते. आणि तो वैदिक पौराणिकांच्या अगोदरच्या कालात होऊन गेला आहे. श्रीरामाचे कुलगुरू ब्रह्मवेत्ते ब्राह्मण आणि ऋषी होते. ते अखंड सूर्य वंशाचे गुरू होते. त्यांचे सान्निध्यात बालपणापासून देहांतापर्यंत श्रीराम होते. श्रीरामाने गुरू वसिष्ठांजवळ सर्व प्रकारचे ज्ञान प्राप्त करून घेतले होते. सर्वांत श्रेष्ठ ज्ञान, ब्रह्मज्ञान, तेही श्रीरामाने गुरू वसिष्ठांकडून प्राप्त करून घेतले होते. ते एक बाणी होते. एक पत्नी होते. अशा सर्वसंपन्न, सत्य युगात जन्मलेले, सद्धर्माची प्रस्थापना करणाऱ्या श्रीराचंद्राकडून वाली वधाचेवेळी अधर्म होणे शक्य नाही. ते अधर्म व पाप करणारे असते तर श्री वाल्मिकी सारख्या ऋषींनी श्रीरामाचे चरित्र निर्माण केले नसते. कोणत्याही इतिहासात, कोण्याही क्षत्रियाने, कशाच्या तरी आड बसून, समोरच्या वीराला जाणीव न देता, त्यांना आव्हान न करता,

मारलेले आढळले नाही. आणि अशा वरील वर्णनाप्रमाणे सर्वज्ञान संपन्न रामाने वालीला कपटाने, त्याला आव्हान न करता, विश्वासघाताने मारले हे सत्य असेल का ? हे सत्य मानल्यास क्षत्रिय धर्म राहीला का ? रामाने असा अधर्म केला का ? हे शक्य नाही. हा सर्व प्रकार पौरणिकांनी आपण जसे अधर्मी आहोत तसेच भारतीय आर्य अधर्मी होते असे भासविण्याचा प्रयत्न केला आहे.

**५४. शंभर कोटी श्लोकाचे रामायण वाल्मिकीने लिहिलेले नाही. नंतर कोण्यातरी मुर्खाने लिहिले आहे.**

वाचक सज्जनांनो आपण थोडा रामचरित्राचा (रामायणाचा) विचार करू या. रामायणातल्या कथेवरून रामायण हा ग्रंथ शतकोटी (शंभर कोटी) श्लोकांचा आहे. आणि तो वाल्मिकी ऋषींनी लिहिला आहे. असे रामायणात आहे. आता आपण त्रेता युगातील श्रीरामकालाचा विचार करू या.

लेखन कला व्यासांच्या कालातही नव्हती. व्यासानंतर बऱ्याच दिवसांनी लेखन कला निर्माण झाली आहे. श्रीरामाच्या कालात तर नव्हतीच. त्या कालात कोणतेही वाङमय मुखोद्गत करीत होते. शंभर कोटी श्लोक मुखोद्गत करणे मानवाला शक्य आहे का ? मानवाला ज्याचा उपयोग करता येत नाही. अितके मोठे वाङमय निर्माण करणारा कोणीतरी मूर्ख मानव असला पाहिजे. वाल्मिकी ऋषी मूर्ख होते का ?

**५५. रामायणात काल्पनिक भाकड कथा.**

वस्मिकीने लिहिलेले रामायण फारच लहान असले पाहिजे आणि त्यांत अनीतिला स्थान नसले पाहिजे. चालू कालातील रामायणांत तर फारच चुका आहेत. अुदाहरणार्थ मारुती जन्माचा आपण विचार करू. मारुतीची जन्म तिथी चैत्र शुद्ध पौर्णिमा आहे. मारुती जन्माला आल्याबरोबर त्याला भुक लागली. त्यावेळी सूर्य अुगवला होता. ऊगवत्या सूर्याच्या गोल व लाल रंगाला पाहून मारुतीला वाटले की, ते कांही तरी फळ आहे. म्हणून ते खाण्याकरिता अुडी मारुन सूर्याजवळ गेला. त्या दिवशी सूर्याला ग्रहण होते म्हणून मारुतीच्या

अगोदर तेथे सूर्याला गिळून टाकण्यासाठी राहू आला होता. मारुतीला पाहून राहूला वाटले की, माझे भक्ष खायला आलेला, शेपुट असलेला, दुसरा राहु आला कोठून. माझें भक्ष मी खाऊ देणार नाही. मारुतीलाही तसेच वाटले. मग त्या दोघांचे भांडण लागले, हा सर्व प्रकार सर्वांना माहीत आहे. ज़ास्त लिहिण्याची गरज नाही. वरील प्रकाराचा थोडा विचार केल्यांस पौर्णिमेच्या दिवशी सूर्याला ग्रहण असते का ? नाही. जन्मल्याबरोबर ह्या बाळाला पश्चिम समुद्रापासून पूर्व समुद्रापर्यन्त उडीं मारून जाता येईल का ? शक्य नाही. तसेच मारुती वानर पशू होता का ? नाही. रामायणातील मारुतीच्या कार्याची माहिती कळल्या-वर पशू वानराला ते करता अेईल का ? येणार नाही. मारुती पशु वानर तव्हते. वनात रहाणारा नर मानव होते. पौरानिकांनी त्याला (नर मानवाला) पशू बनविले आहे. चालू रामायणाचा सारासार विचार केल्यावर रामायणाचा आधार घेऊन कोण्यातरी मूर्ख लेखकाने हे रामायण लिहीले आहे. पोराणिकांनी मत्स्य कच्छादी अवतारी विष्णु कडून आपले काम करून घेऊन अधोगतीला घातले तसे श्रीरामाला करणे जमले नाही. फक्त रामाच्या चारित्र्यात कांहीतरी विपरित प्रकार घालून रामाचे चरित्र हनन केले आहे.

## ५६. रामायणांतील १० तोंडाच्या रावणाचे चरित्र.

आता थोडा रावण नावाच्या राक्षसाचा संक्षिप्त विचार करु. रावण हा फारच सामर्थ्यवान होता. त्याचे सहकारी राक्षसही महा-सामर्थ्यवान होते. आणि लाखो संखेने होते. ते समुद्रातील बेटावर रहात होते. त्यांची लंका नावाची सोन्याची नगरी होती.

त्या लंका नगरीत रावण आपल्या लाखो सहकाऱ्यासह रहात होता. ती लंका नगरी किती मोठी होती. ति इन्द्राच्या अमरावती पेक्षा व कृष्णाच्या द्वरकेपेक्षाही मोठी होती. त्या नगरीत किती प्रकारच्या सुखसोई होत्या त्याचे वर्णन माझ्या या छोटचा पुस्तकात लिहीणे शक्य नाही. अगदी थोडे लिहिले तरी दोनशे पाने पुरणार नाहीत. वाचक सज्जनांनी रामायण ग्रंथात पहावे. रावणाला दहा तोन्डे होती. पोट एक, पाय दोन होते. त्याचे सहकारी असेच अनेक

प्रकारच्या विचित्र शरीराचे, विचित्रतोंडाचे होते. रावण महासामर्थ्यवान होता. त्याने एका विष्णूला सोडून बाकीचे सर्व इंद्रादि तेहतीस कोटी देव, शनी, मंगळादी ग्रह, वायु, अग्नी, मेघादि लोक. लाखो वर्षे आपल्या बंदी शाळेत बंदीवान करून ठेवले होते.

**५७. रावणाने पळवून नेलेलेली आपली बायको रामाने सोडवून आणली आणि शंकराने आपली बायको रावणाला देऊन टाकली.**

रावणाने पौराणिकांच्या अनंत देवाला आपल्या बंदिवासात ठेवले होते· विष्णूला मात्र त्याने कांहीच केले नाही. रावणाला विष्णूची भिती वाटत असावी. शंकर मात्र रावणाची आराध्य देवता होती. शंकराला रावणाने जितके वर मागितले, जितक्या प्रकारचे मागितले तितक्या वेळा, तितक्या प्रकारचे वर दिले होते. एका वेळी रावणाने शंकराला पार्वती व आत्मलिंग मागितले. आणि शंकराने आपली बायको पार्वती व आपले आत्मलिंग देऊन टाकले. होते. रावणावर शंकराचे फारच प्रेम होते. वाचक मित्रानो, आपण थोडा विचार करु. राम हा सूर्य वंशातील दशरथ नावाच्या राजाचा मुलगा होता. तो माणूस होता. देव नव्हता. त्याची बायको रावणाने भिक्षुक संन्याशाचे रूप धारण करून पळवून नेली होती.

रामाने रावणाला त्याच्या संपूर्ण सहकारी राक्षसांसह मारुन णापली बायको सोडवून आणली, आणि शंकराने आनंदाने रावणाला आपली बायको देवून टाकली. सर्वसाधारण दारिद्रयाने गांजलेला माणूस देखील आपली बायको दुसऱ्याला देणार नाही. परंतु तिन्ही देवांत स्रेष्ठ असलेला महादेव किती मूर्ख असेल की, आपली बायको अेका दुष्ट राक्षसाला देऊन टाकली. होती. ह्या पौराणिकांच्या शंकराला साधारण जंगली माणसा अितकी ही अक्कल नव्हती. बायको म्हणजे पुरुषाची आर्धांगी असते. असा शास्त्र सिद्धांत आहे. आपल्या अर्धांगाचे ज्याला रक्षण करता आले नाही, येत नाही, अशा अज्ञान वेड्या शंकराची किर्ती सर्व ब्रह्मांडात गाअीली जाते. शंकराच्या किर्तीच्या वर्णणाचे हजारो ग्रंथ केले होते. नंतर त्यात वाढत जाऊन चालू कालांत वर लाखो ग्रंथ आहेत. अितका भोळा, वेडा की ज्याला स्वतःच्या

बायकोला सांभाळण्याची अक्कल नाही. असा देव मानवाला मोक्ष देतो. वरील वर्णनावरून विचार केला तर शंकराला स्वत:लाच मोक्ष म्हणजे काय हे कळण्या इतकें ज्ञान असेल का ? अशा शंकराकडून मोक्ष मिळावा म्हणून त्याची ऊपासना करणारे अगणित लोक आहेत. त्यांना मोक्ष मिळेल कां ? शक्य नाही. त्रिवार शक्य नाही.

### ५८. रामायणातील रावणाचा भाऊ कुंभकर्ण

रामायणात कंभकर्ण नांवाचा रावणाचा भाऊ होता. त्याने तपश्चर्या फार मोठी केली होती. त्याला देव प्रसन्न झाला, देवाने वर मागावयाला सांगितले. तो इन्द्रपद मागणार होता. त्याला इन्द्रपद मिळाल्यावर आपल्याला अतिदुःख देईल. म्हणून सर्व देवांनी सरस्वतीला त्याच्या जिभेवर बसून त्याला इंद्र शब्दांच्या ऐवजी निद्र शब्द बोलावयाला लाव असे सांगितले. देवाचे ऐकून सरस्वतीने कुंभकर्णाच्या जिभेवर बसून त्याला इंद्रपद मागायच्या ऐवजो निन्द्रपद मागून घ्यायला लावले. हा सारखा झोपून राहील म्हणून वर देणाऱ्या देवाने त्याला आशिर्वाद दिला, की सहा महिन्यांत एक दिवस तू जागा रहाशील. त्या दिवशी सहा महिन्यातील सर्व कार्यक्रम अंघोळ पूजा अर्चा, भोजनादि करून पुन्हा झोपून राहशील. त्याप्रमाणे तो सहा महिन्यांने एक दिवस जागा होत होता व भोजनादि करित होता. त्याला खायला लाखो हत्ती, लाखो उंट, तसेच रेडे, मेन्ढे, बकरे, हरणादि अनेक जातीचे पशू लागत होते. आणि ते सर्व पशु जीवंतच तो आपल्या तोंडात टाकून गिळत असे. जसे पशु अगणित लागत होते. तसेच अन्नही लागत होते. त्याच्या करता अन्न शिजवणे तो जागा व्हावयाच्या अगोदर कित्येक दिवसापासून करावे लागत होते. त्याचा खाण्याचाही प्रकार ज्या भांड्यांत अन्न तयार केले असेल ते भांडे उचलून आपल्या तोंडांत ओतून घेत होता. शेकडो भांडे तोंडात ओतायचे त्यावेळी त्याचा एक घास होत होता. तो अंघोळ करायला समुद्रात जात होता. समुद्र चारशे कोस (८०० मैल) खोल होता. तो समुद्रात उभा राहिला म्हणजे समुद्राचे पाणी त्याच्या गुडघ्या पर्यन्त येत होते आणि डोके आकाशांत जात होते. चंद्र सूर्य त्याच्या कानाळा

लागत होते. इतका तो उंच होता. इतका उंच कुंभकर्ण रावणाच्या लंकेत रहात होता. त्याच्या करिता रावणाने स्वतंत्र घर बांधले होते. ते घर किती उंच असेल व लांब रुंद असेल. इतका उंच कुंभकर्ण झोपल्या वेळी त्याला ते घर पुरत असेल कां ? त्याच्या गुडघ्या पर्यंन्तची आठशे मैल उंची होती तर त्याची संपूर्ण उंची ३२०० मैल होती. त्याचे घर इतक्या लांबी रुंदीचे असेलच तर त्या घराला लंकेत जागा होती कां ? हा सर्व कपोलकल्पित प्रकार आहे आणि तो वाल्मिकी रामायणांत पौरणिकांनी घातला आहे. अशा प्रकारे रामचरित्राला काळोखी फासली आहे. त्यांचा हा गाढवपणा ते वाल्मिकीच्या माथी मारतात. जगांत (विश्वांस) नाही ते निर्माण करण्या इतके वाल्मिकी ऋषी मूर्ख असतील कां ?

## ५९. भारतीय वैदिक धर्म संस्थापक राम आणि कृष्ण

त्रेता युगाचे शेवटी रामाने भारतीय वैदिक सद्धर्मांचा उद्धार केला. द्वापार युगाचे शेवटी कृष्णाने भारतीय वैदिक सद्धर्माचा उद्धार केला. कृष्णाने काय केले ते रामाला माहीत नव्हते. परंतु रामाने काय केले ते सर्व कृष्णाला माहीत होते. दोघांनाही भारतीय वैदिक धर्माचे म्हणजे वेदाचे नियम माहीत होते. कृष्णाचे आचार विचार उपासना आणि कार्य रामाला माहीत नव्हते. रामचे आचार विचार उपासना आणि कार्य कृष्णाला माहीत होते. राम एक वचनी, एक पत्नी होता हे कृष्णाला माहीत होते. वेदाचे नियम रामाला जसे माहित होते तसेच कृष्णालाही माहीत होते. रामाचे चरित्र लिहिणारे ऋषी वाल्मिकी होते. कृष्णाचे चरित्र लिहिणारे ऋषी व्यास होते. तेही भारतीय वैदिक आर्य होते. वेदाच्या नियमाला मानणारे होते. आणि दोघेही महाऋषी होते. हे वर वर्णन केलेल्या चौघांनाही मानवाच्या कल्याणाकरिता निर्माण केलेल्या वेदाचे नियम माहित होते. भारतीय आर्यांच्या वेदाचे नियम पाचव्या प्रकरणांत लिहिले आहेत.

वैदिक पौराणिकांनी निर्माण केलेल्या विष्णु अवतारी कृष्णाचा वेदविरुद्ध केलेल्या पापाचाराचा विचार करु.

त्यातील मुख्य मुख्य पांचव्या प्रकरणांत दिले आहेत. त्यांतील एक, पत्नीव्रत व दुसरा एक पती व्रत ह्या दोन प्रकाराचा विचार करावयाचा आहे.

**६०. भारतीयाचा महामानव श्रीकृष्ण आणि एकपतिव्रता सती द्रौपदी.**

वैदिक धर्म म्हणजे मानव धर्म, पुरुष्याचा एक पत्नीव्रत धर्म व स्त्रीयांचा एक पतिव्रत धर्म कृष्णाला माहित नव्हते असे कोणालाही म्हणता येणार नाही. कारण "स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः" ।। गीता ।। ४–३५ ।। कृष्ण अर्जुनाला सांगतो की, स्वधर्माने वागले असता मोक्ष मिळतो आणि परधर्माने वागल्यास नरक मिळतो. स्वधर्माचा वेगवेगळचा ठिकाणी वेगवेगळा अर्थ होईल. येथे एक पत्नी व्रत पुरुषाचा व एक पतीव्रत स्त्री धर्माचा विचार करावयाचा आहे.

कृष्णाने एक पत्नीव्रताचा त्याग करून १६१०८ सोळा हजार एकशे आठ बायका केल्या असतील कां ? कन्या, भगिनी, माता या वैदिक तत्त्वाचा त्याग करून हजारो गौळणींबरोबर भागवतांत लिहिल्याप्रमाणे रासक्रिडादि व्याभिचार केले असेल कां ? आणि आपल्या बहीणीला अर्थात द्रौपदीला पांच पती करून दिले असतील कां ? गौळणीबरोबर सहा महिन्याची रात्र करून रासक्रिडादि व्याभिचार केले असतील कां ? कन्येबरोबर व्याभिचार करील कां ? बहिणीबरोबर जारकर्म करील कां ? मातेशी गमन करील कां ? तसेच द्रौपदीने पुत्राबरोबर गमन केले असेल कां ? भावाबरोबर व्यभिचार केला असेल कां ? पित्याबरोबर व्याभिचार केला असेल कां ? कृष्णाने स्वधर्माचा त्याग केला असेल कां ? आणि या सर्व पापाचाराचा प्रकार व्यासांनी लिहिलेल्या जय नांवाच्या ग्रंथात स्वतः लिहीला असेल कां ? तसेच व्यासांनी गीता सातशे श्लोकाची लिहिली आहे का ?

वाचकांनो तेरा प्रश्नांचे उत्तर एकच आहे. ते नाही असे आहे. यातील कृष्णाने १६१०८ बायका व द्रौपदीने पाचपती केले नाहीत. आणि व्यासांनी असे कांहीही लिहिलेले नाही. कृष्ण भारतीय आर्य होता. तसेच द्रौपदी भारतीय आर्य स्त्री होती. तसेच व्यास महर्षिही

भारतीय आर्य होते. असा महापापाचार व्यासांनी लिहिलेल्या जय नावाच्या ग्रंथात लिहिला नाही.

वाचकांनो तुम्ही ज्या कृष्णाला देव मानता. मोक्ष देणारा देव ज्या कृष्णाला म्हणतात. ज्याच्या कीर्तीचे चरित्राचे वर्णन करणारे हजारो ग्रंथ आहेत तो कृष्ण वैदिक आर्यानी कल्पनेने निर्माण केलेला आहे. त्याला विष्णूचा अवतार म्हणतात. त्या कृष्णाने मात्र वरीलपैकी दोन प्रकारापेक्षाही अधिक पाप केले आहे. त्या पाप करणाऱ्या कृष्णाला मोक्ष देणारा देव म्हणतात. त्या महा पापाचारी अवतारी कृष्णाचा विचार करू.

**६१. आठवा अवतार कृष्णाचे चरित्र कृष्णचा महा पापाचार व द्रौपदीला पाच पती.**

कृष्णाने एक पत्नीव्रताचा त्याग करून १६१०८ सोळा हजार एकशे आठ बायका केल्या आहेत. एक स्त्री सोडून इतर स्त्रिया कन्या, भगिनी, माता या वैदिक तत्त्वाचा त्याग करून हजारो बायका केल्या आहेत. तसेच हजारो परस्त्रिया गौळणी बरोबर भागवतात लिहिल्या-प्रमाणे रासक्रिडादि महा व्यभिचार केला आहे. आपल्या बहिणीला (द्रौपदीला) पाच नवरे करून दिले आहेत. एक पत्नी व्रत व एक पतीव्रत सर्व विश्वातील स्त्रीपुरुषाला, जंगलातील जंगली स्त्रिपुरुषाला सर्व श्रेष्ठत्वाने मान्य आहे. परंतु वैदिक हिंदूच्या सर्व श्रेष्ठ अवतारी देवाला (कृष्णाला) व सर्व श्रेष्ठ अयोनी संभव यज्ञातून निर्माण झालेल्या द्रौपदीला मान्य नाही. इतके मोठे महापाप करणाऱ्या कृष्णाला वैदिक हिंदू मोक्ष देणारा परमेश्वराचा अवतार मानतात. तसेच सर्व जगातील स्त्रियापेक्षा महाभयंकर पाप करणाऱ्या एकाच वेळी पाचपति असलेल्या द्रौपदीला महासती प्रतिव्रता मानतात. हजारो लग्नाच्या बायका करणारा हजारो परस्त्रिया गौळणी बरोबर सहा सहा महिन्याची रात्र करून व्यभिचार करणाऱ्या, आगम निर्गमाच्या नियमाला न मानणाऱ्या, महाभयंकर पाप करणाऱ्या कृष्णाला वैदिक हिंदू देव, इश्वर, मोक्षदाता मानतात आणि आगम निगमाचे नियम मानून एक पत्नी व्रत व एक पति व्रत मानणाऱ्या, आणि त्याप्रमाणे आचरण

करणाऱ्या स्त्रीपुरुषाला पापी जीव मानतात. आणि महापाप करणाऱ्या कृष्णाची उपासना करायला लावतात. अर्थात पुण्यवानाला महापाप करायला लावतात.

६२. महापापी कृष्णाची उपासना केल्याने मोक्ष मिळेल का ?

तसेच महापापी द्रौपदी प्रमाणे आचरण केल्यास स्त्रीजातीचा उद्धार होईल का ?

कृष्णाप्रमाणेच शेषाचा अवतार असलेला कृष्णाचा थोरला भाऊ बळीराम हाही कृष्णाप्रमाणेच परस्त्रिया हजारो गौळणी बरोबर रासक्रीडा करीत होता आणि दारूही पीत होता. हे सर्व पापमय चरित्र श्रीमद् भागवतातील दहाव्या स्कंदांत सविस्तर लिहिले आहे. भागता-शिवाय दुसरे कृष्ण चरित्रपर हजारो लाखो ग्रंथ वैदिक हिंदूंनी लिहिले आहेत. या ग्रंथाधारे कथा, कीर्तन, प्रवचनकार विद्वान महा पंडित कथा, कीर्तन, प्रवचन द्वारा उपदेश करतात आणि अंधश्रद्धेच्या साध्या भोळ्या मानवाला महापाप करायला शिकवतात. हा महापाप करणारा कृष्ण उत्तर ध्रुवावरून आलेल्या वैदिक आर्यांनी स्वतःच्या कल्पनेने निर्माण केला आहे.

कलियुगातील पंडित महापंडित हाच कृष्ण मोक्ष देणारा महाविष्णूचा अवतार मानून त्याची उपासना आपण स्वतः करतात. तसेच अंधश्रमद्धेच्या सर्वमानवाला करायला लावून मोक्षाला जाण्याऐवजी अधोगतीला जातात. इ. स. सहाव्या शतकात पुंडलिकाने निर्माण केलेला विठोबा याच कृष्णाचा अवतार मानून चालू काळात फारच मोठ्या प्रमाणात कीर्तन प्रवचनद्वारे अंधश्रद्धेच्या मानवाचे मनोरंजन करतात.

६३. अवतारी कृष्णाचे कुटुंब

आता आपण श्रीकृष्णाच्या कुटुंबाचा, त्याच्या सहकारी यादवांचा, आणि द्वारका नगरीचा विचार करू. कृष्णाला १६,१०८ बायका होत्या; यादव छप्पन कोटी होते. आणि द्वारका नगरी सोन्याची होती. ती समुद्रात पाण्यात होती. श्रीकृष्णाचे ऐश्वर्य त्रिभुवनाचा राजा इंद्रापेक्षा काही कमी नव्हते. जास्त होते. इंद्रापेक्षा कृष्णाला बायका कमी

होत्या. सहकारी इन्द्राला तेहतीस कोटी देव होते. कृष्णाला छप्पन कोटी यादव होते. इन्द्राची नगरी अमरावती ही सर्व ऐश्वर्यात संपन्न होती. पण सोन्याची नव्हती. कृष्ण नगरी द्वारका सर्व ऐश्वर्य संपन्न असून सोन्याची होती. तुलनात्मक दृष्टया विचार केल्यावर बायका सोडून बाकी सर्व इंद्रापेक्षा कृष्णाचे ऐश्वर्य फारच मोठे होते. छप्पन्न कोटी यादवांसह कृष्ण समुद्रात रहात होता. तसेच तेहतीस कोटी देवाः सह इन्द्र अंतराळात रहात होता.

श्रीकृष्णाला सोळा हजार अेकशे आठ बायका होत्या. त्याच्या सहकाऱ्याला प्रत्येक पांचशे तरी असतील असे मानावयास कांहीं हरकत नाही. अट्ठावीस कोटी यादवांच्या व सोळा हजार अेकशे आठ कृष्णाच्या अेवढ्या बायका होत्या. जेवढ्या बायका तेवढे कुटुंब असतात. अेका कुटुंबात अगदी कमीत कमी दहा माणसे धरून हिशोब केला तर त्याला गणित संख्या पुरणार नाही. त्याला आता आपण अगणित म्हणू या.

हे सर्व रथी महारथी महा योद्धे होते. त्यांची युद्ध सामुग्री, रथ, रथाचे घोडे, हत्ती, उंट असे अनेक प्रकार होते. शिवाय गायी, म्हशी, नोकर, चाकर, दास दासी असे अनेक प्रकार होते. तेही सर्व द्वारका नगरीत रहात होते. माणसांना रहायला जेवढी जागा लागते त्यापेक्षा गुरे ढोरे, हत्ती, घोडे, ऊंट, रथ युद्धाचे शस्त्रात्रे ठेवण्याकरता, दासदासी नोकर चाकर यांच्याकरिता दसपट तरी अधिक जागा लागली असेलच. हे सर्व समुद्रातील द्वारकेत होते. ती द्वारका सोन्याची होती. त्याला सोने किती लागले असेल. हे सर्व खरे होते का ? कृष्ण होता, खरे आहे. त्याला बायको एकच होती, यादव होते हे खरे आहे. परंतु ते छप्पन कोटी नव्हते, द्वारका होती हे खरे आहे. परंतु ती समुद्रात आणि सोन्याची नव्हती, हा सर्व पौराणिकांच्या कल्पना चातुर्याचा बागुल बुवा आहे (हे सर्व खोटे आहे)

## ६४. वाचकाची शंका व समाधान

वाचक सज्जन मित्रहो, हा सर्व प्रकार वाचून तुम्हाला शंका निर्माण होईल की, आम्ही व्यासांच्या महाभारतात वाचतो. तसेच

विद्वान पंडित लोकही वाचतात. पण आतापर्यन्त कोणीच हे नाही, ते नाही असे लिहिले नाही आणि तुम्हीच का तेवढे शहाणे अहात. ते नाही हे नाही, असे महाभारताविरुद्ध लिहीता.

वाचक सज्जनहो, तुमची शंका बरोबर आहे, आणि मी जे लिहिले आहे तेही बरोबर आहे. तुमच्या माझ्यात फरक एवढाच आहे की, तुम्ही वाचता ते खरे मानता, सत्या असत्याचा, धर्म अधर्माचा, तुम्ही विचार करत नाही, आणि मी जे लिहिले आहे ते माझ्या अगोदरच्या पंडीत, महापंडितांनी, सत्या असत्याचा, धर्म अधर्माचा, विचार व संशोधन करून जें सिद्धांत काढले आहेत ते मला सत्य वाटले, ते मी लिहिले आहेत. माझ्या पदरचे काहीच लिहिले नाही.

### ६५, नववा अवतार बौद्ध

नववा अवतार बौद्ध, गौतम बौद्धाने मात्र वैदिकांची चांगलीच खोड मोंडली आहे. आर्यावर्त, भारतभूमीवर भारता बाहेरून येवून, आपले बस्तान बसवून हजारो प्रकारचे यज्ञ निर्माण करून, यज्ञात आहुती या नात्याने हजारो कोट्यावधी निरपराधी पशुबळी देऊन, महा पापाचरणांचा धुमाकूळ हजारो वर्ष वैदिकांनी घातला होता. तो महात्मा गौतम बुद्धाने बंद पाडला. या कार्याला जैनांनी थोडी मदत केली. शैव वीरशेव तर अगोदरपासून विरूद्ध होते. विश्व निर्माण झाल्यापासून भारत युद्धांतापर्यंत आर्यावर्त भारत भूमी पवित्र होती. ती भारतभूमी वैदिक आर्यांनी महापाप करून अपवित्र केली होती. त्या पापापासून भरतभूमीचा उद्धार बुद्धाने केला. धन्य तो महात्मा गौतम बुद्ध पौराणिकांच्या दशावतारांचा विचार केला ( दहावा अवतार व्हायचा आहे. )

### ६६. वैदिक पौराणिकांचे कल्पना चातुर्य

आता थोडा पौराणिकांच्या कल्पना चातुर्यांचा विचार करू. दशावतार पौराणिकांनी आपल्या कल्पनेने निर्माण करून, प्रत्येक अवतारी देवाकडून आपल्या स्वार्थापुरते काम करून, घेऊन, त्या त्या देवाला महापाप करायला लावून अधोगतीला घातले आहे. अशा आठ अवतारी देवाला अधोगतीला घातले आहे. नवव्या अवताराने

(बुद्धाने) मात्र पौराणिकांचा मोठा घात करून, भारत भूमीला पापमुक्त केले होते. आता राहिलेला दहावा अवतार कलंकी पौराणि-कला बुद्धांसारखा फसवितो का, पौराणिकाला सहकार करतो ते कोणालाही सांगता येणार नाही.

६७. वैदिक पौराणीकाच्या शिवाचे चरित्र

पौराणिकांच्या मुख्य तीन देवांपैकी दोघांना विचार आपण केला आता त्यांचा तिसरा देव महेश (शंर) याचा विचार करू.

शंकराला सर्वात मोठा मान आहे. हा. पौराणिकांचा शंकर वैष्णव आहे. (विश्णूची उपासना करतो.) शंकर जसा वैष्णव आहे. तसा विष्णु शैव आहे. पौराणिकांच्याच (शंकराची) उपासना करतो. शंकर अखंड तपश्चर्यमग्न असतो. त्याला रहावयाला अंतराळांत असलेले कैलास दिले आहे. तो भोळा आहे. थोडयाश्या तपाने तो प्रसन्न होतो. तो जसा सर्वात मोठा आहे. तसाच तो सामर्थ्यवान आहे.

अशा या शिवा विषयी उत्तर ध्रुवीय वैदिक आर्य (पौराणिक हिंदू) यांनी आपल्या कल्पनेतून निर्माण केलेल्या या शिवाचे चरित्र भारतीय आर्यांच्या वेदांत समाविष्ट केलेला प्रकार

डॉ. सिद्धेश्वर शास्त्री चित्राव यांनी लिहिलेल्या वैदिक सूक्त पाठ नावाच्या ग्रंथात शिवसूक्ते या प्रकरणात वेदपुराणादि ग्रंथाधारे लिहि-लेला प्रकार खालील प्रमाणे आहे.

६८. वेदात शिवाचे रौद्र आणि शांत अशी दोन रूपे आहेत.

पान क्र. ३७ ऋग्वेदात शिवाच्या रौद्र (रुद्र) आणि शांत (शिव) रूपाचे निर्देश असून या ग्रंथमते हिंस्त्र पशूसदृश, भयंकर आणि विनाशक असा रुद्र (ऋ. २/३३) स्वतःच्या प्रभावी शस्त्रांनी गायीचा आणि मनुष्याचा वध करीत असे. (ऋग्वेद १/११४/१०) म्हणूनच भक्तजन त्याचा क्रोध शांत होण्यासाठी तसेच स्वतःच्या आणि स्वतःचे पितर, संतान, अश्व आदिच्या रक्षणासाठी प्रार्थना करीत असतात. (ऋ. १/१११४) क्रुद्ध झाल्यानंतर दानवाप्रमाणे सर्व संहार करणारा रुद्र प्रसन्न होताच भक्त कल्याणासाठी पशू रक्षण करित असे. या गुण समुच्चयामुळेच त्यास शिव (ऋ १०/९२/९) आणि पशुपत

(ऋ १/११४/९) नावे प्राप्त झाली.

ऋग्वेदमते श्रेष्ठ भिषग्वर असणारा शांत स्वरूपी शिव (ऋ २/३३/४) भक्त जनाच्या पुत्र पौत्रादिकांना व्याधिमुक्त करित असे. (ऋ. ७/४६/२) त्याच्या संग्रहीच्या संहस्त्रावधी औषधीमुळे (ऋ ७/४६/३) त्यास जलाष (व्याधिनाश) आणि जलाषभेषज (दिव्यऔषधीयुक्त) उपाधी प्राप्त झाल्या. (ऋ १/१४४/९)

यावरून शिवाची द्विविध रूपे ऋग्वेद कालापासून सुविख्यात असून त्यात ब्राह्मण काली सुस्पष्ट रूप देण्यात आले असावे.

**६९. अनार्यांची देवता शिव आणि रुद्र यांचे चरित्र आणि अवतार**

शिव हा अनार्याधिपती असल्याचा प्राचिनतम निर्देश तैतिरीय संहितेमध्ये असून या ग्रंथमते मेघ सदृश, पर्वत निवासी (गिरीश, गिरीत्र) रुद्र – शिव जंगलाचा आणि तत्रस्थ पशू, चोर, डाकू अंत्यज आदिचा राजा होता. यज्ञ विध्वंसक अर्थाने यांस मखघ्न असेही म्हणत असून (तै. सं. ३/२/४) (तै. ब्रा. ३/२/८/३) दक्ष यज्ञ विध्वंसाचा निर्देश येथे अभिप्रेत असावा (पान क्र. ३८) तामसी रूप.

शैव सांप्रदायाचे रुद्र, संज्ञक कृष्णवर्णीय आणि तामसी शिव, काली नामक स्वपत्नीसह अंगास चिताभस्म चोपडून आणि साप, प्रेते आणि कवटचाचे अलंकार धारण करून स्मशानातील प्रेत शरीरावर तांडव नृत्य करतो. स्मशानातील धगधगत्या चितांच्या प्रकाशात मानवी कवटचाच्या डमरुच्या तालावरील या नृत्य प्रसंगी राक्षस, पिशाच्च आणि अस्थिपंजर प्रेते रुद्रगण बणून सहभागी होतात. नृत्य समाप्तीनंतर रुद्र स्वगणासमवेत प्रेत शरीरावरील मांस तसेच कपालातून (कवटचांचे पात्र) मानवी रुधिर सेवन करतो.

रुद्राचे हे महाभयानक रौद्ररुप, शांत सात्विक आणि प्रसन्न शिवाचे प्रतीरूप असल्याची भक्तांना खात्री असल्याने त्याचे भय त्यांस वाटत नाही. पान क्र. ३८ शांत रूप.

शैव सांप्रदाय मते समस्त देवाचा अधिपती असणारा शांत स्वरुपी शिव देवी पार्वती स्वरुपी स्वपत्नी समवेत कैलास पर्वतावर निवास करतो. भक्त प्रतिपालन आणि दैत्यराक्षसाचे निर्दालन हे त्याचे

प्रमुख गुण वैशिष्ट्य असून त्यासाठी देव देवता आणि ऋषीमुनी त्याची पूजा करतात शिवाचे कौटुंबिक जीवन प्रसन्न आणि आल्हाद-दायक असून शिव – पार्वती प्रणय क्रिडा आणि बुद्धीबळाचा डाव हे त्याचेच द्योतक आहे.

(पान क्र. ४२) शिवाची विभिन्न रूपे.

वाजसनेय संहितेत शिवाची निम्न लिखित नामांतरे आढळतात.

१) पार्वन (जटाधारी) २) शर्व (धनुष्यधारी)
३) भव (चराचर सृष्टीव्यापी) ४) शंभु (सृष्टी कल्याणकारक)
५) शिव (पवित्र) ६) कृत्तिवसन (पशूचर्मधारी)

वा. सं. ३/६१ – (१६।५१)

७०. सप्तरुद्र

अथर्ववेदांत (वेदमंत्र क्रमांक दिला नाही) रुद्राच्या इशान, भव, शर्व, पशुपति, उग्र, रुद्र आणि महादेव या सात नामांतराचा स्वतंत्र देवता म्हणून निर्देश आढळतो. शतपथ ब्रह्मणांत अष्ट रुद्राचा निर्देश असून तेथे अशनि (उल्कापात) हे एक नांव नवे आढळते. या नामांतरा पैकी रुद्र शर्व, उग्र अशनि ही नांवे शिवाच्या जगत् संहारक रूपाची आणि भव पशुपति महादेव आणि ईशान ही नांवे त्याच्या शांत आणि जगत् पालक रुपाची प्रतिकभूत आहेत. (श. ब्रा. ६:१।३।७) (कौ. ब्रा. ६।१।९) ही नामावली विष्णू मार्कंडेय, वायु आणि स्कंद पुराणांत पुनरुद्धत असून या अष्ट रुद्राची निवास स्थाने पत्नी आणि परिवार तेथे वर्णिली आहे.

७१. एकादश रुद्र

महाभारतात तसेच पौराणिक साहित्यात आद्यरुद्रापासून उत्पन्न झालेल्या एकादश ब्रह्ममानसपुत्राची रुद्रांची नामावली आढळत असून, शर्व, भव, कपालिन, पिनाकिन् या परंपरागत शिवनामासमवेतच दहन, ईश्वर, स्थाणु – मृगव्याध निऋति, अज, एकपाद, अहिर्बुध्न्य आदी अर्धवैदिक देवतांनाही तेथे शिवरूप मानले आहे. (म. आ. ५०/१/३)

७२. द्वादश रुद्र.

गृह्य सूत्र ग्रंथात शूलगव (गोरोमप्रतिहारक) यज्ञाच्या संदर्भात

द्वादश रुद्राचा संदेश असून त्यापैकी सात नांवे शतपथ ब्रह्मणांतील आणि हर, मृड्ड शिव, भीम आणि शंकर ही नांवे नवीन आहेत.

७३. (पा. क्र. ४३) शिवाचे अवतार

भक्त रक्षणासाठी तसेच शत्रू संहारासाठी विभिन्न कल्पामध्ये शिवानें धारण केलेल्या अवताराची माहिती पौराणिक साहित्यात असून या अवताराची संख्या ४, ५, १०, २८ अशा विभिन्न प्रकारे दिली आहे.

चार अवतार :– १) शिवमते शरभ (नृसिंहवधार्थं) २) मल्लारी (मणिमल्लवधार्थं) ३) दुर्वासस् (ब्रह्मा विष्णू आणि महेश या त्रिमूर्ती-मध्ये स्थित) ४) पंचशिख (त्रिपूर दाहा नंतर अवतीर्णं)

७४. पांच अवतार

शिवमते पांच प्रमुख शिवावतार १) सद्योजात २) अघोर ३) तत्पुरुष ४) ईशान ५) वामदेव (शिवशत १)

७५. दशावतार

शिवमते विष्णूच्या दशावतारासदृश शिवाचे दशावतार

१) महाकाल २) तार ३) भुवनेश ४) श्रीविद्येशं ५) भैरव ६) छिन्नमस्तक ७) भूमवत् ८) बगलामुख ९) मातंग १० ) कमल. – (शिवशत १७ )

७६. अठ्ठावीस अवतार

वायुमते वारह कल्पांतर्गत वर्तमान कल्पांच्या द्वापार युगातील व्यासाच्या सहाय्यार्थ धारण केलेले शिवाचे अठ्ठाविस माहेश्वरावतारः–

१) श्वेत; २) सुतार; ३) दमन; ४) सुहोत्र; ५) कंक; ६) लोकाक्षि; ७) जैगिषव्य; ८) दधिवाहन; ९) ऋषभ; १०) भृगु; ११) तप्; १२) अत्रि; १३) बली; १४) गौतम; १५) वेदशिरस्; १६) गोकर्ण; १७) गुहावासिन्; १८) शिखांडिन्; १९) जटमालिन्; २०) अट्टाहास; २१) दारूक; २२) लांगलिन् भीम; २३) श्वेत; २४) शूलिन्; २५) दंडिमुंडीश्वर; २६) सहिष्णू; २७) सोम; २८) लकुलिन् (वायु २३ शिव शत ४–५, शिव वायव ८–९ लिंग ७)

७७. शतावतार

याखेरीज भिन्न कल्पामध्ये उत्पन्न झालेल्या शिवाच्या शतावताराची तसेच त्याच्या पुत्रांची नामावली शिव पुराणात आढळते. (शिवशत्त ५)

७८. असा हा मुर्ख शिव महापापी राक्षला वर देतो.

असा हा शिव भक्ताला लवकर प्रसन्न होतो. भक्ताने सांगेल तो वर (आशीर्वाद) देतो. भक्ताला वररूपी सामर्थ्य मिळाले की, तो सर्व जगाला त्रास देतो. त्या त्रास देणाऱ्या भक्ताचे गाऱ्हाणे लोक शंकराला सांगतात. वरसामर्थ्याने त्रास देणाऱ्या भक्ताला शंकर समजावून सांगण्याचा प्रयत्न करतो. मग भक्त शंकरालाच त्रास द्यायला सुरू करतो. मग शंकर इकडे तिकडे पळू लागतो. हा सर्व प्रकार शंकराची बायको विष्णूला सांगते आणि विष्णू शंकराची सुटका करतो. अशा त्या भोळ्या शंकराला हजारो भक्ताने फसविले आहे. कांही भक्ताने त्याच्या बायकोला जबरदस्तीने पळवून नेण्याचा प्रयत्न केला आहे. एका रावण भक्ताने तर त्यानें मागितलेल्या वरात शंकराची बायको व आत्मलिंग मागून घेऊन पार्वतीला (शंकराच्या बायकोला) घेवून जावू लागला. वाटेत पार्वतीने विष्णूचा धावा केल्यावर विष्णूने कांही-तरी कपट कारस्थान करून पार्वतीला व आत्मलिंगाला सोडवून घेतले. भस्मासुराने तर शंकराला जाळून टाकण्याचा प्रयत्न केला होता. त्यावेळीही विष्णूने सोडविले. असे हजारो भक्तांनी फसवून शंकराला त्रास दिला आहे. आणि प्रत्येकवेळी काही तरी कपट कारस्थान करून विष्णूने सोडविले आहे. शंकर भोळा होता आणि विष्णू फारच चतुर होता. पौराणिकाने शंकराला कुटुंबी बनविले आहे.

७९. शंकराचे विचित्र कुटुंब

शंकराच्या कुटुंबाचा थोडा विचार करू. शंकराच्या कुटुंबात जगात कोठेच नाही असा विचित्रपणा, विसंगती विशेष प्रकारची आहे. स्वतः शंकराचा विचित्रपणा पाहू. शंकराला तीन डोळे, नेसायला वाघाचे कातडे, पांघरायला हत्तीचे कातडे, भूषणे विषारी साप आहेत. लग्नाची बायको पार्वती असून दुसरी स्त्री डोक्यावरच्या जटेत लपवून ठेवली होती. लपवून ठेवलेल्या बायकोबद्दल शंकर पार्वतीचे नेहमी भांडण होत होते. शंकराला दोन मुले होती. एकाला सहा तोंडे बारा हात

आणि बाकी शरीर एकच आहे. दुसरा मुलगा गणपती. गणपतीचे तोंड हत्तीचे आहे. बाकी शरीर माणसाचे आहे. शंकराचे वाहन बैल आहे. पार्वतीचे वाहन सिंह आहे. कार्तिकेयाचे वाहन मोर पक्षी आहे. गणपतीचे वाहन उंदीर आहे. उंदीर सापाचे भक्ष आहे. साप मोराचे भक्ष आहे. बैल सिंहाचे भक्ष्य आहे. असे हे विचित्र कुटुंब एका घरात एका गोठ्यात रहात होते.

शंकराला तिसरा एक मुलगा होता. त्याला शंकरानें आपल्या जटेतून निर्माण केला होता. त्याचे नाव वीरभद्र होते. तो जन्मल्या-बरोबर त्याला युद्धाला लावले. त्यानेही जन्मल्यावरोबर महासामर्थ्य-वान दक्ष राजाबरोबर लढाओी करून दक्षाला मारले. हे शक्य आहे का ? अशा विचित्र कुटुंबाचे नियंत्रण पार्वतीला करावे लागत होते, पार्वतीचे यामुळे फारच हाल होत होते. तिला बिचारीला आयुष्यभरात कधीच सुखाचा क्षण गेला नाही. शंकर कुटुंबाचा बाप असून तो घराकडे अजिबात बघत नव्हता. शंकराला आयुष्यभर भक्तांनी सुख लाभू दिलं नाही. तसेच पार्वतीला विचित्र कुटुंबाचा सांभाळ करणे महाकष्टाचे काम करीत आयुष्यभर त्रास भोगावा लागला आहे.

**८०. कोट्यावधी पशू खाणारा तसेच कोट्यावधी बायका करणारा शंकराचा अवतार खंडोबा**

महाराष्ट्रात पुणे जिल्ह्यात पुरंधर तालुक्यांत कसबे जेजुरी गावात उंच गडावर खंडोबा नावाचा देव आहे. खंडोबाचे मंदिर गावच्या शेजारी उंच टेकडीवर आहे. देऊळ वाडा मोठा आणि भव्य आहे. देऊळ वाड्यात खंडोबाच्या भक्तांची काही मंदिरे आहेत. प्रथम पायरी पासून देऊळवाड्यापर्यन्त मोठमोठ्या कमानी आहेत. हजारो दिपमाळा आहेत. गावातून येण्याजाण्याचे दोन रस्ते आहेत. ते दिपमाळेमुळे फारच सुंदर दिसतात. हे दोन मार्ग सोडून दुसरे दोन मार्ग आहेत. त्याही मार्गात तुटक फाटक चिरेबंदी पायऱ्या आहेत. चालू कालात गडावर पाण्याची व विजेच्या दिव्यांची उत्तम सोय आहे. गडाच्या आजूबाजूला छोट्या छोट्या बागा लावल्या आहेत. हा सर्व प्रकार भक्ताला फारच मोहून टाकतो. अशा या सुरम्य परिसरांतील गडावर खंडोबाचे मंदिर आहे. हे मंदिर अहिल्याबाई होळकर यांनी बांधले आहे.

अहिल्याबाईने गडाच्याखाली गावाला लागूनच एक शिव मंदीर बांधले आहे. गडावरील खंडोबाला व खालच्या शिवमंदिराला दररोजच्या पुजा नैवद्याकरिता इनामी जमीन आहे. ही सर्व व्यवस्था पाहणे करीता अहिल्याबाईचा एक प्रतिनिधी कायमचा जेजुरीला असतो. या गडावरील मंदिराच्या अगोदर खंडोबा ह्या देवळापासून दोन मैल अंतरावर रहात होता. त्या स्थानाला कडेपठार म्हणतात. तेथेही चिरे-बंदी देऊळ व देऊळवाडा आहे. दीपमाळाही पुष्कळ आहेत. हे ठिकाण नयनरम्य आहे. प्रत्येक भक्त कडेपठारच्या खंडोबाच्या दर्शनाला जातोच असा हा खंडोबा महाराष्ट्रातला मुख्य देव आहे. त्याची शाखा मंदीरे महाराष्ट्रात हजारो आहेत. तशीच कर्नाटकात बिदर जिल्हयात मैलार नावाचे गाव आहे. गावा शेजारी डोंगर दरीत खंडोबाचे मंदिर आहे. हे गाव मात्र ओसाड पडले आहे. एकही माणूस रहात नाही. स्थान मात्र जेजुरी पेक्षाही सुरम्य आहे. कर्नाटकातील खंडोबाचे भक्त धनगर, महार समाजातील संपूर्ण लोक आहेत. इतर समाजात त्याला विशेष स्थान नाही. परंतु महाराष्ट्रातील खंडोबाचे भक्त मात्र महाराष्ट्रातील नव्वद टक्के बहुजन समाजाचे ब्राह्मणासह कुळदैवत आहे. आता खंडोबाच्या देवाचा पुढचा प्रकार पाहू. पौराणिकाने पुराण कालांनंतर निर्माण केलेले हे देव ऐहीक ( प्रपंचातील) सुखे देणारे आहेत.

८१. खंडोबा नवसाला पावतो.

खंडोबाला त्याचे भक्त नवस बोलतात. प्रपंचातील सर्व सुखे मागून घेतात आणि खंडोबा देव देतोही. या नवसात विशेष आणि महत्त्वाचे नवस मुले मागून घेणे कोणाला मूल होत नसेल व कोणाचे मूल जगत नसेल तर खंडोबाला नवस बोलतात. हे खंडोबा मला मूल दे अथवा मुलगी दे. मला प्रथम मुलगी, मुलगा होईल ते तुला अर्पण करीन. आणि अशाही नवसाला खंडोबा पावतो. व नवस केलेल्या भक्ताला मुले होतात. मुलगी असली तर तिचे खंडोबा बरोबर लग्न लावून त्याला अर्पण करतात, आणि आपल्या मुलीचे चांगले झाले, देव नवरा मिळाला आणि आपल्याला देव जावई झाला असे मानतात. खंडोबाच्या लग्नाचा सोहळा-खंडोबाच्या मंदिरात यथाविधी नवरा-

नवसीला मुंडावळचा बांधून, बाशिंगे बांधून, अंतरपाट धरून, मंगलाष्टके म्हणून ब्राह्मण लग्न लावतात. लग्नाला वऱ्हाड पुष्कळ लोक येतात. मुख्य खंडोबाचे भक्त वाघे आणि त्यांच्या अगोदरच्या बायका (मुरळचा) बहुसंख्येने येतात. काही गावातील मंडळी येतात. आणि दक्षिणा मिळते म्हणून ब्राह्मण मंडळीही येतात. हा सर्व विधी (लग्न) ब्राह्मणांच्या हस्ते केला जातो. या लग्नात भोजन मोठ्या प्रमाणात असते. तो सर्व मांसाहार असतो. नवस केलेल्या काही भक्तांना मुलगा झालेला असला तर त्याला खंडोबाला अर्पण करतात. त्याचाही विधी असतो. तो विधी ब्राह्मणांच्याच हस्ते केला जातो. त्या मुलाला वाघ्या बनवतात. त्याचे आई वडील असा विधी करून वाघ्या बनविलेल्या मुलांना घरी नेतात. परंतु मुलीला मात्र तिचे आई वडील आपल्या जावयाजवळ सोडून जातात. लग्न लागल्यापासून तिला मुरळी म्हणतात. तिचे आई वडील गेल्यानंतर तिच्या सवती म्हणजे खंडोबाच्या पहिल्या बायका तिला आश्रय देतात. आणि तिला त्यांच्या पतिव्रता धर्माची माहिती देतात आम्ही नवऱ्या बरोबर कसे वागतो आणि आयुष्यभर कसे जगतो हे ज्ञान देतात. व तिला आयुष्यभर कसे जगावे ते सर्व नववधूला (मुरळीला) शिकवतात. आणि त्या आपआपल्या कार्याला निघून जातात.

**८२. कोट्यावधी बायकांचा एकच नवरा खंडोबा तोही दगडाचा.**

ही बिचारी चालती बोलती जिवंत हाडामासांची स्त्री असते. आणि नवरा पाथरवटाने दगडाचा घडवून केलेला भक्तांनी त्याला मजबूत दगडाने बांधलेल्या देवळांत स्थापन करून कुलुपात बंदिस्त केलेला जिवंत नसलेला असतो. त्याच्या बरोबर पतीचे एकांतातील सुख मिळत नाही. म्हणून सवतीने शिकवलेल्या मार्गांचा अवलंब करून आपला जोडीदार एखादा वाघ्या मिळविते. वाघे काही लग्न केलेले असतात. काही लग्न न केलेले असतात. त्यात हिला जो आवडेल त्याला जोडीदार समजून त्याच्या बरोबर राहते.. वाघ्या बायका मुलांचा असला तर त्याच्या घरीच राहते. वाघ्याची लग्नाची बायको तिला चांगली वागणूक देते. कारण तिच्या कुटुंबाच्या पोषणाला मुरळीचा बराच हातभार लागतो. म्हणून ती मुरळीला चांगली वागणूक देते.

**८३. वाघ्यामुरळी (शंकर पार्वती) दोघे मिळून भक्तांचा उद्धार करीत भक्ताच्या दारोदार फिरतात.**

वाघ्या मुरळीची जोडी जमल्यावर ते दोघे भक्तांचा उद्धार करण्याकरिता घराबाहेर पडतात. त्यांचे जवळ (मुरळी) जवळ एक तुणतुणे नावाचे तंतुवाद्य असते. दुसरे दोन लहान घंटचा एकत्र जोडलेल्या एका हातात धरून वाजविता येतील अशी जोड घंटी असते. आणि वाघ्याजवळ एक डफ नावाचे हलगीच्या आकाराचे वाद्य असते व एक झेन्डा असतो. अशा वाद्याचे साह्याने त्यांनीच रचलेल्या खंडोबाच्या चरित्राचे वर्णन असलेले गाणे गात ते घरोघरी भीक मागत जातात. हे वाघ्या मुरळी ज्यांच्या अंगणात जातील त्या घरची घरधनीण व वाघ्या मुरळीची पूजा करून त्यांना दान घालते. कोणी खणानारळानी ओटी भरतात. कोणी पैसे दक्षणा म्हणून देतात. कोणी धान्य वगैरे देतात. असे ते भीक मागून जगतात. खंडोबाच्या भक्ताच्या घरी काही महत्त्वाचे मंगल कार्य झाल्यावर ते त्या कार्याची सांगता व खंडोबाच्या आशीर्वाद मिळावा म्हणून गोंधळ घालतात. त्या मंगल कार्याला भक्त आपले गणगोत मित्र यांना आपल्या घरी बोलावतो. वाघ्या मुरळीलाही बोलावतात. वाघ्या मुरळीची पूजा करतात. या कार्याला भोजनाचा प्रकार मांसाहारच असतो. बकरा कापून त्याचा स्वयंपाक करून खंडोबाला दाखवून सर्व मंडळी भोजन करतात. रात्रभर जागरण करतात, वाघ्या मुरळी डफ-तुणतुणीचे तालावर गाणी म्हणतात. काही गाण्यात कथा प्रसंग असतो. त्याला उत्तम गाण्याची जोड देवून भक्तांचे मनोरंजन करतात. असा हा गोंधळाचा कार्यक्रम वाघ्या मुरळीला भरपूर दक्षिणा, कपडेलत्ते, धान्य वगैरे मिळवून देतो. भक्त लोक खंडोबाप्रमाणे वाघ्याला शंकर मानतात.

**८४. वाघ्या मुरळी म्हणजे शंकर पार्वती आहेत.**

तसेच मुरळीला खंडोबाच्या बायकांप्रमाणे पार्वती मानतात. अशा प्रकारे खंडोबाच्या बायकोची जीवनयात्रा सुरू होते. मुरळीने एका वाघ्या बरोबरच आयुष्यभर रहावे असे नियमबंधन नाही. त्यांचे एकमेकांत बिनसले, तर मुरळी वाघ्याला सोडून दुसऱ्या वाघ्याजवळ राहते. असे तिच्या आयुष्यात किती तरी वाघे येतात जातात, असे या खंडोबा

देवाच्या बायकोला जगावे लागते. खंडोबाचे भक्त खंडोबाला शंकर आणि त्यांच्या बायकांना (मुरळयांना) पार्वती मानतात. त्यात तिला आनंद वाटतो. ती अगदी आयुष्यभर सुखाने जगते.

पोराणिकांनी निर्माण केलेल्या खंडोबाला खायला भरपूर मांस लागते. दर वर्षाला हजारो नवीन लग्नाच्या बायकाही लागतात. भक्तगण खंडोबा देवाची सर्व प्रकारची दर वर्षाला हजारो बायकासह इच्छा पुरवितात. पोराणिक वैदिक लोक खंडोबाला शंकराचा अवतार मानतात. पुराण कालातल्या देवांना पोराणिकांनी कसे अधोगतीला घातले ते वर्णन आपण मागे पाहिले आहे व पुराण काळानंतरच्या देवाला किती पापे करावयाला लावून त्यांनाही अधोगतीला घातले आहे. खंडोबा सारखे दुसरे देव लाखो जीवांना मारून खाणारे व हजारो बायकांचा उपयोग घेणारे देव पुष्कळ आहेत.

**८५. खंडोबा (शंकर) दर वर्षाला कोटयावधी बायका करतो.**

खंडोबा देवालाच जर विचारले की, तुला किती बायका आहेत, तर ते त्यालाही सांगता येणार नाही. कारण त्याला बोलता चालता येत नाही. तो दगडाचा आहे आणि भक्तांच्या बंदीवासात आहे. त्याला बायका किती असतील त्याचा विचार केला तर महाराष्ट्रात लहान मोठे हजारो तरी खंडोबा असतील. त्यात मोठे निम्मे असतील व लाहान निम्मे आसतील. मोठ्या देवाला प्रत्येकी दर वर्षाला कमीत-कमी दोनशे बायका तरी होत असतील आणि लहान खंडोबाला दर वर्षाला आपण पन्नासच धरू. दर वर्षाला लहान खंडोबाच्या पांच हजार पाचशे व मोठ्या खंडोबाच्या पाच लाख बायका होतात. मिळून एकंदर ५,०५००० पांचलाख पाच हजार बायका महाराष्ट्रातल्या खंडोबाला दर वर्षाला होतात. तितक्याच कर्नाटकातल्या खंडोबाच्या होतील. एकंदर महाराष्ट्र व कर्नाटक मिळून दहा लाख होतात. खंडोबाच्या बायका ही संख्या जास्त आहे असे वाटले तर महाराष्ट्र व कर्नाटक मिळून आपण अर्धी धरू. तीही जास्त वाटली तर चौथाई धरू. चौथाई धरली तर अडीच लाख दर वर्षाला २,५०,००० होतील. दर वर्षाला अडीच लाख खंडोबाच्या बायका होतात. त्या आपले जीवन कसे घालवतात हे आपण वर पाहिले आहे.

८६. खंडोबा (शंकराला) दररोज कोट्यावधी पशूचे मांस खायला लागते.

खंडोबाला जशा लाखो बायका लागतात तसेच त्याला आणि त्यांच्या भक्ताला निरपराधी लाखो पशूंचे मांस लागते. त्याकरिता दररोज या खंडोबाच्या नावाने होणारी पशूहत्या कोट्या वधी जीवांची होत आहे. केवढा भयंकर अत्याचार, केवढे मोंठे पाप, एका खंडोबाच्या नांवानें होंत आहे. खंडोबा सारखे अनेक देव आहेत. त्यांच्या नावानेही असेच महापाप होत आहे. वाचक मित्रांनो, या वैदिक हिंदूंनी खंडोबादि देव निर्माण करून केवढी पशूहत्या आणि मातृ देवतेची विटंबना असे महाभयंकर पाप करायला लावले आहे. लाखो कोट्या-वधी मातेला महाभयंकर पाप करायला लावले आहे. याचा विचार कोणी महापुरुष करतील का ? आणि या महापापातून कोट्यावधी मातेला मुक्त करतील कां ? या माता म्हणजे आदिमाता पार्वतीचीच अनंत रूपे आहेत. कारण खंडोबा शंकर आहे. त्याच्या बायका मुरळ्या पार्वती आहेत. असे सर्व खंडोबाचे भक्त मानतात. वैदिक पौराणिकांनी सर्वात मोठ्या देवाला आयुष्यभर सुख मिळू दिले नाही. आता पर्यन्त पौराणिकांच्या देवाचा विचार केला आता त्यांच्या बायकांच्या विचार करू.

८७. वैदिक पौराणिकांच्या देवाच्या बायका.

विष्णू अवतारी रामाच्या बायकोला आयुष्यभर सुख मिळाले नाही. कृष्णाच्या बायकोला रुक्मीणीला आयुष्यभर सुख मिळाले आहे. बाकीच्या विष्णू अवतारी मत्स्य, कूर्म, वराह, नारसिंहादि देवांना बायका होत्या का नव्हत्या त्यांचा उल्लेख पौराणिकांनी कोठेच केला नाही.

८८. ब्रह्मदेवाची बायको सावित्री

ब्रह्मदेवाच्या बायकोला मात्र आयुष्यभर फारच यातना भोगाव्या लागल्या आहेत. तिच्या पोटातून हे विचित्र प्रकारचे विश्व जन्मले आहे. विचार केल्यास हे सत्य वाटत नाही. स्त्रीच्या पोटातून मानव दानवादि. अनंत प्रकारच्या लहान मोठ्या शरीराचे पशुपक्षीआदि अनेक प्रकारचे, सरपटणारे साप वगैरे, लाहान मोठ्या नद्या, समुद्र,

आकाश, पृथ्वी आदि पंचमहाभूते, चंद्रसूर्यादि तारांगणे, लहान मोठे हिमालयादि पर्वत वगैरे असे विचित्र प्रकारचे विश्व ब्रह्मदेवाच्या बायकोच्या (सावित्रीच्या) पोटातून जन्मले आहे असे पुराणादि ग्रंथात अनेक कथा आहेत. असे विचित्र वर वर्णन केलेल्या प्रत्येक वस्तूला गर्भात धारण करून जन्म देता देता बिचाऱ्या सावित्रीचे आयुष्यभर किती हाल झाले असतील ते सर्व त्या देवीलाच ठाऊक, इतरांना काही समजणार नाही. अशी ही परिस्थिती ब्रह्मदेवाच्या बायकोची.

**८९. विष्णूची बायको लक्ष्मी (धन) सर्व जगाची भोग्य वस्तू**

विष्णूची बायको लक्ष्मी, पौराणिकांनी लक्ष्मीला सर्व जगाची भोग्य दासी बनविली आहे. लक्ष्मी म्हणजे पैसा, पैसा ही सर्व जगाची भोग्य वस्तू आहे. हे सर्वांना माहीत आहे. लक्ष्मी ही विष्णूची बायको आहे. हे ही सर्वांना माहीत आहे. लक्ष्मीने पहिल्या जन्मात मोठे पाप केले असेल म्हणून या जन्मात सर्व जगाची दासी झाली आहे. आता या जन्मातही ती काही थोडे पुण्य करते आणि लोकांना सुखी ठेवून त्यांचा आशीर्वाद घेते, आणि पुष्कळ लोकांना दुःख देऊन पाप करते. पौराणिकांनी लक्ष्मीला असे हीन दर्जाचे काम करावयाला लावून तिची दुर्दशा केली आहे.

**९१. कोटयावधी पशू खाणारी तसेच महा अत्याचारी शंकराची बायको पार्वतीची उपासना**

शंकराची बायको पार्वती, जगात जेवढ्या स्त्रीरूपी देवी आहेत, त्या सर्व पार्वती, महादुर्गा, काली, मरीआई, पोचम्मा आदि अनंत नावांने अनंत रूपाने असलेल्या सर्व देवी पार्वती आहे. किती नावाच्या किती देवी आहेत या सर्वांची नावे लिहिली तर फार मोठा ग्रंथ होईल. पार्वतीला महान पाप करावयाला लावून पौराणिकांनी अधोगतीला घातले आहे. पार्वती हिमालय पर्वताची मुलगी आहे.

शंकराच्या बायकोचे (देवीचे) उपासक व त्यांच्या उपासनेचे प्रकार पाहू.

मद्यं मांसं च मीनं च मुद्रा मैथुनमेव च । एते पंचमकराः स्युर्मोक्षदाहि युगेयुगे ॥ कालीतंत्रादिक ॥ प्रवृत्ते भैरवीचक्रे सर्वे वर्णा द्विजातयः । निवृत्ते भैरवी चक्रे सर्वेवर्णाः पृथक् पृथक् । कुलार्णव तंत्र ॥

पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा यावत्पतति भूतले। पुनरुत्थाय वैपीत्वा पुनर्जन्म न विद्यते ॥ महानिर्माण तंत्र ॥ मात्रयोनि परित्यज्य विहरेत्सर्व योनिषु। वेदशास्त्र पुराणानि सामान्य गणिकाइव ॥ एकैव शाम्भवी मुद्रा गुप्ता कुलवधूरिव ॥ ज्ञानं संकलनी तंत्र.

वैदिक आर्य हिंदूच्या देवी उपासकांचे उपासना प्रकार पहा, देवी उपासकाला शाक्त म्हणतात. अतिनिंद्य दुराचरण या देवी उपासकाने उत्तम मानले आहे. मद्य मांस मीन मुद्रा व मैथुन हे पाच प्रकार सर्व युगांत मोक्ष देणारे असतात, हा यांचा पहिला सिद्धांत आहे. दारु पिणे, मांस खाणे, जन्मदाती आई सोडून वाकी सर्व नात्याच्या मुलगी, वहीण, मावशी, मामी, कांकी वयाने लहान मोठी सर्व स्त्रिया पार्वती आहेत व सर्व पुरुष शंकर आहेत असे समजून

अहं भैरव स्त्वं भैरवी ह्यावयोरस्तु संगमः या मनःकल्पित सूत्राधारे पाहिजे त्या पुरुषा बरोबर व पाहिजे. त्या स्त्री बरोबर समागम करणे फार पवित्र मानतात.

रजस्वला पुष्करं तीर्थं, चांडाली तु स्वयं काशी, चर्मकारी प्रयागः, स्याद्रजकी मथुरा मता। अयोध्या पुष्करसी प्रोक्ता। रुद्रयमाल तंत्र।

रजस्वलेशी समागम केल्याने पुष्कर तीर्थात स्नान केल्याप्रमाणे, चांडाळीशी समागम केल्याने काशी यात्रेचे पुण्य मिळते. चांभारणीशी संग केल्याने प्रयाग स्नान घडते. धोबिणीशी संगत केल्याने मथुरा यात्रा केल्या सारखे होते व करंजीशी समागम केल्याने अयोध्येच्या शरयु तीर्थात स्नान केल्याचे पुण्य संपादन होते. अशाप्रकारे वैदिक आर्यांनी देवी उपासंका करिता हजारो तंत्र ग्रंथ लिहिले आहेत.

आपली परिभाषा समजू नये म्हणून त्यांनी निराळी सांकेतिक भाषा निर्माण केली आहे. दारूला शुद्धी, किंवा पुष्प, माशाला तृतीया, मुद्रेला चतुर्थी व मैथुनाला पंचमी अशी सांकेतिक भाषा ( खुणा ) निर्माण केली आहे. ही नावे उच्चारून आपले कार्य करतात. दुसऱ्याला अजिबात कळू देत नाहीत.

भैरवी चक्र या नावाचा यांचा एक सर्वश्रेष्ठ प्रकार आहे. जेव्हा भैरवी चक्र सुरू होते तेव्हा ब्राह्मणांपासून तो चांडाळापर्यंन्त सर्व लोक द्विज होतात व जेव्हा भैरवी चक्र बंद होते तेव्हा सर्व वर्ण

वेगवेगळ्या वर्णानें युक्त होतात. हे लोक जमिनीवर किंवा कापडावर बिंदू, त्रिकोण, चतुष्कोण किंवा वर्तुळ आशा आकृत्या काढून त्यावर दारूने भरलेली घागर ठेऊन तिची पूजा करतात व ( ब्रह्मशापं विमोचय ) हे मद्याब्रह्मादिकांच्या शापापासून मुक्त हो. हा मंत्र म्हणतात. याचे नाव भैरवी चक्र आहे. ही सर्व स्त्री पुरुष मंडळी एका, गुप्त ठिकाणी जाऊन भैरवीचक्र सुरू करतात. यांच्याशिवाय दुसऱ्या कोणालाही त्या कार्यात घेत नाहीत. त्या गुप्त जागेत स्त्री पुरुष दोन भागात बसतात. एका पुरुषाला नागवा करून त्याला मध्यभागीं बसवून त्याची पूजा करतात. दारूने भरलेले एक पात्र हातात घेवून त्यांच्यातील एक मोठा आचार्य मोठ्याने म्हणतो की, (शिवो ऽहम् भैरवोऽहम् ) मी शिव आहे मी भैरव आहे. अशी मोठ्याने गर्जना केल्यावर त्या एकाच पात्राने सर्व स्त्री पुरुष दारू पितात. तसेच एकाच पात्रात ठेवलेले मांस खातात. मद्य मांसाचे भरपूर सेवन झाल्यावर त्या नशेमध्ये एका स्त्रीला नागवी करून व एका पुरुषाला नागवा करून, पुरुषाच्या हातात एक तलवार देऊन, त्या जोडप्याला शंकर पार्वतीची जोडी मानून त्यांच्या गुप्त इंद्रियांची सर्व मिळून पूजा करून, नंतर त्यांना मद्य पाजून त्यांच्या उष्टया पात्रांनेच सर्व स्त्री पुरुष पितात. पुन्हा पुन्हा भरपूर दारू पिऊन ते सर्व स्त्री पुरुष नागवे होतात. आणि त्यांचे समुहिक मैथुन सुरू होते. त्या ठिकाणी कन्या बहीण आई हे नाते अजिबात निषिद्ध मानीत नाहीत. फक्त स्त्री पुरुष एवढाच भेद तेथे असतो. अति दारू प्याल्याने ओकारी झाल्यास त्या ओकलेल्या ओकारीस फारच पवित्र मानतात. व लगेच खावून टाकतात. अशा वमन भक्षकांना सिद्ध पुरूष मानतात. सिद्ध पुरुषाला पुढीलप्रमाणे गुण असावे लागतात.

हालां पिबति दीक्षितस्य मंदिरेसुप्तो । निशायां गणिका गृहेषु । विराजते कौलवचक्रवर्ती ।

कलालाच्या घरी जाऊन बाटल्यावर बाटल्या पिऊन वेश्येच्या घरी जाऊन अत्यंत कुकर्म करतो. ही कुकर्मं, करताना बिलकुल लाजत नाही. तो त्याच्यामध्ये चक्रवर्ती राजा प्रमाणे पूज्य मानतात व सिद्ध मानला जातो. अशा दुराचाऱ्याला फारच मोठा मानतात.

पाशबद्धो भवेज्जीव : पाशमुक्त: सदाशिवः ।। ज्ञान संकलनी तंत्र ।। ४३ ।।

यांच्या तंत्रामध्ये बद्ध व मुक्ताची अशी व्याख्या केली आहे की लोक लज्जा, कुल लज्जा, देशलज्जा अशा पाशांनी जो बद्ध असेल त्याला पापीजीव म्हणतात आणि सर्व लज्जा सोडून दुराचार करतो त्याला सदाशिव मानतात.

उड्डीस तंत्रामध्ये एक प्रयोग लिहिला आहे, की ज्याला मोक्ष मिळावा असे वाटते, त्याने अखंड दारू प्यावी म्हणजे मोक्ष मिळतो. या लोकात सहा महाविद्या प्रसिद्ध आहेत. त्यापैकी मातंगी विद्यानुयायी जे लोक आहेत ते (मातरमपि न त्यजेत्) म्हणजे आओशीही समागम करणे सोडू नये असे मानतात. हे लोक अशा अनैतिक समागमाच्यावेळी सिद्धी प्राप्ती साठी विशिष्ट मंत्र जप करीत असतात. वेद शास्त्र पुराणादि ग्रंथाला वेश्याप्रमाणे मानतात. या पापी लोकांचा हा प्रकार हजारो वर्षे चालला होता. काही कालांतराने आपोआपच बंद पडला. निरनिराळ्या प्रकारात अजून भारतात चहूकडे चालू आहे. हा सर्व प्रकार अंधश्रद्धेच्या लोकांना व वैदिक आर्यांना (देवी उपासकाला) फारच महत्त्वाचा वाटतो. तसेच हे सर्व पाप नसून याने मोक्ष मिळतो असे मानतात.

वैदिक आर्यांच्या ह्या पापाचरणाने मोक्ष मिळेल का ? अशा महाभयंकर पापाला पुण्य आहे असे भासवून वैदिक आर्य ब्राह्मण पापाचरण करायला लावतात. या पाप कर्मांचे फल मोक्ष देणारी शंकराची बायको पार्वती (आदिमायाशक्ती) आहे.

अशा या महापाप रुपी उपासनेने देवी प्रसन्न होऊन मोक्ष देईल का ? परंतु या देवी भक्ताला त्यांच्या सिद्धांताचा मोक्ष मिळत असेल. त्यांचे सिद्धांत पुण्यालाच ते पाप समजतात. आगम निगम, पुराण, उपनिषदादि ग्रंथाला ते वेश्येप्रमाणे मानतात. आणि त्यांनी निर्माण केलेल्या तंत्र ग्रंथाला ते पतिव्रते प्रमाणे मानतात, त्यांच्या या सिद्धांतानुसार त्यांचा नरक म्हणजे मोक्ष आणि मोक्ष म्हणजे नरक. नरकाला जाणे म्हणजेच मोक्षाला जाणे. वाचक मित्रांनो, वैदिक आर्य हिंदूंनी निर्माण केलेले हे देव देवी वरील प्रकारच्या उपासनेने प्रसन्न होऊन

त्यांना पाहिजे ती ऐहिक सुखे देतात हे खरे असेल. मोक्ष मात्र देत नाहीत. मोक्ष देणारा फक्त एकच देव आहे. ज्याने विश्व निर्माण केले आहे तो. यांच्या वरील प्रकाराधाराने विचार केल्यावर मोक्ष देणाऱ्या देवाला हे देव न मानता पिशाच्च मानतात व अैहीक सुखे देणारे यांनीच निर्माण केलेल्या देव देवीला मोक्ष देणारे देव मानतात.

वाचक मित्रांनो, अशा अत्याचारी उपासनेने मोक्ष मिळेल का ? उत्तर नाही असे आहे. या देवी उपासकांचा देव अशा अत्याचारी उपासनेने प्रसन्न होऊन देवी आपल्या भक्ताला मोक्ष देत असेल का, आणि त्या देवतेत मोक्ष देण्याइतके सामर्थ्य असेल का ? मोक्ष कशाला म्हणतात, ते तरी त्या देवतेला माहित असेल का ? प्रश्न तीन आहेत पण उत्तर मात्र एकच आहे. उत्तर नाही असे आहे.

हा वर वर्णन केलेला देवी उपासनेचा प्रकार गुप्तपणे करतात, आता उघडपणे होणाऱ्या देवी उपासनेचा विचार करू.

**९२. अनंत रुपी पार्वती देवीला दररोज कोटयावधी पशूंचे मास खायला लागते.**

संपूर्ण भारतात पाच लाख खेडे आहेत. प्रत्येक खेडयात एक श्रेष्ठ (मोठया) देवीचे मंदीर असतेच आणि मरीआइ पोचमा ह्या दोन रुद्र देवी असतात. प्रत्येक खेडयात तीन देवी असतातच, श्रेष्ठ देवीची जत्रा वर्षातून तीन चार वेळा भरते. जत्रेच्या वेळी खेडे गावातील मोठया देवीला कमीत कमी पांचशे तरी पशु बळी दिले जातात आणि एरवी दररोज कमीत कमी दहा पंधरा तरी बळी दिले जात असतील याशिवाय दर वर्षातील आषाढ महिन्याच्या पहिल्या अवस्थेला व शेवटच्या अमावस्येला या तिन्ही देवांना फारच पशुबळी दिले जातात. हे दोन दिवस देवीचा उत्सवच असतो. जत्रेतील उत्सवातील अे-हवीची गोंधळादि मंगल प्रसंगी अशा चार प्रकाराने देवींना पशु बळी देतात.

हा वरील प्रकार खेडयातील भक्तगण करतात. कसबे गांवातील मध्यम शहरातील मोठया देवीच्या नावाने पशुबळी दिल्याचा विचार केल्यावर दररोज कोटयवधी पशुबळी देवी पार्वतीच्या नावाने दिले जातात. अशा हिंसाचारी उपासनेने मानवाचे कल्याण होइल कां.

वैदिक आर्यांनी निर्माण केलेलें सर्व देव देवींमध्ये शंकर आणि पार्वती या दोघा पतीपत्नी इतके महापाप कहेण्याही देव देवीला करायला लावले नाही. अशा या महापाप करविणाऱ्या देव देवींची मानवाला उपासना करायला लावून हेच पुण्य आहे. या पुण्याने मोक्ष मिळतो. स्वर्गादि सर्वश्रेष्ठ सुखे मिळतात. असा वैदीक हिंदु धर्मातील पंडीत महापंडीत आणि पुरोहित वर्ग उपदेश करून मांनवाला नरकाला घालण्याचा प्रयत्न करतात.

९३. आकाशातील सूर्याचा परिवार

सूर्याला प्रथम तीन वायका होत्या, त्यातील संज्ञा नांवाच्या बायकोपासून वैवस्वत मनु आणि यम असे मुलगे व यमी नावाची एक मुलगी झाली. काही काळाने संज्ञेला सूर्यांचे तेज सहन न झाल्याने तिने आपल्या स्वशरीरापासून छाया (सवर्णा) नावाची स्त्री तयार करून तिला सूर्यांच्या सेवेला ठेवून आपण तपश्चर्येला गेली. सूर्याला छायेपासून सावर्णीमनु (श्रुतश्रवस्) आणि शनि (श्रुतकर्मन्) नावाचे दोन मुलगे व तपती नावाची एक मुलगी झाली. कालांतराने छायेचा त्याग करून सूर्य पुन्हा संज्ञेकडे गेला. तिच्या पासून पुन्हा दस्त्र आणि नासत्य नावचे अश्वीनीकुमार आणि रेवंत नावाचे तीन मुलगे झाले. सूर्याला एकंदर छायेसह दोन बायका होत्या. छायेपासून दोन मुलगे आणि एक मुलगी, संज्ञेपासून पाच मुलगे एक मुलगी असे सात मुलगे दोन मुली होत्या अशी नऊ मुले सूर्याला होती हे सर्व सत्य असेल का ?

९४. हिमालय पर्वताचे चरित्र

जगातील सर्वात उंच असलेल्या हिमालय नावाच्या पर्वताला मेनका नावाची बायको होती. तीला पार्वती नावाची एक मुलगी होती हिमालयाने ती मुलगी शंकराला देऊन तिचे लग्न केले, त्या लग्नाला तेहतिस कोटी देव, उपदेव, कोट्यावधी पिशाच्च, चंद्र, सूर्य आंतराळातील सर्व देव (चंद्रासह तारे) व्यास नारदादी ८८ हजार ऋषी आदि त्रिभुवनातील सर्व लोक आपापल्या परिवारासह आले होते. लग्न समारंभ सोहळा आनंदाने पार पडला. आणि पौराणिक हिंदुचा सर्वात मोठा देव महादेव (शंकर) हिमालय पर्वताचा जावई झाला. महेश ज्याप्रमाणे वैदिक हिंदुच्या कल्पनेतील आहे. त्याप्रमाणेच त्याची वायको पार्वतीही

कल्पनेतील आहे. हिमालय पर्वत आहे. हे सर्व जगाला माहित आहे. त्याला बायको होती तीही पर्वतच असेल. आणि मुलगी मानव स्त्री असेल का ? हे सारे खरे आहे का ?

९५. देवगुरु ब्रहस्पती आणि चंद्र यांचे चरित्र्य.

ब्रह्मा, विष्णु, महेशासह सर्व देवाचा गुरू ब्रहस्पती होता. त्याची बायको स्वरुप सुंदर देखणी होती, एकदा चंद्र ब्रहस्पतीच्या घरी गेला होता, त्याच्या बायकोला पाहून चंद्र काममोहीत झाला. त्याने आपल्या गुरु पत्नीला पळवून नेले. आणि आपल्या घरात ठेवली. चंद्राला लग्नाच्या बायका बऱ्याच होत्या. त्या सर्व बायका पेक्षा देव गुरुची बायको फारच देखणी होती म्हणून चंद्राने तीला पळवून नेले. आणि तिचा उपभोग कित्येक वर्षे घेत होता, या दरम्यानच्या काळात देव गुरु ब्रहस्पती चंद्राकडे जाऊन माझी बायको मला परत दे म्हणून कित्येक वेळा कित्येक वर्षं मागत होता. परंतु चंद्राने दिली नाही. शेवटी दोघाचे भांडण झाले. त्या भांडणात चंद्राने देव गुरुला सांगितले की, गुरुदेव तुम्ही आपल्या बायकोचा नाद सोडून आपल्या घरी जाऊन गप्प बसा. नाहीतर माझ्याबरोबर युद्ध करून मला जिंकून आपली बायको घेऊन जा.

चंद्राचे हे बोलणे ऐकून देवगुरुला वाईट वाटले आणि क्रोध-युक्त होऊन तो इंद्राकडे गेला. इंद्राने त्याचे स्वागत केले आणि क्षेमकुशल विचारले देवगुरुने आपली पवित्र आणि करूण कहाणी इंद्राला सांगितली. ते सर्व ऐकून देव गुरुला आश्वासन देऊन चंद्राकडे एक दुत पाठवून चंद्राला सांगितले की, गुरुपत्नीला सामोपचाराने परत देऊन टाक नाहीतर तुझ्या बरोबर युद्ध करून गुरुपत्नीचा उद्धार करावा लागेल. हे इंद्राचे आव्हान एकूण चंद्र कोपायमान झाला. आणि त्याच दुताबरोबर सांगितले की, इंद्राला माझ्या बरोबर युद्ध करण्याची धमक असेल तर युद्ध करूनच गुरुपत्नीला घेऊन जा. इंद्राच्या दुताने चंद्राची हकिकत इंद्राला सांगितली. ही युद्धाची वार्ता एकूण सर्व देव एके ठिकाणी येऊन चंद्राला अनेक तऱ्हेचा सदुपदेश करुन त्याची समजूत करून त्याच्याकडून गुरुपत्नीला द्यायला लावले. चंद्राने ती देवगुरुला परत देताना सांगितले की हिच्या पोटात माझा गर्भ वाढती आहे. तो

जन्मल्यानंतर माझा मला मिळाला पाहिजे.

ब्रह्मा, विष्णू, महेश, इंद्र, चंद्र, कुबेरादि तेहतीस कोटी देवाचे परम पुज्य गुरु ब्रहस्पतीने आपली बायको परपुरुषाने पळवून नेऊन कित्येक वर्ष उपभोगलेली, त्या पुरुषाचा गर्भ तिच्या पोटात असलेली, अशानिंद्य कर्मानें भ्रस्ट झालेली स्त्री आपल्या घरी घेऊन गेला. स्वगृही आल्यावर गुरुपत्नी प्रसूत झाली तिला मुलगा झाला.

गुरु पत्नीला मुलगा झाला ते चंद्राला समजले तेव्हा चंद्र देवगुरुकडे जाऊन मुलगा माझा आहे. तो मला देऊन टाक. देवगुरु म्हणाले की, हा मुलगा माझ्या पासून माझ्या बायकोच्या पोटी जन्मला आहे. त्याच्यावर तुझा हक्क नाही. आणि मी तुला देणार नाही. यावेळी ही दोघांचे भांडण विकोपाला गेले. यावेळीही सर्व देवांनी सांगून दोघांचे भांडण मिटवण्याचा प्रयत्न केला. परंतु दोघेही ऐकायला तयार झाले नाहीत. शेवटी सर्व देवानी गुरुपत्नीला विचारले की, हा गर्भ कोणचा होता. तुझ्या पतीचा (देवगुरुचा) होता का, परपुरुष चंद्राचा होता हे सत्य सांग देवांचे असे विचारणे ऐकून गुरुपत्नी देवलोकासमोर येऊन खाली मान घालून सांगितले की, हा गर्भ देवगुरुचा नव्हता तो इंद्राचा होता, हा मुलगा देवगुरुचा नाही. तो चंद्राचा आहे. हे ऐकूण देवगुरुने तो मुलगा चंद्राला दिला चंद्र आपला मुलगा घेऊन गेला.

देव गुरु ब्रहस्पती आणि चंद्र यांचे चरित्र, आचार, विचार, धर्माधर्म, नीतीअनीति, पापपुण्य, योग्य अयोग्य आदि प्रकारचा विचार केल्यास इतके महापाप स्वर्गातील देवलोकच करतात, मुत्युलोकातील मानवाला ते करता येणार नाही. मागेही कधी कोण्या मानवांनी केले नाही. आणि पुढेही कुणी मानव करील असे वाटत नाही. कारण मानवाची परंपराच असे वरील प्रमाणे पाप करण्याची नाही. मानवाची तर नाहीच पण असुराने सुद्धा असे वरीलप्रमाणे महापाप केलेले कोठेही आढळत नाही.

मृत्युलोकातील मानव आगमनिगमाच्या शिकवणी प्रमाणे वागतो, तो पाप करायला भितो, परंतु वैदिक पौराणिक हिंदूचे देव आगमनिगमाच्या शिकवणीप्रमांणे न वागता महाभयंकर पाप करतात या प्रकाराचा विचार केल्यावर हे सर्व निव्वळ भाकीत कथा आहेत. असे

वाटते. कारण चंद्रसूर्य ब्रहस्पती, आदि अंतराळातील प्रकाशयुक्त तारे आहेत. आणि हिमालय पर्वत आहे. याना बायका मुले आहेत ते एकमेकाच्या बायका पळवून नेतात. एकमेकात भांडण तंटे करतात हे सर्व खरे असेल का ? आता आपण असुराचा विचार करु.

९६. वैदिक पौराणिकाचे असूर.

भारतीय आर्यांचे असूर म्हणजे माणसेच होते. ते वेद बाह्य असूरी आचार विचारांचे होते म्हणून त्यांना असुर म्हणत होते. वैदिक आर्यानी त्यामानवी आकाराला काल्पनिक आकार दिला आहे. अनेक तांडे अनेक हात, अक्राळ विक्राळ शरीराचे अनेक प्रकारच्या आकाराचे तसेच त्यांच्या बायकाही अनेक प्रकारच्या आकाराच्या बनवल्या आहेत. राक्षस दैत्य दानव हे तपश्चर्या करण्यांत फारच पटाईत होते. त्यांचे आचार विचार फारच वाईट होते. त्यांच्या खाण्या-पिण्याचा प्रकार तर इतका अमंगळ होता कीं, त्याचे वर्णन ह्या छोटया पुस्तकांत लिहीणे शक्य नाही. त्यांचे सर्व प्रकार, ते काय करित होते, काय खात होते, त्यांच्या विषय भोगाचे प्रकार वगैरे पौराणिकांच्याच ग्रंथात सविस्तर वाचकाने पहावे. नाथांच्या भावार्थ रामायणात थोडे आहेत ते पाहावे. ते तपःश्चर्या करून कोणी शंकराला, कोणी ब्रह्म-देवाला प्रसन्न करून घेऊन आपल्या इच्छेप्रमाणे वर मागून घेत होते. असल्या पापी लोकांना पौराणिकांचे देव प्रसन्न होऊन त्यांनी मागितलेले वर राक्षस लोकांना देत होते. थोडा वर देणाऱ्या देवांचा विचार करू.

९७. वैदिक पौराणियाचे वर देणारे महामूर्ख देव

पौराणिकांचे वर दणारे देव किती मूर्ख असतील. पहा पाप करणारे लोक तपःश्चर्या करतात आणि वर मागून घेऊन पुन्हा पहिल्या-पेक्षा लाखो पटीने पाप करतात. शेवटी (वर देणाऱ्या देवालाही) फारच त्रास देतात. अशा महापापी व महाबलवान मूर्खाना पिशाच्च्य सुद्धां प्रसन्न होणार नाही. त्या राक्षसादि लोकांना प्रसन्न होऊन त्यांनी मागितलेले सर्व प्रकारचे वर पौराणिकांचे देव देतात हे एक आश्चर्य आहे.

अधर्मी, दुष्ट, पापी लोकांना शिक्षा करून, प्रसंगानुसार दुष्टांना मारून सद्धर्माचे पालन करणे हा धर्म सोडून, दुष्टाला वर देवून,

धर्माचा व सज्जनांचा नाश करायला लावणे आतापर्यन्त इतिहासातल्या कोणत्याही मानव राजा महाराजाने केले नाही. परंतु ह्या पौराणिकांचे देव करतात. थोडक्यांत लिहावयाचे म्हणजे मानव धर्म रक्षणासाठीं प्रयत्न करतात आणि पौराणिकाचे देव धर्म द्वेष्टया पापी लोकांना वर देतात. देव असून धर्म नष्ट करणाऱ्याला आणि सज्जनांचा नाश करणाऱ्या लोकांना अनंत पटीने शक्ती देवुन धर्माचा नाश करतात. नंतर त्या दुष्टांचा नाश करण्याकरिता धावा धाव करतात. त्यांना मारण्यासाठी त्यांच्या देवाला चालू रुपांनी जमत नाही. कारण त्यांचे चालू रुप त्या दुष्ट लोकांच्या ओळखीचे असते. चालू रुपांत देव आपणांला मारायला येत आहे. असे पाहून ते देवालाच मारायला धावतात. हे देव त्यांना घावरून पळून जातात व काही तरी कपट कारस्थान करून त्यांना मारतात. दुष्टांना मारण्यासाठी त्यांचे कपट कारस्थान म्हणजे विष्णूला माशाच्या, कासवाच्या, डुकराच्या पोटी जन्म देवून घोड्याचे तोंड, सिहाचे तोंड वनऊन त्याच्या कडून त्या पापी दुष्ट महावलवान राक्षसादि लोकांना मारतात.

या वरील सर्व प्रकाराचा विचार करू. आपला सर्वांचा अनुभव आहे कीं, मासे, कासव, डुक्कर, घोडे, महाबलवान पशू सिंह या जीवाना माणसे मारून खातात आणि पौराणिकांचे मासे कासव, डुकरे हे जलचर पशू महा बलाढ्य राक्षसादि लोकाना मारतास. म्हणजे पौराणिकांच्या देवापेक्षा पौराणिकांचे वरील जलचर पशु अनंत पटीने शक्तीमान होते असे म्हणावे लागेल. हे सर्व शक्य आहे कां, सत्य असेल कां, त्रिवार शक्य नाही. सत्यानाही. हा सर्व पौराणिकांच्या कल्पना चातुर्याचा नाटकी खेळ आहे.

सज्जन वाचक मित्रानो मी जे पौराणिकांच्या शंकराविषयी लिहिले आहे ते वाचून तुम्हांला वाटेल कीं, ज्या शंकराची उपासना अनादि कालापासून चालत अली आहे. ऋषी मुनी, महात्मे ज्यांची उपासना करून मोक्षाला गेले, ब्रह्मज्ञानी झाले. ज्या शंकराची मंदीरे, जगात लाखोंनी आहेत. भारतात तर शंकराचे मंदीर नाही असे एक लहान खेडे सुद्धां नाही. वैदीकांच्या भारत आगमनापूर्वी सर्व विश्वात शंकराशिवाय दुसरे दैवत नव्हते. त्या शंकरा विषयी तुम्ही असे लिहीणे

योग्य आहे कां.

**९८ विश्वनिर्माता आगमनिगमाचा शिव आणि वैदिक पौराणिक हिंदूचा शिव.**

वाचक मित्रांनो मी ज्या शंकराविषयी लिहीले आहे तो पौराणिकांनी आपल्या कल्पनेने निर्माण केलेला आहे. तुम्ही वर्णन केलेला ज्याची वनादि. कालापासून पूजा अर्चा चालू आहे. ज्यांने ऋषि मुनींना मोक्ष दिला आहे. ज्याची मोठ्या शहरापासून लहान खेड्यांत शिव मंदीरे आहेत. तो वेगळा आहे. त्याला कोणी निर्माण केले नाही. तो स्वयंसिद्ध आहे. त्यानेच हे विश्व निर्माण केले आहे. त्याची पूजा करण्याकरिता प्रतिक आदिमानवाने शिवलिंग तयार करून त्याची सर्व मानवाला पूजा करता यावी, म्हणून सर्वत्र शिवमंदीरे बांधली आहेत. आणि त्यात शिवलींगाची स्थापना केली आहे. त्या शिवाची (शिवलींगाची) उपासना आदिकालापासून आजतागायत चालू आहे. या विश्व निर्माण कर्त्या शिवाची (परब्रह्म परमेश्वराची) संपूर्ण माहिती तुम्हांला (वाचकाला) दुसऱ्या तिसऱ्या व चौथ्या प्रकरणात वाचावयास मिळेल. पौराणिकांनी निर्माण केलेले तिन्ही देव, ब्रह्मदेव, विष्णू महेश (शंकर) यांना वैदीक आर्यांनी आपल्या कल्पनेनें निर्माण केले आहे. म्हणजेच ह्या पौरणिकांचे देव देवी आजपासून मागे पाच हजार वर्षांच्या अगदोर जन्मले नव्हते. त्या देवांनी त्रेतायुगातल्या रावणादी राक्षाला सहकार वरादी आशिर्वाद कसे दिले असतील.

श्रीराम व रावणाचा काळ त्रेतायुगातला आहे. त्रेतायुग १२.९०,००० वारा लक्ष शहाण्णव हजार वर्षांचे होते. श्रीराम या युगात केव्हा होते हे निश्चित सांगता येत नाही. आपण त्रेता युगाचे शेंवटी होते असे गृहीत धरून पुढचा विचार करू. रामा नंतर ८,३२००० आठ लक्ष वत्तीस हजार वर्ष द्वापार युग होते. द्वापार युगानंतर अडीच हजार वर्षानें म्हणजे रामजन्मानंतर ८,३४,५०० आठ लक्ष चौतीस हजार पांचशे वर्षाने निर्माण झालेल्या पौराणिकांच्या शंकराने रावणादी राक्षसांना वर देणें शक्य आहे का ?

**९९. उत्तर ध्रुवीय वैदिक पौराणिक हिंदूंच्या कल्पनेचा सारांश**

वैदीक आर्यांनी भारतीय युद्धानंतर अडीच हजार वर्षे हजारो

प्रकारचे यज्ञ निर्माण करून लाखो पशुबळी देवून महापापे केली. बुद्धांनी वैदिकांच्या यज्ञाचा प्रकार बंद पाडल्यानंतर मागे वर्णन केल्याप्रमाणे देव देवी निर्माण करून त्या देव देवींना महाभयंकर पापें करायला लावून आधोगतीला घातले. त्या अधोगतीला गेलेल्या देव देवींच्या दगड धोंड्यांच्या मुर्ती, देवाच्या हजारो व देवींच्या हजारो लाखो मूर्ती बनवून त्यांना निवासाकरिता हजारो लाखों मोठे मोठे मंदीरे बांधून ठेवली आहेत. मंदीर बांधण्याला लागणारा पैसा (खर्च) क्षत्रिय, वैश्य, यांनी केला आहे व अंग मेहनत (मजुरी) शूद्रादिकांनी केली आहे. ब्राह्मणांनी मात्र एकही पैसा खर्च केला नाही. अशाप्रकारे मंदीरे बांधून त्या मंदीरात दगड धोंड्याच्या मूर्ती स्थापन करून हे देव मोक्ष देणारे आहेत असे भासवून ब्राह्मणेतर सर्व समाजाला त्या दगड धोंड्यांची (देवांची) उपासना करायला लावून पुण्याचा व मोक्षाचा मार्ग बंद पाडून मानवाला अधोगतीला घालायचा प्रयत्न केला आहे. वरील हजारो व लाखो देवदेवींच्या सिद्धांताकरिता, उपासनेकरिता, चरित्रे वर्णनाकरिता, त्यांच्या स्थान महाम्त्याकरिता, हे सर्व देव मोक्ष देतात या सिद्धांताकरिता, त्यांच्या मंदिराच्यावर्णनाकरिता, ती मंदीरे कोणी बांधली त्यांच्या माहितीकरीता, त्या मंदिराला कोणी किती देणग्या दिल्या. जहांगिरी दिल्या अशा प्रकारच्या सिद्धांताकरिता लाखो ग्रंथ निर्माण केले आहेत. या देवदेवींचे पुजारी हे वैदिक आर्यंच आहेत. ते पूजा करतात म्हणजे स्वत.करिता नाही. ब्राह्मणेतर समाजाच्या कल्याणाकरिता पुजा रकणारे आहेत. परंतु त्या पुजेला लागणारा खर्च व पुजा केल्याचा मोबदला दक्षिणा पुजकाकडून (ब्राह्मणेतरांकडून) घेतात. तसेच मंदिराला मिळालेल्या देणग्या व जहांगिरीचे उत्पन्न ते पुजाऱ्यालाच मिळते आणि त्या सर्व उत्पन्नाचा उपभोग वैदीक ब्राह्मणच घेतात आणि पुढे अनंतकाल घेत राहतील.

**१००. वैदिक पौराणिक हिंदूंच्या पुरोहित वर्गाचे अनंत काल सुखाने जगण्याचें साधन**

वैदीक आर्यांनी एवढे देव देवी निर्माण करून अनंत कालापर्यंत विनाकष्टाने सुखाने जगण्यासाठी भरपूर पैसा मिळविण्याचे साधन करून ठेवले आहे. धनाची उत्पन्न भरपूर झाली परंतू मांस कमी पडत

होते. कारण आता पर्यंत निर्माण केलेले देव मासाहारी नाहीत. देवी तेवढ्या मासाहारी होत्या त्यांची (वैदिक ब्राह्मणांची) व ब्राह्मणेतर समाजाची लोकसंख्या फारच मोठी होती. देवांना बळी दिलेल्या पशूचे मांस त्यांना पुरत नव्हते म्हणून काही मोठे देव, खंडोबा, ज्योतीबा, बिरोबादि मांसाहारी देव निर्माण केले. आणि यमाई, गोमाई, मुकाई, सुखाई, अशा अनंत नावाच्या अनंत देवी निर्माण करून पशुबळीचा प्रकार फार मोठ्या प्रमाणावर वाढवला. त्यांचे जेवढे देव व देवी आहेत. त्या प्रत्येक देव देवींची स्थापना हजारो ठिकाणी केल्या आहेत त्यांचे कारण असे असेल की, सर्व लोकांना मास मिळावे, सर्वांना सोडून त्यांनीच मांस खाल्ले तर शोभले नसते. सर्व लोकांनी त्यांना नावे ठेवली असती. पुराणानंतर ज्या देवदेवी निर्माण केल्या आहेत त्या सर्वांचे वर्णन लिहीणे शक्य नाही.

देवांची संख्या कमी आहे. देवींची संख्या देवा पेक्षा हजारोनी जास्त आहेः त्यांच्या नावाखाली असेच महापाप चालत आहे. हे सर्वांच्या नजरेसमोर आहे. त्याला पुराव्याची गरज नाही. एवढे करून पौराणिकाचे समाधान झाले नाही. पुराणातल्या महा देवता व पुराणानंतर मध्यम देवता आणि त्यानंतर क्षुद्र देवता यांनी निर्माण केल्या आहेत.

**१०१. वैदिक हिंदुनी निर्माण केलेल्या क्षुद्र देवता व पशुहत्या**

आता क्षुद्र देवतांचा विचार करू क्षुद्र देवता अगदी प्रत्येक लहान खेड्यांत (वेताळ सरीअई, सटकाई, पोचम्मा ह्या चार ठराविक आहेत. भारतात पाच लक्ष खेडेगाव आहेत २०,००००० वीस लक्ष खेड्यातील वेताळ व क्षूद्र देवी आहेत. भारतात कसबे गावे पन्नास हजार असतील. प्रत्येक कसबे गावात १० दहा देवी धरल्या तर पाच लक्ष ५,०००० आणि लहान मोठे शहर भारतात दोन हजार असतील प्रत्येक शहरांत १०० शंभरप्रमाणे धरले तर दोन लक्ष शहरातील क्षूद्रदेवी होतात. भारतात २७,००००० सत्तावीस लक्ष क्षूद्र देवी आहेत. म्हसोबा मात्र प्रत्येक खेड्यात कमीत कमी गांवांत आणि गावाबाहेर मिळून पंचवीस तरी असतात. आपण प्रत्येक खेडयात पंचविस धरू. भारतात पाच लाख खेडी आहेत. २५ ह्या हिशोबाने पाच लाख खेड्यातिल देव १२५००००० एक कोटी पंचवीस लाख म्हसोबा आहेत. तसेच भारतात कसबे गांवांत

कमीत कमी धरले तर प्रत्येक कसबे गांवात शंभर तरी म्हसोबा असतील, पाच कोटी कसबे गांवात म्हसोबा होतात. शहरांत कमीत कमी ५०० तरी देवता असतील. मध्यम व मोठे शहरे भारतात एक हजार असतील सरासरी पांचशे प्रमाणे पांच लाख देवता असतील. भारतातक्षुद्र देवतांची संख्या कमीत कमी चार कोटी क्षुद्र देवता आहेत. दररोज एक पशु धरला तरी भारतात रोज क्षुद्रदेवतांना चार कोटी पशू लागतात. हे झाल्या क्षुद्र देवता.

पुराण कालानंतर निर्माण केलेल्या मोठे देव देवी यांच्याकरिता पशु हत्या दररोज भारतात हजारो कोटी होत आहेत. हे सर्वांना माहीत आहे.

हा सर्व हिंसेचा प्रकार वैदिक आर्यांनी निर्माण केला आहे. ही सर्व हिंसा देव देवींचे नांवाने होत असते.

भारताबाहेर जी हिंसा होते ती भारतापेक्षा लाखोपटीने जास्त होते. ती वैदिकांचीच परंपरा आहे. कारण जगांत जेवढे धर्म वंश आहेत. त्यांचे मूळ भारतातच आहे. भारतीय हिंदू धर्मातूनच बाहेर पडलेले आहेत. म्हणजे भारता बाहेरच्या हिंसेला मूळ कारण भारतातले वैदिक आर्यच आहेत.

## १०२ जगातील सर्व धर्मापेक्षा हिंदू धर्म कनिष्ट आहे.

पारशी मुसलमान आणि ख्रिस्त व हिन्दू धर्म यांचा तुलनात्मक विचार करून श्रेष्ठ व कनिष्ठ ठरवू.

| | |
|---|---|
| पारशी मुसलमान आणि ख्रिस्ती धर्म श्रेष्ठ आहे. यांची हिंसा स्वतःला खाण्या करिता आहे. निराकार उपासक आहेत. उपासना ही श्रेष्ठ आहे. | हिंदू धर्म कनिष्ठ यांची हिंसा देवा पुढे पशु कापून देवाला खायाला घालून नंतर आपण खातात. सगुण साकार व बहु देव उपासक आहेत. उपासना कनिष्ठ आहे. |
| १) यांचे देव निराकार आहेत. | १) यांचे देव सगुण साकार आहेत. आणि दगड धोंड्याचे, पाथरवटाने घडवून तयार केलेले आहेत. |
| २) यांचे देव चेतन आहे. | |

| | |
|---|---|
| ३) यांचे देव एकेकच आहेत. | २) यांचे देव अचेतन आहेत. |
| | ३) यांचे देव लाखो आहेत. |
| ४) यांचे देव आकाशांत किंवा भक्ताचे हृदयमंदिरांत रहातात आणि स्वतंत्र आहेत. | ४) यांचे देव पृथ्वीवर देवळांत ओटयावर, नदीकिनारी, हागणदारीत रहातात व कांहींपुजाऱ्याच्या बंदीवासांत असतात. |
| ५) हे पाप स्वतःच करतात | ५) यांच्या पापात यांचे देव सहभागी असतात. |
| ६) यांचा धर्म एकेकच आहे. | ६) ह्यांचाही धर्म एकच आहे. हिंदू |
| ७) यांच्या धर्मात जात एकेकच आहे. | ७) यांच्यांत जाती हजारो आहेत. |
| ८) यांच्यांत पति एकच असतो. | ८) यांच्यात पति अनेक आहेत (द्रौपदी) |
| ९) यांच्या उपासनेत भेसळ नाही. बायकोचा, बापाचा देव तोच आईचा मुलाचा नातवाचा आहे. | ९) यांच्या उपासनेत भेसळ आहे. बापाचा देव शिव असेल तर आईची देवी असेल. मुलांचा खंडोबा तर नातवाचा म्हसोबा असेल. |
| १०) यांच्या देवाला जन्म नाही. | १०) यांच्या देवाला पाथरवट जन्म देतात. |
| ११) यांच्यात पत्न्या १ ते १० असतील. | ११) यांच्यांत पत्न्या हजारो आहेत. (सगराला बीत हजार बायका होत्या). |
| १२) यांच्या देवाला कोणीही मारीत नाही. | १२) यांच्या हजारो देवाला मुसलमानांनी मारून टाकले आहे. हिंदू स्वतःसुद्धा रस्त्यांत चौकतील काढून टाकतात. व दुसरे नवीन तयार करतात. |
| १३) यांच्या देवाला बायाका नाहीत. | १३) यांच्या देवाला हजारो बायका आहेत. (श्रीकृष्ण) शंकर |

| | |
|---|---|
| | अवतारी खंडोबा बिरोबादी देवळातर लाखो बायका आहेत. |
| १४) यांचे देव कांहीच पाप करीत नाहीत. | १४) यांचे देव महाभयंकर पाप करतात. उदा. यांच्या देवांनी निर्माण केलेले (त्यांची मुले) सामर्थ्य संपन्न (राक्षसादी) मारून टाकतात. निरपराधी मुले कापून खातात, असे हे महाभयंकर पाप करतात. |
| १५) यांच्या देवाला कोणताच आकार नाही. | १५) यांच्या देवाला डोके, डोळे तोंड, छाती, पोट, पाय मल-मूत्र विसर्जनादि इंद्रिये आहेत. |
| १६) यांच्या देवाला खायला कांहीच लागत नाही. | १६) यांच्या देवाला खायला लागते. कांही शाकाहारी आहेत. काही मांसाहारी आहेत. मांसाहारी देव देवी आपली मुले खातात. त्यांचे भक्त त्यांना कापून खायला देतात. देव ते खातात. |
| १७) यांच्या देवाला आगम निग-मांत स्थान आहे. | १७) यांच्या देवाला आगम निग-मांत स्थान नाही. |
| १८) यांच्या देवाला आगम निग-मांची मान्यता आहे. | १८) यांच्या देवाला आगम निग-मांची मान्यता नाही. |
| १९) यांचे देव कल्पनातीत आहेत. | १९) यांचे देव कल्पनेतले आहेत. यांनीच तयार केलेले आहेत. |
| २०) यांच्या देवाला सर्व धर्मीय लोक मानतात. | २०) यांच्या देवाल हिन्दूशिवाय कोणीच मानीत नाहीत. |
| २१) यांचा आचार (खाणे पिणे) हिंदूचेच आहे. | २१) यांचा आचार खाणेपिणे स्वतःच्या कल्पनेतला आहे. |

| | |
|---|---|
| २२) यांच्या पापाला मर्यादा आहेत. | २२) यांच्या पापाला मर्यादा नाहीत. कल्पनातीत आहेत. यांच्या पापांची कल्पना सुद्धा केली जात नाही. |
| २३) यांच्या धर्माचे मूळ हिन्दू धर्म आहे. | २३) यांच्या धर्माला मूळ आधारच नाही. त्यांचा हिन्दू धर्म त्यांनी स्वतःच निर्माण केला आहे. प्रथम हिन्दू हे वैदिक आर्य धर्माचे होते. भारतात आल्यावर भारतीय युद्धा नंतर त्यांनी आपला वैदिक धर्म चालू केला नंतर पुराण धर्म निर्माण केला आहे. पुढे मुसलमानाने त्यांचा सर्वनाश करून, त्यांना दास बनवून, त्यांचे मूळचे नांव (वैदिक पौराणिक) नष्ट करून, मुसलमानांनी त्यांना ठेवलेले नांव हिन्दू, ते हिन्दू नांव स्विकारून हिंदू म्हणवून घेतात. |

वरील तुळनात्मक प्रकारांचा (श्रेष्ठ कनिष्ठ) विचार केल्यावर सर्वधर्मात हिंदूधर्म कनिष्ठ आहे. असे ठरते.

१. सर्वधर्मापेक्षा कनिष्ठ असलेले, २. भारतीयांच्या वेदांत नसलेले ३. परब्रह्म परमेश्वराला विसरलेले, ४. सगुण दगड धोंड्यांचे देव देवी निर्माण करणारे, ५. सत्याचा त्याग केलेले, ६. विष्णूला जलचर, पशु अशा नीच योनीत जन्म (अवतार) घ्यायला लावणारे (मासा, कासव, डुक्कर), ७. विष्णूला सिंहाच्या तोंडाचा, घोड्याच्या तोंडाचा, बनविणारे, ८. मारुतीला शेपटाचा वानर बनविणारे, ९. शंकराला तीन डोळ्यांचा बनविणारे १०. कार्तिकीला सहा तोंडाचा बनविणारे, ११. ब्रह्मदेवाला

चार तोंडाचा बनविणारे, १२. रावणाला दहा तोंडे बनविणारे, १३. एक पत्नी व्रत धर्माचा त्याग करणारे, १४. एक पत्नी वृताला न मानणारे, १५. मांसाहारी देवदेवी निर्माण करणारे, १६. देवदेवींच्या नांवाने हिंसा करणारे, १८. यज्ञयागांत पशू बळी देणारे, १९. निराकारी एकेश्वरी उपासनेंचा त्याग करणारे, २०. निराकारी एकेश्वरी उपासना करणाऱ्याला वेद बाह्य म्हणणारे, २१. वेदात नसलेले जाती, धर्म पंथ, निर्माण करणारे, २२. स्वकल्पित देव देवी निर्माण करून त्यांची उपासना करून मोक्ष मिळविण्याकरिता प्रयत्न करणारे, २३, महाभयंकर पापाचरण करून मोक्षाची इच्छा करणारे, २४. अधर्म, २५. अमानवता २६. हिंसा २७. असत्य, २८ अनिती, २९. अंधश्रद्धा, ३०. अशांती, ३१. परपिडा, ३२. असद्विचार, ३३. अनआर्यत्व. असा अनेक प्रकाराने हीनवैदिक आर्य हिंदुधर्म आहे. यांच्या पूर्व कालातील स्त्री पुरुष समागमाचा प्रकार महा भयंकर आहे. आई, बहिण, मुलगी, मामी, आत्या आदि स्त्रियांचे नाते हे आजिबात मानीत नव्हते. बाप, भाऊ, मुलगा, चुलता, मामा आदि नाते यांच्या स्त्रियाही मानीत नव्हत्या. हे यज्ञाग्निला साक्ष ठेऊन यज्ञ ज्वालाच्या प्रकाशांत नागडे उघडे शेकडो स्त्रिपुरुष एकाच वेळी सामुहिक समागम करीत होते. हा यांचा स्त्रिपुरुष समागमाचा प्रकार शाक्तापेक्षाही महाभयंकर होता. यांची सविस्तर माहिती इतिहासाचार्य कं. वि. का. राजवाडे यांनी लिहिलेल्या "भारतीय विवाह संस्थेचा इतिहास" नावाच्या ग्रंथात सविस्तर आहे.

या वरील सर्व प्रकाराचा विचार केला तर वैदिक आर्यांच्या हिंदू धर्माला उत्तम धर्म म्हणता येईल का ? या धर्मात मानवता आहे का ? या धर्माला सर्व धर्मापेक्षा श्रेष्ठ म्हणावे का ? या धर्माचरणाने मोक्ष मिळेल का ? या वरील पाच प्रश्नांचे उत्तर एकच आहे. ते नाही. असे आहे. बर पारशी, मुसलमान, खिरस्त धर्म श्रेष्ठ आणि वैदिक आर्यांचा हिन्दु धर्म कनिष्ठ असा तुलनात्मक विचार करून हिंदु धर्म कनिष्ठ आहे. असे सिद्ध झाले आहे. हे तिन्ही धर्म सोडून बुद्ध जैन महानुभावादि धर्म, आणि अहिंसा तत्वावर आधारित असलेले सर्व पंथ, तसेच भारतीय वैदिक आर्यांचा शैव वीर शैव धर्म हे सर्व धर्म, पंथ वैदीक आर्यांच्या हिंदु धर्मापेक्षा फारच श्रेष्ठ असून वैदीक

आर्य हिन्दु म्हणतात. की, आमचा हिंदु धर्म अनादि कालाचा असून सर्व धर्मापेक्षा श्रेष्ठ आहे.

या हिंदु धर्मातील सर्व दोष सविस्तर लिहिले तर एक हजार पानांचा ग्रंथ होईल. ते या छोटया पुस्तकात लिहिणे शक्य नाही. हिंदुचा हा सर्व महापापांचा, महाअत्याचारांचा, वर लिहीलेला प्रकार वेदांत आहे का ? हा हिंदु धर्म भारतीय आर्यांच्या वेदांत अजिबात नाही.

आतापर्यंत लिहिलेला सर्व प्रकार भारता बाहेरून आलेल्या वैदिक आर्यांनी आपल्या कल्पना चातुर्याने निर्माण केला आहे. ह्या सर्व प्रकारात भारतीय आर्यांचा अजिबात संबंध नाही. भारतीय आर्यांना इतके महाभयंकर पाप करता येणार नाही. भारतीय आर्य पापाला भिणारे आहेत. पाप करणे भारतीय आर्यांची संस्कृतीच नाही. भारतीय आर्यांचा विचार पुढच्या प्रकरणात केला आहे.

**१०३. उत्तर ध्रुवीय वैदीक पौराणिकानी निर्माण केलेल्या हिंदु-धर्माचारामुळे भारताला निधत्व प्राप्त झाले आहे.**

या वैदिक अर्यांनी भारताची सर्वच प्रकारची महाहानी केली आहे. जिवंत वस्तुतल्या देवांचा धिक्कार करून दगड धोन्डयाचे तांब्या पितळेचे देव निर्माण केले, व त्यांच्या (देवा) करिता लाखो मंदीरे बांधवून कोटयावधी निरापराध जीवांची हत्त्या करावयास लावून हे सर्व देव मोक्ष देतात, काही देव ऐहिक सुखे देतात असे भासवून त्या देवांची उपासना करायला लावली आहे. हजारो लाखो देव देवींना खाण्याकरता कोटयावधी पशूहत्त्या, लाखो देव देवींमुळे भारतीयांचे लाखो तुकडे झाले आहेत. तसेच हजारोलाखो देव देवींचे उपासना पंथ निर्माण झाले आहेत. हजारो जाती निर्माण करून, जाती जातीत भेद करून भारताची मोठी हानी केली आहे. हा सर्व प्रकार वेदात आहे का ? भारतीय आर्यांच्या वेदात अजीबात नाही. असा हा सर्व प्रकार वेदा बाहेरचा असून आम्ही (हिंदू) वैदिक आहोत. म्हणतात आणि हा सर्व प्रकार वेदांचा विकास आहे असा प्रचार महा विद्वान पंडीत, किर्तनकार, प्रवचनकार करतात. असे हे हिंदू मुळचे आहेत तरी कोण ? आणि त्यांनी महाभयंकर पापांचा प्रकार का

निर्माण केला आहे व त्यांनी हा अधोगतीला घालणारा प्रकार का निर्माण का केला आहे. याचा आपण थोडा विचार करू.

हा अधोगतीला घालणारा प्रकार भारताबाहेरच्या उत्तर ध्रुव वरून आलेल्या वैदीक आर्यांनी आपणाला सुखाने जगण्यासाठी उत्पन्नाचे साधन म्हणून निर्माण केला आहे.

## १०४. वैदीक हिन्दु धर्म व त्याचे विचित्र वैशिष्टचे

वैदिक धर्माचे विचित्र वैशिष्ठचे वैदिकांनी निर्माण केली आहेत. त्यांना भारतीय आगम निमगामादि ग्रंथात अजिबात स्थान नाही. ही सर्व वेद बाह्य आहेत. मूर्ती पुजा, आवतार, हत्तीच्या तोंडावर गणपती, सिंहाच्या तोंडचा नारसिंह (विष्णू) माशाच्या पोटी विष्णु, कासवाच्या पोटी विष्णु, डुकराच्या पोटी विष्णु, घोडयाच्या तोंडाचा विष्णु, माकड वानराचे पोटी मारुती. सोळा हजार एकशे आठ बायकांचा नवरा श्रीकृष्ण, मेलेल्या आई वडिलांचे श्राद्ध, नवग्रह निर्माण करून त्याची उपासना, झाडा जुडपांची पुजा, स्मशानातील भुताखेतांची पूजा, फलित ज्योतिष, सूर्य चंद्र ग्रहणांच्या वेळी दान धर्म करण्याची प्रथा, राहूकेतुचे चमत्कार, गंगा यमुनादि नद्यांचे स्नानाने पापमुक्ती, कालीकादि देवीच्या उपासनेनें मुक्ती, भैरोबा, खंडोबा, म्हसोबा, ज्योतीबादि देवांना आणि कालिका यमाई, गोमाई इ. देवी देवांना निरापराधी पशूबळी दिल्याने मोक्ष, ईश्वराऐवजी दगड धोंडयाच्या, तांबे पितळेच्या मूर्तींची उपासनना, यज्ञात गाई, म्हशी, डुकरे, रेडे, उंट बकरे, हरणे असे चौदा प्रकारचे पशुबळी दिल्याने स्वर्गादि महा लोकांची प्राप्ती करण्याकरिता यज्ञांचे हजारो प्रकार वैदिकांनो निर्माण केले आहेत. या सर्व प्रकारच्या सिद्धांता करता लाखो ग्रंथही निर्माण केले आहेत. आगमनिगमादि धर्मग्रंथाचे सिद्धांत त्यांना मान्य नाहीत. एका पत्नीशिवाय इतर स्त्रीया कन्या, भगिनी, माता तसेच एक पती सोडून इतर पुरुष पुत्र बंधू पिता हे त्यांना मान्य नाही. सती द्रौपदीला पाच नवरे, महाविष्णूची बायको लक्ष्मी हिला सर्व जगाची दासी, विष्णुचे विश्रांतीस्थान दुधाचा समुद्र, शंकराचे विश्रांतीस्थान स्मशानभूमी आणि अंतरातील कैलास, शंकराला नेसायला वाघाचे कातडे, पांघरायला हत्तीचे कातडे, विंचु सर्पादि विषारी प्राणी अलंकार, शंकराचे वाहन बैल, त्याच्या बायकोचे वाहन

महाक्रूर सिंह, गणपतीचे वाहन उंदीर, कार्तिकस्वामीचे वाहन मोर, गणपतीला हत्तीचे तोंड, कार्तिक स्वामीला सहा तोंडे, पोट एक, पाय दोन शंकराला तीन डोळे. रावणाला दहा तोंडे, वीस हात पोट एक पाय दोन, रावणाचा एक भाऊ कुंभकर्ण यांची उंची ३, २०० मैल होती. रावणाची लंका सोन्याची होती. रावणाच्या बंदीवासात तेहतीस कोटी देव होते. (लाखो वर्ष).. शिवाय त्या लंकेत कोटयावधीं राक्षसांची घरे होती. ती लंका सोन्याची होती. तसेच कृष्णाची द्वारकाही सोन्याची होती. एवढ्या मोठ्या लंका व द्वारका नगरीला बांधावयाला सोने किती लागले असेल, आणि ते सोने कोठे तयार केले असेल. श्रीकृष्णाची द्वारका नगरीही सोन्याची होती. त्या द्वारकेत छप्पनकोटी यादव रहात होते. यांत एका कृष्णाचे सोळा हजार एकशे आठ घरे होती. कृष्णाला सोळा हजार एकशे आठ बायका होत्या. रावणासारखा एक बाणासूर नावाचा राक्षस होता. त्याला एक हजार हात होते. तो आपल्या एक हजार हातानी युद्धात एकाच वेळी पाचशे महाविरा इतका शस्त्रांचा उपयोग करीत होता. बाणासुराने त्यावेळच्या राजे महाराजांच्या राजकन्या सोळा हजार जिंकून आणल्या व आपल्या घरी ठेवल्या होत्या. आणि त्या सोळा हजार मुलींबरोबर लग्न करून घेणार होता. त्यांनी (वैदिक हिन्दूंनी) त्यांच्या अवतारी कृष्णाला सांगितले. मग कृष्ण त्या मुलींना सोडवावयास गेला, तेव्हा बाणासुराने कृष्णाबरोबर लढाई सुरू केली. त्यावेळी बाणासुराचा देव शंकर आपल्या भक्ताच्या सहाय्याकरीता धावला. कृष्णाचे व शंकराचे युद्ध झाले. म्हणजे रावण बाणादि महापापी राक्षस भक्तांचे देव, आपल्या महापापी भक्ताचे रक्षण करण्याकरीता कृष्ण शंकरादि देव एकमेकांत लढाया करून घेतात. असे हे महापापी. भक्ताचे महामूर्ख देव आहेत. वैदिक हिन्दू म्हणतात की; आम्ही व आमचे देव सर्व वैदिक आहोत. भारतीय आर्यांचे एक शिव पुराण होते. त्याची व्यासांनी दहा पुराणे केली. ती सर्व निराकारी शिव देवतेवर आधारित होती. त्यात ह्या हिन्दूंनी आपल्या कल्पनाचातुर्याने अनेक कल्पित प्रकार घुसडून मूळ ग्रंथाच्या कितीतरी पटीने मोठे केले आहेत. आणि त्यांचे मूळ स्वरूप नष्ट केले आहे. त्या शिव पुराणात भारतीय

युद्धाच्या अगोदरच्या राजे महाराजांच्या व ऋषी मुनींच्या कथा सोडून दुसरा अयोग्य प्रकार वैदिकांनी (हिन्दूंनी) त्यात घुसवडवला आहे. आणि बाकी आठ पुराणे व उपपुराणे १८ अशी २६ सव्वीस पुराणे त्यांनी निर्माण केली आहेत. अगदी अलीकडच्या कालात म्हणजे इ. स. ३०० ते १८०० वर्षाच्या दरम्यानच्या कालात निर्माण केली आहेत. भागवत पुराण हे तर इ. स. ८०० या कालात निर्माण केले आहे. यांच्या पुराणामध्ये सर्वच विचित्र प्रकार आहेत. मत्स्य भगवंताकडून सर्व सृष्टी निर्माण करून घेतली आहे. पशू, पक्षी, दानव, मानव, राक्षस, गंधर्व, किन्नर, जलचर, भूचर, खेचर, आंडज, जारज, स्वेदज, अद्भिज-चारी योनी पंचमहाभुते, वृक्ष, वेली, नद्या, सरोवरे, गुहा, कंदरे, वने, उपवने, गिरी पर्वते, चंद्र सूर्यादि, तारांगणे, ब्राह्मण वेदांगे, उपनिषदे, शास्त्रे, पुराणें, आदि ग्रंथ, ब्रह्मा, विष्णू, महेश, पार्वती, सावित्री आदि अनेक देव देवी, यज्ञादि सर्व प्रकारची विधी विधाने, या विश्वात जेवढे प्रकार ईश्वराने निर्माण केले आहेत तेवढे व त्याशिवाय अधिक प्रकार, म्हणजे मत्स्य, कच्छादी अवतार, या मत्स्य भगवानाकडून निर्माण करून घेतले आहेत.

हे वरील प्रकार विष्णू अवतारी माश्याकडून करून घेतले आहेत. तसेच बिष्णू अवतारी कासवाकडून, विष्णू अवतारी डुकराकडून, सिहाच्या तोंडाकडून म्हणजे नारसिंहाकडून, विष्णू अवतारी (घोड्याच्या) तोंडाच्या हयग्रीवाकडून, विष्णू अवतारी माशाप्रमाणे सर्व प्रकार निर्माण करून घेतले आहेत. काही पुराणे एका एका अवतारी देवाच्या नावावर आहेत. ज्या देवाच्या नावावर जे पुराण आहे, त्या पुराणात त्या देवाने वरीलप्रमाणे सर्व देवांसह विश्व निर्माण केले आहे आणि त्या पुराणात तोच देव श्रेष्ठ आहे. बाकीचे सर्व देव त्या देवाचे उपासक आहेत, त्या देवाचे भक्त आहेत असा विचित्र प्रकार सर्व पुराणात आहे. या शिवाय त्यांच्या सांगण्याप्रमाणे सृष्टी निर्माण करणारे काश्यप ऋषि होते. त्यांच्याकडूनही या वैदिक हिन्दूंनी वरील अवतारी मत्स्य कच्छाप्रमाणे सर्व सृष्टी निर्माण करून घेतली आहे. कश्यप हे मानव होते. त्यांना अनेक बायका होत्या. त्याही मानव होत्या. अशा मानव स्त्रियांपासून वरील

प्रकारची सृष्टी निर्माण झाली असेल का ? मानव पुरुषांच्या बीजापासून व मानव स्त्रीच्या गर्भात वरील प्रमाणे मानवादी सर्व लोक, मांजरे, कुत्रे व डुकरे, कोल्हे, लांडगे, वाघ, सिंह, उंट, सर्प, विंचू आदि सर्व प्राणी, तसेच अनेक प्रकारचे धान्य, अनेक प्रकारच्या वृक्षवल्ली, लहान मोठे वृक्ष, लहान पर्वतापासून ते हिमालयासारखे महापर्वत, लहान मोठी सरोवरे, सात समुद्रे सर्व प्रकारचे मानव पुरुषांच्या बीजातून मानव स्त्रीच्या गर्भात गर्भधारणा होऊन मानव स्त्रीच्या योनीतून कसे निर्माण झाले असतील ? असे होणे शक्य आहे का ? असे झाले असेल का ? असे झाले का ? हे सर्व सत्य असेल का ? असा प्रकार निर्माण झाला नाही, असे होणे शक्य नाही. असे झाले नाही. हे सर्व असत्य आहे. खोटे आहे. हा सर्व प्रकार वैदिक हिंदूंनी निराधार, स्वतःच्या कल्पनाचातुर्याने निर्माण केला आहे. असे करणे म्हणजे दारू प्याय-लेल्या माणसाच्या बडबडण्याप्रमाणे किंवा वेड लागलेल्या वेड्या माणसाच्या बरळण्याप्रमाणे आहे. उदाहरणार्थ एखाद्या वेड्या माणसाला अमक्याच्या बायकोला कुत्रा झाला आहे. अमक्याच्या बायकोला डुक्कर झाले आहे. असा प्रकार सांगितला तर तो वेडा माणूस म्हणेल की काय रे मूर्खा, माणसाला कुठे मांजरे, डुक्करे, होतात का ? माणसाला माणूसच होतो. आणि तू म्हणतोस की अमक्याच्या बायकोला कुत्रे मांजरे, डुकरे झाले आहेत. तुला डोकेच नाही. म्हणून असे बोलतोस. म्हणजे वैदिक हिन्दूंचा वरील सर्व प्रकार वेड्या सारख्याला सुद्धा खरा वाटत नाही. हा वैदिक हिंदूंनी कल्पनेने निर्माण केलेला प्रकार ईश्वर निर्मित आहे, हे सर्व अवतार देवाने घेतले आहेत. त्याला अंधश्रद्धेचे लोक म्हणतात की देवाने असे अवतार घेऊन दुष्टांचे निर्दालन केले आहे. देवाने तसे केले नसते तर आम्ही व आमचे पूर्वज जगलो नसतो. असे देवभोळे लोक मानतात. हे एक आश्चर्यच आहे. देवांनी असे अवतार घेऊन दुष्टांचे निर्दालन केले असे मानणे हा वेडेपणा आहे. या वैदिक हिंदूंनी लाखो देव निर्माण करून मानवात लाखो उपासना गट निर्माण केले आहेत. जो तो म्हणतो, तुमच्या देवापेक्षा आमचाच देव श्रेष्ठ आहे. आमच्या देवानेच तुमचे देव निर्माण केले आहेत. तसेच हजारो जाती निर्माण केल्या आहेत. जो तो म्हणतो

तुमच्या जातीपेक्षा आमची जात श्रेष्ठ आहे. ह्या प्रकारामुळे देशात एकी नाही. कारण बाप शिवाची उपासना करतो. आई देवीची उपासना करते, नातू म्हसोबाची उपासना करतो, मुलगा खंडोबाची उपासना करतो हे सुनेला आवडत नाही. असा हा विचित्र प्रकार निर्माण करून थांबले नाहींत. त्यांचा उपदेश प्रत्येक जातीतल्या माणसाने आपलीच जात श्रेष्ठ मानावी असा आहे. आपली जात हलकी म्हणून ती सोडू नये. आपली जात सोडून दिली तर नरकात जावे लागते. तसेच आपला देवधर्म तोच श्रेष्ठ मानून त्याचीच उपासना करावी. आपला देव सोडून दिला तर नरकात जावे लागते. या उपदेशामुळे पापी असलेले मातंग, कसाई इत्यादी लोक आमचा धर्म, अमाची जात, ब्राह्मण धर्मजातीपेक्षा श्रेष्ठ आहे असे म्हणून परंपरेने चालत आलेले पापकर्मच श्रेष्ठ मानून तेच करीत आहेत. सारांश वैदिक हिंदू पुरोहित (ब्राह्मणांनी) ब्राह्मणेतर सर्व समाजाला विचित्र व पापमय प्रकारात गुंतवून, त्यांना पुण्य कर्मांपासून वंचित ठेवून पाप करावयास लावले आहे. ब्राह्मणेतर समाज अनादि कालापासून ब्राह्मणांना देव मानीत आला आहे. ब्राह्मण जे सांगतात ते देव रूपाने आम्हाला आमच्या कल्याणाकरिता सांगतात, आणि त्यातच आपले कल्याण आहे. त्यांच्या सांगण्या प्रमाणे आपण वागलो तरच आपणाला मोक्ष मिळणार आहे. नाही वागलो तर आपण नरकात जाऊ. या भीतीने मागच्या परंपरेप्रमाणे पापच करतात. अशा महाभयंकर पापापेक्षा दुसरे पाप आहे का ? असेल का ? याचे उत्तर नाही असेच आहे. हे जे महाभयंकर पाप आहे त्यालाच पुण्य आहे असे वैदिक हिन्दू साध्या भोळ्यांना भासवितात. या महाभयंकर पापकर्मांचे पौराहित्य हेच (वैदिक ब्राह्मणच) करतात, हे पाप कर्म करताना म्हणावयाचे मंत्र-तंत्र त्यांनीच निर्माण केले आहेत. ते ही संस्कृतमध्यें आहेत. त्याचे कारण आम्ही काय म्हणत आहो ते ब्राह्मणेतरांना कळू नये म्हणून असे अनेक प्रकारचे पापकर्म ब्राह्मणानें ब्राह्मणेतरांना करावयास लावून, त्या पाप कर्मांतच गुंतवून ठेवून ब्राह्मणेतरांचा मोक्षाचा मार्गच त्यांनी बंद केला आहे. भारतातील हिंदू लोक त्यालाच श्रेष्ठ मानतात. त्यात आमचे कल्याण आहे असे मानतात. त्यांनी निर्माण केलेले ग्रंथ

वाचून आपणाला धन्य मानतात. आमचा हा हिंदू धर्म सर्व धर्मांत श्रेष्ठ आहे. तोच वैदिक धर्म आहे म्हणतात. कारण त्यांचे धर्मगुरू (वैदिक ब्राह्मण) तसे त्यांना सांगतात. आपला हा हिंदू धर्म वैदिक आहे. तोच सर्व धर्मांत श्रेष्ठ आहे. या धर्माने तुम्ही वागाल तरच तुम्हाला मोक्ष मिळेल. वरील (हिंदू) वैदिकांच्या धर्माच्या आचरणानें मोक्ष मिळेल का ? शक्य नाही. वैदिक हिंदूंचे देवच अधोगतीला गेले आहेत. बौद्ध, जैन, ख्रिश्चन, मुसलमान, शीख, पारशी या धर्मांना कोणीतरी संस्थापक आहे. कोणता तरी एक धर्म आहे. एक देव आहे. परंतु हिंदू धर्माला मात्र एक संस्थापक नाही, तसेच एक धर्मग्रंथ नाही, एक देव नाही याचे वाईट वाटते. पूर्वी यांना (हिंदूंना) वैदिक धर्मी किंवा यज्ञ धर्मी म्हणत होते. नंतर पौराणिक म्हणू लागले. पुढे मुसलमानांनी दिलेले हिंदू नाव चालू कालात प्रचलित आहे.

(क) शंका : हिंसा हा प्रकार वैदिक हिंदूंनीच निर्माण केला आहे का ? सृष्टीवर प्रथम मानव निर्माण झाले तेव्हा हिंसा अहिंसा हा प्रकार अजिबात नव्हता. नंतर कांहीं कालांतराने हिंसा अहिंसा प्रकार निर्माण झाला होता. प्रथम मानवाला देव म्हणतात. त्यांच्या आचारात अहिंसादि प्रकारच होते. जेव्हा हिंसा हा प्रकार निर्माण झाला तेव्हा देव मानवात दोन गट झाले. पहिल्या गटात देव आहेत. आणि दुसऱ्या (हिंसा) गटाला असुर. हे नवीन नाव ठेवले. असुर हे हिंसक होते. अहिंसक देव व हिंसक असुर या दोन गटांत द्वेष निर्माण होऊन भांडण तंटे होऊ लागले. त्यात देव विजयी होत होते व असुरांचा पराभव होत होता. हळूहळू पराभवी असुर आर्यावर्ता- (भारता) बाहेर गेले. त्यांच्याबरोबर हिंसाहा प्रकार गेला होता. तो हिंसादि प्रकार उत्तर ध्रुवीय वैदिकांनी आपल्याबरोबर भारतात आणला आहे. आणि त्यामुळे भारताचा इतिहास अशुद्ध झाला आहे.

(ख) मानव मनाला हिंसादि प्रकार ग्राह्य नाही ?

प्रत्येक मानव मनाला १ हिंसा, २ असत्य ३ चोरी आणि ४ व्यभिचार हे चार प्रकार ग्राह्य नाहीत. १) माझी कोणी हिंसा करू नये. ही मानव मनाची जन्मसिद्ध नैसर्गिक प्रवृत्ती आहे. म्हणजे अहिंसा ही सुखमय असल्यामुळे प्रत्येक मानव मनाला ग्राह्य आहे. आणि हिंसा ही

दुःखमय वाटत असल्यामुळे ग्राह्य नाही. असे वाटणे हीही मानव मनाची जन्मसिद्ध नैसर्गिक प्रवृत्ती आहे. त्यामुळे हिंसा त्याज्य आहे.

२) माझ्या बरोबर दुसऱ्याने असत्य भाषण करू नये. अशीही मानव मनाची जन्मसिद्ध नैसर्गिक प्रवृत्ती आहे. सत्य हे सुखमय असल्यामुळे मानव मनाला ग्राह्य आहे. आणि असत्य हे दुःखमय वाटत असल्यामुळे मानव मनाला त्याज्य आहे.

३) प्रत्येक मानवाला वाटते की आपली धन संपत्ती कोणीही चोरून नेऊ नये. असे वाटणे मानव मनाची जन्मसिद्ध नैसर्गिक स्वाभाविक प्रवृत्ती आहे. म्हणजे चोरी करू नये असे प्रत्येक मानव मनाला वाटणे हीही मानवाची जन्मसिद्ध नैसर्गिक स्वाभाविक प्रवृत्ती आहे. त्यामुळे चोरी त्याज्य आहे.

४) दांपत्य जीवनातील सर्व स्त्रीपुरुष मानवाला असे वाटते की आपल्या पतिपत्नीच्या परस्पर प्रेमात दुसऱ्या कोणाकडून हस्तक्षेप होऊ नये. पत्नीला वाटते की आपला पती दुसऱ्या कोण्या स्त्रीच्या नादी लागू नये. तसेच पतीलाही वाटते की आपली पत्नी दुसऱ्या कोण्या पुरुषाच्या नादी लागू नये. अशी प्रत्येक स्त्रीपुरुषाच्या मानव मनाची जन्मसिद्ध स्वाभाविक नैसर्गिक प्रवृत्ती आहे त्यामुळे. व्यभिचार त्याज्य आहे.

हिंसा, असत्य, चोरी, आणि व्यभिचार हे चारी प्रकार मानवाला त्याज्य आहेत. आणि अहिंसा, सत्य, अस्तेय (चोरी न करणे) आणि अव्यभिचार मानव मनाला ग्राह्य आहेत (यातच मानवत्व आहे.) हिंसादि प्रकार दुःखमय आहे. आणि अहिंसादि प्रकार सुखमय आहे. प्रत्येक मानवालाच नव्हे तर सृष्टीतील सर्व चराचर जीवाला दुःखाची इच्छा नसते. सुखाची इच्छा असणे ही नैसर्गिक सर्व जीवांची प्रवृत्ती असते — आहे. ही दोन्ही प्रकाराची प्रवृत्ती नैसर्गिक स्वाभाविक आहे. त्यात सुखाची इच्छा देवमानवापासून ते कनिष्ठ पशू पक्षी कीट पतंगादि सर्व जीवांना जन्मापासून ते मरणापर्यंत नव्हे तर विश्वारंभापासून ते विश्वांतापर्यंत नैसर्गिक प्रवृत्ती आहे. प्रत्येक जीवाला दुःख नको आहे त्यामुळे १) हिंसा, २) असत्य, ३) चोरी, ४) आणि व्यभिचार त्याज्य आहे आणि १) अहिंसा, २) सत्य, ३) अस्तेय

(चोरी न करणे) ४) आणि अव्यभिचार हे सर्वश्रेष्ठ चार प्रकार मानवाला ग्राह्य आहेत.

हिंसादि प्रकाराच्या आचरणाच्या मानवाला असूर, राक्षस, दैत्य, दानव म्हणतात. आणि अहिंसादि प्रकाराच्या आचरणाच्या मानवाला देव, मानव, ऋषि, मुनी, महात्मा, संत आदि अनेक नावे आहेत. हिंसादि प्रकारातील वैदिक हिंदूंचा विचार या पहिल्या भागात केला आहे. हा भारताचा अशुद्ध असुरी इतिहास आहे. पुढच्या (दुसऱ्या) भागात भारताचा शुद्ध इतिहास पाहू.

भाग २

# भारताचा शुद्ध इतिहास

## हनुमंताचे शुद्ध चरित्र

यत्र ब्रह्म च क्षत्रं च सम्यंच: चरतः सह ।
ते लोकं पुण्य प्रज्ञेषं यत्र देवा सहाग्निना । (यजु. २०-२५)

प्रत्येक मानवात ब्रह्मबल आणि क्षात्रबल या दोहोतून कोणते तरी एक विशेषत्वाने असते. कांही विद्वान असतात त्यांच्यात शारीरिक शौर्य बल नसते. कांहींना शारीरिक बल असते तर विद्वत्ता नसते. विद्या आणि बल ज्याच्यात दोन्ही आहेत तोच पुण्य पुरुष, महापुरुष, दिव्य पुरुष (देव) असतो. तोच राष्ट्रोद्धाराचे, धर्मोद्धाराचे महान कार्य करू शकतो. विद्वत्ता आणि शौर्य हे दोन्ही गुण असलेले महापुरुष, दिव्य पुरुष "राम" "कृष्ण" आणि या दोघापेक्षाही श्रेष्ठ तिसरा "हनुमंत" होता. रामाची, कृष्णाची कीर्ती सर्व जगाला माहीत आहे, त्या प्रमाणेच हनुमंताचीही कीर्ती माहीत आहे. रामाने व कृष्णाने सर्व सुखे भोगून राष्ट्रोद्धार व धर्मोद्धार केला आहे. परंतु हनुमंताने राष्ट्र व धर्मोद्धाराकरिता सर्व सुखाचा त्याग केला आहे, म्हणून राम, कृष्णापेक्षा हनुमंताला श्रेष्ठत्व मानावे लागते: नव्हे श्रेष्ठ होता.

(क) राम आणि कृष्ण या दोघापेक्षा हनुमंत श्रेष्ठ होता.

राम परंपरेने राजा होता. रामाने राजाश्वैर्याचे सुख भागले. कृष्णानें स्वसामर्थ्याने राजाश्वैर्य मिळवून राजाश्वैर्य सुख भोगले. रामाला एक बायको व दोन मुलगे होते. रामाने पत्नी व पुत्र सुख भोगले. कृष्णाला एकच बायको व एकच मुलगा होता. कृष्णाने पत्नी व पुत्र सुख भोगले. रामानें व कृष्णाने सर्व सुखे भोगीत भोगीत राष्ट्राचा व धर्माचा उद्धार केला होता. हनुमंताने राष्ट्रोद्धार व धर्मोद्धाराकरिता सर्व सुखाचा त्याग केला होता. म्हणून राम व कृष्णापेक्षा हनुमंत श्रेष्ठ होता.

हनुमंताला परंपरेचे राज्य होते. त्याला राज्य सुख भोगता आले असते. पत्नी पुत्र सुखही भोगता आले असते. परंतु राष्ट्रोद्धार व धर्मोद्धाराकरिता हनुमंताने सर्व सुखाचा आणि सर्वाश्वैर्याचा त्याग केला होता. म्हणून राम व कृष्णापेक्षा हनुमंत श्रेष्ठ होता.

(ख) हनुमंताचा पूर्व इतिहास.

सुमारे साडे आठ लक्ष (८,५०,०००) वर्षां पूर्वी भारत देशात १) देव, २) आर्य, ३) वानर, आणि ४) राक्षस या चार वंशांचे मानव राज्य करीत होते. देव आणि आर्य उत्तर भारतात व वानर आणि राक्षस दक्षिण भारतात राहात होते. वानर राष्ट्राचा विस्तार वर्तमान आंध्रप्रदेश, मध्य प्रदेशचा काही भाग, मद्रास आणि उत्कल प्रदेशात होता. वानर राष्ट्राचा राजा वाली होता. तो मोठा प्रतापी, शूरवीर, होता. त्याने एकदा महा बलाढ्य राक्षस राजा रावणाला आपल्या बंदीवासात सहा महिने ठेवला होता. वानर वंश, क्षत्रियातील एका उच्चकोटीचे क्षत्रिय होते. त्यांच्यात मोठमोठे राजे महाराजे, सर्वश्रेष्ठ कालावंत, वेद व्याकरणादि शास्त्रवेत्ते, विद्वान पंडित, महायोगी प्रतापी, न्याय नीतिमान, असे सर्वगुण, सर्वसामर्थ्यवान होते. भारता शिवाय भारता बाहेरच्या अनेक राष्ट्रातही होते. बर्मा, शाम, मलाया, इंडोनेशिया, कंबोडिया, सुमात्रा, जावा, बोर्निया, सिंगापूर, ब्रह्मदेश, पाली, सुमात्रा, गांधार (कंधार) इराण आदि देशात पसरलेले होते.

(ग) हनुमंताचे पूर्वज, व हनुमंताचा जन्म.

वानर राष्ट्राची राजधानी किष्किंधा कर्नाटक प्रांतात होती. या

सार्वभौम राज्यांत अनेक मांडलिक राज्यें होती. हनुमंताचा आजा प्रल्हाद नावाचा मांडलिक राजा होता. राजधानीचे नाव चंद्रपूर होते. तो महा प्रतापी, शूरवीर, सद्धर्मप्रेमी, न्यायी, उदार आणि विद्याप्रेमी होता. विद्या प्रेमी, होता म्हणून त्याला विद्याधर ही पदवी मिळाली होती. त्याच्या बायकोचे नाव केतुमती होते. त्याचे राज्य कृष्णा व कावेरीच्या मध्य भागात सर्व सुखाने समृद्ध होते. त्याला पवन नावाचा एकच मुलगा होता. त्याचे ब्रह्मचर्याश्रमातील शिक्षण अगस्ती ऋषीजवळ झाले होते. तो बापापेक्षाही सर्वच गुणाने श्रेष्ठ होता. त्या कालातील वानर क्षत्रियात सिंहासारखा श्रेष्ठ होता. म्हणून त्याला 'केसरी' हे भूषण मिळाले होते. त्यांची पवन व केसरी अशी दोन नावे होती. त्याला अंजनी नावाची बायको होती. तिचे वडील महेंद्रपूरचे मांडलिक राजे होते. त्यांचे नाव महेंद्रराय होते. तो विद्वान, शूरवीर, न्यायी, उदार, वेद व्याकरण विद्येत पारंगत होता. हनुमंताची बायको आणि आई सती साध्वी वेदविद्या पारंगत होत्या. अशा पवित्र क्षत्रिय आर्य राजा पवन व राणी अंजनी यांच्या पोटी वर वर्णन केलेला महावीर हनुमान चैत्र वद्य आष्टमी पुष्य नक्षत्रावर जन्माला आला.

चैत्रमास वदि आष्टमी पुष्य नक्षत्र प्रमाण।
दिन मंगल परभात जन्मलिया हनुमान ॥ (वाल्मिकी रामायण)

(घ) राजकुमार हनुमंताचे गुरू आगस्ती ऋषी होते.

राजा पवन उर्फ केसरी प्रमाणें राजकुमार हनुमंताचे ब्रह्मचर्य आश्रम ज्ञान गुरु आगस्ति ऋषिकडेचं झाले होते. हनुमंताचा आदर्श अखंड ब्रह्मचर्य, अनुपम शौर्य, अप्रतिम नीतिमत्ता, राजनीति कुशलता, अलौकिक पुरुषार्थ, सर्वश्रेष्ठ पांडित्य, आदर्श–सेवाभाव, अद्भूत समर्पण-भाव, अतुलनिय नम्रता असा सर्वगुण संपन्न राजा पवन आणि राणी अंजनीचा मुलगा महावीर हनुमंत महर्षि अगस्तीचा शिष्य होता.

(ड) हनुमान (मारुती) माकड नव्हता. महामानव होता.

महावीर हनुमंत, पितापवन, आजा प्रल्हाद, वाली, सग्रीव, अंगद आदि वानर आर्य क्षत्रिय वीर शेपूट असलेले पशू माकड नव्हते. ते मानव होते. याला आधार वाल्मिकी रामायणात पुष्कळ आहे. विस्तार भयास्तव थोडे प्रमाण पुढे देत आहे.

१. प्रथम भेटीतील मारुती (हनुमंताचे) बोलणे ऐकून राम लक्ष्मणाला म्हणतात की या हनुमंताला ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेदाचे चांगले ज्ञान आहे, तसेच व्याकरणाचेही विशेष ज्ञान आहे.

(वा. रा. कि. कांस्ती ३।२८)

२. राम सुग्रीवाची मैत्री झाली तेव्हां अग्निला साक्ष ठेवण्यासाठी हनुमंताने याज्ञिक ब्राह्मणाप्रमाणे काष्ठ (आरणी) मंथन करून अग्नि निर्माण करून हवन कुंडांत स्थापन केला होता (कि. ५।१४)

३. हनुमंताचे आई वडील अंजनी आणि पवन शेपटाचे माकड नव्हते ते क्षत्रिय आर्य मानव होते. मानवापोटी पशू पक्षी कधीच जन्मत नसतात.

(कि. ६६।८)

४. पाऊस काळ संपल्यावर सीतेचा शोध करण्याकरिता महामंत्री या नात्याने राजा सुग्रीवाला हनुमंताने जो उपदेश केला होता तो वेदज्ञानी विद्वान मानवाशिवाय कोणीही करू शकणार नाही. माकडाला ते जमेल का ? (कि. २८-८-२७)

५. सीतेची शुद्धी करीत करीत जेव्हा हनुमान लंकेतील अशोक वनात गेला. त्याला पाहून सीतेला वाटले की हा रावण आहे. हनुमंताने आपली ओळख करून दिली व सांगितले की मी रामाचा संदेश घेऊन आलो आहे. राक्षसाच्या भीतीमुळे मी रात्रीच्या वेळी लंकेत आलो आहे. तेव्हा सीतेला बरे वाटले. हनुमंत माकड असता तर तो दिवसा उघडपणे लंकेत गेला असता, तो मानव होता. दिवसा आला असता तर त्याला राक्षसांनी तावडतोब ओळखले असते. शुद्धीकार्यास विलंब झाला असता (सुंदर कांड. सर्ग ३५)

६. हनुमान सीतेला संस्कृत भाषेत रामाची कीर्ती वर्णन करून सांगतो. हे कार्य पशू माकड (वानर) करू शकेल कां ?

७. राम हनुमंतास कृतज्ञता प्रगट करून त्याला महापुरुष म्हटले आहे (युद्ध कां. १-७) माकडाला कोणी महापुरुष म्हणेल का ?

८. राम व वाळी संवादात सुग्रीवाला आज्ञा, अंगदाला उपदेश तसेच मानव धर्म शास्त्राविरुद्ध आचरण केल्यामुळे वालीस मृत्यदंड. वालीचा अंत्यविधि [illegible] वैदिक रीतीप्रमाणे केला. या सर्व

प्रकारावरून सिद्ध होते की वानर लोक पशू माकड नव्हते. मानवच होते.

९. उत्तरकांडात लिहिले आहे की जेव्हा रावण वाळी बरोबर युद्ध करायला आला तेव्हा वाळी समुद्रकाठी संध्या करीत होता (अ. का. सर्ग ३४)

यावरून वाटते की वाली साधारण पुरुष होता. परंतु तो वैदिक-धर्मी क्षत्रिय आर्य.उच्च वर्णाचा राजा होता.

या वानर क्षत्रियांचा विचार केल्याबर असे वाटते कीं ही सूर्य वंशातील एखादी शाखा असावी. कारण वालीच्या बापाचे नाव अंशुमान होते. आणि इतर वृद्ध लोकांची नावे सूर्य अथवा सूर्यवंशी असे लिहिलेले वाल्मिकी रामायणांत आढळते. (वा. रा. का. सर्ग ४-१६)

१०. वालीच्या भावाला सुग्रीवाला 'भास्करात्मज' 'सूर्यपुत्रो-महावीर्यः' अशी विशेषणे आहेत.

११. वाली मेला तेव्हां त्याच्या बायकोने विलाप करताना पुष्कळ वेळा आर्य म्हणत दुःख करीत होती.

समीक्षयं व्यथिता भूमै सम्भ्रान्ता नितातह ।
सुत्प्येव पुनरुत्थाय आर्य पुत्रोति शोचती ।। (कि. २०-१३)

१२. जे लोक मानव वानर क्षत्रियाला माकड (वानर) मानतात त्यांनी वाल्मिकी रामायण वाचून पाहावे व सांगावे की माकडाला कोठे वेदवेत्ता ब्राह्मण, मंत्री, म्हटले आहे का ? (वा. रा. कि. कां २६-३५)

१३. सर्वज्ञान, सर्वसामर्थ्य संपन्न महामानव 'राम' माकडाला (वानराला) शरण गेला असेल का ? (वा. रा. कि. ४-१८-१९)

१४. अग्निहोत्र करून वेद मंत्राने अग्नि साक्ष ठेऊन मैत्री दृढ माकड (वानर) करील कां ? (कि. का. ५-१४-१६)

१५. माकडाला (वानराला) शास्त्रशुद्ध पाप पुण्याचे ज्ञान असते कां ? (कि. का. १८-४-४१)

१६. माकडाला राजतिलक, रत्न, धूप, दीप औषधी युक्त जल स्नान आणि हवन यज्ञाग्नि साक्ष ठेऊन राज्याभिषेकाची पद्धत माहीत असते का ? ज्या प्रमाणे वानर क्षत्रियात होती. (कि. का. २६-२४)

१७. माकड (वानराला) आर्य, क्षत्रिय म्हटले आहे का ? (कि. ५५-७)

१८. माकड ( वानर ) पशूमध्ये केतुमतीं, अंजनी, तारा, रुमा नावाच्या पतिव्रता आणि धर्मशास्त्रज्ञानी स्त्रिया असतील का ? ( कि. ३५–३–५ )

१९. माकडाला राजसभेत बोलावले असेल क़ा ? ( उत्तर कां. ४० )

२०. अंगदाने वाली अंतेष्टी संस्कार केल्यावर यज्ञोपवित धारण " ततोऽविन् विधिवद्त्वा सोऽपसव्य चकारह " ( कि. २५-५० )

वाल्मिकी रामयणातील हा सर्व प्रकार वाचून अशा आर्य रत्नाला माकड ( वानर ) म्हणणे निव्वळ महापाप आहे.

२१. सुग्रीव व अंगद यांना राज्याभिषेक व युवराज्याभिषक करायच्या वेळी राम लक्ष्मणाला म्हणतो नगरवासी लोकांना आणि ब्राह्मणाला बोलाऊन सुग्रीवाला राज्याभिषेक व अंगदाला युवराज्याभिषेक कर.

लक्ष्मण तुरत बुलाये, पुरजन विप्र समाज ।
राज दीन्ही सुग्रीव कहँ, अंगद कहँ युवराज ।।

हा सर्व प्रकार माकड ( वानरात ) असेल का ?

वैदिक आर्य हिंदूने महावानव राम, कृष्ण, हनुमान यांना अवतारी इश्वर बनवून, त्यांच्या सिद्धि करिता अनेक प्रकार वेदविरुद्ध आणि अवैज्ञानिक चमत्कारयुक्त कथा निर्माण करून हजारो अधर्म ग्रंथ निर्माण करून भारतीयांचे पूर्वज महामानवाचा शुद्ध इतिहास नष्ट करण्याचे महापाप केले आहे. आणि ते महापाप चालू कालात फारच मोठ्या प्रमाणात चालू आहे. या महापापाला नष्ट करणे अशक्य झाले आहे. हे महापाप कोणी महामानव नष्ट करील का ?

**१. सृष्टी उत्पत्तीचा इतिहास आणि भारत.**

आपल्या चहूबाजूला पसरलेल्या सृष्टी सौंदर्याला पाहून मानव आश्चर्यचकित होतो व आपल्या मनात विचार करतो की,

कुतो इयं विसृष्टि कुर्त आजाताइयं । अर्वाङ्‌ देवा अस्य विसर्जनेन को वेदयत् आबभूव ।

एवढी मोठी सृष्टी कोठून निर्माण झाली, एवढे मोठे जगत कोठून आले, हे कोण सांगेल, सांगणार तरी कसे, सांगणारे कोणी ऋषी-

मुनी, विद्वान सर्व सृष्टीच्या नंतर निर्माण झाले आहेत. असे असता ही सृष्टी कोठून आली आणि कशी झाली ते कोण सांगेल का ?

किती सहज, किती गंभीर, किती मनोहर विचारणीय प्रश्न आहे. याचे समाधान पाहिजे असेल तर आपण ऋग्वेदातील " नासदीय सूक्त " पाहा. ही सृष्टी कोठून आली आहे हे तुम्हा आम्हाला कोणालाही माहीत नाही. परंतु ऋग्वेदात आहे. ही सृष्टी सूक्ष्म अवस्थेत होती त्यावेळी न सत् न असत् (व्यक्त व अव्यक्त) लोकांतर, आकाश, जन्म, मरण, रात्र, दिवस असे काहीच नव्हते. भारतीय शास्त्रात सृष्टी रचनेचे वर्णन केले आहे त्याचा सारांश पुढे देत आहे.

(१) ज्या प्रमाणे मरणानंतर जन्म आणि जन्मानंतर मरण अटळ आहे. त्या प्रमाणे प्रलयानंतर सृष्टी व सृष्टी नंतर प्रलय हें ही अटळ आहे.

(२) कोणत्याही वस्तूचा अथवा पदार्थाचा नाश होत नाही. आधुनिक विज्ञानही या गोष्टीला मानतात. महर्षि कपिल म्हणतात, "नाशः कारण लयः" नाश याचा अर्थ आपल्या मूळ कारणात परिवर्तन होणे. सृष्टीचा नाश अर्थात मूळ कारणाचा नाश केव्हाही होत नाही.

(३) सृष्टीचे मूळ कारण परमाणूरूप प्रकृती आहे. ती साम्य अवस्थेत असल्यास सृष्टी नसते. तिची विषम अवस्था होते तेव्हा सृष्टी निर्माण होते. निरनिराळचा जीवांचे कर्मभोग आणि निसर्गाचा क्रम प्रकृतीत विषम अवस्था निर्माण करते. पाणी सृष्टीच्या माते समान आहे. कारण पृथ्वी पाण्याच्या परमाणूबरोबर आपल्या परमाणूच्या संयोगाने उत्पन्न होते. आणि मेघमंडलात गर्भासमान राहते. सूर्य तिच्या पित्यासमान आहे. यामुळे पृथ्वी सूर्याभोवती प्रदक्षिणा करते. याप्रमाणेच सूर्याचा पिता वायू आहे. आणि आकाश माता आहे. चंद्राचा पिता अग्नि आहे. माता पाणी आहे. वरील प्रमाणे सृष्टीचा क्रम चक्राप्रमाणे चालत आला आहे आणि चालत राहाणार आहे.

(४) महाप्रलय काळात सर्व तत्त्वे विलीन होऊन फक्त प्रकृती राहते.

" आसीदिदं तमोभूत प्रज्ञातम लक्षणम् । अप्रतर्क्यम विज्ञेयं प्रसुप्त

मिव सर्वतः ।। मनुस्मृती १-५ ॥

ही मूळ प्रकृती अंधारात पडल्याप्रमाणे अप्रज्ञात लक्षण (चिन्ह) रहित, तर्काच्या पलिकडे होती.

(५) जगत् निर्मितीमध्ये भाग घेणारे महत्त्वाचे तीन तत्त्वे आहेत.

१. परमात्मा, २. जीवात्मा, ३. प्रकृती. प्रकृती केवळ सत् आहे. जीवात्मा सत् + चित आहे. आणि परमात्मा सत् – चित् – आनंद = सच्चिदानंद स्वरूप आहे.

(६) या तीनही वस्तू अनादि अजन्मा आहेत. या तिन्ही शिवाय सृष्टी निर्माण होत नाही.

(७) सत्व, रज, तम या तिघांच्या साम्यावस्थेचे नाव प्रकृती आहे. प्रकृतीपासून महत् बनते. त्यापासून अहंकार. अहंकारापासून (सात्विक) दहा इंद्रिये आणि मन, अहंकारापासून (राजसिक) तन्मात्रा. अहंकारापासूनच (तामसिक) पंचमहाभूते बनतात. हे चोवीस गुण आहेत. आणि पंचविसावा जीवात्मा वेगळा आहे.

(सांख्य दर्शन १-६)

(८) परमात्म्यामध्ये सृष्टी निर्माण करण्याची जेव्हा इच्छा होते तेव्हा प्रकृतीची साम्य अवस्था भंग होऊन महत् रूप बनते. यालाच अपः (पाणि) सलिल. अथवा नारा। म्हणतात यात चक्राकार गती निर्माण होते. याला प्रकृतीचा अथवा ब्रह्माचा आंडा असे म्हणतात. यालाच हिरण्यगर्भ म्हणतात. याला आधुनिक विज्ञानाच्या भाषेत "नेब्युला" असे म्हणतात. या अंड्यापासूनच अहंकार, मन, इंद्रिय, तन्मात्रा पंचभूत बनतात.

९. परमात्म्याच्या प्रेरणेने तो हिरण्यगर्भ अंड फुटतो. त्याचे दोन भाग होवून १) दिव्य झाला, २) पृथ्वी झाली. त्यानंतर सूर्य, ग्रह, चंद्र, पृथ्वी, समुद्र, पर्वत, वनस्पती, पशू आणि मानव हे सर्व क्रमाक्रमाने निर्माण झाले.

१०. भूमीची प्रथम अवस्था तरल असते. अग्नि आणि वायूच्या संबंधाने तिचे घनत्व वाढत जाते. वरच्या भागात मोठा सूर्य बनत होता. त्याच्या पासून ग्रह नक्षत्र निर्मित होते. चंद्राचे पूर्वरूप बनले होते.

तेव्हा मेघ उत्पन्न झाला. इंद्र शक्ती (विद्युत शक्तीने) वायूच्या सहाय्याने त्याचा नाश केला. कालांतराने तरल भूमि, रेति, कण, नंतर खडे, धोंडे, टेकडया, पहाड, आदि तयार होवून भूमि चांगली कठीण झाली. पहिल्याने पहाड (पर्वत) इकडे तिकडे सरकत होते. कालांतराने सर्व भूमि कठीण झाल्यावर पर्वत स्थिर झाले. प्रथम सूर्य आणि पृथ्वी फार दूर नव्हती. नंतर दोघांत अंतर वाढत गेले. आणि मोठे अंतराळ तयार झाले. भूमीचा सुद्धा विस्तार मोठा झाला. भूमी आणि सोम याच्या योगाने भूमीवर प्रथम बीज उत्पन्न झाले. वनस्पती झाडे झुडपे उगवल्या. अशा प्रकारे भूमीचा वराच मोठा भाग सुशोभित, सुंदर झाला.

११. सूर्याच्या उष्णतेमुळे भूमीचा फारच विकास झाला. मेघ वर्षावामुळे पृथ्वीवर लहान लहान नद्या निर्माण झाल्या. झुळूझुळू वाहू लागल्या. पर्वत दऱ्यात झाडा झुडुपाने जंगल बनू लागले. पर्वत फोडीत नद्या नवीन मार्ग बनवू लागल्या.

१२. पहिली सृष्टी अमैथुनी असते. सृष्टीचे सर्व प्रकार हिरण्य गर्भात (प्रथम अंडयात) सूक्ष्म रूपात बनत असते. पहिल्याने वनस्पती नंतर प्राणी (भोक्ता) जीव निर्माण होतात. सृष्टी उत्पत्तीचा असा वरील प्रमाणे क्रम आहे.

### मानव सृष्टीचा आरंभ

१३. औषधी वनस्पती उगवल्या. आकाशावरोबर गोष्टी करण्यासाठी मोठे मोठे वृक्ष उगवले. भूमी (पृथ्वी) सूर्याभोवती प्रदक्षिणा करू लागली. आकाशात मेघ विजा गडगडू लागल्या. खळखळ करीत नद्या वाहू लागल्या गगन चुंबी पर्वतराज, सर्व आपापली कामे करू लागले. पशू पक्षी सृष्टी सौंदर्यात भर घालीत आनंदाने फिरू लागले.

(१४) आता आली सृष्टीला शोभा देणारी परमेश्वराची सर्वात श्रेष्ठ कलाकृती मानव. हा कसा निर्माण केला असेल हा प्रश्न मनात सहज निर्माण होतो आता चालू काळात आपापले माता पिता प्रत्यक्ष आहेत. त्यावेळी जर कोणीच नव्हते तर मानव निर्माण कसे झाले. प्रभाकर संझगिरो यांनी लिहिलेल्या "मानवाची कहाणी" नावाच्या ग्रंथात लिहिले आहे की माकडाचा विकास मानव आहे.

(१५) मागे लिहिल्याप्रमाणे सृष्टीचे मुख्य तत्त्व नष्ट होत

नाहीत. त्याचे रूप बदलत असते. सृष्टीचे मुख्य तत्व तीन आहेत. (१) परमात्मा सत् चित् आनंद स्वरूप एक (२) आत्मा (जीव) सत् चित् रूप परंतु अल्प शक्ती असणारे अनेक (३) प्रकृती त्रिगुण परमाणु युक्त सद्रूपी ज्ञान रहित. ही तीनही तत्वे स्वभावासह अनादि आहेत. आणि अनंत काळ राहतात.

परमात्मा सत्य ज्ञान आनंद रुपी आहे. उत्पत्ती, स्थिती, लय ही तीनही कार्य त्यांच्या स्वाभाविक क्रियेने चालतात. प्रकृती जीवाच्या योग्य वस्तूत भर घालीत असते. प्रकृतीला ही प्रेरणा आणि गती परमात्म्याकडून मिळते. आत्मा (जीव) सुख, दुःख, इच्छा, द्वेष, ज्ञान प्रयत्नयुक्त असल्यामुळे स्वेच्छेने कर्म करतो व वासनाबद्ध होतो. कर्मानुसार भोगही भोगतो. परमात्मा सर्वज्ञ आहे तो जीवाच्या कर्मानुसार निरनिराळे शरीर (योनी) देतो.

(१६) जे सूक्ष्मावस्थेत परमाणू होते ते सूर्य, चंद्र, पृथ्वी, आकाश, वायू, जल, अग्नि आदि रूपात प्रभू प्रेरणेने येवू लागली. हे जे सर्व तयार झाले तेव्हा आपल्या अनादि कर्मवासनेला घेवून परमाणू रूपात असलेल्या जीवांना मानव शरीर मिळण्याची व्यवस्था सृष्टी निर्माणकर्त्या इश्वराकडून होवू लागली. प्रथम मानवाचे शरीर लहान बालकाप्रमाणे नव्हते. ते तरुण अवस्थेत होते, कारण लहान बालकाचे संरक्षण कोण करणार. याप्रमाणेच सुरवातीला सर्व पशू पक्षी कृमी किडे आदि तरुण अवस्थेत निर्माण झाले.

या सृष्टीला अमैथुनी सृष्टी (स्त्री-पुरुषांच्या समागमाशिवाय) म्हणतात. पुढे नंतर मैथुनी सृष्टी (स्त्री-पुरुषाच्या समागमाने) सुरू झाली. आधुनिक विज्ञानाच्या विचाराने (संशोधकाच्या) दृष्टीनेसुद्धा प्रथम अमीबा आदि अमैथुनी सृष्टी होती.

(१७) वनस्पती, वृक्ष, पशू, पक्षी निर्माण झाल्यानंतर मानव उत्पन्न झाला. प्रथम मानवात (१) ब्रह्मा (२) भृगु (३) अग्नि (४) वायू (५) आदित्य (६) अंगिरा (७) अत्रि आदि सप्त ऋषी फार प्रसिद्ध होते. यांच्या नावावर भारतीय गोत्र चालू आहेत. पुढे मानव सृष्टीचा विस्तार होवू लागला. या प्रथम मानवात एकवीस प्रजापती होते. त्यात काश्यप आणि दक्ष प्रजापती प्रसिद्ध होते.

हळू हळू पृथ्वीवर मानवाचा विस्तार होवू लागला.

(१८) विकासवादी लोक आदि कालातील मानव असभ्य होते असे मानतात. भारतीय परंपरा हे मानीत नाही. भारतीय परंपरेत ब्रह्मा, स्वायंभूव सप्त ऋषीमध्ये भृगु अंगिरा आणि अत्रि (अरबी भाषेत मद्रीस) आदि व प्रजापती मध्ये काश्यप आणि दक्ष आदि महान विद्वान होते. ते ऋषी होते: ते रजोगुण तमोगुण रहित असल्याने त्यांचा महान आत्म्याबरोबर सतत संबंध होता.

विकासवादी इश्वर सर्व व्यापक मन अथवा महान् आत्म्याला मानीत नाहीत व ते मानवाचा विकास हळूहळू झाला असे मानतात. या विरुद्ध महान आत्म्याचे अस्तित्व मानणारे आदिमानवाला उत्तम ज्ञानवान मानतात. भारतीय इतिहास यालाच पुष्ठचकारक आहे.

(१९) प्रथम मानव सृष्टीत कोणी राजा नव्हता. कारण सर्व लोक सदाचार संपन्न व निर्लोभ होते. कोणालाही दंड देण्याची आवश्यकता नव्हती. धर्मानुकुलतेने वागणाऱ्याला राजाची आवश्यकता नसते.

यहुदी, मुसलमान यांच्या ग्रंथात भूमीवर अन्न, फल, फूल, कंद, भरपूर होते. परंतु मानव (नर) संख्या फारच थोडी होती. व नर निःसत्व होते. हे अगदी चुकीचे आहे.

२०) **सृष्टी रचना काल व मानव सृष्टी रचना काल :–**

सृष्टी रचना करणे हे परमेश्वराचे सहज कर्म आहे. तसेच प्रकृतीचा (परमाणूचा) स्वभाव विकृत होवून सृष्टीरूप होणे, हा प्रकृतीचा नियम आहे.

जीव, इच्छा, ज्ञान व प्रयत्न करणारा असल्यामुळे सृष्टीमध्य त्याचे आवागामन होत राहणार. प्रकृती सृष्टीचे रूप घेत राहणार आणि जीव कर्म फल भोगीत राहणार यामुळे सृष्टी प्रलयाचा आरंभ आणि समाप्त होणार नाही. सृष्टी प्रलयाचे चक्र दिवस रात्री सारखे अनादि आणि अनंत आहे. अर्थात सृष्टी प्रवाह अनादि आहे. परंतु सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत चालू दिवसा प्रमाणे वर्तमान सृष्टी आदि आणि सात आहे. अर्थात ज्याप्रमाणे दिवसा अगोदर रात्र आणि रात्री पूर्वी दिवस तसेच दिवसा नंतर रात्र आणि रात्रीनंतर दिवस

असा प्रकार सतत चालू आहे. त्या प्रमाणे सृष्टी पूर्व प्रलय आणि प्रलयापूर्वी सृष्टी तसेच वरील दिवस रात्रीप्रमाणे हे चक्र अनादिकाला-पासून चालत आहे. याप्रमाणे सृष्टी प्रलय चक्राचा आदि अंत नाही. परंतु वर्तमानसृष्टी यादी आहे. तिचा रचना काल आहे त्याचा विचार करू.

२१) सृष्टी उत्पत्ती काल विषयात पाश्चात्य विद्वानांचे मत होते की इ. स. पूर्व २००० दोन हजार वर्ष सृष्टी उत्पन्न झाली. नंतर दोन-तीन हजार पूर्वपेक्षा वाढत ४००० हजार वर्षपूर्वपर्यंत आले. परंतु जसे जसे भू-गर्भ संशोधन होत गेले आणि विज्ञान उन्नती होत चालली तेव्हा विज्ञानज्ञानी वास्तविकतेच्या जवळ येत गेले. उदा० प्रसिद्ध इतिहासकार विद्वान श्री फ्लिटस् महाशय याने आपले पुस्तक आइक्नोग्राफीमध्ये लिहितात की आम्हाला प्राचीन मिश्रच्या ममीमध्ये अनेक प्रमाण मिळत आहेत की पाचव्या वंशातील एका कबरमधून ती काढली आहे. ही ममी (प्रेत) ५००० पाच हजार वर्षापेक्षा जुनी आहे. हे नूहच्या जलप्लवनच्या समयापेक्षा पूर्वीची आहे. तीत आम्हाला त्या समयाची माहिती मिळाली आहे.

२२) याप्रमाणे पाश्चिमात्य वैज्ञानिक आणि ज्योतिषी दोन चार, सहा, हजार वर्षापेक्षा वाढत वाढत हजारो वर्षापूर्व सृष्टीची उत्पत्ती सांगत आहेत. प्रोफेसर कोंब यांनी आपले पुस्तक 'पॉप्युलर' एस्ट्रोनामी 'मध्ये लिहिले आहे की, जेव्हा पृथ्वी थंड होऊन वनस्पती उगवण्याच्या योग्य झाली तेव्हापासून आजपर्यंत एक कोटी वर्ष झाले असतील. प्रा. कॉल यांनी लिहिले आहे की, पृथ्वी थंड झाल्यापासून या चालू दशेला यायला कमीत कमी सात कोटी वर्षे लागले असतील. याच प्रमाणे प्रा. टाम्सन लिहितात की दहा कोटी वर्ष, प्रा. निश्चाल यांनी उष्णक्रमाच्या आधारावर २५ कोटी वर्ष. प्रो. रेड यांनी ५० कोटी वर्षाचा अनुमान केला आहे. परंतु प्रसिद्ध भूतत्व विद्याविशारद प्रा. हक्सले यांनी पूर्ण संशोधनांती ही गोष्ट सिद्ध केली आहे, की वनस्पती आरंभापासून आजपर्यंत कमीत कमी एक अब्ज वर्ष झाले असतील. परंतु यूरेनियम आणि रेडियम धातूआधारे परिक्षण केल्या-नंतर विज्ञानाकडून याच्याही पुढे वैदिक सिद्धांताच्या जवळ जवळ दोन अब्ज वर्षाला पुष्टी केली आहे. येल विश्वविद्यालयाचे प्रा. शूचर्ट

तसेच प्रो. ब्राऊन यांनी ही जोतिषाचे आधारावर जवळ जवळ दोन अब्ज (दोनशे कोटी) वर्षांचा अंदाज लावला आहे. या संदर्भात ट्रिब्यूनच्या १३ जुलै १९७५ च्या अंकातील हा समाचार पहाण्यासारखा आहे. त्यात ऐरिजोना विश्वविद्यालयाच्या वैज्ञानिक प्रो. नागी आणि जुमवर्ग यांनी दक्षिण आफ्रिकेच्या ट्रांसवाल प्रदेशात मिळालेल्या चट्टानोच्या आधारावर मानव जीवनाचा आरंभ दोनशे तीस कोटी वर्षापूर्वी सिद्ध केले आहे.

(२३) वरील विवेचना वरून असे वाटते की वैज्ञानिक अनुसंधान अथवा पुरातत्व विभाग संशोधनाधारे संशोधन करून काढलेल्या वस्तूंच्या आयुष्याच्या आधाराने वर्तमान सृष्टीचे आयुष्य निश्चित करता येत नाही. कारण ज्यावेळी वैज्ञानिकांना ज्या प्रमाणे साहित्य उपलब्ध झाले त्यानुसार त्यांनी सृष्टीच्या उत्पत्तीच्या काळाचा अनुमान लावला आहे,

वर्तमान सृष्टीचे आयुष्य निश्चित करण्याकरीतां कोणत्यातरी योग्य प्रमाणाची आवश्यकता आहे. सर्व प्रथम हे पाहावे लागेल की या संबंधात जगातील प्राचिन ग्रंथ वेद काय सांगतात ? सृष्टीचे संपूर्ण आयुष्यस्थिती कालाचा काल अथर्व वेदात लिहिला आहे की,

**शतंतेऽयुतं हायनान्द्वे युगे त्रीणि चत्वारी कृण्मः**

(अथर्व ८/२/२१)

एक ब्रह्म दिवस (सृष्टीचा स्थिती काल) चार अब्ज, बत्तीस कोटी वर्षाचा असतो. आणि इतक्याच वर्षांची एक ब्रह्मरात्र (प्रलय) असते. मनुस्मृतीच्या पहिल्या अध्यायात याची गणना खालील प्रकारची आहे.

देविकांना युगानांतु सहस्त्रां परिसंख्यया ।
ब्राह्ममेकमहर्ज्ञेयं तावती रात्रिरेव च !

एक हजार दिव्य युग अथवा एक हजार चतुर्युगाचा एक दिवस आणि इतक्याच दिव्य युगाची ब्रह्म रात्र असते. या संपूर्ण गणतीचा हिशोब वर्षाच्या प्रकारात केला आहे. सर्व प्रथम सृष्टीचा स्थिती काल ( चार अब्ज बत्तीस कोटी) आहे. सत्ययुग (कृत्ययुग) त्रेतायुग द्वापार आणि कलियुग असे चार भागात वाटणी केली आहे. कलि-

युगाच्या दुप्पट द्वापार. तिप्पट त्रेता आणि चौपट सत्ययुग असा प्रकार आहे. चार युगाची वर्ष गणना याप्रमाणे आहे.

भारतवर्षका शुद्ध इतिहास ग्रंथाधारे आहे.

कृत युग/ सत्य युग १७, २८, ००० वर्ष.
त्रेता १२, ९६, ००० वर्ष.
द्वापार ८, ६४, ००० वर्ष.
कलियुग ४, ३२, ००० वर्ष.

एका चतुर्युगाची संख्या = ४३, २०, ००० झाली आहे. पुनः या प्रमाणे ७१ चतुर्युगाचा एक मन्वंतर होतो. म्हणजे ४३, २०, ००० १७१ = ३०, ६७, २०, ००० तीस कोटी सदुसष्ट लाख वीस हजार वर्षाचा एक मन्वतर होतो. या प्रमाणे चौदा मन्वंतराचा एक ब्रह्म दिवस (सृष्टीचा स्थिती काल) असतो. त्याबरोबरच ६ सहा चतुर्युगाचा काल मानव सृष्टी पूर्वीचा काल आहे. काही विद्वानांच्या मते १४ मन्वंतराचा १५ संधी काल आहे. एक संधी काल समय कृत युगा इतक्याच वर्षाचा अर्थात १७, २८, ००० वर्ष आहे. श्री. डॉ. काशिनाथ शास्त्री एक हजार चतुर्युगाला १४ मन्वंतरात वाटणी करून १ मन्वतर ७१ ३/७ चतुर्युगाचा मानतात. या प्रमाणे एक चतुर्युगाचा महायुग = ४३,२०, ००० वर्ष.

| | |
|---|---|
| ७१ चतुर्युग अथवा १ मन्वंतर | = ३०,६७,२०,००० वर्ष. |
| १४ मनवंतर [७१ × १४] = ९९४ महायुग | = ४२,९४,०८,०००० |
| [ ३०,६७,२०,००० × १४ ] | |
| ६ चतुर्युग अथवा १५ संधी काल | -- २,७९,२०,००० |
| | ४३,२०,००,०००० |

[ चार अब्ज बत्तीस कोटी ] = १ कल्प

आता याला आपण संक्षिप्त प्रकारात समजून घेऊ.

एक चतुर्युग अथवा महायुग = ४३,२०,००० वर्ष

एक हजार [ ९९४ + ६ ] चतुर्युग अथवा
एक हजार महा [ दिव्य ] युग = बरोबर १ कल्प } ४३,२०,००००००
अथवा एक ब्रह्मदिवस [४३,२०,००० × १०००]

सृष्टीचा स्थिती काल ४ अब्ज ३२ कोटी सिद्ध झाल्यानंतर वर्तमान सृष्टी केव्हा उत्पन्न झाली हे पाहाणे आवश्यक आहे. आत्तापर्यंत किती वर्षे होवून गेले. आतापर्यंत ६ मनवंतर (१) स्वायंभुव (२) स्वारोचिश (३) औत्तमी (४) तामस (५) रैवत (६) चाक्षुप होवून गेले. आणि सातवा [वेवस्वत] चालू आहे. वरील गणनेनुसार याप्रमाणे होते.

(१) होवून गेलेल्या ६ मनवंतरीचा समय = १८४०३२००००
(एक अब्ज चौऱ्याऐंशी कोटी तीन लक्ष वीस हजार)

२) सातवा मन्वंतर चालू आहे तो त्याच्या ९७ चतुर्युगाच्या समय = ११,६६,४०,००० अकरा कोटी सहासष्ट लक्ष चाळीस हजार

३) २८ वा चतुर्युग चालू आहे तो त्यातून तीन होवून गेलेले (कृत त्रेता द्वापार युग) चा अवधी = ३८,८८,००० वर्षे

४) चौथा कलियुग त्याचा समय (विक्रम संवत २०३८ अथवा २६ मार्च १९८२ पर्यंत = ५०८२

सर्व मिळून = १,९६,०८,५३०,८२

हाच मानव-सृष्टी संवत आहे. विशेष म्हणजे वरील सृष्टी संवत मेष संक्रांती चैत्र महिन्याच्या शुद्ध १ (प्रतिपदा) ला चालू होतो. याला आर्य संवतही म्हणतात. ब्रह्म दिवस, वैवस्वतादि वनांतराचा आरंभ, सत्य युगादी युगाचा आरंभ सृष्टी संवता प्रमाणेच चैत्र शुद्ध प्रतिपदेलाच होतो. सृष्टी निर्माण झाल्या पासून आर्य संवत्सराचा आरंभ पर्व चैत्र शुद्ध प्रतिपदेला मानण्याची प्रथा आजतागायत चालू आहे. पुढे कलि संवत विक्रम संवत आदी आर्यांचे सर्व संवत चैत्र शुद्ध प्रतिपदेलाच आरंभ होतात. (केले जातात).

काही विद्वान ६ चतुर्युगाचा काल १४ मन्वंरातील १५ संधी काल मानून एक संधीचा काल १७२८००० वर्षे धरून आज पर्यंत सात संधीचा काल १,२०,९६,००० वर्षे आत्तापर्यंत संधीचा काळ.

१,२०,८६,००० वर्षे संवत काळात मिळवून सृष्टीचा काळ १,९७,२८,४१,०८२ वर्षे मानतात आणि सृष्टी व मानव संवत

१,९७,२८,४९०८२ वर्ष मानतात.

मानव सृष्टीची ही काल गणना आर्यांच्या संकल्प पाठात सर्वसिद्ध आहे. सृष्टी उत्पत्ती पासून आजपर्यंत आर्य लोक दिवसेंदिवस मोजतात, आणि क्षणापासून कल्पांतापर्यंतचे गणित विद्येला या संकल्प पाठाच्या माध्यमाने प्रसिद्ध करीत आले आहेत. हा संकल्प पाठ संपूर्ण भारतात एक सारखा आहे. कोठेही याच्यात वदल (विरोध) नाही. त्यामुळे याला खोटा म्हणता येत नाही. वैज्ञानिक शोध सुद्धा आता याला सत्य मानू लागले आहेत. काही दुराग्रही पाश्चात्य इतिहासकार आणि त्यांच्या परंपरेतील भारतीय इतिहासकार मानव सृष्टीचा काळ काही हजार वर्षापेक्षा अधिक मानत नाहीत. काही भारतीय मानव सृष्टी वैस्वत मनुपासून मानतात. परंतु हे खरे नाही. कारण मानव सृष्टी प्रथम (स्वायंभूव) मनवंतरात झाली आहे. जरी ही दुसरी कल्पना मानली तरी हा काल १२,०५,३३०,८२ बारा कोटी पाच लक्ष तेहतीस हजार व्याऐंशी वर्ष होतात. सृष्टीतील काही प्राचीन देशाचे संवत ही भारतीय आर्यांच्या काही घटनांचे द्योतक आहेत. असे सांगता येते की मनुष्य कोट्यावधी वर्षापासून आपली ऐतिहासिक वर्ष संख्या चालवित आले आहेत.

येथे आम्ही सर्व देशात प्रचलित असलेले काही प्रमुख संवतांची माहिती खाली देत आहो:—

| | |
|---|---|
| १. शालीवाहन संवत (शालिवाहन पासून) | १,९०४ |
| २. इसवी सन (येशूच्या जन्मापासून) | १,९८२ |
| ३. विक्रम संवत (विक्रमाच्या राज्याभिषेकापासून) | २,०३८ |
| ४. हिजरी संवत (हजरत महमद मक्केहून मदिनेला गेला तेव्हा पासून) | १;४०० |
| ५. बौद्ध सं. (बुध्दापासून) | २,५०६ |
| ६. इब्राहिमी सं (इब्राहिम पासून) | ३,९०३ |
| ७. युधिष्ठीर सं (युधिष्ठिराच्या राज्याभिषेका पासून) | ५,०८२ |
| ८. कलियुग सं (कलियुगाच्या आरंभापासून) | ५,०८२ |
| ९. (इबरानी सं. बायबल मध्ये आदमच्या उत्पत्ती पासून) | ५,९८६ |
| १०. इजिप्सीयन सं (आर्य इजिप्तमध्ये गेल्यापासून | २८,६३४ |

११. फिनिशियन (आर्य फिनिशियनला गेल्यापासून) ३०,०५२
१२. इरानी संवत (इरानच्या प्रथम राजापासून) १८९९५२
१३. ज्योतिष विषयकचा चाल्डियन संवत ४७,००५५
१४. चाल्डियन सं. (चाल्डियनच्या म्हणण्याप्रमाणे सृष्टीआरंभापासून २,१५,०००५५
१५. खताई (संवत खतानगरी प्रथम बसल्यापासून) ८,८८,४०,२५५
१६. पीनी संवत प्रथम चीनी राज्यापासून ९,६०,०२,४८२
१७. मानव आर्य संवत (वैवस्वत मनुपासून मानल्यास) १२०,५३३,०८२
१८. शुद्ध मानव संवत्सर आणि आगम संवत्सर १९६,०८५,३०८२
१९. सृष्टीचा उत्पत्ती काल १९७,२९,४९,०८२

या वरील प्रकारावरून पाश्चात्य विद्वान आणि त्याचे अनुयायी भारतीय विद्वानाचे सृष्टीच्या आरंभापासूनच्या विषयाचे मत सृष्टी-निर्मितीचा काल काही हजार किंवा काही लक्ष वर्ष झाले आहे, या मताचे खंडण होत आहे.

### ४. मानवाचे आदि स्थान

१४. आदिमानव प्राणी एकाच ठिकाणी निर्माण झाले का वेग-वेगळ्या ठिकाणी या प्रश्नाचे उत्तर फार दिवसापूर्वीच्या विधानाचे मत दोन प्रकारचे होते.

१. मनुष्य माकडाचा विकास आहे. ज्या ज्या ठिकाणी माकडे जास्त राहतात त्या त्या ठिकाणी माकडाचा विकास होऊन मानव तयार झाले.

२. मानव माकडापासून नाही परंतु वन मानवापासून विकसित झाले आहे. मानवाचा जन्म जेथे वन मानव राहतात त्या त्या ठिकाणी मानव झाले. परंतु वैज्ञानिकांनी नवीन नवीन संशोधनाच्या आधारे डारविनच्या विकासवादाचे पूर्ण खंडण केले आहे. आणि मानव माकड किंवा वनमानवाचे वंश आहे या मताचे खंडण केले आहे. तेव्हापासून हा प्रश्न निर्माण होत नाही, की मानव एकाच ठिकाणी किंवा वेगवेगळ्या ठिकाणी निर्माण झाला. भूगर्भ शास्त्राच्या विकासा-मुळे असे सिद्ध झाले आहे की, सृष्टीवर जितके प्राणी आहेत, त्या सर्वाचा वंश विस्तार एकाच ठिकाणी आणि सारख्या परिस्थितीत

झाला आहे. आणि मानव जातीची मूळ भाषाही एकच होती.

आम्ही पाहात आलो की कोणत्याही कुठल्याही भूमीवर आपोआप वृक्ष उगवत नाही. बीज लावल्याशिवाय वाऱ्या वादळाने पशु पक्षाने कोणत्याही अन्य प्रकारे वृक्षाचे बीज पडल्याशिवाय आणि त्याला अनुकूल हवा पाणी असल्याशिवाय वृक्ष उगवत नाही. या बीज आणि भूमी प्रमाणेच मानव कुठल्यातरी ठिकाणी पहिल्याने निर्माण झाले आणि नंतर सर्व जगभर अनेक ठिकाणी गेले.

**मानव निर्माण होण्याकरिता योग्य ठिकाण**

१. ते ठिकाण जगातील सर्व भूभागापेक्षा उंच असले पाहिजे. प्रथम थंड होऊन पाण्यातून पहिल्याने बाहेर आलेले असले पाहिजे

२. त्या ठिकाणी शीत उष्ण दोन्ही समान असले पाहिजे.

३. त्या ठिकाणी मानवाला खायला फळ, मूळ आणि अन्न सहज मिळाले पाहिजे.

४. त्या ठिकाणी आजही पहिल्या मानवांच्या रंगरूपाचे मानव राहत असले पाहिजे.

५. त्या ठिकाणचे नाव सर्व जगातील मानवाला माहीत असले पाहिजे.

६. असे ते ठिकाण म्हणजे भारतातील हिमालय पर्वत आहे. हा सर्वात जुना आहे. आणि सर्वात उंच आहे. हीच भूमी सर्व प्रथम पाण्यातून वर आली आहे. याच भूगर्भातून लावारस (तप्त पातळ पदार्थ) फार पुष्कळ बाहेर पडतो.

**२६. प्रलय काळात सर्व पृथ्वी पाण्याने भरलेली होती**

त्या पाण्यातून सर्वप्रथम हीच भूमी वर आली. तेथेच सर्व वनस्पती उगवल्या. पशु पक्षी आणि मानवही सर्व प्रथम त्याच ठिकाणी उत्पन्न झाले आहेत. हीच भूमी (पर्वत) सर्वात उंच आहे. यावरून असे सिद्ध होते की सृष्टीतील सर्वश्रेष्ठ सर्वात उंच हिमालय पर्वतच सर्व प्रथम प्रगट झाला आणि तेथेच सृष्टी उत्पन्न झाली. अमेरिकेचे प्रसिद्ध विद्वान, हेविस आपल्या हारमोनिया नावाच्या पुस्तकाच्या पाच भागात तसेच जर्मनचे ओकम (          ) साक्षीसहीत लिहितात की

हिमालय सर्वात उंच पर्वत आहे. त्यामुळे आदि सृष्टी हिमालयाच्या जवळच कोठेतरी झाली असावी, स्वामी दयानंदाने सृष्टी सर्वात प्रथम तिबेटात झाली असे लिहिले आहे. तिबेट हा हिमालयाचाच एक भाग आहे.

प्रथम मानवाच्या उत्पत्तीकरीता आणि विकासाकरीता समशीतोष्ण हवा पाणी आवश्यक आहे. हिमालयावर समशीतोष्ण हवा पाणी आहे. हिमालयावर फळे अन्न वनस्पती आणि इतर खाद्यपदार्थ भरपूर आहेत. तेथे पुष्कळ दूध देणारे पशू आणि अनेक तऱ्हेच्यां अनेक रंगाच्या गोड रुचकर फळांची झाडेही पुष्कळ आहेत. मानवाच्या अगोदर वनस्पती, वृक्ष, पशू तेथेच निर्माण झाले होते. अशी समशीतोष्ण हवा-पाणी असते तेथेच पशू पक्षी मानवादि सर्व प्राणी राहू शकतात. तात्पर्य असे आहे की, सर्व प्रथम वृक्ष, वनस्पती, पशू पक्षी मानवादि सर्व सृष्टी एकाच ठिकाणी हिमालयावर निर्माण झाली आहे.

२७. जगात जितक्या रंगरूपाचे मानव आहेत त्यात मुख्य चार रंगाचे आहेत.

१. पांढरा रंग लांबट आकृतीचे ( काकेशस् )
२. पिवळा रंग पसरट आकाराचे (मंगोलिक)
३. काळा रंग मोठ्या आकाराचे (इथियोपिक – नीग्रो)
४. लाल रंग पातळ आकाराचे ( रेड इंडीयन)

अशा चारी रंग आकाराचे मानव काश्मीर भागातील ब्राह्मण आहेत असे सिद्ध होते. एका मोठ्या भाषाशास्त्रज्ञाच्या आधाराने टेलर महोदय म्हणतात. मानव जातीची जन्मभूमी स्वर्गतुल्य काश्मीर आहे.

बंगालचे पुरातत्व विशारद श्री बाबू अनिवाश चंद्रदास आपल्या ऋग्वेदिक इंडिया पुस्तकात लिहितात की आर्यांचे आदि जन्म ठिकाण काश्मीरच आहे. आर्यमानवाच्या सर्व प्रकारच्या रंगरूपाचे मानव आज सुद्धा काश्मीरमध्ये आहेत. आदि सृष्टी हिमालयावरच झाली आहे. आदि मानव आणि मूळ आर्य एकच आहेत. विस्तार भयास्तव थोडक्यात लिहीत आहे. (सविस्तर मूळ ग्रंथ ' भारत वर्षका शुद्ध इतिहास ' या ग्रंथात पहावे ).

२८. हिमालयाचे दुसरे नाव मेरुपर्वत आहे.

याला भारतीय आर्य मेरू म्हणतात. झेंद भाषिक इराणी लोक "मौरु" म्हणतात. युनानी लोक "मेरोस" दक्षिण तुर्कस्थानी लोक "मेरुव" म्हणतात. मित्र लोक "मेरई" आणि असिरीयन लोक "मोरूख" म्हणतात. इराणीं आणि भारतीय आर्य आपल्या आदि पुरुषाचे मूळ ठिकाण हिमालय आहे म्हणतात.

काही देशाचे लोक मूळ सृष्टीच्या उत्पत्तीचे ठिकाण वेगवेगळे सांगतात. भारतीय विव्दान भारतातच पण काश्मीर, कुरुक्षेत्र सांगतात. पुष्कळ विव्दानांच्या मते प्रथम सृष्टीचे उत्पत्तीचे ठिकाण हिमालय आहे.

मानवाचे प्रथम स्थान. हिमालय अथवा भारत आहे. आणि भारतातूनच मानव वंश साऱ्या जगात पसरले आहेत. सृष्टीतील पहिला मानव भारतीय होता. आणि आर्य होता. सर्वश्रेष्ठ होता. परमेश्वरानें मानवाला (आर्याला) "अहम् भूमिम् अददाम आर्याय" ही भूमी आर्यांना दिलेली आहे आणि त्याला सांगितले आहे की "कृण्वंतो विश्वमार्यम्" साऱ्या जगाला आर्य बनव. अर्थात सर्व जगात आर्यत्वाचा विस्तार कर असा उपदेश आदि देव मानवाने (ऋषिमुनीने) वेदात केला आहे.

सर्व सजातील मानवाची जन्मभूमी भारत आहे.

विव्दान जेकोलेट भूतपूर्व मुख्य न्यायाधिश सुप्रीम कोर्ट चंद्रनगर आणि विव्दान वानशोडर प्रो. संस्कृत केल युनिव्हर्सिटी (जर्मन) यानी (दोघांनी) आपल्या पुस्तकात सिद्ध केले आहे की सर्व जगातील देशात भारतीय आर्यांनीच प्रथम वस्ती केली आहे आणि वेगवेगळी राज्ये स्थापन केली आहेत. या दोन पुस्तकांच्या आधारे भारतीय आर्यांची प्राचीनता सिद्ध होते. भारतीय आर्य प्राचीन काळी भारताबाहेर जाऊन राहिल्याचे काही विव्दानांचे मत पुढील प्रमाणे होते.

३० शोडर महोदय लिहितात की अती प्राचीन काळी काही भारतीय आर्य भारताबाहेर उत्तर पश्चिमेला गेले. पहाडी भाग पाहून अफगाणिस्थान वसविले हे लोक सोमवंशाची एक शाखा होती. त्याचे वर्णन महाभारतात आले आहे. त्यांनी त्या देशाचे नाव अफगानिस्तान ठेवले.

३१. काही आर्य लोक पश्चिमेकडे गेले. ते आपणाला करात

म्हणत होते. आपल्या नावाप्रमाणे त्या देशाचे नाव करात ठेवले. हे लोक फार उंच होते. तेथे त्यांचा मोठा विस्तार झाला. करात नावाचा बदल होता होता त्या देशाचे नाव बलुचिस्तान झाले. या दोन्ही देशातील लोकांना पठाण म्हणतात. संकृत पुष्टान (युष्ठांग) या शब्दातील ष काढून टाकून पुठाण, नंतर पठाण असा बदल झाला ताहे.

३२. त्यातील काही लोक पुढच्या देशात गेले. हे सर्व लोक एकोप्याने रहात होते, त्यामुळे त्या देशाचे नाव आर्यस्थान ठेवले. त्यातील स्थ जाऊन आर्यन राहिले. आर्यनचे इरान (इराण) झाले तेथील सर्व गावाची नावे संकृत भाषेचा अपभ्रंश आहेत. ते असे शुध्द :– भूखारा, अशुध्द :– बुखारा, शु. :– समरखंड, अ.:–समरकंद शुध्द :– शिवस्थान, अ. :– सरीस्तान, शु. :– अश्वस्थान अ. अस्सहान, मुळचे शुध्द असलेले नंतर अशुध्द झाले आहे.

३३. यांच्या पुढे गेलेले लोक विखा राजाचें वंशज होते. त्यांनी आपल्या देशाचे नाव तखान ठेवले. त्याचा अपभ्रंश होऊन तुरान नाव आता त्याला तुर्कस्तान म्हणतात. सर आस्टिन ओरोल म्हणतात की दुर्गपालाने चीनी तुर्कस्थान येथे आपले राज्य स्थापन केले. रुद्राक्ष राजाचा तिसरा मुलगा लोकेक्ष याने ( तो भारतातील प्रयागचा राजा होता ) तुर्कस्थानात फारच मोठी राजधानी बनविली. प्रो. मूसर यांना तुखारी भाषेत एक पुस्तक मिळाले आहे. त्यात हे सर्व लोक भारतीय आर्य होते असे सिद्ध झाले आहे. कर्नल टाडने लिहिले आहे की, तरू राजाच्या मुलांनी हे स्थान वसवले आहे. मजहिब नावाच्या पुस्तकात लिहिले आहे की, आफगानीस्थान, सिस्तान, निरावल, काखरस्थान आणि सुडान येथील सर्व लोक इ. स. पूर्व ५० वर्षा पर्यंत आपणाला भारतीय म्हणत होते. हे सर्व भारतीय आर्य होते.

३५. काही आर्य इराणच्या पुढे युरोपमध्ये गेले. त्यांनी पुढच्या देशाचे नाव "आर्यवाह" ठेवले. त्याचा अपभ्रंश होऊन अरबिया झाले. तेथे काही लोक राहिले. तेथील चांगले घोडे पाहून देशाचे नाव अर्वस्थान ठेवले. या नावाचे परिवर्तन होऊन आरबस्थान झाले आहे.

३५. काही आर्य उत्तर पश्चिमेला गेले होते. त्यांनी आमीनिया नावाचा देश स्थापन केला. तेथे मलाना (मलानी सूर्यवंशी) उपदेष्टी

(खत्री) याचे जुने लेख संशोधनात सापडले आहेत. विद्वान विनकालर यांनी काढले आहेत. त्या लेखात इंद्र, मित्र, वरूण आदि भारतीय देवतांचे स्पष्ट वर्णन आहे.

३६. हल्लीच्या रशिया देशाचे नाव रुस होते.

हल्लीचा रसिया देश याला पूर्वी रुस म्हणत होते. तोही भारतीय आर्यांनीच स्थापन केला आहे. कर्नल टाड यांनी आपल्या पुस्तकात राजस्थानचा इतिहास लिहिला आहे. त्यात ते लिहितात की दोन प्रसिद्ध जाती (१) समोडी, (२) मरिचूडी, सामवेदी आणि चंद्रवंशांचा अपभ्रंश आहे. आशिया बालिकलाटा नावाच्या पुस्तकांत असे वर्णन आहे की भारतीय आर्यांनी हा देश स्थापन केला आहे.

३७. मिश्रजात

(क) मिश्र जातीच्या संबंधात इतिहासकाराचे मत असे आहे की ही जात काकेशियन, सेमाइट आणि निग्रो वंशाचे मिश्रण आहे. परंतु आम्ही मागे सिद्ध केले आहे की त्या सर्व जाती आर्य वंशीय आहेत.

(ख) मिश्रांच्या लिखित प्रमाणावरून ती साडेसात हजार वर्षांची जुनी आहे. युनानी राजदूत मेगस्थनिज याने मौर्य राजाच्या राजकीय पुस्तकालयातून एक वंशावळी मिळविली होती. त्यात चंद्रगुप्त मौर्या-पर्यंत ज्या १५४ राजाची गणना आहे. त्यांच्या राज्य कालाचा आवधी ६४५१ वर्ष ३ महिने आहे आणि चंद्रगुप्ताला होऊन आज पर्यंत २३०० वर्षे झाली. हे दोन्ही समय मिळून ८७५१ वर्ष होतात हे मिश्र मौर्या-नंतरचे आहेत. इतका जुना मिश्राचा काळ आहे.

(ग) आर्यांच्या वर्ण व्यवस्थेप्रमाणेच मिश्रसमाजाचे चार वर्ग होते. (१) पुरोहित – लेखक, (२) राजवंश, (३) किसान (शेतकरी) (४) कुशल कारागीर.

(घ) मिश्राच्या सभ्यतेचे महत्त्व त्यांच्या पिरामिड (स्मारक) चे कारण आहे. यांच्या या वैशिष्ट्यांत आर्यांचा सहभाग आहे. या पिरामिडमध्ये ठेवलेल्या प्रेताला निळा रंग आणि चिंचेच्या लाकडाचा प्रयोग केला आहे. या दोन्ही वस्तू भारतातूनच तेथे गेल्या आहेत. नीळ आणि चिंच भारताशिवाय इतर ठिकाणी नाहीत. यामुळे नीळीला "इंडिगो" म्हणतात याचा अर्थ आहे भारतीय आणि चिंचेला म्हणतात

"तमरे हिंद." यावरून सिद्ध होते की हे मिश्र मौर्यानंतरचे आहेत आणि ते आर्यंच आहेत.

३८. मेसोपोटामिया

मेसोपोटामियाचा विकास पश्चिम आशियातील दजला आणि फरात नद्यांच्या घाटात जवळ जवळ ५००० वर्षांपूर्वी झाला आहे. सर्व प्रथम या घाटात सुमेरियन लोकांनी वस्ती केली होती. सुमेरियनांची स्वतःची स्वतंत्र भाषा होती. ते चित्र बनवून मातीच्या पाट्यावर लिहीत होते. हे सुमेरियन लोक आर्यंच होते. दशरथ नावाचा मितानी राजा आर्य होता. तो ईजिप्तच्या राजाचा मेव्हणा होता. हा इ. स. पू. १४१४ ते १३७९ च्या कालात राज्य करीत होता. येथील दुसऱ्या एका राजाचे नाव हरी होते. हे नाव आर्यांचेच आहे. तेथील उत्खननात भाजलेल्या मातीच्या पक्क्या विटा सापडल्या आहेत. त्या विटांवर मितानी (मेसोपोटामिया) आणि हिहाई या दोन राज्यात झालेला करारनामा सापाडला आहे. त्यात मित्र, वरूण, इंद्र, नासत्य आदि वैदिक देवतांची नांवे लिहिली आहेत. या वरून सिद्ध होते की या दोन्ही जाती आर्यंच होत्या.

३९. बेबीलोन

दजला आणि फरातच्या मुहोनोच्या मध्यातील जागेला सुमेर म्हणतात. सुमेरच्या वरच्या भागाला अक्काद म्हणत होते. या देशाची राजधानी बेबीलोनच्या नावाने प्रसिद्ध होती. या साम्राज्याची स्थापना इ. स. ३००० पूर्वी झाली होती. बेबीलोन रहिवासी लोक आर्यंच होते. बेबीलोनची मतु अथवा मर्तु देवता वैदिक भारतीय आर्यांची ' मरुत " ही होती. अशा प्रकारची अनेक प्रमाणे मिळतात. त्यामुळे असे सिद्ध होते की हे बेबीलोन आर्यंच होते.

४०. असिरिया

अक्कादच्या उत्तरेला असीरिया आणि कॅंडिया हे देश होते. १३०० ते ६०० इसवी पूर्वी येथे एक विशाल राज्य होत. तेथील रहिवसी लोकांना आर्य लोक " असूर " म्हणत होते. असूर हा शब्द आर्य भाषेतील आहे. असूर नासिरपाल आणि असूर वाणीपाल आदि येथील प्रसिद्ध राजे होऊन गेले.

### ४१. चाल्डिया

चाल्डियन साम्राज्याचा सर्वात शूर राजा नेबूकादनजर नावाचा होता. त्याने बेबीलोनची राजधानी स्थापन केली (बनविली) आणि या शहराच्या सौंदर्यात उत्तम भर घातली. त्याने निर्माण केलेल्या "झुलते – पवन" जगातील सात आश्चर्या पैकी एक आहे. या राजाचे दुसरे वैशिष्टय "इश्वर देवीचे द्वार" आहे. मनुच्या प्रलयाची कथा "डेल्यूज टेबलेट" च्या स्वरूपात जशीच्या तशी आहे. वस्तुतः बेबीलोनियात भारतातील आर्य आणि चोल या लोकांनी वस्ती केली होती चाल्डिया रहिवाशी सुद्धा भारतीय आर्यंच आहेत.

### ४२ यूनानी

यूनानी लोक मूळ पश्चिमी मानले जातात. त्याचा काळ १५०० ते ३००० इ स. पूर्वीचा आहे जवळ जवळ दोन हजार २००० वर्ष झाले आर्य लोक कास्पियन समुद्राकडून ग्रीस (यूनान) मधून येवून राहिले होते. कास्पियन समुद्राचे नाव कश्यप ऋषिच्या नावाने आहे. यूनानी रहिवासी आपणाला यवन म्हणत होते. त्यांची उत्पत्ति पतित क्षेत्रायापासून झाली आहे. पुराणात लिहिले आहे, "तर्वसो यवनो जाताः" अर्थात तुर्वस पासून यवन निर्माण झाले. तुर्वंतु ययातिचा मुलगा होता. यावरून सिद्ध होते की यवनही भारतीय आर्यंच होते.

### ४३. रोम

इतिहासकाराचे असे मत आहे की ७५३ इ. स. पूर्व रोमलस नावाच्या व्यक्तीने "रोम" नगरीची स्थापना केली. हा रोम शब्द संस्कृत आहे. यामुळे इटली निवासी लोकांना रोमन म्हणतात. ते लोक काकेशियन आर्य होते. रोमला यूरोपच्या इतिहासात विशेष महत्त्व आहे. रोम इटलीची राजधानी आहे.

इटली हे भारतीयांच्या आदित्यालयातून बनली आहे. सूर्य वंशीयांचे स्थान जेकोलेटच्या लेखानुसार सूर्यवंशी लोक तेथे जावून राहिले. आदित्यालयाचा लोप करून आतालय झाला. सूर्य वंशातील प्रसिद्ध राजाचे नाव राम होते. म्हणून राजधानीचे नाव राम ठेवले. त्याचा बदल होऊन रोम झाले तेथील पर्वताचे नांव सीता आहे. आता त्या पर्वताला सेटा म्हणतात.

४४. जर्मनी

इटलीहून काही ब्राह्मण पाहाडी रस्त्याने पुढे गेले. त्यांनी एक देश वसविला. ब्राह्मणाला संस्कृत भाषेत शर्मा, शर्मन आणि शिरोमणी म्हणतात. शरोडरसाहेब लिहितात की संस्कृत मध्ये काही ठिकाणी "श" ला "ज" म्हणतात. शर्मन पासून जर्मन आणि शिरोमणी पासून जर्मनी शब्द झाला आहे. याचे समर्थन मेक्समूलर वेद अनुवाद प्रकरणात करतात.

अर्थात जर्मन लोक आर्य आहेत. त्यांना संक्रुत वाचण्याचा, अनुवाद करण्याचा पैत्रक संस्कार आहे. याच प्रमाणे डॉक्टर ( ) यांनी दयानंद सरस्वतीला इ. स. १८८३ मध्ये लिहिले आहे की, आम्हाला भारताविषयी सहानुभूती आहे. कारण आमचे पूर्वज भारतात जन्मले आहेत. जर्मनीचे अध्यक्षांनी स्वीकार केला होता की, आम्ही आर्यवंशी आहोत. आम्ही खिस्ती धर्माचा त्याग करून आर्य धर्माचा स्वीकार करू. आता अन्य काही देशाचे नाव संक्षिप्त देत आहे. ते संस्कृतचे अपभ्रंशच आहे. जुने नाव: राष्ट्रीय देश, नवे नाव: आस्ट्रिया आहे. जु. ना. स्वधन न. ना: स्वेडन, योद्धया लोकांचा देश जु. ना: आर्य खंड, न: ना. आयरलंड, जु. ना. राष्ट्रीय खंड, न. ना. स्विटरलंड, त्यावेळी इंगलीस्तान समुद्रात होते. हास्पनिया, पुर्तगालमध्ये ही कोणी राहण्यासारखे नव्हते. फ्रांन्स दलदलीत होता. युरोप देशात राहाण्या-सारख्या भूमीवर अति प्राचीनकाळी भारतीय आर्यांनी जाऊन तेथे वस्ती केली. आणि आपला विस्तार केला. हालंड सुद्धा त्यावेळी पाण्यात (समुद्रात) होते. धेनु-मार्ग (डेनमार्क) भारती आर्यांनी प्रथम वस्ती केली आहे.

४५ चीन

चीन निवासी लोक मोगल, तातार आणि चीनी आम्ही भारतीय सोमवंशी क्षत्रिय आर्य आहोत म्हणतात. तातार आपणाला "आर्या" चे वंशज म्हणतात. हा आर्य पुरूरवाचा मुलगा आयु होता. याचाच वंशज 'यदु" होता. आणि त्याचा पौत्र हयु होता. चीनी लोक याच हयुला (यु) म्हणतात ते यालाच आपला पुर्वज मानतात. तातारांचा आय, चीन्यांचा यु, आणि पौराणिकांचा आयु एकच आहे.

याशिवाय चीनमध्ये होम (हवन) ला घोष म्हणतात. यावरून असे सिद्ध होते की प्राचिनकाळी तेथे वैदिक यज्ञ कर्मकांड चालत होते.

हिंदी विश्वकोश पान क्र. ३१८ मध्ये 'उपनिवेश' शब्दाच्या विवरणात लिहिले आहे की, पुरातत्व संशोधनात असे सिद्ध झाले आहे, की इ. स. पू. आठव्या शतकात भारतीय आर्य व्यापाराकरिता चीनमध्ये गेले व तेथे आपला व्यापार स्थापन केला होता.

४६ ऑस्ट्रेलिया

ऑस्ट्रेलिया "आंध्रालयाचा" अपभ्रंश आहे. आर्यांच्या एका आंध्र शाखेचे जे विश्वामित्राच्या पतित झालेल्या मुलापासून उत्पन्न झाले होते त्याचा उल्लेख एतरेय ब्राह्मण ग्रंथात आहे. त्यांनी आंध्रालय वसविले होते. त्यांचे सिलोन आणि मेडेगास्करची भूमी त्यावेळी पाण्यावर येऊन पसरली होती ती भारत आणि ऑस्ट्रेलिया यांच्या मध्यावर होती. त्यांची भाषा व कोल-भील संथल यांच्या भाषेत सादृश्य आहे. यामुळे हे सर्व लोक पतित आर्यांचे वंशज आहेत. महर्षि पुलस्त्य राजा तृणबिंदूच्या काळात उपदेश करण्याकरिता ऑस्ट्रेलियाला गेले होते असा उल्लेख वाल्मीकी रामायणात आहे.

४७ अमेरिका

निरनिराळ्या संशोधनाधारे असे स्पष्ट झाले आहे की उत्तर अटलांटिक महासागर जलमय नव्हता. तेथील भूमी फार प्राचीन आहे. भारतीय क्षत्रियांचा एक ग्रुप बंगालच्या नागा पर्वतावर राहात होता. नागापर्वतावर रहात होते म्हणून त्यांना नाग म्हणत होते. काही कालांतराने यांच्यातील काही लोक पाताळ लोकात (अमेरिकेत) जावून राहिले ते लोक आपणाला नाग म्हणवून घेत होते. काही काला-नंतर नाग शब्दाचा खरा अर्थ विसरून गेल्याने ते लोक आपणाला नागाचे अर्थात सर्पाचे वंशज मानू लागले आणि नागाची (सापाची) पूजा करू लागले. अमेरिकेतील मूळ रहिवाशी लोकांत सूर्य पूजा आणि रामसीतव उत्सव करीत होते, यावरून असे सिद्ध होते की हे लोक आर्य होते.

महाभारतात एक प्रमाण आहे की उद्दालकमुनी अमेरिकेत राहात होते. अर्जुनाचे अमेरिकेतील (पाताळातील) उलुपीबरोबर

लग्न झाले होते. महर्षि वेदव्यास अमेरिकेला गेले होते. महाभारत काळापर्यंत आर्यांचा अमेरिकेबरोबर फारच संबंध होता आणि तेथील रहिवासी आर्य होते.

अमेरिकेचे नांव पाताळ होते. डॉ. प. वि. वर्तक यांनी आपल्या 'वास्तव रामायण' नावाच्या ग्रंथात पृ. क्र. २३ मध्ये सप्त पाताळाचे सविस्तर वर्णन लिहिले आहे. रूस (रशिया) देश ओलांडून आर्य लोक अबलास्का वरून अमेरिकेत जात होते. समुद्राच्या कडेकडेचे देश आर्य लोकांनी निर्माण केले. (वसविले) त्यावेळी 'न्यूयार्क' आदि ठिकाणी महाभयंकर जंगले होती. आर्यांनी सर्व प्रथम मेक्सिका देश वसविला. या देशात चांदी फारच उत्पन्न होते. जगात जेवढी चांदी निर्माण होते त्याच्या निम्मी चांदी या देशात उत्पन्न होते. यामुळे आर्यांनी या देशाचे नांव 'माक्षिका' ठेवले. माक्षिकाचा अर्थ चांदी आहे. त्याचा अपभ्रंश होऊन मेक्षिको असा झाला आहे. तेथील प्राचीन मंदिराचे नमुने भारतातील मंदिरासारखे आहेत. आता थोड्या दिवसापूर्वी नवीन संशोधनात यज्ञ कुंड सापडला आहे. यावरून प्राचीन काळी भारतीय आर्यांची यज्ञ संस्कृती अमेरिकेत होती असे सिद्ध झाले आहे.

अमेरिकेतील पेरू देशाचे नांव परनपूर होते. येथे सोन्याची उत्पत्ती फारच होत होती. तेथील राजे आपणाला 'इन्का' म्हणवून घेत होते. ते सूर्य वंशाचे होते आणि सूर्याचे चिन्ह आपल्या डोक्यावर धारण करीत होते. तेथे एक यात्रा भरते त्याला 'राम सिताव' म्हणतात. ते राम सीताचा अपभ्रंश आहे. तेथील माया जातीच्या लोकांचे रितीरिवाज भारतीयांसारखे आहेत.

### ४८ आफ्रिका

कर्नल विलफोर्ड महोदय एशियाटिक रिसर्चेज नावाच्या पुस्तकात लिहितात की त्यावेळी आफ्रिकेचे दोन भाग होते. मध्यावर समुद्र होता. ज्याला आता रेगिस्तान म्हणतात. पूर्व भागाचे नाव कुश द्वीप होते. सूर्यवंशी रामाचा मुलगा कुश होता त्याच्या प्रजेने तेथे राज्य स्थापन केले होते. पश्चिम भागाचे नाव शाम द्वीप होते. भारतीय श्री कृष्णाच्या प्रजेने तेथे जाऊन राज्य स्थापन केले होते. याचे वायु पुराणात सविस्तर वर्णन आहे की सिंधु देशातील लोक तेथे जाऊन आपल्या राजाच्या

नावाने एक देश स्थापन केला. त्याचे नाव प्रजापती होतें. भारता बाहेरच्या भाषेत 'त' ला 'ट' म्हणतात. प्रजापतिला प्रजावट म्हणतात. त्याचा अपभ्रंश होऊन इजिप्त झाला. हे लोक कौरव वंशाचे होते; त्यामुळे त्यांनी राजधानीचे नाव 'कोरो' ठेवले आहे. त्याचा बदल होऊन रोमन झाला आहे. अर्थात अफ्रिकादेश केवळ मिश्र जातीचा नव्हता तर संपूर्ण नील नदीच्या काठावर असलेले देश आणि सर्व आफ्रिका प्रथम आर्य देश होता. कारण आर्य लोकांनीच प्रथम ते देश वसवून आपले राज्य स्थापन केले होते. अर्थात प्राचीन काळी संपूर्ण आफ्रिका आर्यांचा देश होता. तेराव्या शतकापर्यंत हेच नाव होते. ( आर्यदेश ) नंतर 'अफ्रीकानस' या नावाच्या मुसाफिराने तेथे जावून आपल्या नावावर अफ्रिका हे नांव ठेवले. वास्को-डि-गामा नावाचा मुसाफिर आफ्रिकेच्या मार्गाने भारतात आला होता. त्याने आपल्या पुस्तकात लिहिले आहे की आफ्रिकेच्या पूर्व भागात हिंदू राहात होते. तेथील लोक रामायण महाभारताच्या कथा फारच चांगल्या प्रकारे सांगतात. कांही गावचे नाव प्राचीन काळातील भारतीयांच्या प्रमाणे आहेत. ते असे श्यामसुख, कुटिलकेश, अयरछत्री, साम गिरी, कर्दम स्थान, पद्म स्थान, चंद्र स्थान गुप्त स्थान, शंख वर्धन, निषाद पर्वत, रूपवती पर्वत, ही नांवे प्रख्यात आहेत. यांची भाषा आणि रिती रिवाज आर्यांप्रमाणेच जुळते मिळते आहेत. तेथील मनासी जातीचे लोक आतापर्यंत दूध. फळे मुळे खावून राहातात.

### ४९ उत्तर ध्रुव

काही आर्य लोक उत्तरेच्या शेवटच्या भागात (उत्तर ध्रुवावर) गेले. हे लोक शक्ती संपन्न, ज्ञान संपन्न, धैर्य संपन्न असे होते. त्यांनी उत्तर ध्रुव प्रदेशात आपले राज्य स्थापन करून राहिले. तेथील हवा पाणी त्यांना अकूनुल होती. परंतु अन्न धान्याचे उत्पन्न नसल्याने त्यांना मांसाहारावर जागावे लागत होते. भारताबाहेर गेलेले आर्य कांही शुद्ध आर्य होते तर काही पतित झालेले आर्य होते. त्यासर्वांचे मूळ तत्त्व अहिंसा होते. ते कालंतराने नष्ट झाले ते हिंसा वृत्तीनेंच राहू लागले व आताही तसेच राहातात.



उत्तर ध्रुवावरील आर्यांना मात्र हिंसात्मक जगावे लागत

होते. यज्ञयागात पशू बळी देऊन (परमेश्वराला अर्पण करतात.) आणि ते शुद्ध झाले असे मानून नंतर आपण खात होते. तो बर्फमय प्रदेश असल्यामुळे ते मादक पदार्थाचे (दारूचेही) सेवन करीत होते. भारतीय आर्यांच्या ज्या वैदिक देवता आहेत त्या देवतांनाही ते मासान्न व मदिरा अर्पण करीत होते. पुढे काही कालानंतर उत्तर ध्रुवावर महा-भयंकर हिमवृष्टी झाली. त्यामुळे त्यांचे तेथील जीवनमान फारच विस्कळीत झाले आणि ते तेथून बाहेर पडले. त्यातील कांही लोक सुखाचा शोध करीत ६००० वर्षा पूर्वी भारतात आले.

प्रथम भारतातून जाताना जी भारतीय आर्य संस्कृती बरोबर नेली होती ती सर्व नष्ट झाली होती परंतु त्यातील भाषा आपल्याबरोबर नेली होती ती मात्र जशीच्या तशी परत भारतात येताना बरोबर आली. हे लोक भारतात आल्याचा शोध टिळकांनी लावला आहे आणि तो अनेक विद्वानांना मान्य आहे.

### ५०. संस्कृत भाषा

ज्याप्रमाणे जगातील सर्व देशाची मातृभूमी भारत आहे, त्याच प्रमाणे जगातील भाषेची मातृभाषा संस्कृत आहे. जगातील सर्व देशाचे राजधानी नावांची प्राचीन नावे आर्य संस्कृत भाषेतीलच होती. गांधारचे शुद्ध नाव गांधार होते. गांधार देशाच्या राजाची मुलगी दशरथ राजाची बायको होती. जगातील सर्व देशाचा आणि संस्कृतचा कसा संबंध होता त्याचा वर विचार केला आहे.

### ५१. देव लोकांचा परिचय

मानवाचे जन्मस्थान हिमालय आहे असे मागे सिद्ध केले आहे. या हिमालयाचाच एक भाग तिबेट आहे. त्याला संस्कृत तिब्बत, त्रिविष्टथ अशी नावे आहेत. पुराणात तिबेटला देव लोक म्हटले आहे. प्रथम निर्माण झालेले अमैथुनी मानव दिव्य गुणयुक्त होते. म्हणून त्यांना देवता (देव) म्हणत होते. त्रिविष्टप या शब्दाचा पर्यायवाची अर्थ स्वर्ग, असा होतो आणि स्वर्ग हे नाव विशेष सुखदायी आहे. विशेश सुख स्वर्ग, अति दुः–नरक असा या स्वर्गनरक शब्दाचा अर्थ आहे.

प्रथम ज्या ठिकाणी सर्व प्रकारची सुख सुविधा होती ते ठिकाण तिबेट होते आणि तीच प्रथम आर्य मानवाची जन्मभूमी होती (आहे.)

## ५२. देवभूमी स्वर्ग

जगातील कोणत्याही जाती, धर्म, पंथ, अनुयायी मानवाला विचारा की स्वर्ग कोठे आहे ? याचे उत्तर एकच मिळेल. स्वर्ग वर आहे. ते ठिकाण कोठे आहे ? धार्मिक लोक स्वर्गाला जाण्याचे अधिकारी आहेत, सूर्य वंशातील त्रिशंकु राजाला स्वर्गातून हाकलून दिले होते, गंगा नदी स्वर्गाचा मार्ग आहे, देवता स्वर्गात रहात होत्या, असुराने स्वर्गावर हल्ले केले होते, स्वर्गात मानस सरोवर आहे, स्वर्गात अलकापुरी आहे ! आपण आपल्या सर्वश्रेष्ठ इतिहासाला विसरलो आहो. आमच्यावर (भारतावर) परदेशी लोकांनी असा प्रयत्न केला आहे की हा विचार आम्ही विसरून जावा. कारण त्यात आमच्या पराक्रमाचा इतिहास होता. त्यात इंद्राचा विजय होता, त्यात विष्णूची नीती होती, आणि शंकराचा दिग्विजयी त्रिशूळ होता. या सर्व आठवणी आमच्या रक्तांत संचार करीत होत्या. परदेशी लोकांना याची फारच भीती वाटत होती.

भारताच्या प्राचीन संस्कृत साहित्यात जागोजागी स्वर्गातील राज्याचा उल्लेख आहे. भारताचे शेजारी इराण, चीन, इराक, असिरिया, अरब, फिनिशिया आणि ग्रीक साहित्यात स्वर्ग शासनाचा हजारो ठिकाणी उल्लेख आहे. त्यात इंद्र, शिव, अश्विनीकुमार, जयंत नृसिंह, दुर्गा, स्कंद यांच्या पराक्रमाचा उल्लेख आहे. तुम्ही विचार केला का हे स्वर्ग राज्य कोठे होते ? परदेशी म्हणतात की या सर्व गप्पा आहेत त्याना असे विचारले पाहिजे की इतक्या मोठ्या प्रमाणात गप्पा लिहिणाऱ्या सर्व वरील उल्लेखिलेल्या देशातील सर्व लोक एकाठिकाणी जमून गप्पा लिहिण्याचा विचार केला असेल का ? शक्य नाही. भारताच्या इतिहासात जे लिहले आहे, तेच दुसऱ्या अनेक देशाच्या इतिहासात लिहिले आहे. यावरून इतिहासाची सत्यता सिद्ध होते. इ. स. च्या तिसऱ्या शतकात कालिदास यांनी कुमारसंभव महाकाव्याच्या आरंभी या इतिहासाची सत्यता सिद्ध केली आहे. ते लिहितात की,

अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा ! !
हिमालयोनाम नगाधिराजः ! !
पूर्वा परौ तोयनिधीव ग्राह्य स्थितः ! !

मी ज्या ठिकाणी बसून हा ग्रंथ लिहीत आहे. (पाटलीपुत्र)

याच्या उत्तरेला पर्वतराज हिंमालय आहे, तेथे देवता राज्य करीत होते.

"!! भागीरथी निर्झर शीकरांणं बोढा कंपित देवदारू !!"

हा तो हिमालय आहे. की जेथून गंगा वाहत आहे आणि देवदारूची झाडे मंदमंद हवेच्या झोताने डुलत आहेत. देवतांच्या राज्यात ही झाडे निर्माण झाली आहेंत म्हणून त्याचे देवदार हे नाव प्रसिद्ध आहे,

रामायणात वाल्मिकीने लिहिले आहे की, अयोध्येचा राजा मोठा पराक्रमी होता. असुर (वर्तमान असीरिया राज्याचे निवासी) जेव्हा स्वर्गावर हल्ले करीत होते जेव्हा इंद्र आपल्या सहाय्याला दशरथाला बोलावित होता. अशाच एका युद्धात दशरथाबरोबर त्याची राणी कैकयी योद्धा बनली होती.

पुढे कालीदासाने लिहिले आहे की याच प्रकारे एका युद्धात दशरथाचे वडील-अज इंद्राच्या सहय्याला स्वर्गात गेले होते. ते स्वर्गातून विजयी होऊन आले. त्या प्रित्यर्थ भेट म्हणून इंद्रानें उत्तर कोसलप्रदेश (वर्तमान नेपाळ) दिला होता. दशरथ जेव्हा राजा झाला तेव्हा उत्तर कोसल देशाचे राज्य करीत होता. महाभारत युद्धानंतर युधिष्ठिर राजाने कुरू देशाचे राज्य केले होते. वृद्धापकाळी आपला उत्तराधिकारी परिक्षिताला राज्यावर बसवून चौघे बंधू आणि द्रौपदीला घेवून वान-प्रस्थ जीवन घालविण्याकरीता ते स्वर्गाला गेले होते. ते ज्या रस्त्याने गेले होते, त्याचे वर्णन महाभारताच्या वनपर्वामध्ये आहे. ते हरिद्वार ओलांडून ज्या ज्या रस्त्याने गेले तो गढवाल आणि कुमांऊ ओलांडून तिबेटला जाण्याचा मार्ग आहे. युधिष्ठिर पायी चालत होते. मागे मागे द्रौपदी आणि चौघे बंधू चालत होते. महाभारतात म्हटले आहे कीं चौघे बंधू आणि द्रौपदी बर्फात घसरून पडून मरण पावले. एकटा युधिष्ठिर राहिला आणि त्याचा पाळलेला कुत्रा. जेव्हा युधिष्ठिर चालण्यास असमर्थ झाले तेव्हा इंद्राने अमरावतीहून त्यांना नेण्याकरीता विमान पाठविले. देवांच्या वैमानिकाने (पायलट) त्यांना आणि कुत्र्याला घेवून अमरावतीला गेले.

"स्वर्गत्रिविष्टप प्राप्य धर्म राजो युधिष्ठिरः"



श्री राहुल सांकृत्यायन यांनें लिहिले आहे, की तिबेटच्य

राजधानीचे नाव ल्हासा, भोट भाषेत अमरावतीचाच अनुवाद आहे. अमर कोषात स्वर्गाचे पर्यायवाची लिहिताना जी नावे लिहीत ते पहा

पितुरनंतरमुत्तर कोसलान समधिगम्य समाधि जितेंद्रिय :।।
दशरथ : प्रशशास महाबलो यमवतामवताण्च धुरिस्थित :॥
(रघुवंश)

स्मर राजन् पुरावृत्तं तस्मिन्देवा सुरे रणे॥
तंत्र त्वां च्यावयच्छ त्रुस्तव जीवितरमंतरा॥
तत्रचापि मया देव यत्त्वं समभिरक्षित :॥
जाग्रत्या यतमानाया स्ततौ मे प्रददौ वरौ।।
(वाल्मिकी रामायण अयोध्याकांड ११/१८--१९)

१. स्वर्ग, २. अव्यय लोक, ३. स्वः, ४. नाक, ५; त्रिदिव. ६. त्रिदिवशाल, ७. त्रिविष्टप (अमर कोश स्वर्ग वर्ग)

कालिदासाने रघुवंशात म्हटले आहे की त्रिविष्टप (तिबेटचा) सम्राट इंद्राचा मुलगा जयंत होता. "त्रिविष्टपस्येव पति जयंत: (रघुवंश) महाभारतातही असाच उल्लेख आहे.

'त्रिविष्टप शक्र इवामितौजा:" म. भा. वनपर्व ७।२९४ त्रिविष्टपचेच विकृत रूप तिबेट आहे.

५३. स्वर्गाचे रहिवासी

जेव्हा स्वर्गाचा विचार करतात तेव्हा तेथील रहिवाशांचाही विचार करायला पाहिजे. प्राचीन कालापासून "पंचजन" 'पंचायत' सारखे शब्द समाज व्यवस्थेत चालत आले आहेत. ते स्वर्ग शासनातूनच आले आहेत. कारण स्वर्ग शासनात पाच वर्गाचे लोकच राहत होते १. देव, २. नाग ३. यक्ष ४. गंधर्व ५. किन्नर.

या सर्वांना देव लोक म्हणत होते. परंतु प्रजातंत्र शासनात पाच गण अथवा पंच–जन म्हणत होते. "पंच–जन" मम होत्रं जुषध्वम्" तिबेटचा संपूर्ण प्रदेश देवलोकांच्या स्वाधीन होता. स्वर्गाची राजधानी अमरावती होती. नाग लोक धौलगिरीपासून काश्मीर आणि सिमकियांग (हरिवर्ष) पर्यंत होता. यांची राजधानी कैलासावर होती. यक्ष लोक गढवाल आणि कुमांउचा प्रदेश होता. याची राजधानी अलकापुरी होती. गंधर्व लोक गंधर्वांना गण होता. उत्तर आणि दक्षिण गांत्रा

मिळून ऐक प्रदेश होता उत्तर गांधारमध्ये अफगाणिस्तान आणि ताजिकीस्तान ही आहे. याची राजधानी पुष्कलावती वर्तमान चार सद्दा होती. आणि किन्नर लोकांत कनौर हिमाचल प्रदेशाचा समावेश होता. याची राजधानी कलात म्हणून ओळखली जात होती.

चरक संहितेत एक इतिहास लिहिला आहे. एक वेळी ऋषी, महर्षि लोक धन मिळवू लागले, आणि आळशी विषयविलासी बनले. यामुळ त्यांना अनेक प्रकारचे रोग निर्माण झाले. त्यातून मुक्त होण्याचे ज्ञान त्यांना अजिबात नव्हते. याकरीता भृगु, अंगिरा अत्रि, वसिष्ठ, कश्यप, अगस्त्य, पुलस्त्य, वामदेव, असित आणि गौतम आदि महर्षि हे सर्व मिळून आपल्या पूर्वजांच्या निवासस्थानी स्वर्गात गेले. तेथील इंद्राच्या आयुर्वेद विद्यालयात सर्व रोगांची चिकित्सा, विधीचे ज्ञान मिळवू हा त्यांचा विचार होता. ही पूर्वीची स्वर्गभूमी इंद्राच्या शासनात होती, येथे रोगराई अजिबात नव्हती. रोगरहित गंगेच्या शेजारी देव, गंधर्व आणि किन्नर ब्रह्मऋषी सिद्ध वर्गाने पावन दिव्य औषधी युक्त जलाशयाने सुशोभित हा हिमालयाचा प्रदेश होता. इंद्रभुवनात पोचल्यावर इंद्राने त्यांचे स्वागत केले आणि आयुर्वेदाचे ज्ञान शिकविले. त्यामुळे ते रोगमुक्त झाले, आणि परत मृत्युलोकी आले.

ते ज्ञान या ऋषी लोकांनी त्यांच्या नरक लोकात घेऊन आले रोग चिकित्सा ज्ञानाचा प्रसार केला. नंतर काही काळाने स्वर्ग लोक आणि भू लोक अथवा नरक, या नावाचा भेद एकमेकात खटकू लागला तेव्हा देव मानवांनी विचार करून एक राष्ट्र केले आणि त्याचे नाव आर्यावर्त ठेवले. मनुने त्याची सीमा अशा प्रकारची केली आहे.

आ समुद्रात्तु ये पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमाम्
तयोरेवानंतरं गिर्योर्गार्यावर्तं विदुर्बुधः ।। मनुस्मृती ॥

पूर्वेला प्रशांत महासागर, पश्चिमेला भूमध्य सागर, उत्तरेला हिमालय, दक्षिणेला विंध्यचल पर्वत, या सीमेतील संपूर्ण भागाला आर्यावर्त असे नाव होते.

### ५४. नरक प्रदेश

हरिद्वार उतरून पूर्वेला हिमालय आणि विंध्याचल पर्वताच्या मध्य भागाला भूलोक अथवा मृत्युलोक म्हणतात. त्यालाच नरक ही

म्हणत होते. नरक तराईच्या खालच्या भूमीला म्हणत होते. हिमालयावर राहणाऱ्या लोकांना ही भूमी खरोखरच नरक होती. कारण फारच खाली खोल उतरून तेथे जाणे महा कठीण होते. यास्काचार्यांनी निरुक्त ग्रंथात नरकाची व्याख्या करताना लिहिले आहे की,

" नरक न्यरकं नीचैर्गमनम्! नास्मिन् रमणम्! !

नरकातून स्वर्गाला जाण्याचा रस्ता गंगेच्या काठाने होता. जेथून स्वर्ग सुरू होत होता ती जागा हरीद्वार आहे. यामुळे गंगेला स्वर्गाची शिडी म्हणत होते. हे एक ऐतिहासिक सत्य आहे. गंगा आणी अलकनंदाच्या संगमाला 'देवप्रयाग' म्हणतात. गंगेला देव नदी यामुळे म्हणतात कारण ती देवतांच्या प्रदेशातून निघाली आहे. हिमालयातून पुष्कळ नद्या निघाल्या आहेत. परंतु गंगेच्या कडेने स्वर्गात जाता येते म्हणून दुसऱ्या नद्यांपेक्षा गंगेला अधिक प्रतिष्ठा मिळाली आहे.

## ५५ देवासुर संघर्ष

भारतीय साहित्यात ज्या प्रदेशास देवलोक म्हटले आहे, जेथे आर्यांचे आदीपूर्वज देव राहत होते, जेव्हा देव लोकात पूजा उपासनेच्या विधानावर द्वैत सुरू झाले आणी त्याने उग्र रूप धारण केले, दोघात अनेक संघर्ष झाले तेव्हा तो समाज ( देवलोक) दोन वर्गात विभक्त झाला. आधात्म—उपासना करणारे लोकांना देव व अधिभूत उपासकला असुर हे नाव मिळाले. संपूर्ण ऋग्वेदात असुर शब्दाचा प्रयोग आदी भौतीक शक्ती संपन्नतेकरीता घेतला आहे. त्यानुसार चीरकाळपर्यंत या नावाचा प्रयोग त्याच अर्थाने होत राहिला. कालंतराने तो प्रयोग निंदाजनक अर्थाने होऊ लागला. तो आजपर्यंत प्रचलित आहे.

## ५६. भारतात लोकसंख्या वाढीमुळे असूर पश्चिमेकडे गेले

भारतातील मूळ ठिकाणी ( स्वर्गात ) लोकसंख्या वाढल्यामुळे राहणे कठीण होवू लागले. त्यामुळे असुर वर्गाने पश्चिमकडे [illegible] समुद्र (कॉस्पियन सी ) च्या किनारी प्रदेशामध्ये म्हणजे वर्तमान इराक, असीरीया आदी प्रदेशापर्यंत पसरत गेले. आर्यांचा पहिला वर्ग ज्यांना त्यावेळी देव म्हणत होते त्यांची ही लोकसंख्या वाढल्यामुळे सरस्वती गंगा आदि नद्यांच्या घाटात उतरत हिमालयाच्या क्षिण पश्चिम तळवठापर्यंत येवून राहीले. त्याची माहीती मनुस्मृती-

तील श्लोक (१-१७) मध्ये आहे.

सरस्वती आणि दुषद्विती (गंगा) या दोन नद्यांच्या मधील भागातील प्रदेशाला 'ब्रम्हावर्त' म्हणतात. आदि कालात आर्यात दोन वर्ग झालेला निर्देष शतपथ ब्राह्मण ग्रंथात (१४।४।४१) मध्ये उपलब्ध आहे. हे दोन्ही वर्ग मध्य कालात एकमेकात मिळते जुळते व केव्हां केव्हां भांडण तंटे करीत होते. पश्चिम आशिया व युरोपच्या अनेक देशात आर्यांचा दुसरा वर्ग असुराचे वंशज अधिकांश आहेत.

वरील सर्व प्रकार भारतीय संस्कृत साहित्या अधारे स्वर्गातील भूलोक इतिहास लिहीत असताना देव पक्षाचे विवरण जितक्या विस्ताराने लिहीले आहे, तितके असुर पक्षाचे नाही. असुर पक्षाच्या विस्ताराचे वर्णन पाश्चात्य लोकांनी फारच विस्तारपूर्वक लिहीले आहे.

५७. असूराना भारतात येण्याचे मार्ग

असिरीया, पिलीस्तानच्या सेना वाल्हीक (इराक) इराण (वनायु) अफगाणिस्तान (उत्तर गांधार) आणि समरकंद हरि वर्ष (वशकद) (सिमकियांग) काश्मीर आणि तिबेट (त्रिविषृप) या बाजूने भारतात (आर्यावर्तात) घुसले होते. देव आणि नागांनी त्यांना कापून टाकले. काही पळून गेले. असुर पक्षाचे लोकांची आम्हाला फारच थोडी माहिती आहे. हिरण्याकश्यप, नमुची, प्रल्हाद, विरोचन, बळी आदि. या लोकांनी (असुरांनी) आमच्या बरोबर भांडण तंटे करायचे नाहीत असे ठरवून मिळून मिसळून रहात होते.

५८. असूर अक्रमकांना तोंड द्यायला-लाहोल हे स्वर्गाचे प्रसिद्धगर होते.

लाहोल हे स्वर्गाचे प्रसिद्ध नगर पश्चिमी आक्रमकांना तोंड देण्याला पहिला मोर्चा होता. असुरांनी शेकडो वेळा आक्रमण केले. त्यांना विजय मिळाला नाही. आजपर्यंत त्या देशाच्या असुर लोकांना विजय मिळवता आला नाही. देवासुरांचे थोडक्यात विवरण वरील प्रमाणे आहे. प्रजापति मध्ये दक्ष आणि कश्यप प्रसिद्ध आहेत. दक्षाला दिती, अदिती, दनु आणि दनायु आदि मुली होत्या. त्यात दिती सर्वात वडिल होती. तिला हिरण्यकशिपु आणि हिरण्याक्ष दोन मुले झाली. यांनी काल्डिया व सुमेर या प्रदेशात आपले राज्य स्थापन केले. यांच्या वंशात प्रल्हाद, विरोचन आणि बळी फार प्रसिद्ध आहेत. यांचे पुत्र.

पौत्र सर्व जगात पसरले आहेत. हे प्रथम जगातील अनेक देशाचे राजे होते. दैत्यांचे वंशातील लोक वर्तमान ग्रीक वाङमयात टाइटन आणि उत्तर युरोप साहित्यात टूटन आणि पुढे डाइंट = जर्मन व डच आदि त्यांना नावे आहेत. दैत्य आणि दानव शब्दाचे विकृत रूप युरोपिय देशातील नावात आज ही सापडतात.

धर्माचा एक पाय लोप पावत होता. आर्यावर्त भारतात सत्ता मिळविण्याकरिता दैत्याचा लोभ वाढत होता. प्रजेत मोह उत्पन्न झाला होता. वलवान निर्बलांना तंग करीत होते. तेव्हा धार्मिक लोकांनी ऋषी लोकांच्या संमतीने निर्णय केला की, दंड विधान लागू केले पाहिजे. हे शासन चालवायला कोणीतरी राजा असला पाहिजे, सर्वांचा विचार झाला की, मनुचा मुलगा विवस्वान या कार्याला योग्य आहे.

५९. वैवस्वत मनु व राज्य उत्पत्ती

मनु ब्रह्माचा पडपंतु (प्रपोत्र) होता. ब्रह्माचा मरीची त्याचा काश्यप त्याचा विवस्वान, विवस्वानचा मुलगा मनु ही पित्र वंशावळी आहे. ब्रह्मा (प्रचेता) चा दक्ष, त्याची मुलगी अदिती ही अदिती कश्यपाची पत्नी होती. अदितीचा मुलगा विवस्वान त्याचा मनु ही मात्र वंशावळी आहे.

आर्यावर्त भारतात पहिला राजा मनु झाला. हा फारच धर्मात्मा होता. महान शास्त्रज्ञ आणि राज्य चालविण्यास समर्थ होता. परंतु तो राजा होण्यास तयार नव्हता. त्याने या कामाचा अस्वीकार केला. पुनः पुनः प्रजेने विनंती केल्यामुळे राजा होण्यास अनुमती दिली. मनु भारताचा प्रथम अभिषिक्त राजा झाला. तेथून पुढे भारतात राजशासन चालू झाले.

६०. मानव कल्याणाकरिता अगम निगम रचना

सृष्टीवर प्रथम मानव उत्पन्न झाले ते अमैथुनी होते. त्यांनाच देव म्हणतात. त्या आदिमानवात (देवात) पाच प्रकार होते. १. देवलोक २. नागलोक ३. यक्षलोक ४. गंधर्वलोक ५. किन्नर यांच्यापासून पुढे मैथुनी स्त्री पुरुष समागमातून मानव निर्माण होऊ लागले. त्या मानवातील ज्ञानी लोकांना ऋषीमुनी म्हणतात देवलोक स्वर्गात राहात होते. आणि मानव ऋषीमुनी मृत्यू लोकात रहात होते. स्वर्ग

हिमालय पर्वतावर आहे. आणि मृत्यूलोक हिमालयाच्या खालच्या भागात आहे.

**६१. मृत्युलोकाला प्रथम नरक म्हणत होते.**

मृत्यूलोकाला प्रथम नरक म्हणत होते. कालांतराने नरक हे नाव निंद्य वाटू लागले. म्हणून देव आणि मानव ऋषीमुनींनी विचार करून नरक हे नाव बंद करून मृत्युलोक हे नाव ठेवले. तेव्हापासून मानव ऋषीमुनी राहातात त्या भूमीला मृत्यूलोक म्हणू लागले.

**६२. विश्वारंभी प्रत्येक प्राणी आपले पूर्व प्रारब्ध घेऊन निर्माण होतो.**

मानव प्राण्याच्या अगोदर प्रकृती परमाणु पासून पृथ्वी, लता, वनस्पती, झाडे झुडपे, औषधी, जीव, जंतु, पशु, पक्षी, देवमानव, (अमैथुनी) मानव ऋषीमुनी (मैथुनी) निर्माण झाले. कोणतेही प्राणि जन्मले की त्याच्या बरोबर त्यांचे पूर्व प्रारब्ध असते. प्रारब्धाचे प्रकार दोन आहेत. १. चांगले २. वाईट चांगल्या प्रारब्धाचे लोक स्वर्गात रहातात आणि वाईट प्रारब्धाचे लोक मृत्युलोकात रहातात.

चांगल्या वाईटात प्रत्येकात दोन प्रकार आहेत १. श्रेष्ठ २. कनिष्ठ स्वर्गात राहाणाऱ्या देव लोकात पाच प्रकार आहे. १. देव, २. नाग ३. यक्ष ४. गंधर्व ५. किन्नर पहिल्या प्रकारातील देव श्रेष्ट प्रारब्धाचे आहेत. पुढचे चार प्रकार कनिष्ठ प्रारब्धाचे आहेत.

मृत्युलोकात राहाणारे ऋषीमुनी राजे महाराजे, श्रेष्ठ प्रारब्धाचे आहेत. आणि दुःखीमान कनिष्ट प्रारब्धाचे आहेत. प्रत्येक प्राणी पूर्व प्रारब्धरूपी सुख दुःखाचे गाठोडे बरोबर घेऊनच जन्माला येतो. प्रत्येक प्राण्याला सुख हवे असते आणि दुःख नको असते. दुःखाच्या नाशा करिता ज्ञानाची गरज असते.

**६३. देव मानवाच्या कल्याणाकरिता आगमनिगम रचना**

देव मानवाच्या दुःख निरसनाकरिता आगम निगमाची उत्पत्ती आगमनिगमाचा अर्थ ज्ञान आहे. आगम रचना देवांनी केली. निगम रचना ऋषी मुनींनी केली. आगम रचना अगोदर झाली. निगम (वेद) रचना नंतर झाली. आगम संहिता संख्या २८ आहे. निगम (वेद) संहिता संख्या चार आहे. आगमाने (देवांनी) ईश्वराचे नांव "शिव" ठेवले आहे. वेदाने (ऋषीने) ईश्वराचे नांव ॐ ठेवले आहे. आगम रचना संबंधात तीन

देव आहेत. १) महादेव, २) दुर्गा, ३) स्कंद या तीन देवाच्या संवादातून आगम रचना झाली आहे. वेद रचना चौघा ऋषीनी केली आहे. १) अग्निऋषीने ऋगवेद, २) वायुऋषीने, यजुर्वेद, ३) आदित्यऋषीने – सामवेद आणि ४) अंगिरा ऋषीने अथर्व वेद रचना केली आहे. देवाच्या नावाचे यादित महादेव, दुर्गा, स्कंद, ब्रह्म विष्णु, इंद्र, नृसिंह, अश्विनीकुमार आदि पुष्कळ नांवे आहेत. या मानव देवाला उत्तर ध्रुवीय वैदिक आर्यांनी अवतारी देव बनवून त्यांना महा पाप करायला लावले आहे. ते पहिल्या भागात लिहिले आहे मानव देवांना दोनशे कोटी वर्षं झाले आहेत. त्यांना वैदिक आर्यांनी कलियुगात महा पाप करायला लावले आहे. तसेच ऋषीची नांवे भृगु, अंगिरा, अत्री, वसिष्ट, कश्यप, आगस्त्य, पुलस्त्य, वामदेव, असित, गौतम आदि नांवे आहेत. भारतीय आर्य निराकार ईश्वराची उपासना करतात. आगमाने (देवांनी) उपासने करिता विश्वाचे प्रतिक निराकार शिवलिंग निर्माण केले आहे त्याची उपासना (पूजाआर्चा) करतात. वेदाचा ब्रह्म आणि आगमाचा शिव नाव दोन आहेत परंतु वस्तु एकच आहे. "विश्व निर्माता ईश्वर" (शिव). देव मानव (महादेव–शंकर, दुर्गा – पार्वती आणि स्कंद) निर्मित आगम उपासना एकईश्वरी एके नामी आहे.

६४. आगमोपासना श्रेष्ठ आणि वेदापासना कनिष्ठ.

मानव ऋषी निर्मित वेद उपासना (अग्नी, वायू, आदित्य आणि अंगिरा) एकेश्वरी बहुनामी आहे. ही बहुनामी कल्पना योग्य नाही. उदाहरणार्थ. रामा नावाच्या माणसाला गोविंदा, कृष्णा, शामा नांवाने हाक मारली तर त्याला ऐकुही जाणार नाही. अशा अनेक नावाने रामाला कितीही हाका मारल्या तरी रामा तुम्हाला ओ देणार नाही. की तुमच्याकडे पहाणारही नाही. तुम्ही शेवटचा प्रयत्न करून पहा, रामाच्या समोर जावून, त्याच्या खांद्यावर हात ठेवून, आहो शामराव तुम्हाला मी पुष्कळ हाका मारतोय परंतु तुम्ही मला ओ देत नाही, किंवा माझ्याकडे पहातही नाही. रामराव लगेच बोलतील की आहो तुम्हाला भ्रम झाला आहे. माझे नांव रामराव आहे आणि तुम्ही मला वेडचा सारखे शामराव म्हणाला, आहो मला शामराव नावाने हजारो वेळा जरी

हाका मारल्या तरी ते मला ऐकू येणार नाही. आणि मी तुम्हाला ओ देणार नाही. किंवा तुमच्याकडे पहाणार नाही. ज्याप्रमाणे रामाला शामा म्हणून हाका मारणाऱ्याला रामा ओ देणार नाही, किंवा त्याच्याकडे पहाणार नाही. त्याप्रमाणे बहुनामी उपासकाला (भक्ताला) ईश्वर ओ देणार नाही. तसेच त्या भक्ताकडे पाहाणार ही नाही. या प्रमाणे बहुनामी वेदोक्त उपासनेने ईश प्राप्ती होणार नाही.

आगम उपासना एकेश्वरी एक नामी आहे. रामाला रामा म्हणून हाक मारली आणि ती हाक रामाला ऐकू आल्याबरोबर लगेच तो ओ देईल, हाक मारणाऱ्याला आनंद होईल. ज्याप्रमाणे ईश्वर एक आहे, त्याप्रमाणे त्याचे नावही एकच असणे योग्य आहे. ज्याप्रमाणे रामाला रामा नावानें हाक मारल्यावर ओ देतो त्याप्रमाणेच ईश्वराला एकाच नावानें हाक मारल्यास तो ओ देईल. ते नाव कोणते अशी अडचण निर्माण होते. कारण वेदांत शेकडो नावे आहेत. पुराणात तरी लाखो नावे आहेत. हे योग्य नाही. वेदाच्याही अगोदर देव मानवानें प्रथम ईश्वर निर्माण केला आहे. आणि त्याला नावही ठेंवले आहे. ते नाव "शिव" किंवा "ॐ नमः शिवाय" आहे. ज्याप्रमाणे रामाला रामा नावानें हाक मारल्यास ओ देईल. त्याप्रमाणे शिवाला शिव नावानें हाक मारल्यास तो ओ देईल.

**६५. आगमोपासना एकेश्वरी एक नामी पतिव्रते प्रमाणे श्रेष्ट आहे.**

वेदाचे एक नाव मुख्य आहे. परंतु उपासनेत (वेदाच्या कर्मकां-डात) मात्र देवता अनेक आहेत. त्यात ३३ देवता मुख्य आहेत. वेदात अनेक शिव, रुद्र, इंद्र या तीन देवता मुख्य आहेत. या तीन देवाचे सामर्थ्य वर्णन, स्तुतीस्तोत्रे, शत्रुला मारून आमचे रक्षण, रोगराईपासुन रक्षण, आम्ही व आमचे पुत्र–पौत्र आदि लोक शंभर वर्षे आनंदाने जगणे, धनधान्य विपुलता, अशी अनेक प्रकारची ऐहिक सुखे व स्वर्गसुखे इत्यादि प्रकारची मागणी आहे. हा सर्व प्रकार वेदात प्रामुख्यानें आहे. आणि या तीन देवाला उद्देशूनच जास्त आहे. यावरून असे सिद्ध होते की, वेदातील इतर देवापेक्षा हे तीन देव फारच श्रेष्ठ आहेत.

हे तीन व वेदातील इतर देव यांना आगमात मानवाचे स्थान आहे. सृष्टीवर प्रथम मानव निर्माण झाले त्या प्रथम मानवाला देव म्हणतात.

याचा खुलासा यां प्रकरणातील दुसऱ्या भागांत लेख क्रमांक ५२ मध्ये आहे. त्या देवमानवातील. हे वेदाचे तीन देव मानव आहेत. या देवमाणसातीलमहादेव–शंकर, दुगा–पार्वती आणि स्कद या तीन देव मानवाच्या संवादातुन आगम निर्माण झाले आहेत. या तीन देवानी निर्माण केलेल्या आगम संहितेत शिवाची (विश्वनिर्माता ईश्वर-शिव) उपासना आगमोक्त आहे. आणि ती सर्सश्रेष्ठ आहे. ही शिवोपासना विश्वारंभापासून ते द्वापारयुगाचे अंतापर्यंत भारतीय आर्याचे चारी वर्ण जंगलातील जंगली लोकांसह सर्व वर्णातील मानव करीत होते. पुढे कलियुगात भारतीय आर्यातील ब्राह्मण व क्षत्रिय, या दोन वर्णात विश्वारंभापासून ते आजतागायत जशिच्या तशी चालू आहे. आणि ती निराकार एकेश्वरी ऐकनामी आहे. पतीव्रते प्रमाणें श्रेष्ट आहे.

६६. मानव देवाची व मानवाची आयुष्य मर्यादा १०० शंभर वर्षाची आहे. पहा ऋग्वेद.

१. भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्ष भिर्यजत्राः। स्थिरैरंगैस्तुष्ठुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ ऋग्वेद (१/८९/८)

अर्थ : हे देव हो, कानानी कल्याणकारक (असे भाषण) आम्ही ऐकावे. यजन करणाऱ्याचे पालन करणाऱ्या (हे देवांनो) डोळ्यांनी कल्याण कारक (असेल तेच आम्ही) पाहावे. बळकट अशा इंद्रियांनी आणि शरीरानी तुमची सेवा करणारे (आम्ही) जे आयुष्य (आम्हाला मिळाले आहे ते) देवाची उपासना करण्यात घालवू.

२. शतमिन्नु शरदे अति देबा यत्र नश्चक्रा जरसं तनूनाम्। पुत्रासो यत्र पितरो भवंतिमानो मध्या रीरिषतायुर्गंतोः ऋ. (१/८९/९)

अर्थ : हे देवांनो, (मानवी जीवनाची) शेवटची मर्यादा शंभर वर्षे आहे ना (मग) जेथे आमची शरीरे वृद्ध केली जाणार आहेत, जेथे मुलगे (आमचे रक्षणकर्ते) पितर होणार आहेत, अशा आमच्या आयुष्याच्या (शेवटच्या गमनापूर्वीच मध्यंतरी आमचा विनाश होऊ देऊ नका.

(अ) बहपती, बहूपित्याप्रमाणे मानवाला घातक वेदांतील बहूदेव बहूनामी उपासनेला वेदमंत्राधार.

३. अदितिर्द्यौरदितिरन्तरिक्षमदितिर्माता स पिता स पुत्रः।
विश्वेदेवा अदितीः पंच जना अदितिर्जातमदितिर्जनित्वम् ॥
(ऋ. १/८९/१०)

अर्थ : अदिति (पृथ्वी) हीच स्वर्ग, अदिति हेच अन्तरिक्ष, अदिति हीच माता, तीच जनक, तीच पुत्र स्वरूप आहे. अदिति म्हणजेच सर्व देव. अदिति म्हणजेच सर्व लोक. (सर्व) प्रजा आणि भावी संतती अदिति स्वरूपच आहे.

४. स्वस्ति नो मिमीतामश्विना भगः स्वस्ति देव्यदितिरनर्वणः।
स्वति पुषा असुरो दधातुनः स्वस्ति द्यावापृथ्वी सुचेतुना ।
(ऋ ५/५१/११)

अर्थ : अश्विनीकुमार आमचे कल्याण करोत, भग, आणि देवी अदिति (आमचे) — कल्याण (करो). स्थिर राहणारा आणि प्राण-शक्ति देणारा पूषा आमचे कल्याण करो. विशेष ज्ञानी असणाऱ्या द्यावापृथ्वी (आमचे) कल्याण करोत.

५. स्वस्तये वायुमुप ब्रवामहे सोमं स्वस्ति भुवनस्य यस्पातिः ! ः
-बृहस्पती सर्वगणं स्वस्तये स्कस्तय आदित्यासौ भवन्तु नः ॥ ऋ. ५।५१।१२ अर्थ : कल्याणाकरीता (आम्ही) वायूची स्तूति करीत आहोत. जो जगाचा अधिपती आहे. त्या सोमाची आम्ही कल्याणाकरीता (स्तूती करीत आहोत.) सर्व देवगणासहित बृहस्पतीची आम्ही कल्याणा-करीता (स्तुती करीत आहोत) आदित्य आमचे कल्याण करणारे होवोत.

६. विश्वे देवा नो अद्या स्वस्तये वैश्वानरो वसुरग्निः !!
स्वस्तये ! देवा अवन्त्वृभवः स्वस्तये स्वस्तिनो रुद्रः पातवंहस ऋ. ५।५१।१३ अर्थः सर्व देव आज आमचे कल्याण करणारे होवोत. सर्व व्यापक, वैश्वानर अग्नि आमचे कल्याण करो. देव आणि ऋभु (आमच्या) कल्याणाकरीता (आमचे) संरक्षण करो.

७. स्वस्ति मित्रावरुणा स्वस्ति पथ्ये रेवति/स्वस्तिन इद्रश्चाग्निश्च स्वास्तिनो आदिते कृधि ॥ (ऋ. ५।५१।१४)

अर्थ : हे मित्रावरुणानो कल्याणकरक व्हा हे मार्गरक्षक आणि धनसंपन्न देवते, (तू आपचे) कल्याण कर. इंद्र व अग्नी आमचे कल्यण करोत आणि हे अदिते, तू ही आमचे कल्याण कर.

८. येभ्यो माता मधुमत्पिन्वते पयः पीयूषं द्यौरदितीरद्रिबर्हाः
उक्थशुष्मान् वृषभरान्त्स्वप्नसस्तां आदित्यां. अनु मदा स्वस्तये !! ऋ १०।६३।३

अर्थ : ज्याच्या करीता माता (पृथ्वी) मधुर दूध देते, समृद्ध आणि मेघमंडळाने आच्छादित अशी अंतरिक्ष देवता घृत देते. अशा स्तुतीनी बलीष्ठ झालेल्या वृष्टी देणाऱ्या आणि चांगली कामे करणाऱ्या त्या देवांची (आपल्या) कल्याणासाठी स्तुती करा.

९. नृचक्षसो अनिमिषन्तो अर्हणा बृहद्देवासो अमृतत्व मानशुः
जोतीरथा अहिमाया अनागसो दिवो वर्ष्माणं वसते स्वस्तये !
ऋ. १०।६३।४

अर्थ : (स्वकर्म करणाऱ्या) मनुष्यांना पाहणारे आणि सदोदित जागृत असलेले (इंद्रादी) देव पूज्य होऊन जेष्ठ अशा अमरत्वाला प्राप्त झाले. तेजोमय स्थानीयुक्त, अजिंक्य आणि पुण्यवान असे हे देव सर्व लोकांच्या कल्याणासाठी स्वर्गलोकाच्या मध्य भागावर राहु लागले.

१०. सम्राजो ये सुवृधो यज्ञ यज्ञ माययुरपरिह्वृता दधिरे दिवि क्षयम् । तां आ विवास नमता सुवृक्तिभिर्महो आदित्यां अदितिं स्वस्तये (ऋ १०/६३/५)

अर्थ : सर्व लोकांचे राजे व अतिशय उत्कर्षाने वाढलेले जे (देव) यज्ञात येतात (आणि) पराभूत न होता स्वर्गलोकात (जाऊन) निवास करतात. अशा त्या देवांची व अदितिची (त्यांच्या मातेची) सर्वांच्या कल्याणासाठी चांगल्या नमस्कारांनी आणि स्तोत्रांनी स्तुती करावी.

११. को वः स्तोमं राधति यं जुजोषथ विश्वे देवासो मनुषो यतिष्टन्
कोः वो ऽध्वरं तुविजाता अरं करद् यो नः पर्षदत्यंहः स्वस्तये ॥
(ऋ १०।६३।६)

अर्थ हे सर्वज्ञ अखिल देवांनो (तुम्ही) असंख्य अहात, (पण) ज्याच्यावर तुमची प्रीती आहे असा (माझ्याशिवाय) कोण तुमच्यासाठी स्तोत्र रचु शकेल ? अनेक प्रकारच्या देवांनो, जो (यज्ञ) आमच्या कल्याणाकरिता पापरूप मार्ग दूर करतो. असा तुमचा यज्ञ (माझ्याशिवाय

दुसरा) कोण पूर्ण करील ?

१२. येभ्यो होत्रां प्रथमामायेजे मनु: समिद्धाग्निर्मनसा सप्त होतृभि: ।

त अदित्या अभयं शर्म यच्छत सुगा न: कर्त सुपथा स्वस्तये ॥ ऋ १०।६३।७

अर्थ : ज्यानें अग्नि प्रदिप्त केला आहे अशा मनुनें (श्रद्धायुक्त) मनानें सात ऋत्विजासह ज्यांच्याकरीता प्रथम यज्ञ केला. हे देवांनो, ते तुम्ही आम्हाला निर्भय सुख द्या आणि आमच्या कल्याणासाठी जाण्यास योग्य असे (वैदिक) मार्ग प्रवृत्त करा.

१३. ये ईशिरे भुवनस्य प्रचेतसो विश्वस्य स्थातुर्जगतश्च मंतव: ।

ते न । कृतादकृतादेनसस्पर्यद्या देवास: पितृता स्वस्तये ॥ १०।६३।८

अर्था : उत्तम ज्ञानवान, सर्व जाणणारे आणि जे स्थिरचर अशा सर्व लोकांचे नियमन करतात, असे ते (तुम्ही) हे देवांनो, (आमच्या) शरीराकडून व मनाकडून घडलेल्या पातकापासून आम्हाला आमच्या कल्याणासाठी आज दूर करा.

१४. भरेष्विन्द्रं सुहवं हवामहें ऽ होमुचं सुकृतं दैव्यं जनम् ।

अग्निं मित्रं वरुणं सातये भगं द्यावापृथ्वी मरुत: स्वस्तये ॥ ऋ १०।६३।९

स्तुतिला पात्र व सर्व पातकांचा नाश करणाऱ्या इंद्रास व पुण्यवान अशा देवमंडळीला (आमच्या रक्षणासाठी आम्ही संग्रामांत बोलावितो व त्याच वेळी) अन्नाची विपुलता होण्यासाठी आणि कल्याणासाठी अग्नि, मित्र, वरुण भग, द्यावापृथ्वी व मरुत यानांहि (बोलावितो)

१५. विश्वे यजत्रा अधि वोचतोतये त्रायध्वं नो दुरेवाया अभिह्रुत: ।

सत्यया वो देवहूत्याहुवेम शृण्वतो देवा अवसे स्वस्तये ॥

ऋ. १०।६३।११

अर्थ :– हे पुजनीय देव हो, (तुम्ही सर्व (आमच्या) रक्षणासाठीं (आम्हांस) अभिवचन द्या आणि सर्व प्रकारे नाश करणाऱ्या दुर्गती-

पासून आमचे रक्षण करा. हे देवांनो (आमच्या) रक्षणासाठी व कल्याणासाठी (स्तुती) ऐकणाऱ्या तुमची यथार्थ स्तोत्रांनी स्तुती करु.

१६. अपामीवामप विश्वामनाहुतिमपारातिं दुर्विदत्रामघायत। ।
आरे देवा द्वेषो अस्मद्युयोतनोरूणः शर्मयच्छता स्वस्तये ।।
१०।६३।१२

अर्थः– हे देवांनो आमचे रोग दूर (करा) सर्व नास्तिक बुद्धीं दूर (करा) शत्रूंस दूर (करा) पापी शत्रूंची दुष्ट बुद्धी (दूर करा) आणि (सर्वच) शत्रू आमच्या पासून दूर ठेवा आमच्या कल्याणासाठी आम्हाला विपुल सुख द्या.

१७. अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत ! सदेवां एह वक्षति ! ! शु. १।१।२

अर्थ: पूर्वीच्या तसेच नव्या ऋषीनी ह्या अग्निची स्तुती केली आहे. तो (हा अग्नि) देवांना येथे घेऊनयेत आहे.

१८. प्रातरग्निं प्रातरिन्द्रं हवामहे प्रातर्मित्रावरुणा प्रातरश्विना ।
प्रातर्भगं पूषणं ब्रह्मणस्पतिं प्रातः सोममुत रुद्रं हुवेम ।।
(ऋ. ७।४१।१)

अग्नि, इंद्र, मित्रावरूण, अश्विनी कुमार, भग, पूषा, ब्रह्मणस्पति आणि सोम यांना आम्ही सकाळी बोलावितो तसेच रुद्र देवासही बोलावितो.

यावरिल १८ मंत्रांत बहूदेव, बहूनामाचा स्पष्ट उल्लेख आहे. ज्याप्रमाणे प्रतिव्रतेला एक पती एक नाव साधक आहे. त्याप्रमाणे मानवाला (भक्ताला) एक देव, एव नाव साधक आहे तसेच पतिव्रतेला अनेक पती अनेक नाव घातक आहे त्याप्रमाणे मानवाला (भक्ताला) अनेक देव, अनेक नाम घातक आहे. अनेक पती आचाराने अधोगती, तसेच अनेक देव उपासनेने मानवाला अधोगती.

आगमाचा देव एक आहे. वेदाचे देव शेकडो आहेत. आगम अगोदर, वेद नंतर, आगम उपासना एकेश्वरी आहे. वेदोपासना बहू इश्वरी आहे. पंडीत महादेव शास्त्री आपल्या "गाजती दैवते" या ग्रंथात लिहितात की ऋग्वेदात अडिचशे देवता संख्या आहे. पुढे अथर्व वेदांत आणखी वाढली आहे. पुराण काळात हजारो देवता मानवाने निर्माण

केल्या आहेत. त्याशिवाय समाजातील जाती जमातीच्या देवता, ग्राम-देवता, यांची त्यात पुष्कळ भर पडली आहे. त्याच्या जोडीला मेलेले पूर्वज, रणांगणावर पतन पावलेले वीर पुरुष, वेताळ, भुते, प्रेते, पिशाच्च हेही देव कोटीत दाखल झाले, विशिष्ट वृक्ष, पशू पक्षी यांनाही देवत्व प्राप्त झाले. पर्वत नद्या, समुद्र, यानाही देवत्व मिळाले.

या सर्व देव निर्मितीला आधार वेदातील बहू देवत्व आहे. वेदानें (मानव ऋषीनें) स्विकारलेल्या श्रेष्ठ देवता देवमानव आहेत. आणि कनिष्ठ देवता वैदिक हिंदूंच्या कल्पनेतील आहेत.

आगम उपासना मानवाला ज्याप्रमाणे एक बाप एक पती असतो, त्याप्रमाणे उपासकाला (भक्ताला) एक ईश्वर (एक देव) आहे. देवाचे नावही एकच आहे. वेदानें आगमाची शिव ही देवता स्वीकारली आहे. वेदांतील शिवांच्या चरित्राधारे उत्तरध्रुवीय पौराणिक हिंदूंनी केवढा पापाचार निर्माण केला आहे. त्याचे वर्णन मागे केले आहे. आता वेदातील शीव रुद्र नावाचा वेदाधारे विचार करू.

६८. वेदातील शिव, रुद्र, शंभो, शकर नावाचा अर्थ.

१. शिव : मंगलकारी (यजु. १६।२)
२. शिव : मंगलकारी (य. १६।२)
३. शिव : कल्याणकारी (य. १६।४)
४. शिव : मंगलकारी (य. १६।१३)
५. शिव : मंगलकारी (य. १६।४१)
६. शिव : कल्याण करणारा
७. शिव : दिसायला सुंदर
८. शिव : सुख देणारा (य. १६।४९)
९. शिव : सुख देणारा (य. १६।५१)
१०. शिव : न्याय करणारा (य. १७।११)
११. शिव : मंगल करणारा (य. १७।१५)
शांकर : कल्याण करणारा (य. १६।४१)
शंभो : सुखाला निर्माण करणारा परमेश्वर (१६।४१)

चारी वेदांत शिव हा शब्द हजारो ठिकाणी आला आहे. एका यजुर्वेदातील अध्याय १६ मध्ये १० ठिकाणी शिव हा शब्द आला

आहे. त्याचा अर्थ मंगळ करणारा, मंगल स्वरूप, सुख देणारा, सुख-स्वरुप मंगलमय, न्यायकारी असे अर्थ आहेत (य. १६।४१) मध्ये शंकर शब्द आला आहे, त्याचाही अर्थ कल्याण करणारा, सर्व प्राण्यांना सुख देणारा असा अर्थ आहे. याच मंत्रात शंभो हा शब्द आला आहे, त्याचाही अर्थ सुखाला निर्माण करणारा परमेश्वर, असा आहे. शिव, शंकर, शंभो, या तीनही शब्दाचा अर्थ एकच आहे. आणि ही नावे देव मानवाचीं आहेत. (महादेवाची नावे आहेत.)

६९. वेदातील रुद्र नावाचा अर्थ.

१. रुद्र : दुष्टांना भय आणि श्रेष्ठींना सुखकारी शिक्षक, विद्वान (य. १६।२)

२. दुष्ट शत्रूंना रडवणारा (य. १६।१)

३. दुष्ट कर्म करणाराला रडविणारा (य. १६।६)

४. विद्वान पुरुष (य. १६।१५)

५. शत्रूंना रडविणारा (य. १६।१८)

६. दुष्टांना रडविणारा (य. १६।२८)

७. दुष्टांना रडायला लावणारा (य. १६।३९)

८. सभापती, राजा (य. १६।५०)

९. जीवाचा प्राणादि वायु (१६।५४य.)

१०. सर्व प्राण्याचा जीव आणि प्राण (य. १६।६४)

११. प्राणादी (१६।६४ य.)

१२. (य. १६।६५)

१३. (य. १६।६६)

चारी वेदांत रुद्र हा शब्द हजारो ठिकाणी आला आहे. यजुर्वेदातील अध्याय १६ मध्ये वर उद्धृत केलेल्या मंत्रात १३ प्रकारात अर्थ काढलेला आहे आणि संपूर्ण अध्यायातील ६६ मंत्राची देवता रुद्रच आहे. चारी वेदातून एकाच अध्यायातील १३ + ६६ = ७९ शब्दांचा अर्थ एक सारखाच आहे. दुष्टांना रडविणारा, दुष्टकर्म करणाराला रडविणारा, भय दाखविणारा, विद्वान पुरुष, राजा, प्रत्येक जीवाचा प्राणवायू सर्व जीवाचा जीव आणि प्राण असा

आहे. वरील सर्व अर्थ एकार्थीच आहेत. हे (रुद्रा) दुष्टानां त्याच्या पापाबद्दल दंड करून त्याना रडायला लावणाऱ्या परमेश्वरा आम्हाला पाप करण्याची बुद्धि देवू नको आमचे कल्याण होइल अशी बुद्धि दे.

दुष्टांना पाप्यांना रडविणारा असा हा रुद्र हातापायाचा नाका डोळयाचा, मानवाकृतीचा मानवदेव महादेव होता, दैत्य, दानव, राक्षस असा कोणी प्राणी नाही. दुष्ट पापी मानव आपल्या पापाचे फल दुःख दारिद्र्य भोगताना आपोआपोच रडतो, पापाचे फल दुःख हा सिद्धांत सर्वच धर्मग्रंथात आहे.

७०. वेदातील रुद्रशब्दाचा विपरितार्थ.

रुद्र शब्दाचा अर्थ विद्वान पंडितांनी घोर, रौद्र, हिंस्र पशू सदृश, भयंकर, विनाशक, अनार्यांची देवता. अनार्याधिपती, पर्वतावर राहाणारा जंगलात राहणाऱ्या पशू, चोर, डाकु, अंत्यंज आदिचा राजा. असा अर्थ केला आहे. ते चुकीचे आहे. रुद्र शाब्दाचा अर्थ (य' १६।२) या मंत्रात चांगल्या पुरुषाला सुख देणारा, शिक्षक – चांगले शिकविणारा, (विद्वान यजु. १६।५० ) मध्ये सर्व प्राण्यांचा प्राण असा आहे. तात्पर्य रुद्र या शब्दाचा अर्थ परमेश्वर वाचक आहे. तसेच शिव शंकर शंभो या शब्दार्थासारखा आहे, आणि तो सर्वश्रेष्ठ आहे. ही नावे इश्वराची नाहीत देव मानवाची (महादेवाची) आहेत. ज्याप्रमाणें ओंकार (ॐ) इश्वर वाचक (ईश्वराचे नांव) आहे, त्याप्रमाणे शिव रुद्र, शंकर, शंभो ही नांवे इश्वराची नाहीत. अशी वेदांत विश्वनिर्माण करणाऱ्या निराकार परमेश्वराची अनेक नांवे अहेत. असे वैदिक मानतात पण ती सर्व देवमानवाची आहेत.

या अनेक नांवापैकी मानवाने दोन नांवे श्रेष्ठ मानली आहेत. ती (१ ॐ आणि २ शिव) ही दोन्ही नांवे आदिकाला पासून आजतागायत श्रेष्ठत्वाने भारतीय वैदिक आर्यांनी सांभाळली आहेत.

विश्व निर्माण करणाऱ्या निराकार परमेश्वराची ( शिवाची ) उपासना ( पुजाअर्चा ) करण्याकरिता निराकार प्रतिक (चिन्ह) देवमानवाने तयार केले आहे. त्याला शिवलिंग म्हणतात.

७१ लिंग शब्दाचा अर्थ

१) लिंग म्हणजे खूण

२) लिंग—म्हणजे चिन्ह या अर्थाने रघुवंश ग्रंथात आला आहे

३) लिंग म्हणजे सामर्थ्य

४) लिंग म्हणजे आकार या अर्थाने भागवतात आला आहे.

५) लिंग म्हणजे शाळुंकेतील शिवलिंग

६) लिंग :— जीवाचे सूक्ष्मस्वरूप असा अर्थ भागवतात आलेला आहे.

७) लिंग म्हणजे शब्दाचे लिंग सांगणारे शास्त्र या अर्थाने व्याकरण शास्त्रात आलेला आहे. लिंग या शब्दाचे अर्थ अनेक ग्रंथात अनेक ठिकाणी अनेक अर्थाने आलेले आहेत.

७२ आगमोक्त उपासना साधी सोपी आहे. वेदोपासना अवघड [कठीण] आहे.

अशा अनेक नांवापैकी भारतीय आगमोक्त देव आर्यादीमानवाने विश्व निर्माण कर्त्या निराकार इश्वराच्या चिन्हाला शीवलिंग हे नांव ठेवले आहे. शिवलिंग उपासने करीता वेदाआगोदरचे आगम नांवाचे २८ ग्रंथ आदी मानवाने (देवमानवाने) निर्माण केले आहेत. वेद आणि आगम हे दोन प्रकार वेगळे का एकच आहेत अशी शंका निर्माण होते. वेदांत प्रतीक उपासना नाही. आगमात प्रतीक उपासना आहे. अप्रतिक उपासनेने इश्वर प्राप्तीला फारच कष्ट पडतात, आणि वेळही पुष्कळ लागतो. प्रतिक उपासनेने इश्वर प्राप्ती अल्प कष्टाने आणि थोडया वेळात होते. वेदोपासनेने इश्वर प्राप्ती करीता संसाराचा त्याग करावा लागतो आणिं आगमोपासनने ईश्वर प्राप्ती करिता संसाराचा त्याग करावा लागत नाही. वेदोपासना अवघड आहे आणि आगमोपासना फारच सवघड (सोपी) आहे. कांही उपासक वैदिक उपासना करतात आणि कांही आगमोक्त उपासना करतात. दोन्हीं उपासकांचे अंतिम साध्य एकच आहे आणिं ते दोघानाही साध्य होते. वेदाची बहूदेव बहूनामी उपासना घातक आहे.

७३. आगमाचा अर्थ सोपा आहे. वेदाचा अर्थ अवघड (कठीण) आहे.

ज्या प्रमाणे वेदोपासना अवघड (कठीण) आहे, त्याप्रमाणे वेदाचा अर्थबोधही कठीण आहे आणि आगमोपासना सोपी (सुलभ) आहे. त्याचप्रमाणे आगमाचा अर्थबोधही सोपा (सुलभ) आहे.

| | |
|---|---|
| वेदाची उपासना अप्रतीक आहे. | आगमाची उपासना सप्रतीक आहे. |
| वेदोपासना निराकाराची आहे. | आगमोपासना निराकारी साकार प्रतिकाची (शिवलिंगाची) आहे. |
| वेदोपासनेत भक्ती गौण आहे. | आगमोपासनेत भक्ती विशेष आहे. |
| वेदोपसना रुक्ष आहे. | आगमोपासनेत भक्तीरस आहे. |

भारतीय वैदिक आर्यांतील ब्राह्मण क्षत्रिय म्हणजे लिंगायत (वीरशैव) आगमोक्त शिवलिंग उपासक आहेत. परंतु त्यांनी वेदाचा त्याग केला नाही. ते आगम निगमाला सारखेच मानतात. त्यांच्या बोलण्यात त्यांच्या ग्रंथांत आगमनिगम असा जोड शब्द येतो. परंतु वेदाची बहूदेव उपासना व हिंसा वीरशैवाना त्याज्य आहे.

**७४. उत्तर ध्रुवीय हिंदूनी आगम निगमाचा त्याग केला आहे.**

उत्तर ध्रुवीय वैदिक हिंदूनी मात्र आगम निगमाचा त्याग करून निराळाच प्रकार निर्माण केला आहे. तो सर्व आगम निगमा विरुद्ध आहे. वैदिक आर्य हिंदूनी परब्रह्म परमेश्वराची (शिवाजी) दोन रूपे केली आहेत. रौद्र (रुद्र) आणि शिव. शिव हा मोक्ष देणारा आणि रुद्र हा महापाप करणारा असून तोही मोक्ष देतो असे म्हणतात. यांच्या म्हणण्याचा सारासार विचार केल्यास, महापाप करणाऱ्याला मोक्ष कशानें मिळतो हे तरी ज्ञान असेल का ? स्वतः पाप केल्यानें अधोगतीला जाणारा असून, त्याच्या भक्ताला तो मोक्ष देईल कां ?

उत्तर ध्रुवीय वैदिकांचा शिव आणि रुद्र यांची शरीरे (रूपे) वेगवेगळी दोन आहेत. हा लेख (वैदिक सूक्त पाठ) नावांच्या ग्रंथात पान ३९ मध्ये आहे. एकाच शिवाची रूपे (शरीरे) दोन आहेत. दोघांची कर्मे वेगवेगळी आहेत. एक महापाप करतो आणि दुसरा पुण्य करणारा आहे. असे असूनही दोघेही मोक्ष देतात. असे असणे शक्य आहे का ? यांचा शांत स्वरूपी शिव देवी पार्वती स्वरूपी स्वपत्नी बरोबर कैलास पर्वतावर राहातो. भक्ताचे पालन, दैत्याचे, राक्षसाचे निर्दालन हे त्याचे मुख्य कर्म आहे. देव देवता, ऋषिमुनी त्याची पूजा करतात. त्याचे कौटुंबिक जीवन प्रसन्न आनंदी असून शिवपार्वती प्रणय-क्रिडा करतात. आणि बद्धीबळाचा डाव खेळतात. हा मोक्ष देणारा आहे.

दुसरा रूद्र तामसी आहे. हा तामसी शिव काली नामक पत्नी-सह अंगाला चितभस्म चोपडून साप, प्रेते आणि मानवी कवटयाचे अलंकार धारण करून, स्मशानातील प्रेंत शरीरावर तांडव नृत्य करतो. स्मशानातील धगधगत्या चितांच्या प्रकाशांत मानवी कवटयाच्या डमरूच्या ताला वरील या नृत्य प्रसंगी राक्षस पिशाच्च आणि अस्थि पंजर प्रेतें रुद्रगण बनून सहभागी होतात. नृत्य समाप्ती नंतर रूद्र स्वगणा समवेत प्रेत शरीरावरील मांस तसेच कपालातून (कवटयाचे पात्र) मानवी रुधीर (रक्त) सेवन करतो. असा हा शिव महापाप करणारा, आणि वर उद्धृत केलेला शांत ही एका शिवाची दोन रूपे (शरीरे) आहेत. असा या दोन शरीराचा पाप पुण्य करणाऱ्या शिवाला मोक्ष कशाला म्हणतात हे कळले असेल का ? असा हा शिव अगमाला मान्य नाही. तसेच जीव शिवांत विलीन होतो असा मोक्ष ही मान्य नाही. (पाहा ऋग्वेद १।१६४।२०) जीव, शिव, आणि प्रकृती वेगवेगळी स्वतंत्र आहेत.

(अ) ईश्वर, जीव, आणि प्रकृती स्वतंत्र वेगवेगळी आहेत. कोणी कोणातून निर्माण व विलिन होत नाहीत.

द्वा सुवर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभि चाकशीति ।।

(ऋ. १।१६४।२०, )

(द्वा) ब्रह्म व जीव हे दोनही (सुपर्णा) चेतनत्व व पालनशक्ती या गुणांमध्ये सुदृश्य आहेत, (सयुजा) ते व्याप्य व व्यापक भावाने संयुक्त झालेले आहेत, (सखाया) ते परस्पर मित्र आहेत. सनातन व आदि आहेत, (समानम्) या दोहोंप्रमाणेच (वृक्षम्) अनादि मुल-रुपकारण व शाखारुप कार्य यांनी युक्त असा एक वृक्ष आहे. जो मुल-रुपात असताना कारणस्थितीत असतो. तो स्थूल होऊन शाखारूप बनला म्हणजे त्याचा विस्तार होतो, व विस्तार प्रलयी छिन्न-भिन्न होऊन पुनः तो कारणरूपाला जाऊन मिळतो, असा तिसरा अनादि पदार्थ आहे याचे गुणधर्म स्वभावही अनादि आहेत. पूर्वी सांगितलेल्या जीव व ब्रह्म यापैकी जो जीव आहे, तो या शाखामय वृक्षरुप संसारातील पाप-पुण्याच्या फलांचा (स्वादु) अति उत्तम प्रकारे आस्वाद घेतो, पण दुसरा

जो परमात्मा आहे. तो (अनश्नन) फलांचा उपभोग करीत नसून चारीही बाजुनी बाहेर व आत सर्व ठिकाणी प्रकाशमान होत आहे. जीवाहून इश्वर व इश्वराहून जीव भिन्न आहेत. आणि या दोहोपेक्षा (मुल जडकारण) प्रकृती स्वस्मतः भिन्न आहे. असे हे तीनही अनादि पदार्थ आहेत.

यथातथ्यतोऽर्थान व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्य ॥ यजु. ४०।८

अनादि सनातन जीवरूम प्रजेकरीता ऋषी मुनीनें वेदाद्वारा सर्व विद्येचा उपदेश केला आहे.

अजोमेकां लाहित शुक्ल कृष्णां वन्हीः प्रजाः सृजमानां स्वरुपः।
अजो ह्येको जुष्माणे नुशेते जहां तेनां मुक्तभोगामजोऽन्यः
(श्वेताश्वेतर. उप. ४।५)

प्रकृती, जीव व परमेश्वर हे तीनही अन् अर्थात कधीही जन्मास न आलेले असे आहेत. अर्थात हे तीनही अनादि असून जगताचे कारण आहेत. यांना कोणी कारण नाही. अनादि प्रकृतीचा उपभोग अनादि जीव करतो तो फसतो, तसा परमात्मा फसत नाही. तो प्रकृतीचा उपभोग घेत नाही.

वरील प्रमाणावरून असे सिद्ध होते की जीव आणि शिव (ईश्वर) वेगवेगळे आहेत. त्यांना जन्म नाही व मरणही नाही. ते दोघेही जन्मत नाहीत तसेच मरणही पावत नाहीत. असा हा वेदागमाचा सिद्धांत आहे

**७५ शैवागमाचा मोक्ष**

वेदांत्याचा मोक्ष शैवागमाना व शैवाचार्याना मान्य नाही. कारण निष्क्रीय निर्गुण निर्धर्मक ब्राह्मत्वाशी अभिन्न होऊन राहाणे म्हणजे पर्यायाने जड पाषाण प्राय स्थितीच स्वीकार करण्यासारखे आहे. ते अवस्थान आहे. दुःखरहित सुखलाभ हे जे मोक्षाचे स्वरूप ते या ब्रह्मत्वाशी अभिन्न पावल्याने कसे साध्य होणार ? अज्ञानाचा आवरण भंग झाल्याने दुःख नाश होईल, पण आनंदाची प्राप्ती कशी व्हावी, ब्रह्म हे आनंद स्वरूप असले तरी त्याच्याशी ऐक्य पावणाऱ्यांना तो आनंद मिळाला असे म्हणता येणार नाही. मधुर रसाने साखरेचे अंतरबाह्य स्वरूप जरी भरून राहिले तरी त्या साखरेशी एकरूप होणाऱ्यास त्याचा काय उपयोग ? साखर होण्यापेक्षा साखरेतील मधुर रसाचा आस्वाद

उपभोगणे हे अत्यंत महत्त्वाचे आहे. जिभेवर ठेवलेला साखरेचा खडा तेथे घोळत ठेवण्याने त्यातील गोडी जशी चाखता येते तशी ती त्याच्या निष्क्रीय अवस्थेत चाखता येणार नाही. आता अशी ब्रह्मरसाची गोडी चाखण्यामध्ये द्वैतभाव निर्माण होउन अद्वैत सिद्धांताचा त्या योगे बाध होण्याचा प्रसंग येईल असे कदाचित कोणाला येथे भय वाटण्याचे कारण नाही. व्दैत हे सत्य असेल तर अव्दैताला बाधक होईल. पण भक्ती सुखार्थं स्वेच्छेनें कल्पिलेले व्दैत हे अव्दैताची हानी कधीही करणार नाही. बोधसार नामक ग्रंथामध्ये नरहरीचे असे विधान आले की,

द्वैतं मोहाय बोधात् प्राक प्राप्ते बाधे मनीषया ! !
भक्त्यर्थं कल्पितं अद्वैतादपि सुंदरम् ! !
जाते समरसानंदे व्दैतमप्यमृतोपमम् ! !
मित्रयोरिव दंपत्यो र्जीवात्म परमात्मनोः! !

ज्ञान होण्यापूर्वीचे व्दैत हे मोह निर्माण करील, परंतु ज्ञान झाल्यानंतर स्वेच्छेनें भक्तीसाठी व्दैताची जी कल्पना केली जाते ती अव्दैतापेक्षाही सुंदर आहे. सामरस्य झाल्यानंतर व्दैत हे अमृता प्रमाणे आनंददायक होते. जीवात्मा आणि परमात्मा यांचे सामरस्य हे प्रेमळ पतिपत्नीच्या मधुर मिलनासारखे निरातिशय सुख देणारे आहे. मोक्षाच्या लक्षणांतील दुःख ध्वंसा नंतरचा द्वितीय अंश जो सुखलाभ हा अंश तो मायावादी वेदांताच्या रुक्ष ज्ञानाने मिळणाऱ्या मोक्षांत मिळणे कधीही शक्य नाहीं. त्या मोक्षामध्ये भक्तिचा ओलावा नाही. या कारणाने त्या निरस मोक्षाचा त्याग करून शैवाचार्य यांनी भक्तिच्या साह्याने सामरस्य निर्माण झाल्यानंतर दिव्यानंदाचा आस्वाद ज्यामध्ये मिळतो अशा मोक्षाची योजना उपपत्तीसह त्रिविध दुःख तापानें होरपाळलेल्या जनतेपुढे ठेवून त्यांना दुःखमुक्त करण्याचा प्रयत्न केला आहे.

भारता बाहेरून येवून भारतीय म्हणविणाऱ्या उत्तर ध्रुवीय वैदिक आर्य पुरोहितांनी विश्वारंभापासून चालत आलेला आगमनिगमोक्त आर्यावर्तीय भातीय वैदिक आर्यांची सर्वश्रेष्ठ आदि कालातील ग्रंथ संपत्ती पैकी वेदांत हिंसात्मक प्रकार घुसडून वेदाला निंद्य बनविले आहे आणि आगमांत कपोलकल्पित महाभांयकर पाप करणाऱ्या शांकराच्या

तोंडातून व त्याची बायको आदि शक्ती म्हणविणाऱ्या महाभयंकर पाप करणाऱ्या पार्वतीच्या व त्याचा मुलगा सहा तोंडाच्या कार्तिकी यांच्या संवादातून आगम मिर्माण झाले आहेत. असा प्रकार निर्माण करून आगमालाही निंद्य करून ठेवल्यामुळे आगमाचे सिद्धांत चुकीचे व निंद्य बनवून ठेवले आहे. या आगम ग्रंथातील निंद्य केलेला (घुसडलेला) प्रकार चालू कालातील बिद्वान पंडितांने काढून टाकल्यावर खग्रास ग्रहाणातून मुक्त झालेल्या सूर्यां प्रमाणे प्रकाशमाण होवून जगव्दंन होतील.

७६. आगमोद्धारचे आव्हान व विनंती

हे आगमोद्धाराचे कार्य वीरशैव ( लिंगाथ ) विद्वान, पंडीत, महापंडित धर्मगुरू, सर्वश्रेष्ठ जगद्रू परमपूज्य संचाचार्य या सर्वांनी मिळून करावे असे माझे (लेखकाचे) आव्हान आणि नम्र विनंती आहे.

७७. ५००० वर्ष अज्ञात वेदाचा दयानंदाने उद्धार केला

वैदिक आर्यांनी वेदाला निंद्य केलेला प्रकार १९ व्या शतकात दयानंद सरस्वतीनें बदलून वेदाचे निंद्यत्व नष्ट करून प्रकाशमान करून आर्यावर्तीय भारतीय वैदिक आर्यावर महान उपकार केले आहेत.

७८. दयानंद सरस्वतीचे अज्ञान.

दयानंदांनी वेदोद्धार करून वेदाला प्रकाशमान केले परंतु वेदा-अगोदरच्या आगमाचा उद्धार तर केला नाहीच पण आनादि कालच्या आगम निर्माण करणाऱ्या शिवोपासक देवमानव ऋषीमुनीच्या शिवलिंग उपासनेचा, शिवलिंग धारक वीरशैवाचा, स्थवर शिवलिंग उपासक, शैवाचा, आगमादि अनादि शैवागम ग्रंथाचा पर्यायाने आर्यावर्तीय वैदिक आर्याचा भारतीय संस्कृतीचा, आगमोक्त अहिंसातत्वाचा, पर्यायाने सत्याचा, धिःकार केला आहे. हा धिःकार म्हणजे पर्यायाने परब्रह्म परमेश्वराचाच धिःकार आहे असे म्हणायला काय हरकत आहे. कारण

या ग्रंथातील पहिल्या प्रकरणांत पहिल्या भागात "भारताचा अशुद्ध इतिहास" लिहिला आहे. उत्तरध्रुवीय वैदिक आर्य हिंदूंनी महाभयंकर पशू हिंसेला आधार असलले ब्रह्मणादि असद् ग्रंथाचा धिःकार न करता त्याचा स्वीकार केला आहे. दयानंदाने निर्माण केलेल्या वाङ्मयांत वैदिक सिद्धांताला ब्रह्मणादि हिंतात्मक असद ग्रंथाचा

हजारो ठिकाणी आधार घेतला आहे. ब्राम्हणादि ग्रंथांचा स्विकार करणे म्हणजे उत्तर ध्रुविय वैदिक आर्यांनी (हिंदूंनी) निर्माण केलेल्या वाङ्मयाबरोबर, त्यांनी निर्माण केलेल्या लाखो, कोटयावधी क्षुद्र देवतांचा आणि महा भयंकर हिंसेचाच स्वीकार केला आहे असे म्हणायला काय हरकत आहे.

अहिंसा तत्वावर आधारीत असलेल्या अनादि कालापासून म्हणजे कृत, त्रेता द्वापर आणि कली या चारी युगांत शिवा (परब्रह्म परमेश्वर) ची उपासना चालत आलेली. या उपासनेला वेदागम, शैव पुराणे, शैवोपनिषदादि ग्रंथ या सर्वांना धि:कारून, महापापाचारकरिता उत्तर ध्रुविय वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या ब्रह्मणादि ग्रंथाचा स्वीकार दयानंदानी थोडातरी विचार करून केलेला नाही. वैदिक आर्यानी (उत्तर ध्रुविय आर्यांनी) पापाचाराकरिता निर्माण केलेल्या ग्रंथातील आर्थाचा वदल केला आहे पण त्याचा त्याग (नष्ट) न करता अर्थ बदलून स्वीकार केला आहे. हिंसक प्रकार जतन केला आहे. आगम शैव आणि पुराणे. शैवोपनिषदे या अहिंसक प्रकाराचा धि:कार केला आहे, पर्यायाने नष्ट केला आहे. आर्यावर्तीय भारतीय वैदिकांच्या आत्मलिंगाला (शिव-लिंगाला,) आर्यावर्तीय भारतीयांच्या अहिंसात्मक शिवोपासनेला नष्ट करू पाहाणाऱ्या, उत्तर ध्रुवीय आर्याप्रमाणेच, वेदोद्धार करणाऱ्या, वैदिक धर्माचा जिर्णोद्धार करणाऱ्या, वैदिक धर्म या नावाने आर्य समाज स्थापन करणाऱ्या, वेदोद्धार, वैदिक धर्माचा वेदाचा प्रसार व प्रचार करणाऱ्या महर्षी पदवी (भूषण) मिळविणाऱ्या," दयानंद सरस्वतीने, आणि त्यांची परंपरा चालविणाऱ्या पंडित महापंडितांनी उत्तर ध्रुवीय आर्या प्रमाणेच केले आहे. यज्ञ यागाच्या नावाने, देवदेवीच्या नावाने. दररोज कोटयावधी निरपराध पशू हिंसा निर्माण करणाऱ्या महापापी महाहिंसक उत्तर ध्रुपीय आर्यांनी (हिंदूनी) अहिंसा तत्त्वावर आधारित असलेले गणपती, वारकरी दत्त, वैष्णव, रामदासी, नाथ, बौद्ध, महाभाव, जैन धर्म पंथीयाचा वेद बाह्य म्हणून निषेध केला आहे. त्या प्रमाणेच दयानंदादि वैदिक आर्य समाजातील पंडित, महापंडितांनी निषेध केला आहे. परंतु निदान दयानंद सरस्वतीने तरी विचार करायला हवा

होता की गाणपत्य नाथादि पंथाचे तत्त्व वेद बाह्य आहेत का ? मूर्ती-पूजा गौण आहे. परंतु अहिंसा सदाचारादि प्रकार वेदबाह्य आहेत का ? कोणत्याही धर्म पंथाचा श्रेष्ठ कनिष्ठ प्रकार त्यातल्या धर्म पंथाच्या बाह्याचारावर असतो. प्रथम बाह्याचार शुद्धी नंतर अंतराचार शुद्धी. शेवटी अध्यात्माचा विचार. ज्याचा बाह्याचार वैदिक आहे, त्यांचा अंतराचार व अध्यात्म वेदबाह्य म्हणता येणार नाही. मूर्ती ही गौण आहे, वेद बाह्य आहे. ही अहिंसावादी धर्म ग्रंथ निर्माण होण्याचे कारण, उत्तर ध्रुवीय वैदिक हिंदूनी निर्माण केलेल्या महाहिंसेला आळा घालणे. ही धर्म पंथे निर्माण करणारे अहिंसक, सदाचारी, आगमनिगम तत्त्ववेत्ते होते. मूर्ती सोडून त्यांची सर्व तत्त्वे उच्च दर्जाची वेदागमोक्त आहेत, वंद्य आहेत, आणि हे धर्म पंथ निर्माण करणारे विश्वारंभापासून आगमानिगमात्मक विश्व निर्माण करणाऱ्या परब्रह्म परमेश्वराची (शिवाची) उपासना करणारे शैव आहेत. यानी निर्माण केलेले देव (मूर्ती) सर्व शिवलिंगधारक शिवोपासक आहेत.

वरील धर्म पंथीयांनी, आपल्या (वैदिक) उपासनेला आधारभूत निर्माण केलेले, धर्मग्रंथही वैदिक तत्त्वावर आधारीतच आहेत. अशा वेदागमोक्त तत्त्वावर आधारित धर्मपंथाचा दयानंदानी निषेध केला आहे. आणि उत्तर ध्रुवीय आर्यांनी आगमाच्यानंतर निर्माण झालेच्या वेदांत, हिंसात्मक प्रकार घुसडलेल्या, वेदाचा, आणि वेद बाह्य असून महाभयंकर हिंसेच्या सिद्धांता करीता निर्माण केलेले ब्रह्मणादि ग्रंथाचा स्वीकार केला आहे. आणि वेदागमोक्त अहिंसा तत्त्वावर आधारित धर्म ग्रंथाचा निषेध (धिःकार) केला अहे, तसेच

आगम निगमाच्याही अगोदर, आदिमानवाने निर्माण केलेला आगम निगमाने स्विकारलेला ज्याच्या उपासनेने आत्मबल वाढवून निगमागम निर्माण केले त्या उपास्य देवाचा परब्रह्म परमेश्वराचा ( शिवलिंगाचा ) निषेध करताना या वरील हिंसक आर्या प्रमाणेच दयानंदानी निषेध केला आहे. तो त्यांच्याच शब्दात आगदी थोडक्यात लिहीत आहे. दयानंद सरस्वतीने स्वतः लिहिलेल्या "सत्यार्थ प्रकाश" नावाच्या ग्रंथातील पृ. क्र. १८० मध्ये त्यांनी, उत्तर ध्रुवीय आर्यांनी महाभयंकर पशुहिंसा, भगिनी मातागमनादि पाप करणाऱ्या, महाभयंकर

शाक्ताच्या मालिकेत शिवलिंगाला व शिव उपासकाला गोवले आहे. शाक्ता विषयी "सत्यार्थ प्रकाश" पान क्र. १६७ पहा आणि शिवलिंगा विषयी पान क्रमांक १८० वर दयानंदानी लिहिले आहे की,

शैव व शाक्त याच दोन मतवाल्या लोकांनी लिंगपूजा सुरू केली, लिंगाची पूजा सुरू करण्यात त्यांना निर्लज्जपणा मुळीच वाटला नाही,. व आपण हा किती नीचपणा करीत आहो याचाही विचार त्यांना सुचला नाही. असे लिहीले आहे.

दयानंदानी शिवलिंगोपासेने विषयी असा निंद्य प्रकार का लिहिला आहे, याचा विचार केल्यास असे वाटते की दयानंदाला वैदिक वाङमय व (वेदानंतरचे) उत्तर ध्रुवीय हिंदूनी निर्माण केलेले ब्राह्मण पुराणादि ग्रंथ मिळाले होते. त्यात शिवलिंगोपासने विषयी जो निंदा प्रकार आहे तोच सत्य मानून, महापापाचारी वैदिका प्रमाणेच दया नंदानी शिवलिंगोपा-नेला निंद्य मानले आहे असे वाटते.

उत्तर ध्रुवीय हिंदूनी निराकार एकेश्वरी एक नामी अहिंसा तत्वावर अधारीत असलेली शिवलिंगोपाना, त्यांच्या पापाचाराला बाधक होती म्हणून शिवलिंगोपाना निंद्य बनवली आहे. तसेच शिवलिंगोपास-नेला आधार असलेले, वेदाच्याही आगोदरचे, सृष्टीवर प्रथम निर्माण झालेल्या देव मानवाने निर्माण केलेले, बहूदेव बहू नामी वेदोपाननेपेक्षा श्रेष्ट असलेले, निराकार एकेश्वरी एक नामी, शिवलिंग उपासनेला अहिंसा तत्वाला आधार असलेले शैवागम वाङमय दयानंदाना मिळाले नाही असे वाटते. कारण दयानंदानी निर्माण केलेल्या वाङ्मयात वैदिक हिंदूनी महापाचारा करिता निर्माण केलेल्या वाङ्मयाचा काही ग्राह्य व काही त्याज्य, या नात्याने उल्लेख आहे, परंतु त्याज्य या नात्याने का होईना परंतु आगम वाङ्मयाचा दयानंदाच्या वाङमयात कोठेही उल्लेख नाही. यावरून असे वाटते की आगम हे वाङ्मय दयानंदांना मिळाले नाही. त्यामुळे शिवलिंगोपानेचे महत्व दयानंदा कळलेच नाही.

उत्तर ध्रुवीय वैदिक हिंदूनी शिवलिंगोपाने विषयी जों निंद्य प्रकार निर्माण केला तोच दयानंदांनी सत्य मानून शिवलिंगोपासने विषयी अती निंद्य प्रकार लिहिला आहे. जोपर्यंत वैदिक हिंदूनी शिवलिंगाविषयी लिहिलेला निंद्य प्रकार मिळाला नव्हता तोपर्यंत

दयानंद महान शिवलिंगोपासक होते.

वेदाच्याही अगोदर सृष्टीवर प्रथय मानव निर्माण झालेल्या देवमानवाने निर्माण केलेल्या, सर्व जगातील मांनवाने सर्व श्रेष्ट मानलेल्या, बहूदेव बहूनामी वेदोपासनेपेक्षा श्रेष्ट असलेल्या, अहिंसा तत्वी, निराकार एकेश्वर, एकनामी शिवलिंगोपासनेचा धी:कार करताना, शिवलिंगोपासना केव्हा व कोणी निर्माण केली. ती श्रेष्ट आहे का कनिष्ट आहे, याला आधार काही वाङ्मय आहे का. याचा विचार केला असतातर शिवलिंगोपाना सर्व श्रेष्ट आहे असे दयानंदांना कळले असते, आणि महापापाचारी वैदिक हिंदू प्रमाणे शिवलिंगोपाने विषयी निंद्य प्रकार दयानंदांनी लिहिला नसता. शिवलिंगोपासने विषयी दयानंदाने जो निंद्य प्रकार लिहिला आहे तो दारुच्या नशेत आव्ह सव्हा बरळणाऱ्या दारुड्याप्रमाणे आहे असे म्हणायला काय हरकत आहे,

चालू कालांत संपूर्ण भारतात अहिंसा तत्वावर आधारीत असलेले सर्वच धर्म पंथ आगमोक्त आहेत. विस्तार भयामुळे थोडक्यात लिहित आहे. आगमोक्त उपासकांत कलियुगात दोन गट झाले आहेत. आगमोक्त उपासना म्हणजे शिवलिंग उपासना, त्यातील एक गट स्थावर लिंगपूजा करतात. आणि दुसरा गट शिवलिंग शरीरावर धारण करतात. दोन्ही गट अहिंसक शाकाहारीच आहेत. उपासनेंचे प्रकारही दोघाचे एकच आहेत. त्यांची नावे शैव आणि वीरशैव ही आहेत. शैव स्थावर शिवलिंगाची उपासना करतात. आणि त्यांच्यात जात पात, उच्च नीच असा भेद आहे. वीरशैव भेदभाव मानीत नाहीत. शिवलिंग धारक, आचार विचार वीरशैया प्रमाणे असलेला मानव वीरशैव आहे. शैव-वीरशैवाच्या प्राचिनत्वाचा विचार या ग्रंथाच्या दुसऱ्या प्रकरणांत केला आहे. आणि वीरशैवाचा प्रकार तिसऱ्या व चौथ्या प्रकरणांत आहे.

आगमोक्त वीरशैव धर्मातून निर्माण झालेले गाणपत्य नाथादि धर्म पंथ अहिंसा तत्वावर आधारित आहेत. आणि त्यांनी निर्माण केलेले देव वीरशैव आहेत. (लिंग धारक आहेत.) व आगमोक्त आहेत.

वेदांत घुसडलेल्या हिंसा तत्वावर आधारित आणि उत्तर ध्रुवीय वैदिक आर्या (हिंदु) च्या हिंसात्मक वैदिक धर्मातुन बाहेर पडलेले भारतातील व भारता बाहेरील जेवढें धर्म पंथ आहेत. (पारशी,

मुसलमान, ख्रिस्तादि) ते सर्व हिंसक आहेत. आर्यावर्तीय भारतीय आर्यांच्या गमोक्त अहिंसात्मक प्रकारातील धर्म ग्रंथीयांच्या लोक संख्येपेक्षा हिंसात्मक प्रकारातील धर्म पंथीयांची लोक संख्या हजारो पटीने अधिक आहे. या सर्व हिंसात्मक प्रकाराला निर्माण करणारे महाबुद्धीमान उत्तर ध्रुवीय वैदिक आर्यातील पुरोहित वर्ग आहे.

७९. वेदांत हिंसा व अहिंसा असे दोन प्रकार का ?

वेदात हिंसा आणि अहिंसा असे दोन प्रकार का निर्माण झाले आहेत त्याचा विचार वेदमंत्राधारे करू. पहा ऋ. १/१/२

अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत ।
स देवाँ एह वक्षति ।। (ऋ. १/१/२)

पूर्वीच्या तसेच नव्या ऋषिनी (ह्या) अग्निची स्तुती केली आहे तो (हा अग्नि) देवांना येथे घेऊन येत आहे.

या मंत्रात पूर्वीचे ऋषि आणि नवेऋषि असा स्पष्ट उल्लेख आहे.

| पूर्वीचे ऋषि | नवे ऋषि |
|---|---|
| १) भारतीय आर्य आहेत. | १) उत्तर ध्रुवीय आहेत. |
| २) हे विश्वारंभापासून भारतीय आहेत. यांचे वेद २०० कोटी वर्ष अहिंसात्मक होते. त्यामुळे वेद हे धर्म ग्रंथ होते. | २) हे ६००० वर्ष झाले उत्तर ध्रुवावरून आलेले आहेत. यांनी भारतीयांच्या वेदांत हिंसात्मक प्रकार घुसडून वेदाला अधर्म ग्रंथ बनले आहे. |
| ३) यांचे वेदमंत्र अहिंसा तत्वी आहेत. | ३) यांचे वेदमंत्र हिंसा तत्वी आहेत. आणि भारतीयांच्या वेदांत समाविष्ट केले आहेत. |
| ४) हे शुद्ध शाकाहारी आहेत. | ४) हे मांसाहारी आहेत. |
| ५) याच्या यज्ञात हिंसा – पशू बळी नाही. | ५) यांच्या यज्ञात १४ जातीचे पशू बळी देतात आणि २९ जातीचे पशू पक्षी खातात. |
| ६) यांचे यज्ञ रोग जंतू नष्ट करण्याकरिता आहेत. | ६) यांचे यज्ञ मांस खाण्या करिता तसेच ऐहिक सुखे, स्वर्ग, मोक्ष मिळण्या करिता आहेत. |

| | |
|---|---|
| ७) हे बहुदेव बहुनामी उपासक आहेत. | ७) यांचे अगणित देव आहेत. |
| ८) यांचे देव (देवमानव) आहेत. | ८) यांचे देव यांच्या कल्पनेतील आहेत. |
| ९) यांचे देव शुद्ध शाकाहारी आहेत. | ९) यांचे देव मांसाहारी, मद्यपानी आहेत. |
| १०) द्वापारयुगाचे अंती यांची सत्ता नष्ट केली यांनी नैमित्तिक यज्ञ बंद केले. नित्य यज्ञ चालू आहेत. | १०) कलियुगारंभी यांनी भारतात सत्ता प्रस्थापित केली. यांच्या कालांत यांनी भारतीयांचे वेद ब्राह्मणेतरा पासून गुप्त ठेऊन, ब्राह्मणादि ग्रंथ निर्माण करून, हजारो यज्ञ सुरू करून, कोटया-वधी पशू हिंसा चालू केली, पुढे लाखो देव देवी निर्माण केल्या. |
| ११) यांचा स्वर्ग हिमालयावर आहे. | ११) यांचे एकविस स्वर्ग अंतराळात आहेत. |
| १२) यांचा पाताळ अमेरिका देशाची भूमि आहे. | १२) यांचे सप्त पाताळ पृथ्वीच्या खाली आहेत. |
| १३) यांचा सृष्टी निर्माता इश्वर निराकार आहे आणि अनिर्मित स्वतंत्र सर्व सत्ता-धीश आहे. | १३) यांचा चार तोंडाचा, नऊ डोळ्याचा ब्रह्मदेव आहे. यांचा ब्रह्मदेव माया निर्मित आहे. परतंत्र आहे. |
| १४) यांचा देव कांहीच पापपुण्य करित नाही. | १४) यांच्या देवांचा पापाचार पहिल्या प्रकरणात पहिल्या भागात वर्णन केला जाहे. |
| १५) यांचे देव, मानव, राक्षस, असुरादि लोक एक तोंड, दोन डोळे, दोन हात, दोन | १५) यांचे देव, राक्षस, असुरादि सर्व अनेक तोंड, अनेक डोळे, अनेक हाताचे, तसेच पशू, |

पाय असे मानव देहधारी आहेत.

१६ ) यांच्या देवांचे, मानवाचे, राक्षसादि सर्वांचे आयुष्य १०० वर्षाचे होते. क्वचित एखादा दुसरा श्रीकृष्णासारखा १२५ वर्ष जगले होते. यांच्या आयुष्य मर्यादेला भारतीयांच्या वेदांत पुष्कळ आधार आहेत

१७) हे ईश्वर, जीव, प्रकृति वेगवेगळे स्वतंत्र मानतात कोणीकोणापासून निर्माण होत नाहीत आणि कोणी कोणात विलीन होत नाहीत. याला भारतीयांच्या वेदाचा आधार आहे.

१८) यांच्या देवमानवानी मानव कल्याणा करिता आगम, व मानव ऋषीनी वेद निर्माण केले आहेत. पुढे मानवाने उपनिषदेही केले आहेत.

१९) यांना अवतार मान्य नाहीत. याला वेदांत आधार नाही. यांनी देवाची नावे आगमा-

जलचर शारीरधारी आहेत.

१६ ) यांच्या देवांचे, मानवाचे तसेच राक्षसादिचे आयुष्य लाखो, कोटयावधी वर्षाचे होते, मार्कंडेय, भृशुडयादि ऋषिच्या हयातीत अनंतवेळा सृष्टी उद्‌भव व प्रलय झाले आहेत. यांच्या आयुष्य मर्यादेला भारतीयांच्या आगम निगमांत आधार नाही. यांना आधार यांनीच निर्माण केलेल्या पुराणादि ग्रंथात आहेत.

१७) यांचे देव मायेने निर्माण केले आहेत. लहान देव यांनीच निर्माण केले आहेत. जीव इश्वराचा अंश मानतात. हे सर्व मायेने निर्माण केले आहे शेवटी मायेत विलीन होतात याच्या या प्रकाराला वेदाधार नाही.

१८) यांच्या ऋषीनी मानव कल्याणा करिता ब्राह्मणे, वेदांगे, सूत्रे; पुराणादि ग्रंथ निर्माण केले आहेत. हे अधोगतीला नेणारे आहेत.

१९) अवतार यांनीच निर्माण केले आहेत. यांच्या अवतारी देवांच्या मायाचे शब्द वेदांत

| | |
|---|---|
| तून देवमानवाची घेतली आहेत. | त्याचा अर्थ अवतारी देव नसून वेगळाच आहे. |
| २०) यांच्यात पति, पत्नी, आई, बाप, गुरु एकच आहे. | २०) यांच्यात पति, पत्नी, आई, बाप अनेक आहेत यांच्या कार्तिक स्वामीला सहा आया (माता) व मारुतीला दोन बाप (वायु व केसरी) आहेत. |
| २१) यांना मूर्ती आणि मूर्ती पूजा मान्य नाहीत. | २१) यांनी अनेक (लाखो) मूर्ती निर्माण करून पूजा करतात. |
| २२) यांचे देव अयोनि संभव आहेत. आणि ते मानव आहेत. यांच्या देवांनी किंवा मानवानी सृष्टी आदि काहीही निर्माण केले नाही, फक्त मानव कल्याणा करिता आगम निर्माण केले आहेत. | २२) यांचेही सर्व देव अयोनी संभव आहेत म्हणतात. यांच्या देवांनी (अवतारी मासा, कासव, डुकरादि देवांनी सुद्धा) सृष्टी आदि सर्व निर्माण केले आहे. तसेच यांच्या मानव आणि ऋषि कश्यप व राजा दक्ष यांनी आपल्या अनेक स्त्रियापासून अनेक प्रकारचे देव मानव, पशू, पक्षी, झाडे, वेली, अन्न, धान्य, समुद्र, नद्या, पर्वत असे नाना प्रकारची सृष्टी मानव स्त्रिच्या योनीतून निर्माण केले आहेत. |
| २३) यांचे देवदेवी व ऋषी, मानव, मांसाहारी नाहीत. हे मेलेल्या आई बापाचे श्राद्ध करीत नाहीत. | २३) यांचे सर्वंच मांसाहारी आहेत. हे मेलेल्या आई बापाचे श्राद्ध पित्र तर्पण करतात पित्रांना २९ जातीचे मांस खायला देतात. तसेच ब्राह्मणांना द्रव्य व मांस दान |

| | |
|---|---|
| | देतात, आणि ते ब्राह्मण घेतात. |
| २४) हे कोणतेच सूतक मानित नाहीत. | २४) हे पांच प्रकारचे सूतक मानतात. |
| २५) हे चंद्र ग्रहणाला, सूर्य ग्रहणाला पर्वकाळ मानित नाहीत. | २५) हे फारच मोठा पर्व काळ मानून मोठ्या प्रमाणात दानधर्म करतात. |
| २६) हे शनि मंगळादि गृह पीडा मानित नाहीत. | २६) यांच्यात गृहाला फारच महत्त्व आहे. गृह पीडा निवारणार्थ जपानुष्टान व मोठ्याप्रमाणात ब्राह्मणांना दान देतात. चंद्र, सूर्य, शनि, मंगळादि देवांना बायका, मुले, दासदासी, घरे-दारे, असून हे सर्व राजे आहेत. यांच्या राजधान्या अंतराळात आहेत. आणि पृथ्वीवर त्यांच्या करिता मोठमोठी मंदीरे बांधली आहेत. |
| २८) यांचे देव हिमालयावरील स्वर्गात राहतात. | २८) यांचे देव अंतराळातील स्वर्गात राहतात. |
| २९) यांचा पाताळ अमेरिकादि भूभागावर आहे. यांचे देव मोक्षाला गेले आहेत. यांचा वरील प्रकार आगम निगमांर्गत आहे. | २९) यांचे सात पाताळ पृथ्वीच्या खाली आहेत. यांचे देव आधोगतीला गेले आहेत. यांचा वरील प्रकार आगम निगम बाह्य आहे. |
| ३०) यांच्यात चार वर्ण आहेत, पण वर्णभेद नाही, जाती, पंथ नाही. | ३०) यांच्यात वर्णभेद आहे, जाती शेकडो अनेक पंथ आहेत. |

| | |
|---|---|
| ३१) यांचे देव, ऋषी, मानव विश्व निर्माण कर्त्या ईश्वराची उपासना करतात. त्याचे नांव शिव ठेवले आहे. | ३१) हें यांनीच निर्माण केलेल्या देवाची उपासना करतात. |
| ३२) यांनी पूजा अर्चा करिता ईश्वराने निर्माण केलेल्या विश्वाचे प्रतिक शिवलिंग, यांच्या देव मानवानी निर्माण केले आहे. | ३२) यांच्या पूजा अर्चा करिता यांनीच निर्माण केलेल्या काही मानवाकृतिच्या, कांही पशूच्या आशा लाखो मूर्ती आहेत. |
| ३३) यांना विश्व निर्मात्या ईश्वराची ( शिवाची ) उपासना करणाऱ्यांना शैव म्हणतात. | ३३) यांना वरील प्रकारच्या लाखो देव उपासकांना शैवा सारखे एक नाव नाही, आपण यांना उत्तर ध्रुवीय आर्य हिंदू म्हणूया. |
| ३४) यांच्या शिवोपासनेला यांच्या देवांनी ( देव मानवांनी ) निर्माण केलेल्या आगम ग्रंथाधारे दुसऱ्या प्रकरणात विचार केला आहे. | ३४) यांच्या महाभयंकर हिंसाचाराचा व अधर्माचा प्रकार पहिल्या प्रकरणातील पहिल्या भागांत निहिला आहे. |

८०. वेद अपौरुषय नाहीत, पुरुषकृत आहेत.

सनातनी विद्वान पंडित लोक म्हणतात की वेद अनादी, ईश्वर – प्रेरित, अपौरुषय आहेत. वेदाचे प्रामाण्य अनादि सिद्धत्वामुळे, ईश्वर – पेरितत्वामुळे, नित्यत्वामुळे, किंवा अपौरुषत्वामुळे निर्माण झालेले नसून धर्म सांगण्याच्या अधिकारावर नेमल्या गेलेल्या स्वतंत्रप्रज्ञ, एकाग्रचित्त व निर्लोभ वृत्तीच्या मानव ऋषीने निर्माण केले आहेत.

वेद हा एक ग्रंथ आहे, ( ४ वेदाला एक मानले आहे) आणि कोणताही ग्रंथ मानवानेच निर्माण केलेला असतो. हे आपण प्रत्यक्ष पाहातो वेद—ग्रंथ हेच या सामान्य नियमाला अपवाद का असावे ?

काही विद्वान म्हणतात वेद कर्त्याचे स्मरण कोणालाच नाही म्हणून

वेद हे नित्य मानावे. तसेच अपौरुषयही मानावे. ही दोनही विधानें योग्य नाहीत. कारण वेदाच्या कर्त्याचे स्मरण कोणालाच नाही हे खरे मानले तरी वेदाचे अपौरुषयत्व कसे सिद्ध होईल ? उदाहरणार्थ एखादे पुरातन मंदीर, एखादा विस्तिर्ण तलाव, किंवा एखादे जगतविख्यात शिल्प, कोणी बांधले हे जरी कोणास सांगता येत नसेल; तरी ते मानवानेंच निर्माण केले आहे असे प्रत्यक्षानुमान प्रमाणाने आपण म्हणतो. वेदच याला अपवाद असण्याचे कारण काय ? कारण जीवनांत अधिक महत्त्वाच्या व उपयोगाच्या असलेल्या वस्तुच्या शोधकाचेही विस्मरण मानवाला होऊ शकते. लोखंड ही वस्तु वेदापेक्षाही मानवाला जास्त उपयोगी आहे. पण, लोखंड ही वस्तु ज्याने शोधून काढली, त्याचे विस्मरण मानवाला झालेच आहे की नाही ? आणि तरीही लोखंड तयार करण्याची युक्ती मानवकृतच आहे असे आपण मानतोच की नाही ? म्हणून वेद कर्त्याच्या नावाचे विस्मरण झाले आपण क्षणभर मानले तरी त्यावरून वेद हे पुरुषकृत नाहीत असे ठरू शकत नाही.

भाषा निर्माण झाल्यानंतरच वेद निर्माण झाले आहेत. भाषा निर्माण झाल्या नंतरच कोणताही ग्रंथ – अर्थात वेदही निर्माण होणे शक्य आहे. आणि भाषा ही तर मानव निर्मित आहे. भाषेशिवाय ग्रंथ होऊ शकत नाही. व भाषा ही तर मानवकृतच आहे. अर्थात वेदही पुरुष–(मानव कृतच) ठरतात.

या अडचणीतून सुटण्याकरिता काही विद्वान म्हणतात की शब्द हे नित्य आहेत. असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचा हाही प्रयत्न सिद्धिस जाऊ शकत नाही. कारण "शब्द" म्हणजे ज्याला कांहीतरी अर्थ असतो असा वर्ण समूह; नुसत्या ध्वनीला किंवा वर्णाला काहीच अर्थ नसतो. विशिष्ठ वर्ण एकत्र आणून, त्या अक्षर समूहाशी सामाजिक संकेतानुसार अर्थ जोडून देणे, ह्या क्रिया मानवकृतच आहेत. ईश्वरकृत नाहीत. ईश्वराने मानवाला, इतर प्राण्याप्रमाणेच, फेक्त ध्वनी दिला आहे. या ध्वनीचे वर्गीकरण करणे, या ध्वनींना क्रम देणे, ते एकत्र आणणे, त्याच्यांत अर्थ भरणे वगैरे सर्व क्रिया मानवाने आपल्या बुद्धीने परस्पर संकेतानुसार केलेल्या आहेत. अर्थात, शब्द हा काही अपौरुषय आणि अनादि ठरू शकत नाही. म्हणजे या प्रमाणानुसार

वेद, हे मानव कृतच ठरतात. असे असूनही सनातनी विद्वान आणि शब्द पंडित 'शब्द' हे नित्य मानतात. त्यांना सांगावेसे वाटते की वेद हा काही निरर्थक शब्दाचा कोश नव्हे. तो " ग्रंथ " आहे, म्हणजे अनेक अर्थयुक्त शब्दाचा व वाक्याचा तो व्यवस्थित समूह आहे. शब्दांना अर्थ देणारा आणि अर्थ युक्त शब्दाची व वाक्याची जुळणी करणारा कोणीतरी मनुष्यच पाहिजे. अर्थात याही दृष्टीनुसार वेद हे पुरुषकृत ठरतात.

**८१. वेदमंत्र करणाराच्या नावाची यादी पुराणांत आहे.**

वायुपुराणात वेद मंत्र करणाराच्या नावाची यादी आहे. (वा. पु. अ. ५९ श्लो. ९५ ते १०६) तसेच मामत्स्य पुराणांतही ही यादी आली आहे. ( म. पु. अ. १४५ ) या वायु मास्य पुरातील वचनावरून प्रत्येक मन्वंतरी नवीन वेदमंत्र तयार केले जात होते, असे स्पष्ट दिसते. आणि युगें युगे विदथ्यं गृणद्भ्योऽग्ने रयिं यशसं धेहि नव्यसीम् ॥ ( ऋ. ६।८।५ ) या ऋग्वेद मंत्राचाही आशय हाच आहे. खुद्द वेदाकडे पाहिले तरी त्यातही प्रत्यक मंत्राचा ऋषी तेथे सांगितलेला आहे. आणि अनेक मंत्रामध्ये अमुक अमुक ऋषीने हामंत्र केला किंवा केले आहेत, असे ऋषीच्या नावाचे प्रत्यक्ष उल्लेख आलेले आहेत ॥ ऋषे मंत्र कृतां स्तोमैः॥ (ऋ. ९।११४।२) असा मंत्रकर्त्यांचा निर्देश आहे. ॥ नवंनु स्तोममग्नये दिवश्येनाय जीजनम् ॥ ( तैत्तिरीय ब्रा. २।४।८ )॥ शुचिंनु स्तोमं नवजातमद्य ॥ (तै. ब्रा. २।४।१० ) इत्यादि वचनांत नवीन उत्पन्न केलेल्या मंत्राचा उललेख आहे. असे वेद ब्राम्हण पुराणादि ग्रंथात पुष्कळ पुरावे आहेत. यावरून वेद पुरुष ( मानव ) कृत आहेत असे सिद्ध होते, वेदादि ग्रंथात भरपूर पुरावे असून, सनातनी विद्वान पंडित तसेच आर्य समाज निर्माण करणारे, दयानंदसरस्वती, ". व त्याचे अनुयायी विद्वान पंडित वेद अपौषषय आहेत म्हणतात.

**८२. वेद अपौरुषय नाहीत तसेच आद्य ग्रंथही नाहीत.**

अद्यग्रंथ आगम आहेत, ग्रंथ संख्या २८ असून सिद्धांत एकच आहे. अहिंसा, निराकार, एक ईश्वर, एक नाव हा आगमाचा सिद्धांत आहे. वेद ग्रंथ चार आहेत आणि सिद्धांतात तीन प्रकार आहेत. १)अहिंसा, निराकार, एक देव, एक नाव, २) अनेक देव अनेक नावे, ३) बहू देव बहू नाव आणि देवाच्या नावाने हिंसा असे वेदाचे तीन सिद्धांत अहेत.

त्यात पहिला देव मानवाने निर्माण केलेल्या आगमाचा सात्विक आहे. दुसरा राजसी आहे. आणि तिसरा तामसी आहे. वेदाचे सिद्धांत असे वेगवेगळे का आहेत ? ते उघडच दिसते वेदमंत्र एकाच कालांत केलेले नाहीत. कालांतराने वेगवेगळ्या ऋषींने केले आहेत

वेद अपौरुष्य नाहीत तसेच धर्मग्रथेही नाहीत. आगम, सृष्टीवर प्रथम निर्माण झालेल्या मानवाने (देव मानवाने) निर्माण केले आहेत. नंतर काही कालाने माणव ऋषीने आगमाच्या सिद्धांताप्रमाणेच वेदमंत्र केले, नंतर काही कालाने बहू देव बहू नामी प्रकार निर्माण केला आणि शेवटी उत्तर ध्रुवीय वैदिक आर्यांनी हिंसादिप्रकारचे मंत्र केले आहेत. या वेदातील सिद्धांतानुसार विचार केल्यास वेदाला अपौरुषय म्हणता येईल का ? वेदाच्या अगोदर निर्माण झालेले आगम, पुरुषकृत अहेत. आगमानंतर कलांतराने निर्माण केलेले, मानवाला बहूदेव उपासना आणि हिंसा करायला लावणारे त्या वेदाला अपौरुषय, आणि धर्मग्रंथ म्हणता येइल का ? वेद अपौरुषय नाहीत तसेच धर्म ग्रंथही नाहीत.

सूचना व विनंती :– लेखक्रमांक ८३ ते ८६ हे लेख प्रकरण पाच मध्ये होते ते प्रकरण १. मध्ये घातले आहेत.

मागील पहिल्या प्रकरणात पहिल्या भागात उत्तर ध्रुव प्रदेशात रहाणारे, महादुःखाला कंटाळून आपल्या मायभूमीचा त्याग करून हजारो वर्षं प्रवास करून भारतात येऊन स्थायिक झालेल्या, हिंसक, असुरी, महाभयंकर निरपराध पशूंची हिंसा करून, मांसान्नावर उदर निर्वाह करून जगणारे, त्यांची उपासना दैवते, व तेही त्यांच्या कल्पनेतून निर्माण केलेले, भारतात सत्ता प्रस्तापित करण्याकरिता कोटयावधी भारतीय मानवांचा (स्त्री, पुरुष आणि मुले बाळे) बळी घेवून, हजारो गावे नष्ट करून, भारतातील क्षुद्र वर्णावर महाभयंकर अत्याचार करून, जबरदस्तीने आपल्यात समावून घेऊन, संपूर्ण भारतात आपली सत्ता प्रस्तापित केली. व नंतर पुढे काही कालाने भारतीय आर्यांच्या वैश्य वर्णाची उपासना देवता " शिवलिंग " आपल्यात समावून घेऊन, संपूर्ण वैश्य वर्णही आपलासा करून घेऊन, सर्व सुख संपन्नतेने, आनंदाने जगणारे, आणि आम्ही व आमचा वैदिक हिंदू धर्म सर्व धर्मापेक्षा श्रेष्ठ आहे. म्हणविणाऱ्या उत्तर ध्रुवीय वैदीक आर्यांनी (हिंदूंनी) आपल्या

असुरी तत्त्वाला आधारीत असलेले वेदमंत्र भारतीय आर्यांच्या अहिंसामय असलेल्या वेदांत समाविष्ट केलेल्या मंत्रधारे निष्कर्ष काढला आहे. तो अशुद्ध आहे, दुसऱ्या भागात शुद्ध इतिहास आहे, आणि आर्यवर्तीय भारतीय आर्यांचा अहिंसा, सदाचारी, निराकार ऐकेश्वरी उपासना, सात्विक ज्ञान संपन्नता, ऐहीक सुख संपन्नता, अध्यात्मिक ज्ञान, विज्ञान, या सर्व प्रकाराचा वेदमंत्राधारे निष्कर्ष काढला आहे.

भारतीय आर्यानी (वीरशैवानी) निर्माण केलेल्या वेदाची शिकवण.

**भारतीय आर्यांच्या वेदांतील विषय**

वेद महाविज्ञान ग्रंथाधारे.

८३. **जीवनसूत्र**

| क्रमांक विषय | मंत्रानुक्रम |
|---|---|
| १. मनुष्य बनो | ऋग्वेद १०-५३-६ |
| २. सामाजीक भलाई करो | ऋग्वेद ३-८-९ |
| ३. समाज सेवा करो | ऋग्वेद १-६-३ |
| ४. निर्बलोको सहाय्यता करो | ऋग्वेद १-१४४-१० |
| ५. अतिथी की सेवा करो | अथर्ववेद ९-६-३ |
| ६. समाज का वैदीक आदर्श | यर्जुवेद २२-२२ |
| ७. सन्मार्ग पर चलो | ऋग्वेद ५-५१-०५ |
| ८. कृषी करो | ऋग्वेद १०-१०-०४ |
| ९. गोरक्षा और दया करो | ऋग्वेद १०-१६९-२ |
| १०. गोरक्षापर उल्लेखनिय प्रसंग | ऋ. ८-११०-१५ |
| ११. निष्काम कर्म करो | ऋ. ८-२-१८ |
| १२. सत्याचरण करो | यर्जु. १-५ |
| १३. सत्संग करो | अथर्व. १०-८-१५ |
| १४. सद्विचार सद्भावना रखो | यर्जु. ३४-३ |
| १५. सर्वोदय हो | अथ. १९-६३-१ |
| १६. व्यापार बढाओ | अथ. ३-१५-२ |
| १७. पाप से बचो | ऋ. १-९७-१ |
| १८. बुराई से बचो | ऋ. ५-८२-५ |
| १९. युवायोग्य दंपति का स्वयंवर रचाओ | अथ. ११-५-१८ |

| | |
|---|---|
| २०. पतिव्रत और पत्नी व्रत हो | अथ. ६-१२२-५ |
| २१. स्त्री पुरुष समान अधिकार रहे | ऋ. १०-१०६-४ |
| २२. समान खानपान हो | अथ. ३-३०-६ |
| २३ बाटकर खावो. | ऋ. ३०-१७१-६ |
| २४. धन कमाओ | ऋ. ७-१-५ |
| २५. धन का सदुपयोग करो | ऋ. ७-३२-१८ |
| २६. चोरी का त्याग करो | अथर्व १४-१-५७ |
| २७. इमानदार बनो | |
| २८. खरी कमाई करो | ऋ. ८-९५-८ |
| २९. स्वावलंबन बनो | अथर्व १-१४-४ |
| ३०. आगे बढो | अथर्व ८-१-४ |
| ३१. आशावादी बनो | अथ. १६-३-१ |
| ३२. सक्रीय बने रहो | ऋ. ८-४८-१४ |
| ३३. निर्भय रहो | ऋ. ८-६१-१३ |
| ३४. विजयी बनो | ऋ. १-८-४ |
| ३५. उदार और दानी बनों | ऋ. २१-१०७-३ |
| ३६. सदाचारी बनो | ऋ. १०-१३४-७ |
| ३७. वेद की सात मर्यादा पालो | ऋ. १०५-५-६ |
| ३८. सत्य मधुर व्यावहार हो | अथ. १-३४-३ |
| ३९. अहिंसा और दया रखो | यजु १२-१३ |
| ४० परोपकार करो | यूज ९-२१ |
| ४१ नशा मत करो | ऋ. ८-१-१२ |
| ४२ जुआ मत खेलो | ऋ. १०-३४-१३ |
| ४३ संगठन और ऐकता हो | ऋ. १०-१९१-संज्ञान सुक्त |
| ४४. सत्य असत्या का विवेक रखो | ऋ. ७-१०४-१२ |
| ४५. देशभक्त बनो | ऋ. १-१३-९ |
| ४६. दिर्घायू हो | यजु. ३६-२४ |
| ४७. स्वाध्याय करो | ऋ. ९-६७-३१ |
| ४८ मन पवित्र हो विश्व संकल्प हो | यजु. ३४-१ |
| ४९. संयस और ब्रह्मचर्य रखो | अथ. ११-५-१९ |

| | |
|---|---|
| ५० समानता विश्व बंधुत्व व विश्व प्रेम हो | ऋ. ५-५९-६ |
| ५१. विश्व अत्थान करो | अथ. १९-७३-१ |
| ५२. तप परिश्रम करो | ऋ. ९-८३-१ |
| ५३. संतोष और शांति हृदय रखो | अथ. १६-३-६ |
| ५४. कर्म व्यवस्था बनाओ | अथ. १२-३-४८ |
| ५५. समत्वकी भावना स्थितप्रज्ञता रहे कर्म और फल. | अथ. ७-७२-१ |
| ५६. सम्यक् ज्ञान प्राप्त करो | ऋ. १-८९-२ |
| ५७. सम्यक् कर्म करो | अथ. १२-२-२८ |
| ५८. मधुर वाणी बोलो | अथ. १६-२-२ |
| ५९. बलवती वाणी बोलो | अथ. १६-२-१ |
| ६०. प्रकाश की और बढो | ऋ. ७-३२-२६ |
| ६१. मेघाबुद्धी धरो | यजु. ३२-१४ |
| ६२. श्रद्धारखो | यजु. १९-३० |
| ६३ अग्नीहोत्र करो | अथ. १९-५५-३ |
| ६४. अस्तिक बनो भगवान को भजो | ऋ. ३-६२-१० |
| | युज. ३-५५ |
| | साम. ३-३-३ |
| | युज. ३०-२ |
| ६५. पित्रयज्ञ करो, माता-पिता की सेवा करो | युज. २-३४ |
| ६६. अतिथी यज्ञ करो | अथ. ९-६-३७ |
| ६७. बलि वैश्व दैव यज्ञ | यज़ु. ११-७५ |
| | अथ. १९-५५-१ |
| ६८. चारी आश्रमो का पालन करो | |
| १) ब्रह्मचर्याश्रम | अथ. १९-५-५ (ब्रह्मचर्यं) |
| २) गृहस्थाश्रम | ऋ. १०-८५-९ |
| ३) यति (संन्यासाश्रम) | ऋ. १०-७२-७ |
| ४) मुनि या देव्मुनि (वानप्रस्थ) | ऋ. १०-१२६-२ |
| ६९, चार वर्णोंकी व्यस्था रखो | यजु ३१-११- |

| | |
|---|---|
| ७०. निरामिश भोजन करो | ऋ. १०–९–१२ |
| मांसाहार का निषेध, अहिंसा | ऋ. १०–८७–१६ |
| ७१. छुताछुत का भेद मत रखो | अथ. ३–३०–६ |
| ७२. सद्गृहस्थ बनो | ऋ. १०–१८३–१ |
| ७३. दूर देशमे समान गुणो से विवाह्न करो. | ऋ. १–९२–३ |
| ७४. गृहस्थरूपी रथ चलाओ | ऋ. ८–२२–८ |
| ७५. बहुपत्नी निषेध | ऋ. १–१०५–८ |
| ७६. एक समय में एक पति और एक पत्नी रहे | ऋ. १०–८५–४२ |
| ७७. पत्नी साथ यज्ञ करो | अथ. १९–५८–६ |
| ७८. स्त्री स्वयं यज्ञ करो | अथ. १४–२–२० |
| ७९. स्त्री के मन के भाव | ऋ. १०–१५६–(२–३) |
| ८०. मातृमान पुत्र हो सरस्वती वंदना | ऋ. २–४१–१६ |
| ८१. वृद्धों की सेवा करो पितृ यज्ञ करो. | ऋ. ६–२०–११ |
| ८२. दंपति व्यवहार | अथ. ६–८९–१ |
| ८३. उत्तम शासन की प्रार्थना | अथ. ६–७(१–२–३) |
| ८४. स्वेच्छाचारी शासन को हटाओ | ऋ. १–४२–२ |
| ८५. झंडा ऊंचा रहे हमारा – राष्ट्रध्वज | ऋ. २–८–८ |
| ८६. विजय घोष हो | अथ. ४–३१–४ |
| ८७. स्त्रियोंकी सेना सजाओ नमुची असूरउदाहरण | ऋ. ५–३०–९. |
| | ऋ. १०–१९१–१ |
| ८८. समाजवादीराष्ट्र हो | ऋ. १०–१९१–२ |
| | १०–१९१–३ |
| अहिंसा साधन हो | १०–१९१–४ |
| (क) राष्ट्र के भीतर पूंजी | ५–६०–५ |
| वाद नहीं हो | १०–१७४–१ |
| | यजु. २२–२२ |
| | ऋ. ७–३–५ |
| | अथ. ६–३०–६ |
| | यजु. ४०–१ |
| | ऋ. १०–१७१–६ |
| | अथ. ३–२४–५ |
| | ऋ. ५–३४–७ |
| | अथ. १२–१–६० |

वरचे रहीवाशी आहेत. ६००० वर्षापूर्वी भारतात आले. आणि ते भारतातच राहिले. तेच आता चालू कालांत भारतातील हिन्दू आहेत.

शैव व वीरशैव हे हिन्दू नाहीत. ते भारतीय आर्य आहेत.

४८. वैदिक आर्य हे हिन्दू आहेत.

भारतीय आर्यांचा शैव व वीरशैव धर्म विश्वारंभा पासून आता पर्यन्त सर्व प्रकाराने व्यवस्थित आहे व वैदिक आर्यांचा हिन्दू धर्म अध:पतित झालेला चालू कालांत मोठ्या प्रमाणांत विस्तारलेला हिन्दू धर्म याचा श्रेष्ठकनिष्ठ तुलनात्मक विचार करून वैदिकांचा हिन्दू धर्म कनिष्ठ आणि भारतीय आर्यांचा शैव – वीरशैव धर्म श्रेष्ठ असे सिद्ध झाले आहे.

पहिल्या प्रकरणांत पारशी, मुसलमान, व ख्रिस्ती धर्मांचा आणि हिन्दू धर्मांचा तुलनात्मक विचार करुन पारशी, मुसलमानादि धर्म श्रेष्ठ आणि वैदिकांचा हिन्दू धर्म कनिष्ठ सिद्ध झाला आहे. भारतातील बोद्ध, व जैन रामानुज, माध्व आणि महाराष्ट्रांतील चालू कालातील वारकरी पंथ. तसेच रामदासी, वैष्णव, दत्त, हरिदासी, चैतन्य, वाल्लभ, सनक, यामुनाचार्य, श्री सांप्रदाय हे सर्व पंथ हिन्दूंच्या अत्याचारी हिंसेला आळा घालण्या करिता वीरशैवातूनच निर्माण झालेले आहेत. या सर्व पंथियांचे उपास्य देव वीरशैव आहेत. शरिरांवर शिवलिंग धारण केलेले आहेत. वरील सर्व धर्म व पंथा पेक्षा हिन्दू धर्म व त्यातील सर्व प्रकारचे हिंसक पंथ कनिष्ठ आहेत. हिन्दू धर्म कनिष्ठ आहे असे पहिल्या व दुसऱ्या प्रकरणांमध्ये सिद्ध झाले आहे. ही दोन्ही प्रकरणे मननःपुर्वक वाचल्यास वाचकाला अशी शंका येईल की, वरील धर्मांत कनिष्ठ असा हा हिन्दू धर्म आहे तरी कोणता ?

हिन्दू धर्माची ओळख अगदी साधी सोपी आहे. हिंसात्मक प्रकारांत गुंतलेला व हिंसा करणारा जो समाज आहे, तोच हिन्दू

धर्म आहे. वाचकांना दुसरी शंका येईल कीं, हिन्दू धर्म जसा हिंसक आहे. तसेच पारशी, मुसलमान व ख्रिश्चन हे धर्म सुद्धा हिंसात्मक प्रकारात गुंतलेले आहेत. मग या तिन्ही धर्मा पेक्षाहि हिन्दू धर्मंच कां कनिष्ठ ? पारशी, मुसलमानादि धर्मातील हिंसेपेक्षा हिन्दू धर्मातील हिंसा फारच कनिष्ठ आहे असे सिद्ध झाले आहे. पुन्हा तिसरी शंका निर्माण होईल की अता चालू कालातला भारतातला जो हिन्दू धर्म आहे. तो धर्म तुम्ही (लेखक) एकटेचे हिन्दू धर्म सर्व धर्मापेक्षा कनिष्ठ म्हणता. चालू कालांत तरी हिन्दू धर्म सर्व धर्मांत श्रेष्ठ आहे. तो वैदिक धर्म आहे, असा हिंदू धर्माला भारतात मान्यता आहे. आणि भारता बाहेरील सर्व प्रदेशांत ही हिन्दू धर्म श्रेष्ठ आहे अशी मान्यता आहे.

मागचे दोन्ही प्रकरणे पुन्हा एकदा मननपूर्वक वाचल्यास असे कळून येईल की, खरोखर हा हिन्दू धर्म सर्व धर्मापेक्षा कनिष्ठ आहे.

त्याच प्रमाणे हिन्दू धर्म निर्माण करणारे वैदिक आर्यांनी पहिल्या प्रकरणांत वर्णन केल्या प्रमाणे हजारो लाखो देवदेवी निर्माण करून त्या पाप कर्माच्या बाहेर आहोत असे भासवितात आणि सर्वसाधारण समाजाला महापाप करायला लावून, आपण मात्र अलिप्त आहेत. सारासार विचार केल्यावर असा निष्कर्ष निघतो, की, पाप करणाऱ्या पेक्षा पाप करविणारा खरा दोषी असतो, असे अनेक सिद्धांत आपण पहातो, चालू कालांत कोर्टकचेऱ्यातून न्यायाधिशांनी स्वतः आपल्या हाताने खून केलेल्या माणसाला निर्दोषी ठरवून, सोडून देवून, खून करविणाऱ्यांना दोषी ठरवून त्यांना शिक्षा केल्या आहेत. त्याचप्रमाणे हिन्दू धर्मातल्या पाप करणाऱ्या पेक्षा, पाप करविणारेच पुरोहित दोषी आहेत.

(अ) भारतीय आर्यांचा वैश्यवर्ण वैदिकहिन्दू धर्मांत विलिन झाला आहे.

वैदिक आर्य हिन्दूचा पहिल्या प्रकरणांत सविस्तर विचार केला आहे. पहिल्या प्रकरणांत उत्तर ध्रुवा करून भारतात आलेल्या, भारतांत स्थिर होऊन आपल्या मुळ असूरी आचार विचार, उपासने प्रमाणे महा भयंकर पाप कर्म निर्माण करणाऱ्या वैदिक आर्यांच्या हिन्दू धर्मात

पहिल्याने भारतीय आर्यांतील फार मोठा शुद्र समाज समाविष्ट झाला होता. नंतर वैदिक आर्यांनी कपट कारस्थान करून भारतीय आर्यांची लिंगलिंग उपासना आपल्यात सामावून घेतली आणि हळूहळू रोटी बेटी व्यवहाराही चालू केले. या कपट कारस्थानाला वळी पडून भारतीय आर्यांचा वैश्य वर्ण संपूर्ण वैदिक आर्यांत समाविष्ठ झाला आहे. मात्र वैशांनी (वैवांनी) आपली अनादिकालची अहिंसा तत्वावर आधारीत शिव उपासना व निराकार शिवलींग प्रतिक पुर्वी प्रमाणेच आजतागायत चालू ठेवली आहे. परंतु वैदिक आर्यांच्या निर्माण केलेल्या मुख्य तीन देवातील श्रेष्ठ देवाला (महेशाला) त्याच्या कुटुंबासह (शंकर, पार्वती, गणपती, कार्तिक स्वामी, वीरभद्रादि) आपल्या उपासनेत सामावून घेतले आहे. तसेच वैदिक हिंदूंनी निर्माण केलेल्या सर्व जातीही आपल्यात समाविष्ठ करून घेतल्या आहेत. आणि अनेक पंथभेदही निर्माण केले आहेत, त्यामुळे मुळची एकेश्वरी उपासना सुटली, जातीभेद, वर्णभेद निर्माण झाले. व हिन्दुत्व प्राप्त झाले. म्हणजे चालू कालांत तेही हिन्दूच आहेत भारतीयांचा वैश्य वर्ण वैदिक आणि हिन्दूमध्ये समाविष्ट झालेला वीरशैवांना ब्राह्मण क्षत्रियाना आवडले नाही.

२०. वैदिक आर्यांनी वीरशैव धर्माची तत्त्वे सर्व धर्म ग्रंथातून नष्ट केले आहेत.

वैदिक आर्य हिन्दूने, वीरशैव धर्माला अनादि कालापासून आधार असलेले धर्मग्रंथ कलियुगारंभापासून नष्ट करीत करीत विसाव्या शतकांत संपूर्णच नष्ट केले आहेत. या आद्यग्रंथाचा जिर्णोद्धार, ग्रंथ निर्मिती वीरशैव करतील कां ?

कलियुगातील धर्मगुरू वर्ग व पंच पीठाधिकारी श्री. पंचाचार्यांनी तसेच वीरशैव लिंगायतानी धर्मरक्षणासाठी, विकासासाठी, प्रचारासाठी नवीन ग्रंथ तर निर्माण केले नाहीत. परंतु सर्वश्रेष्ठ वेदाच्याही आगोदर देवभगवानाने निर्माण केलेल्या आगम ग्रंथाचे संरक्षणही केले नाही. सर्वश्रेष्ठ धर्मग्रंथाचे रक्षण करता आले नाही. नव्हे केले नाही.

वैदिक आर्य हिन्दूंनी वेदांत हिंसात्मक प्रकार घालून भ्रष्ट केले आहे परंतु त्याचे जतन केले आहे आणि त्याचा विकासही फारच मोठ्या प्रमाणात करून कनिष्ट धर्माला सर्वश्रेष्ठ बनविले आहे त्याला

कारण ग्रंथ संपत्ति ग्रंथाधारे महा पापाचाराला श्रेष्ठत्व मिळवले आहे.

भारतीय आर्य वीरशैवांनी आगमाचा विकास केला नाहीच पण त्याचे संरक्षणसुद्धा केले नाही. कनिष्ट असलेले वेद व वेदाचा विकास म्हणून निर्माण केलेले कोटयावधी ग्रंथ कोठेही आणि केव्हाही बाजारात विकत मिळतात. आणि सर्वश्रेष्ठ असलेले फक्त २८ ग्रंथ (आगम) बाजारात कोठेच मिळत नाहीत. आगम होते म्हणायला आधार काही ग्रंथात आगमाची नावे व काही संस्कृत श्लोक आहेत त्यावरून आगम नांवाचे सर्वश्रेष्ठ ग्रंथ होते असे म्हणता येते. आहेत असे म्हणतायेत नाही कारण ते बाजारात अजिबात उपलब्ध नाहीत. याचे वाईट वाटते. कोणत्याहीं धर्म पंथाला त्या धर्माच्या धर्म ग्रंथाचा भक्कम आधार पाहिजे. आपल्या धर्माची धर्म तत्वे त्या धर्मातील प्रत्येक मानवाला समजण्याकरिता धर्म ग्रंथाची फारच गरज असते.

वीरशैव धर्माशिवाय इतर धर्म पंथीय समाजाने धर्मग्रंथाद्वारे धर्माचा फारच मोठा विकास केला आहे. चालू कालात वीरशैव समाज बराच जागृत झाला आहे. धर्म विकासाकरिता मोठ्या प्रमाणांत प्रयत्न करीत आहेत परंतु धर्म ग्रंथाचा जिर्णोद्धार किंवा नवीन ग्रंथ निर्माण करण्याकडे दुर्लक्ष दिसते. आतापर्यंत धर्माचे प्राचिनत्व व श्रेष्ठत्व नवीन किंवा जुने धर्म ग्रंथ, महाराष्ट्रातील कुठल्याही बाजार पेठेत उपलब्ध नाहीत. आपल्या धर्माचे ज्ञान मिळत नसल्याने स्वधर्माविषयीं उदासी-नता निर्माण होते. आशा परिस्थितीत दुसऱ्या धर्माच्या विकासाकडे तो आकर्शित होतो. त्या धर्माचे ग्रंथ वाचतो, त्याला तो धर्मश्रेष्ठ आहे असे वाटते. स्वधर्माविषयी आनास्था निर्माण होऊन परधर्मीयांचे धर्म तत्व वीरशैव स्विकारित आहेत. या अध:पतनाला आळा घालण्यासाठी धर्म ग्रंथाचे मोठे सहाय्य होते. सारांश वीरशैवांना धर्मग्रंथाची फारच मोठी गरज आहे वीरशैव धर्म विकास कार्यकर्ते, धर्मगुरु आणि सर्व श्रेष्ठ पंच धर्म पीठाधिकारी श्रीमत् पंचाचार्य या सर्वांनी धर्मग्रंथ जिर्णोद्धार नवीन धर्मग्रंथ निर्माण केल्यास धर्माला बळकटी येईल. पुढच्या तिसऱ्या प्रकरणात भारतीय आर्य वीरशैवाच्या लिंग धारणेचे प्राचिनत्वाचा विचार करू.



प्रकरण दुसरे समाप्त.

प्रकरण तिसरे

# भारतीय आर्य वीर शैवांच्या लिंग धारणेचे प्राचिनत्व

## (१) लिंग धारणेविषयी उदासीनता :

सांप्रत समाजामध्ये धार्मिक भावनेचा ऱ्हास होत चालला आहे. नास्तिकतेचा प्रभाव वाढत आहे. सामाजिक जीवनाच्या सर्व क्षेत्रात अन्याय, असत्य, अनीति वाढत आहे व विषमतेचे तांडवनृत्य चालू आहे. समाजाचे स्वास्थ्य दिवसेंदिवस बिघडत चालले आहे. त्यामुळे वीरशैव समाजाचे स्वधर्माकडे दुर्लक्ष होत आहे असे दिसून आल्यामुळे धर्मतत्त्व सिद्धांत व धर्माचे महत्त्व हा ग्रंथ वाचून समाजात नवचैतन्य निर्माण होऊन धर्माचरणाला बळकटी येईल म्हणून हा ग्रंथ लिहिण्याचा प्रयत्न केला आहे.

माझा दृढ विश्वास आहे की, वीरशैव समाजामध्ये ही जी विषम परिस्थिती निर्माण झाली आहे, ती दूर व्हायला आपल्या वीरशैव धर्माचे सिद्धांत, धर्माचे, श्रेष्ठत्व आणि अनादित्व इत्यादी धर्मतत्त्वांचे ज्ञान या लहानशा ग्रंथात लिहिले आहेत. ते माझ्या स्वतंत्र मताचे नसून या ग्रंथाच्या पाचव्या प्रकरणात संदर्भग्रंथाची यादी दिली आहे. त्या ग्रंथ कर्त्यांचे (लेखकाचे) अमृतोपम धर्म तत्त्वे, त्यांच्या ग्रंथांतून शोधून काढून ते एकत्रित करून हा लहान ग्रंथ तयार केला आहे. वाचकांना या ग्रंथातील पहिल्य प्रकरणाविषयी वाटेल की आपल्याच धर्माचे ज्ञान असणे जरूरीचे होते. त्याशिवाय इतर धर्मांच्या ज्ञानाची काय आवश्यकता होती म्हणून तुम्ही (लेखक) या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणात इतर अनेक धर्मांच्या भानगडी लिहिल्या आहेत.

प्रत्येक मानवाला आपल्या स्वतः पुरतेच ज्ञान असल्याने भागत नाही. आपल्या आजूबाजूचे ही ज्ञान असणे जरूरीचे असते. उदाहरणार्थ तुम्ही तुमच्या घरातले कुटुंब प्रमुख आहात. तुमच्या कुटुंबात असलेल्या माणसांचे सर्व प्रकारचे ज्ञान तुम्हाला चांगले असेल तरच

तुम्हांला कुटुंबाचे संगोपन करावयाला सोपे पडेल आणि तुमच्या कार्यात तुम्ही यशस्वी व्हाल. उदाहरणार्थ तुमच्या कुटुंबातील तुमचे आई-वडील चुलता, बहिणी, भाऊ, बायको, मुले अशी आठ प्रकारची आठ नात्याची आठ माणसे आहेत. त्यांच्या नात्याचे, त्यांच्या आचार विचाराचे, त्यांच्या स्वभावाचे ज्ञान तुम्हाला असेल तरच तुम्हाला तुमचे कुटुंब सांभाळायला सोपे पडेल.

जसे कुटुंबाला सांभाळणाऱ्या कुटुंब प्रमुखाला आपल्या कुटुंबातील सर्व प्रकारचे ज्ञान असणे आवश्यक असते त्याचप्रमाणे मानवाला आपल्या कुटुंबातील, शेजाऱ्यांचे, गावाचे, देशाचे आणि विश्वातील सर्व धर्मांचे, ज्ञान असणे जरूरीचे आहे. म्हणून पहिले प्रकरण लिहिले आहे. पहिल्या प्रकरणात शैव वीरशैव धर्म सोडून वैदिक हिंदू धर्म पारशी, मुसलमान, इत्यादी व अहिंसक बुद्ध जैनादी धर्मांचे सर्व प्रकार व धर्मांचे तुलनात्मक विचार करून श्रेष्ठ कनिष्ठ सिद्ध केले आहे. दुसऱ्या प्रकरणांत भारतीय आर्यांचा शैव – वीरशैव आणि तिसऱ्या प्रकरणांत वीरशैवांच्या शिवलिंग उपासनेचे अनादित्व व श्रेष्ठत्व तसेच लिंग धारणेचे अनादित्व सिद्ध केले आहे. चौथ्या प्रकरणात वीवशैवांचा लिंगाचार व लिंग संस्कार-अदि विचार केला आहे. आजकाल वीरशैवांची (नवतरूणांची) शिवलिंगधारणा विषयी निष्ठा कमी होत चालली आहे. वीरशैवेतर आधुनिक सुशिक्षित हिंदू लिंगाविषयी बऱ्या वाईट कल्पना निर्माण करून शिवलिंगाविषयी अनादर निर्माण करीत आहेत. त्या गैरसमजुती दूर व्हाव्या म्हणून लिंग बिषयांचे ऐतिहासिक व वैज्ञानिक दृष्टीने विचार करून हा ग्रंथ लिहिला आहे. लिंगायतांमध्येही लिंग विषयक ज्ञानाअभावी उदासीनता वाढत आहे. ती हा ग्रंथ अवलोकन केल्याने दूर होईल. आणि लिंग धारण करतील अशी आशा वाटते. हृदयनिवासी लिंगात आत्मस्वरूपाचे दर्शन करून, लिंगानंदात तन्मय होतील, आणि मुक्ती मार्गाचे अधिकारी होवून, अनुपम आत्मशांती मिळेल व आपला आत्मोद्धार करून घेतील अशी आशा वाटते.

वाचक वृंद हा ग्रंथ वाचून स्वानंद सुख सागरात डुंबून लिंगानंदात तन्मय होवो. अशी सर्वेश्वराकडे अनंत प्रार्थना करीत आहे.

हा ग्रंथ केवळ वीरशैवांकरीताच आहे असे मानू नये. वीरशैव, एक जात नव्हे. वीरशैव धर्मात जातपात नाही, वर्णभेद नाही. सर्व जातीचे सर्व वर्णाचे शैव – वीरशैव असू शकतात.

**२. शिवलिंग धारकाला विश्वारंभापासून ते आज तागायत वीरशैव का म्हणतात.**

दुसऱ्या प्रकरणांच्या शेवटी वीरशैवांचा विचार करू असे लिहिले आहे. शैव वीरशैव हे प्रकार दोन का? शैव आणि वीरशैव शिव उपासकच आहेत. शैव स्थावर शिवलिंगाची उपासना करतात आणि वीरशैव शिवलिंग शरीरावर धारण करतात आणि त्याची पुजा करतात. वीरशैव आपणांला वीरशैव का म्हणवून घेतात आणि स्थावर शिवलिंगाची पूजा न करता ते शिवलिंग शरींरावर धारण का करतात, भारतीय आर्यांतील वैश्य व शूद्र हे दोन्ही वर्ण स्थावर लिंगाची उपासना करीत होते, आणि ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन वर्ण शिवलिंग शरीरावर धारण करीत होते त्याचे कारण वैश्य व शूद्रांना आपल्या घरी (गांवी) स्थिर राहाता येत होते म्हणून त्यांना स्थावर लिंगाची पूजा करायला जमत होते. तसे ब्राह्मण व क्षत्रियांना घरी स्थिर राहाणे जमत नव्हते. कारण क्षत्रियांना घरी स्थिर राहाणे शक्य नव्हते; ते क्षत्रिय होते. त्यांना अनेक प्रसंगी घराबाहेर राहावे लागत होते. युद्ध प्रसंगी, रणां-गणावर जावे लागत असे. अशा वेळी स्थावर लिंगाची पूजा करणे जमत नसे. ते शिवलिंगांची पूजा केल्या शिवाय अन्न ग्रहण करीत नव्हते. (१) आपणांला केव्हाही व कोठेही पूजा करता यावी म्हणून ते शरीरावर लिंग धारण करीत होते. (२) आपणाला कोणत्याही प्रसंगी घरी – दारी, वनांत – अरण्यात, रणांगणावर, युद्धप्रसंगी, केव्हाही व कोठेही पूजा करता यावी, म्हणून ते शरीरावर लिंग धारण करीत होते. (३) आपला देव आपल्या जवळ असावा म्हणून ते शरीरावर लिंग धारण करीत होते. (४) आपण कोणतेही काम करतांना आपला देव आपल्या समोर असावा या भावनेने ते शरीरावर लिंग धारण करीत होते. (५) आपला देव आपल्या जवळ व समोर असल्यावर मनाला अयोग्य कर्म करायला भिती वाटावी म्हणून ते शरीरावर लिंग धारण करीत होते. अशा अनेक प्रकारच्या त्यांच्या सात्विक भावना होत्या.

म्हणून ते शरीरावर लिंग धारण करीत होते. ते शूर वीर होते म्हणून ते आपणांला वीरशैव म्हणवून घेत होते व इतर लोकही त्यांना वीर शैव म्हणत होते.

३. क्षत्रिय प्रमाणेच लिंग धारक ब्राह्मणालाही वीरशैव का म्हणतात.

क्षत्रिय जसे आपणांला वीरशैव म्हणवून घेत होते तसेच ब्रह्मही आपणांला वीरशैव म्हणून घेत होते. त्याचे कारण क्षत्रिय राष्ट्राचे रक्षण करीत होते व ब्राह्मण राष्ट्रातल्या धर्माचे रक्षण करींत होते. संपूर्ण राष्ट्रातील जनतेला धर्मोपदेश करून त्यांचे कल्याण करण्याकरिता ब्राह्मण सारखे फिरत होते. त्यांनाही स्थावर लिंगाची पूजा करणे जमत नव्हते. म्हणून तेही शरीरावर लिंग धारण करीत होते. क्षत्रिय राष्ट्राचे रक्षण करतात आम्ही (ब्राह्मण) ही राष्ट्रातल्या चारी वर्णाचे अधर्मापासून रक्षण करून सर्वांचे कल्याण करतो. क्षत्रिय जसे वीर आहेत तसेच आम्हीही वीरच आहोत, असे ते मानीत होते. आणि क्षत्रियाला जसे सर्व लोक वीरशैव म्हणत होते तसेच ब्राह्मणालाही म्हणत होते. कारण क्षत्रिययासारखे ब्राह्मणही शरीरावर लिंग धारण करीत होते. त्या कालातली सर्व जनता शरीरावर लिंग धारण करणाऱ्याला वीरशैव म्हणत होते. शैवांत व वीरशैवात स्थावर लिंग पूजा व इष्ट लिंग पूजा एवढा एकाच प्रकारचा भेद होता, आणि आताही आहे. बाकी सर्व प्रकार शैवाचे व वीरशैवाचे एकच होते. शैव वैदिक आर्यात हिन्दू धर्मात समाविष्ट झाल्यावर मात्र शैवाची तत्वे वेगळी झाली. वीरशैवांनी मात्र आपली अनादि परंपरा चालू ठेवली आहे.

४. वीरशैव धर्माला विश्वधर्म का म्हणतात.

वीरशैव धर्माला विश्वधर्म नाव देण्याचे कारण वीरशैव विश्वपूजक आहेत. शिवलिंगात विश्वाची कल्पना आहे. शिवलिंगाचे पीठ (साळुंका) गोलाकार पण सपाट भाग पृथ्वी आहे. आकाशाचे प्रतिक अर्ध गोलाकार लिंग आहे. लिंगावर घातलेले पाणी वाहून जाण्यासाठी पुढचा लांबट भाग गोमुख आहे. खाली पृथ्वी, वर आकाश या दोन वस्तूंच्या आत चराचर विश्व आहे. शिवलिंगाची पूजा केल्याने विश्वाची पूजा होते अशी वीर शैवाची कल्पना आहे.

५. शिवलिंग हे विश्वाचें प्रतिक आहे. वीरशैव विश्व पूजक आहेत.

आकाश लिंगमित्याहुः पृथ्वी तस्य पीठिका।
आलयः सर्व देवाना लयनाल्लिंग मुच्यते॥ (स्कंद पुराण)

६. वैदिक आर्य हिंदू विश्व प्रतिक शिवलिंगाला स्त्रीपुरुषांचें मूलेंद्रिय म्हणतात.

वरील वर्णन असलेल्या शिवलिंग आकारांत वैदिक आर्यांनी केलेला वदल शिवलिंगाची पिंडी (लिंग) आकाशाचे प्रतीक अर्ध-गोल होता. नंतरच्या कालांत वैदिक आर्यांनी लिंगाचा अर्धगोल आकार नष्ट करून त्याची उंची वाढविली आहे; पिठीका स्त्रियाची योनी आहे व लिंग पुरषाचे शिश्न आहे, असे भासवून भारतीय अनार्य जंगली लोक स्त्री पुरुषाच्या शिश्न योनीची उपासना करतात. असा आरोप व प्रचार करतात.

काही ठिकाणी पिठीका व लिंग वेगवेगळे आहेत. पिठीकेच्या गोलाकार भागाच्या मध्यावर गोल खड्डा असतो. त्या खड्डयात लांबट आकाराचे लिंग उभे ठेवलेले असते. योनी आणि लिंग वेगवेगळया दोन शरीराचे अवयव आहेत आणि ते स्त्री-पुरुषांचे मूत्रेंद्रिये आहेत असे सर्व मानवांना वाटावे असा अश्लील, अमंगल, निंद्य प्रकार निर्माण केला आहे. एवढे करून थांवले नाहीत. त्यांनी निर्माण केलेल्या सर्व धर्मग्रंथात प्रामुख्याने लिहिला आहे. आणि भारतीय आर्यांच्या अनादि धर्म ग्रंथात (उपनिषदे, पुराणादी) वरील अश्लील प्रकार समाविष्ट केला आहे.

वेदांत शिश्नदेव हा शब्द दोन ठिकाणी आला आहे (७।२१।५) आणि (ऋ. १०।९९।२) याशब्दाधारे पाश्चत्यविद्वान व भारतीय नास्तिक विद्वान पंडित म्हणतात की वेदातही शिश्नदेव उपासनेचा उल्लेख आहे. असे म्हणणे वेदाचा खरा अर्थ न कळणाऱ्या मूर्खाप्रमाणे आहे. वेदातील शिश्नदेव या शब्दाचा अर्थ वेगळा आहे.

वैदिक आर्य (हिन्दू), कर्मठ ब्राह्मण शिवलिंगाला अर्पण केलेला नैवेद्य व तीर्थ ग्रहण करीत नाहीत. त्याचे कारण शिवलिंग हे स्त्री-पुरुषांच्या मूत्रेंद्रियांचे प्रतीक आहे या अज्ञान कल्पनेने निंद्य मानतात.

वैदिक आर्य हिन्दूनी, भारतीय आर्यांचे शैव, वीरशैव सिद्धांताचे धर्मग्रंथ नष्ट करण्याचा केलेला प्रयत्न.

१८. पुराणांचा तपशील.

आष्टादश पुराणेषु दशभिर्गीयते शिवः ।।

चतुर्भिर्गीयते विष्णु द्वाभ्या शक्तिरव विघ्नप: ।। स्कंद पुराण केदारखंड अध्याय १

अठरा पुराणापैकी दहा पुराणे शिवपर आहेत. ४ विष्णु, २ शक्ति व २ गणपती अशी १८ पुराणे आहेत.

७. शैव पुराणांची नावे

१) शिवपुराण, २) लिंगपुराण, ३) स्कंदपुराण ४) मार्कण्डेय पुराण, ५) स्कंद पुराण, ६) वामन पुराण ७) विष्णू पुराण, ८) कूर्म पुराण, ९) मत्स्य पुराण, १०) वराह पुराण अशी नावे आहेत. प्रथम व्यासांनी १ शिवपुराणाची १० पुराणे केली होती. त्यावेळी व्यासांनी त्यांची नावे कोणकोणती ठेविली होती हे निश्चित सांगता येत नाही. वैदिक आर्य हिंदूनी, भारतीय आर्य शैव वीरशैव धर्माचे धर्मग्रंथ नष्टप्राय केले आहेत.

वैदिक आर्यांनी (पौराणिकांनी) व्यासानंतर ३००० वर्षांनी पुराणे निर्माण केली आहेत. तसेच विष्णू, मत्स्य, कूर्मादि १० अवतार निर्माण केले आहेत. पुराण रचनाकाल इ. स. ३०० ते ८०० पर्यंतचा आहे असे अनेक विद्वान पंडीतांचे मते आहे.

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे ४ वेद २८ शैवागमे १ शिवपुराणाची व्यासाने केलेली १० शैव पुराणे, रामायण, आणि व्यासांनी स्वतः लिहिलेला ८,८०० श्लोकांचा जय नावाचा एक ग्रंथ ही सोडून बाकीचे जेवढे ग्रंथ आहेत ते सर्व व्यासानंतर वैदिक आर्यांनी निर्माण केले आहेत.

शैव पुराणात तर फारच विचित्र प्रकार निर्माण करून पुराणाचा मूळ विषय काय आहे ते अजिबात कळत नाही असे करून ठेवले आहे.



१९ व्या शतकाच्या अखेर पर्यन्तच्या काळापर्यंत शैव पुराणात

शैव वीरशैव मताचा थोडाफार भाग आहे. परंतु २० व्या शतकात मात्र वीरशैव सिद्धांताचा प्रकार संपूर्ण काढून टाकला आहे.

वीरशैव सिद्धांताचे वेदाअगोदर देवमानवाने निर्माण केलेले २८ आगमातील वीरशैव सिद्धांत ही नष्टप्राय केले आहेत. वैदिक आर्यांच्या कल्पित उमामहेशाच्या तोंडातून सर्व आगमग्रंथ निर्माण केले आहेत.

वाचकांना अशी शन्का येईल की, वैदिक आर्यांनी (हिंदूंनी) वीरशैवाने धर्मग्रंथ, उपासनेचे प्रकार, नष्टप्राय का केले आहेत ? त्याचे उत्तर वीरशैव हे अनादिकालापासून क्षत्रिय व ब्राह्मण आहेत. वैदिक आर्यांना ते फारच त्रास देत होते. म्हणून त्यांनी भारत युद्धापासून म्हणजे कलियुग सुरू झाल्यापासून ५,००० वर्षात वीरशैवाचे वाङ्मय नष्ट करीत करीत षेवटी इ. स, च्या २० व्या शतकात संपूर्ण नष्ट केले आहे इतके केले तरी वीरशैवांना मात्र त्याचे कांहीच वाटत नाही ही एक खेदाची गोष्ट आहे.

चालू कालात वीरशैव, वैदिक आर्यांनी कल्पित निर्माण केलेल्या महेश व त्याच्या कुटुंबिय गणपती, कार्तिकीं, वीरभद्रादि मंडळीची उपासना करतात.

**९. वीरशैवांनी साकार कुटुंबी सिवाचा स्वीकार का केला ?**

वीर शैव अर्वाचिन संतांनी निराकार एकेश्वरो उपासना करीत. करीत, साकार वैदिक आर्य हिंदूनी निर्माण केलेल्या कल्पित शिवपार्वती गणपती, विरभद्र, कार्तिकादि शिव कुटुंबियांची उपासना का स्वीकारली अशी शन्का येणे योग्य आहे,

त्याचे कारण त्या कालात पुंडलिकाने निर्माण केचेल्या वीरषैव विठ्ठल उपासनेंचा (वारकरी पंथाचा) फारच मोठा प्रचार झाल्यामुळे वीरशैवातील वरेच लोक वारकरी पंथात प्रवेश करू लागले. वारकरी सांप्रदायात भजन, किर्तन, त्याला साथ तंतुवाद्य विणा, मृदुंग, टाळ, या तालावर फारच सुंदर, मनोरंजक करतात. तसाच प्रकार जर वीरषेवांनी निर्माण केला नसता, तर महाराष्ट्रात तरी वीरशेव समाज अजिबात शिल्लक राहिला नसता. म्हणून वीरशैव संतांनी वीरशैवांना अवरून धरण्याकरिता भजन, किर्तन, त्याला साथ वारकरी संप्रदाय प्रमाणेच सर्व निर्माण करावे लागले. आणि त्या प्रकारा करिता साकार

शिवाचा व त्याच्या कुटुंबीयातील सर्वांचा स्वीकार करावा लागला. त्यांचे भजन करण्याकरिता वारकरी सांप्रदाया प्रमाणेंच अभंग रचना करावी लागलो. शिवचरित्राकरिता काही ओवीबद्ध ग्रंथही निर्माण करावे लागले. ज्या प्रमाणे वारकरी सांप्रदायात आहे. तसेच सर्व निर्माण करून वीरशैव समाजाला अवरून धरले आहे. केले नसते तर महाराष्ट्रांत वीरशैव समाज अजिबात राहिला नसता. हे सर्व अज्ञ वीरशैवांना आवरून धरण्याकरितां वीरशैव संतांनी नाटकी प्रकार निर्माण केला आहे. अर्थात तो सत्य नाही, वाचकांना वाटेल कीं, हे सर्व आम्ही कानांनी ऐकतो, डोळयांनी पहातो, वारकरी सांप्रदाया प्रमाणेच भजन कीर्तन, शंकर, पार्वती, गणपती, वीरभद्रादि कल्पित साकाराची उपासना करतात. हे खोटे आहे कां ?

वाचक मित्रांनो हे तुमचे म्हणणे आणि पहाणे वरवरचे आहे. ते कसे, मी वर लिहिले आहे, की, हे सर्व नाटक आहे. हे माझे म्हणणे सत्य आहे. वीरशैवांनी खरोखरच साकाराचा स्वीकार केलेला नाही. वीरशैवांनी अनादि कालापासून चालत आलेली निराकारी एकेश्वरी उपासनेचा त्याग केला नाही. शिवलिंगाची उपासना, शिवलिंग शरीरावर धारण करणे, हे वीरशैवांनी अजिबात सोडलेले नाही. नाटक आणि सत्य याच्यांत फारच मोठा फरक आहे. वीरशैवातील अज्ञ समाजाला वारकरी सांप्रदायात, दत सांप्रदायात, कृष्ण सांप्रदायांत ज्या प्रमाणे आहे, त्या प्रमाणेच आपल्यातही आहे असे वाटून त्यानी इतर सांप्रदायात जावू नये म्हणून वीरशैव संतांनी नाटकी प्रकार निर्माण करून त्याचा स्वीकार केला आहे. तो बाह्याचार आहे.

वैदिक, पौराणिक हिन्दूनी ५,००० हजार वर्षे प्रयत्नें करून शैव, वीरशैवांचे धार्मिक वाङमय नष्ट केले आहे. तरी महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र या प्रांतात विश्वारंभा पासून वीरशैव धर्म सर्व धार्मिक प्रकारानें आजतागायत काहीही बदल न होता. व्यवस्थित आहे.

**१०. वीरशैवांचा नित्य यज्ञ चालू आहे परधन आणि परान्नाचा निषेध :**

वैदिक आर्यानी, भारतीय आर्यांची सर्व प्रकारची सत्ता नष्ट करून आपली सत्ता प्रस्थापीत केल्यावर त्यांच्या परंपरेने चालत आलेल्या असूरी यज्ञाचे प्रकार चालू केले तेव्हा पासून वीरशैवांचे सार्वजनिक यज्ञ करायचे बंद पडले. कारण सार्वजनिक यज्ञ राजे महा-

राजे करतात भारतीय आर्यांची राजसत्ता नष्ट झाली, त्यामुळे वीर-शैवांची सार्वजनिक यज्ञ पद्धती बंद पडली, परंतु नित्य यज्ञ, (दररोज) करावयाचा यज्ञ, मात्र विश्वारंभा पासून चालत आलेला आज तागायत चालू आहे. प्रत्येक वीरशैव दररोज सकाळी आंघोळ करून – घरात देवघरातील शिवलिंगाची व शरीरावर धारण केलेल्या इष्टलिंगाची पूजा करतो त्यावेळी अग्नीमध्ये तूप व दशांगधुप (दशांगधुप म्हणजे सुगंधी दहा प्रकारच्या काष्ट औषधीचे चर्ण असते) घालतात. हे जसे पुरुष नित्य यज्ञ करतात, तसेच वीरशैव स्त्रियाही नित्य यज्ञ करतात, स्त्रियांच्या यज्ञाचा प्रकार दररोज स्वयंपाक संपूर्ण तयार झाल्यावर जेवढ्या वस्तू तयार केल्या असतील त्या सर्व वस्तूंचा नैवेद्य म्हणून एका लहान पात्रात काढून नियमाप्रमाणे त्या अन्न नैवेद्यावर तूप घालतात आणि तो सर्व नैवेद्य स्वयंपाक तयार केलेल्या अग्नीला अर्पण करतात, भारतीय आर्यांचा वेद आगमनिगमाला मान्य असलेल्या यज्ञाचा प्रकार आदी कालापासून वीरशैव स्त्रि पुरुषाचा नित्य यज्ञ चालू आहे.

**११. आगमाच्या सिद्धांत्ताप्रमाणें वीरशैव मेलेल्या आई वडिलांचे श्राद्ध तर्पन करीत नाहीत.**

वैदिक आर्य (हिन्दू) मेलेल्या माता पित्याच्या नावाने पितृ श्राद्ध तर्पण करण्याचा प्रकार आगमनिगमाला मान्य नाही. वीरशैव गमाच्या नियमाप्रमाणे आदिकालापासून ते आजतागायत मेलेल्या माता पित्याला श्राद्ध अर्पण करीत नाहींत हे सर्व जगाला माहीत आहे.

**१२. वीरशेव स्त्रिपुरुष जन्म संस्कारी आहेत. वेदिक आर्य हिंदू ब्राह्मण पुरुष संस्कारी असतो स्त्री असंस्कारी असते.**

वरील वीरशैव स्त्रिपुरुषांचा यज्ञाचा प्रकार प्रत्येक वीरशवांच्या घरात आदीकाला पासून चालू आहे. वैदिक आर्यांच्या (हिन्दू) पुरुष यज्ञाचा प्रकार वैदिक आर्य ब्राह्मणाच्या घरात फक्त पुरुष यज्ञ चालू आहे, त्यांच्या स्त्रियांना यज्ञाचा अधिकार नाही. कारण ब्राह्मण स्त्री असंस्कारी असते. ब्राह्मणाचे संस्कार पुरुषाला वयाच्या पाचव्या, किंवा सातव्या वर्षी यज्ञोपवित (मौंजीबंधन) संस्कार करतात तेव्हा तो ब्राह्मण होतो. त्यांच्या मताप्रमाणे असंस्कारी शूद्रांना वेदाध्ययन व यज्ञयागाचा-

अधिकार नाही. त्याप्रमाणें ब्राह्मण स्त्रीला वेदाध्यन व यज्ञयागाचा आधीकार नाही. ब्राह्मण स्त्री असंस्कारी असल्यामुळे शद्र आहे व पुरुष संस्कारी ब्राह्मण आहे. उत्तर ध्रुवीय हिन्दू ब्राह्मणाची असंस्कारी माता आणि संस्कारी पिता अशी परंपरा आहे.

**१३. वीरशैव परान्न व परधान ग्रहण करीत नाहीत.**

वीरशैव वेदागमनाच्या नियमाप्रमाणे परान्न गृहण करीत नाहीत. परान्न ग्रहण करणे महापाप समजतात, वीरशैव ब्राह्मण सुद्धां स्वतःच्या उपजिविके करिता स्वत: कांहीतरी उद्योग धंदा करतात, ज्याना शेती आहे ते शेती करून उपजिविका चालवतात. ज्याना स्थावर उत्पन्न नाही ते लोक उद्योग धंदे करीतात.

**१४. वैदिक आर्य हिंदू ब्राह्मण परान्न परधनावरच जगतात.**

वैदिक आर्य (हिन्दू) धर्मातील ब्राह्मण सोडून इतर जातीच्या लोकांना परान्न ग्रहणाला विशेष संबंध येत नाही. परंतु वैदिक हिन्दूच्या ब्राह्मणांना परान्न व परधनाशिवाय जगताच येत नाही, हे महापाप आहे, तसेच वारकरी सांप्रदायातील पंडित महापंडित किर्तनकार, प्रवचनकार, आणि साधा दर महिन्याची वारी करणारा वारकरी चालू कालांत संपूर्ण परान्नावर व परधनावर जगत आहे. हे एक प्रकारचे महापापच आहे. हे भारतीय आर्यांच्या आगम निगमाला मान्य नाही.

**१५. परशिवाच्या मुखातून आगम व शिवलिंगातून पंचाचार्य निर्माण झाले. आहेत. असा प्रकार वैदिक आर्यांनी आगमांत समाविष्ठ केला आहे.**

आगमे हे प्रथम विश्वरंभी परशिवाच्या (परब्रह्म परमेश्वराच्या) मुखातून निर्माण झाले आहेत. असे विरशैव मानतात व प्रत्येक युगारंभी पंचाचार्य शिवलिंगातून निर्माण होऊन वीरशैव धर्माची प्रस्थावना करतात असे मानतात. हे योग्य नाही. हा अयोग्य प्रकार वैदिक आर्यांनी भारतीय आर्यांच्या वेदग्रंथात, हिंसेचा प्रकार समाविष्ट करून, भारतीय आर्य आदिकालापासून हिंसक आहेत, असे भासविले आहे. त्याप्रमाणे भारतीयांचे आगम ग्रंथ हे परशिवाच्या मुखातून निर्माण झाले आहेत. हा प्रकार वैदिक आर्यांनी आगमाला कनिष्ठ बनविण्यासाठी नंतर समाविष्ट केला आहे.

# श्री. १००८ जगद्गुरू पंचाचार्य महास्वामी



| श्रीक्षेत्र | श्रीक्षेत्र | श्रीक्षेत्र | श्रीक्षेत्र | श्रीक्षेत्र |
|---|---|---|---|---|
| रंभापुरी | उज्जयिनि | केदार | श्रीशैल | काशी |

## वीरशैवमताचे आचार्य



श्री १००८ जगद्गुरु विश्वेश्वरशिवाचार्य महास्वामीजी

जंगमवाड़ीमठ, वाराणसी (श्रीक्षेत्र काशी)

तसेच प्रत्येक युगारंभी पंचाचार्य शिवलिंगातून निर्माण होतात. हा ही प्रकार वैदिक आर्यांनी वेदाप्रमाणेच नंतर आगमांत समाविष्ट केला आहे. हे वाचून वीरशैवांना वाटेल की, हा सर्व प्रकार लेखकानें स्वतःच्या कल्पनेने लिहीला आहे आणि तो चुकीचा आहे.

वीरशैवांची उपासना निराकारी परशिवाची (परब्रह्माची) आहे. निराकार म्हणजे ज्याला मानवासारखा आकार, डोके, तोंड, छाती, पाठ, पाय, हात, मलमुत्रादि इंद्रिये नाहीत, त्याला म्हणतात. अशा परशिवाच्या तोंडातून आगम ग्रंथ निर्माण झाले, असे मानणे चुकीचे व हास्यास्पद आहे.

तसेच पंचाचार्य शिवलिंगातून निर्माण होतात, म्हणणे चुकीचे आहे, कारण शिवलिंग ही वस्तू पाषाणाची आहे. त्या पाषाणाच्या लिंगातून मानव निर्माण होणे शक्य नाही. निसर्ग नियमाच्या विरुद्ध आहे.

ज्याप्रमाणे भारतीय आर्य मानव ऋषी मुनीनी आपल्या स्वानुभवाने वेदमंत्र रचनां केली आहे. तशीच आगम रचना देवमानवाने केली आहे. वेदमंत्र रचना करणाऱ्या ऋषीची नांवे वेदात उपलब्ध आहेत. तसे आगम रचनाकार देवमानव शंकर पार्वती-आणि स्कंद यांचा संवाद आहे आणि संपूर्ण आगम ग्रंथ उपलब्ध नाहीत. याला कारण कलियुगातील वीरशैव ऋषी – मुनीचे अज्ञान आहे.

**१६. वैदिक आर्यांनी आगम निगमाला निंद्य बनवले आहे.**

वैदिक आर्यांनी भारतीय आर्यांच्या अहिंसा तत्वी वेदांत हिंसक प्रकार घालून वेदाला निंद्य केले आहे. त्याप्रमाणे निराकाराच्या तोंडातून आगम निर्माण आणि पाषाणातून मानव निर्माण करून अगमात घालून आगमाला उणीव निर्माण केली आहे. निराकार वस्तूला तोंड असू शकले का ?

तसेच जड पाषाणातून देहधारी मानव निर्माण होईल का ? असे होणे शक्य नाही. हे सर्व वैदिक आर्य (हिंदूचे) कपट कारस्थान आहे.

**१७. वैदिक आर्यांनी वेदाला निंद्य बनवले आहे परंतु वेदाचे जतन केले आहे.**

वैदिक आर्य हिंदूनी वेद आता पर्यंत जसेच्या तसे जतन केले आहेत. ही फारच आनंदाची गोष्ट आहे. भारतीय आर्यांनी वैदिक आर्यांचे आभार मानले पाहीजे, ज्याप्रमाणे मुसलमानानी त्यांच्या आचार विचाराच्या विरुद्ध असलेले हिंदूचे देव मारुन टाकले, एवढेच नव्हे तर धर्मग्रंथही जाळून टाकले. त्याचप्रमाणे वैदिक आर्यांनी भारतीय आर्यांच्या निराकारी देवाला साकारी बनवले, आणि त्यांच्या आचार विचाराच्या विरुद्ध असलेले भारतीय आर्यांचे वेद ग्रंथ नष्ट न करता जपून ठेवले आहेत. त्याचे कारण वैदिक आर्यांचे अज्ञान आहे. त्यांना वेदग्रंथाचे अर्थज्ञान असते तर त्यांनी भारतीय आर्यांचे वेदमंत्र नष्ट केले असते. कारण भारतीय आर्यांचे वेदमंत्र अहिंसा तत्वाचे आहेत. आणि वैदिक आर्य हिंसक आहेत.

**१७. भारतीय आर्य वीरशैवानी आगमाचे जतन केले नाही.**

ज्याप्रमाणे वैदिक आर्य हिंदूनी अज्ञानानें भारतीयांचे वेदमंत्र जतन केले, त्याचप्रमाणे भारतीय आर्य वीरशैवांनी अज्ञानानें का होईना आगम ग्रंथ जतन केले असले तर फारच चांगले झाले असते. परंतु तसे घडले नाही हे वीरशैवांचे दुभाग्यच म्हणावे लागेल.

वाचकांना असे वाटेल की, सर्व प्रकारच्या ज्ञानाने पूर्ण वेदग्रंथ असताना आगम ग्रंथ निर्माण करण्याची भारतीय आर्यांना काय आवश्यकता होती ? वाचकांनो वेदज्ञान चार वर्ण, दास, पणी, जंगलात राहणारे जंगली लोक, या सर्वांना उपयोगी आहेत. पण चार वर्णातील दोन वर्ण (ब्राह्मण व क्षत्रीय) हे वीरशैव (शरीरावर लिंग धारण करणारे होते.) त्यांच्या करिता (वीरशैवा करिता) म्हणजे त्यांच्या आचार विचारा करिता सोईचे पडावे म्हणून आगम रचना, वेदाच्याही अगोदर केली आहे. ते परशिवाच्या तोंडातून निघाले नाहीत. ज्याप्रमाणे आगम परशिवाच्या तोंडातून निघाले नाहीत. त्याप्रमाणेच शिवलिंगातून पंचाचार्य निघाले नाहीत.

**१८. पाच पीठे व पंचाचार्यांची स्थापना त्रेतायुगातील ऋषिमुनी वराजेमहाराजे यानी केली आहे.**

वीरशैव धर्माचा प्रचार करायला सोईचे व्हावे म्हणून त्रेतायुगातील ऋषी मुनी, राजे महाराजांनी विचार करुन भारतात पाच धर्म

पीठे स्थापन करून सर्व ज्ञान संपन्न, सर्व विद्या पारंगत आसलेले पांच ऋषीची पांच पीठात स्थापना केली होती, आणि त्यांना पंच अचार्य (पंचाचार्य) म्हणत होते तीच परंपरा प्रत्येक युगात आज तागायत कलियुगात ही चालू आहे.

१९. ५००० वर्ष गुप्त असलेले वेद श्री दयानंद सरस्वतीने प्रथम प्रगट केले.

वैदिक आर्यांनी भारतीय आर्यांचे वेद जतन केले हे खरे, परंतु त्यांच्या आचार विचाराला घातक होते म्हणून त्यांनी ब्राह्मणेतरा पासून पाच हजार (५०००) वर्ष गुप्त ठेवले होते. ते दयानंद सरस्वतीने प्रगट केले. तसेच वैदिक आर्य भारतीय नव्हेत, उत्तर धृवावर राहणारे आहेत. हे लोकमान्य टिळकाने उघडकीस आणले आहे. अहिंसा तत्वाचे भारतीय आर्यांचे वेदमंत्र दयानंद सरस्वतीने प्रगट केले आहेत आणि वैदिक आर्यांचे हिंसक प्रकाराचे वेदमंत्र महाराष्ट्रातील आधुनिक पंडीत महापंडीत लोकांनी संपूर्ण नाही पण अगदी थोडे प्रगट केले आहेत.

वर उद्धृत केलेल्या पंडीत महापंडीतानी भारतीय आर्यांवर महान उपकार केले आहेत. भारतीय आर्यातील वैश्य, शुद्र, आणि दास हे वैदिक आर्यांच्या हिन्दू – धर्मात समाविष्ट झाले आहेत. भारतीयांचे जंगलात राहणारे मात्र आदिकालापासून आज तागायत स्वतंत्र वेगळेच आहेत. आणि शैवच आहेत. ब्राह्मण आणि क्षत्रीय (वीरशैव) विश्वारंभापासून आज तागायत जसेच्या तसेच आहेत. त्या वीरशैवाचा विचार या तिसऱ्या व चौथ्या प्रकरणांत केला आहे.

२०. शैवागमाची नावे.

आगमांची नांवे (१) कामीकागम, (२) योगजागम (३) चितागम, (४) कारणागम (५) अजितागम, (६) दीप्तागम, (७) सूक्ष्मागम, (८) सहस्त्रागम (९) अंशुमान आगम, (१०) सप्रभेद आगम (११) विजयागम, (१२) बिश्वासागम (१३) स्वायंभू आगम, (१४) अनल आगम (१५) वीर आगम (१६) गरंव आगम (१७) मकुट आगम (१८) विमल आगम (१९) चंद्रज्ञान आगम. (२०) मुखबिंब आगम (२१) पुरोजित आगम, (२२) ललीत आगम (२३)

सिद्ध आगम (२४) संतान आगम (२५) नरसिंह आगम (२६) परमेश्वर आगम (२७) सिद्ध आगम (२७) किरण आगम (२८) वातूल आगम अशी वीर शैवाची २८ आगमे आहेत. आणि ते आदि-कालांत निर्माण झालेले आहेत. कारण या आगमांत वेद ब्राह्मण पुराणादी ग्रंथाचा आजिवात उल्लेख नाही. त्यामुळे आगम वेदादी ग्रंथांच्या आगोदर आहेत असे सिद्ध होते.

२१. आगम सिद्धांतावर अधारीत पुष्कळ ग्रंथ आहेत.

वेदांताच्या कर्म उपासना आणि ज्ञान अशा तीन कांडा प्रमाणे ज्ञान क्रिया योगचर्या भिः स्याच्चतुष्पादः। म्हणजे ज्ञान योग क्रिया आणि चर्या असे आगमांचे चार भाग आहेत यातील ज्ञानमार्ग उपनिषदा प्रमाणे तत्वज्ञानपर आहे. शैवाचा भर भक्तीवर अधिक आहे. या निरनिराळ्या आगमांवर आधारलेले शिवज्ञान सिद्धियार असे अनेक ग्रंथ आहेत. त्यात बारा शैव तिरूमराइ व १४ सिद्धांत शास्त्रे प्रसिद्ध आहेत. वेदांत सूत्रावर भाष्यपण आहे. तामील संताची देवारम आणि तिरुवासगम व पेरिय पुराण प्रसिद्ध आहेत. वीरशैव, शिव, शक्ती, जीव, जगत आणि ईश्वर ही सत्य मानतात. पण जगाला शिवरूप ब्रह्माहून प्रथक स्वतंत्र सत्ता मानित नाहीत. ते शिवाला (ब्रह्मरूपच) मानतात.

२२. कलियुगातील वीरशैव धर्माचे धर्म संरक्षक व प्रचारक पाचपीठे व पंचाचार्य

वीर शैवाच्या मताने त्यांचे धर्म प्रचारक पंचाचार्य आहेत. व त्यांनी (१) रंभापुरी (म्हैसूर), (२) मरूलसिद्ध, उज्ज्यनी (३) केदार (उखीमठ) ४) श्री. शैल (५) श्री क्षेत्र काशी येथे मठ स्थापन करून अनेक ग्रंथ रचना करून वीरशैव धर्मप्रचार अतिप्राचीन काला-पासून केला आहे. या पंचाचार्यांच्या कलियुगातील पंचाचर्यांची नांवे (१) रेवणसिद्ध (हेच रेणुकाचार्य) (२) मारूलसिद्ध (३) एको-रामाराध्य (४) पंडिताराध्य, (५) विश्वाराध्य अशी होती. यांच्या गांवाची अथवा सिंहासनांची परंपरा अद्यावत चालू आहे. वीर शैवांत दोन भेद आहेत. एक आगमादी ग्रंथ व पंचाचार्य धर्म संस्थापक मान-णारे आहेत. ते आदिकालापासूनचे आहेत व दुसरे बसवपंथी आहेत.

श्री बसवेश्वर बाराव्या शतकांत होते. त्यांनी वीरशैवाची घसरत चाललेली बाजू सावरून पुन्हा भक्कम केली आहे. हे बसव पंथीय आगमादी ग्रंथ व पंचाचार्य यांना मानित नाहीत. ते तामिल संताच्या वचनाला शास्त्र मानतात. ही वचने आगम सिद्धांती आहेत. या दोन्ही पंथात बरेच मतभेद आहेत, तरी ते पंचाचार अष्टवरण, षट्स्थल लिंग धारणा आदि शिवलिंग उपासनेत दोन्ही पंथात पुष्कळ साम्य आहे. आणव-मल (परिच्छिन्नभाव) मायामल (अज्ञानभेद) कार्मिकमल (रागव्देशादि) यांच्या निरासासाठी उभयपंथातील साधनांत बरेच साम्य आहे. पंचा-चाराने समाज उन्नति, आष्टवरणाने वैयक्तिक उन्नती व षष्टस्थलाने आत्मउन्नती साधता येते. असे दोन्ही पंथ सारखेच मानतात. भारतीय आर्यांचे वेद, पुराणे, शैवोपनिषदे आराध्य वीरशैव मानतात. अर्वाचिन (बसवपंथी) लिंगायत ते मानीत नाहीत. आराध्य वीरशैव हे आगम निगम प्रमाण मानतात शैवाची ३६ तत्वे हे मानतात.

चालू कलियुगातील आंध्र प्रांतात कोलीपाक गांवातील रेवण-सिद्ध पंचाचार्यांनी अठरा मठाची स्थापना करून शिवैक्य पावले. त्यांचे काही ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यांचे एक ब्रह्मसूत्रांवर भाष्य पण आहे. त्यानी वीरशैवाच्या शक्ति विशिष्ट अद्वैत मताची प्रस्थापना केली आहे. हा धर्म फारच प्राचिन आहे. यांच्या सिद्धांत शिखामणी ग्रंथात श्री रेवणसिद्धांनी (रेणुकाचार्यांनी) आगस्ती मुनीला उपदेश केला आहे. तसेच आद्य शंकराचार्यांना चंद्रमौलीश्वर लिंग देऊन अनुग्रह केला आहे. त्याच्या ही अगोदरची त्रेतायुगातील आख्यायिका आहे की लंकेत त्यांनी विभिषणाच्या प्रार्थनेवरून एकाच वेळी तीन कोटी रूपे धारण करून तितकेच शिवलिंगे स्थापन केली होती.

या पंथाचे भेदाभेद वादांत शक्तिचे दोन प्रकार मानले आहेत. (१) सूक्ष्म चिदचिद्वीशिष्ट, म्हणजे परशिव (परमात्मा) (२) स्थूल चिदचिद्वीशिष्ट शक्ति म्हणजे 'जीव' असा भेद आहे. या पंथात अनेक सत्पुरुष निर्माण झाले आहेत. (भारत युद्धांचे आगोदरचे सर्व ऋषी मुनी संत महात्मे याच पंथाचे होते.)

२३. बसवेश्वरांच्या लिंगायत पंथाचे वैशिष्ट्ये

(१) वर्ण जाति भेद ते मानीत नाहीत. (२) ते धर्मकर्मात

स्त्री पुरुषांचा सारखाच अधिकार मानतात. (३) त्यांचे तिसरे तत्व अहिंसा, ते शाकाहारी आहेत. (४) सौलभ्य हे त्यांचे चौथे वैशिष्टय आहे. यात यज्ञ याग, व्रतवैकल्य, संस्कार, वर्णाश्रम धर्म, प्रायश्चित, तपाचरण इत्यादी कर्मकांड नाहीत. (५) ते. यात्रा जत्रा तिर्थक्षेत्र, मूर्ती, किर्तन भक्ती सांप्रदाय वगेरे रुढीना मानित नाहीत. अल्पायांस बहूफले असा त्यांचा सुलभ भक्ती मार्ग आहे. या पंथात लिंग ईश्वराचें प्रतिक असून, भोगीचा योगी बनून, नीतीच्या पायावर आधारलेल्या पंचाचार रूपी पटांगणांत, ष्टावरणरूपी अवरणांनी मोक्षाच्या षट्स्थल सोपानावर भक्तीप्रभावाने चढून, शिवानुभव म्हणजे लिंगाग समारस्यांचा आनंद, सर्वांनी उपभोगावा. असे यांच्या मताचे सार आहे. या पंथात कोणत्याही धंद्याला हीन मानीत नाहीत. स्पृश अस्पृश भेद नाही, शरीरावर लिंग धारणे प्रमाणे श्रम उपजीवी व्यवसाय या पंथात प्रत्येक लिंगवंताला अवश्य मानला आहे.

**२४. वीरशैवलिंगी ब्राह्मणानेही चरितार्था करिता उद्योग केला पाहिजे.**

ब्राह्मणाने (जंगमाने) सुद्धा चारितार्था करिता उद्योग केलाच पाहिजे, असा या पंथाचा नियम आहे. गळयात अगर दंडावर लिंग धारण करणे हे उभय पंथांचे समान वैशिष्टय आहे. श्री बसवेश्वर शिवास म्हणतात; विश्वव्यापी, आकाशव्यापी, फार काय यांच्याही पेक्षा व्यापक, असा तू व तुझे पाय पाताला पलीकडे असून तुझे मस्तक ब्रह्मांडास भेदून गेले आहे. एवढे असून सुद्धा तुझे कोणाला ज्ञान नाही. आणि तुझी योग्यता कोणत्याही उपमेने अगर प्रमाणाने करता येत नाही. असा तू अगोचर आहेस, आणि अप्रतिमही आहेत. आणि देवा एवढा महान असून सुद्धा तु माझ्या हाताच्या तळव्यावर येऊन बसल्यामुळे माझ्या मुठीत मावण्यासारखा लहान बनून राहीला आहेस.

**२५. शक्ती विशिष्ट वीरशैव लिंगायत व बसवपंथी लिंगायत यांच्या तत्व ज्ञानाचे अतित्रोटक निर्देश पुढे देत आहे. (शिवलिंगोपासना ग्रंथांधारे)**

लिंगाग समारस्य विचार-वीरशैवसिद्धांतात परशिव ब्रह्मास स्थल* म्हणतात. हे स्थल म्हणजे अंगस्थल (जीव) व लिंग स्थल (परशिव) असे द्वीधा मानतात. भक्तानुग्रहास्तव लिंग स्थूल, सूक्ष्म व कारण

नामक शरीरस्थानावून भेदाने (१) इष्टलींग (२) आचार लिंग (३) व गुरु लिंग (४) प्राण लिंग (५) शिवलिंग जंगम किंवा (६) चरलिंग आणि (७) भावलिंग (८) प्रसादलिंग व ९ महालिंग) असे षडविध मानतात. तसेच अंगसुद्धा १० (११ भक्त व १२ महेश) १३ भोगांग; (१४ प्रसादी व १५ प्राणलिंग) आणि (१६) योगांग (१७ शरण १८ ऐक्य) असे सहा प्रकारचे आहे. अवांतर भेदांनी अंगस्थळ चव्वेचाळीस प्रकारचे व लिंग स्थल सत्तावन प्रकारचे मानतात. या सर्व लिंगांग समरस्याचे ज्ञान हेच वीरशैव मतांत मोक्षासमुळ कारण आहे. *

* स्था = स्थान—स्थिति + ल = लय. स्थीयते लीयते यच जगदेत् च्चराचरम् ! तदब्रह्म स्थल मित्युक्त. स्थल तत्वविशारदेः । स्वशक्ति-मोक्षमात्रेण स्थल. तद्विविधं भवेत् । एकं लिंगस्थलं प्रोक्तमन्यदङ्गे-स्थल. स्मृतम् ॥ लीयते गम्यते यत्र जगत्सर्वं चराचरम् । तदेतत् लिंग मित्मुक्तं लिंग तत्व परायणैः ॥

॥ अनुभव सुत्र ।६।१०।२।६

१) इष्टलींग = स्थूलदेहावर धारण करण्यात येते ते.
२) आचारलिंग = प्राणाख्य प्राणरुप (प्राणचा संचार, संयम इत्यादि)
३) गुरुलिंग = जिव्हेवरील (मंत्राधारे, रसग्रहण)
४) प्राण लिंग = सूक्ष्म शरिरावर धारण करावयाचे ते.
५) शिवलिंग = नेत्रख्य.
६) जंगम किंवा चरलिंग = त्वगूह
७) भावलिंग = कारण शरीराबर धारण करावयाचे ते.
८) प्रसादलिंग = श्रोत
९) महालिंग = मन
१०) त्यागांग = गुरुलिंग व जंगम याचे ऐक्य योगानुसंधान.
११) भक्त = उपासक
१२) महेश = दान ध्यानादीत निश्णात
१३) भोगांग = गुरुलिंग जंगमाला आपर्ण केलेल्या प्रसादाचा स्विकार.
१४) प्रसादी = निर्मल ज्ञानास कारण होणारा शिवप्रसाद
१५) प्राणलिंग = परशिव चित्स्वरुप व तन्नीष्ट शक्तीप्राण स्वरुप लिंग या दोहोचे प्रतिक हे जाणणारा

१६) योगांग=गुरुलिंग जंगमाला निर्वचनापूर्वक तन मन धनाचे अर्पण
१७) शरण=आपण सती व लिंग आपला पति मानून प्रापंचिक सुखविर्वजित होणारा.
१८) ऐक्य=शिवो हं भावनेने शिव ऐक्य साधन.

या पंथात मुख्य भाग म्हणजे षटस्थल होय, परिपूर्ण परब्रह्म पूर्णआनंदात असता त्याच्या ठिकाणी पूज्यपुजक लिला उत्पन्न झाली तेव्हा या पूर्ण ब्रह्माच्या स्वप्रकाशात एकप्रकारचे चलन होऊन न्युन अधिक भावनेने दोन भागात निर्माण झाले. त्यापैकी लहान व अपूर्ण भाग अंगस्थल (अर्थात उपासक जीव) व पूर्णभाग म्हणजे लिंगस्थान (परमेश्वर) एका दिव्याने दुसरे असंख्य दिवे लावले, तरी पहिल्यात काही न्युनता येत नाही. त्याप्रमाणे असंख्य अंगस्थलाच्या (जीव) निर्मिती मुळे लिंगस्थलात (आत्म्यांत) अपूर्णता येत नाही.

अंगस्थल प्रतिपाद्यभक्त, लिंगस्थल प्रतिपाद्य आचार, लिंगाचे अंग असल्यामुळे तो आचार लिंगाशी सामारस्य वाटतो. त्याचप्रमाणे महेश्वर गुरूलिंगाशी, प्रसादी शिवलींगाशी, प्राणलींगी जंगम लिंगाशी, शरण, प्रसाद लिंगाशी, व ऐक्य महालिंगाशी, सामरस्य पावतात. तसेच आचारलिंग. गुरुलींग. शिवलिंगाशी, शिवलिंग जंगम लिन्गाशी, जंगमलिंग प्रसादलिंगाशी, प्रसादलिंग महालिंगाशी व महालिंग परशिव परब्रह्मरूप घनलिंगाशी, सामरस्य पावून अखंड आनंदाचा अनुभव घेत राहतात. नद्या समुद्राला मिळाल्यावर नामरुप विसरून त्याच्याशी एकरूप होतात. तसा शिवज्ञानयुक्त वीरशैव नामरुपापासून विमुक्त होऊन पर शिवाशी सामरस्य पावतो. मुंडकोपनिषद ।३।२।८

जले जल मिवन्यस्तं वन्हौ वन्ही रिवार्पित : ।
परे ब्रम्हणि लीनात्मा विभागेन न दृश्यते ॥

सिद्धान्त शिखामीण २०।२

अंग-हा विषयी अथवा साधक जीव आहे. लिंग हे साध्य अथवा विषय आहे. यांचे सामरस्य हे ध्येय गाठण्याचे मार्गात किती प्रगति झाली व साध्य लिंग किती आटोक्यात आले असा दुहेरी विचार या साधन मार्गात अभिप्रेत आहे. या प्रमाणे त्यागांगीचे इस्टलिंगाशी; भोगांगीचे त्याग लिंगाशी, योगांगीचे महालिंगाशी ऐक्य होते.

वीरशैवांच्या शक्तीविशिष्टाव्दैत ग्रंथांत लिंग व स्थल यांस वेदांतातील क्षेत्र व क्षेत्रज्ञ या शब्दाप्रमाणे फार महत्व आहे. पण लिंग व स्थल यांच्या ठिकाणी त्यांनी शक्तीचा भेदाभेद मानला आहे. या ग्रंथांतील पंथाचार्य पंचम व जंगम यांचे जे वर्णन केले आहे त्यात वीर-क्तीला महत्व दिले आहे. उपपंचमात मखारी व वेद.री हे जसे आहेत. तसेच स्मरारी पण आहेत. त्याच्या साधन मार्गातील कापालीक, काला-मुख, वाममार्गी तांत्रिक यांच्या प्रमाणे भैरवी पूजा योनी पूजा पंच-माकार असे प्रकार मानीत नाहीत. वीरशोव हे शक्तीविशेष योनिचे पूजक नसून शक्ति विशिष्टलिंगाचे पूजक आहेत. शक्ती व शक्तिमान यांच्या ठिकाणी ते भेदांत अभेद पहातात. त्यांचे लिंग म्हणजे शिवाचा अवयव नव्हे, अर्थात त्यांची शिवलींग उपासनाही मूर्तीपूजा नसून तत्वज्ञानाच्या दृष्टीने त्यांचे शक्तिविशिष्ट उव्दैत आहे.

श्री. बसवानुयायी लिंगायत आपल्या ग्रंथात शक्ति विशिष्ट अव्दैत असेच म्हणतात. काश्मीरीशेव ग्रंथात शिवाच्या ठिकाणी शक्ति अबिनाभूत असल्याचे ग्रहित धरलेच आहे. तीच गोष्ट लिंगायतानी आपल्या धर्मात शिवाला स्पष्टपणे शक्ति विशिष्ट मानून उघड केली आहे पण लिंगायताचे हे विशिष्ट अव्दैत रामानुजाप्रमाणे व्दैत विशेष-मूलक नाही. ते निर्विशेष अव्दैत आहे. शंकराचार्यांचा मायावाद ब्रह्म शक्ति मानित नाहीत नामारूपात्मक मायेची ते अजातीच मानतात. लिंगायत व काश्मिरी शैव मायावाद या अर्थांनें मानित नाहीत. ते शिवाप्रमाणे शक्तीला शिव संकल्पाला, संकलपरूप सृष्टीला शिवरूप म्हणजे सत्यरूप मानतात. अघटीत घटना पटीयती ही शिवाची सृष्टी जनक शक्ति ते खरीच मानतात. याप्रमाणे त्यांचा शिव किंवा परब्रह्म शक्ति विशिष्ट आहे. पण या शक्ती विशेषाला ते शाक्ताप्रमाणें सर्वस्व मानीत नाहीत इतकेच काय पण लिंगायत धर्मात शाक्तांची शक्ति, सांख्याची प्रकृती, वेदांताची माया, शैवाची शक्तिदेवता, याप्रमाणे शक्तिची उपासनाभेदाने कोठे उल्लेखही आढळत नाही. त्यांच्या अंगावर धारण करावयाच्या शिवलींगांत शक्ति अव्यक्तच मानलेली असते.

२६. पांच पीठे व पंचाचार्यांची स्थापना सत्ययुगातील देवमानव व ऋषीमुनींनीच केली असावी.

आती प्राचीन काली (सत्य युगात) धर्म संरक्षणाकरिता त्या कालातील सर्व ऋषीमुनी, राजे महाराजे यांचे विचाराने संपूर्ण भारतात धर्माचा प्रचार करता यावा म्हणून पांच धर्मपीठे (मठ) स्थापन करून त्या प्रत्येक पीठात एक प्रतिनिधी स्थापन केले असावेत. प्रत्येक धर्म पीठाधिकारी आपल्या मृत्युसमई दुसऱ्या प्रतिनिधीची स्थापना करीत असावेत ही परंपरापुढे त्रेतायुगात द्वापारयुगात कलीयुगात परंपरेने चालत आलेली आहे. कलियुगातही धर्मपीठाधिकाऱ्याला पंचाचार्य म्हणतात.

२७. पाच पीठे व पंचाचार्य स्थापन करण्याचे कारण.

धर्मपीठे स्थापन करण्याचे कारण धर्मपीठात चारी वर्णाचे लोक ज्ञानार्जना करिता ज्ञान संपन्न होईपर्यंत पीठात राहात होते. धर्म पीठाच्या खर्चाकरिता मोठमोठ्या राजे महाराजानी मोठमोठी दाने दिली आहेत ही सविस्तर माहिती या ग्रंथात दिली आहे.

मागच्या तिन्ही युगातील परंपरेप्रमाणे कलियुगातील धर्मपीठाधिकारी पंचाचार्य वीरशैव धर्माचा आगम निगम उपनिषदे, पुराणादि ग्रंथाधारे ज्ञानदान व धर्म प्रचार करीत आहेत. आनादिकालापासून चालत आलेल्या या सतातन वीरशैव धर्मामध्ये अनेक दिग्विजयी पंडित महापंडितांनी जन्म घेऊन त्या त्या सगयी पाखंड वादाचे खांडण करून वीरशैव मताचा प्रचार करीत आहेत. कली प्रभावामुळे मध्यंतरी नास्तिक वादाचे स्तोम माजल्यामुळे यथार्थ तत्त्व न समजल्याने वीरशैव समाजातील कांही लोक विपरीत मतांचा अवलंब करू लागले, तशा समयी इ. स. १९३५ जगद्गुरु पंचचार्यांच्या कृपेने पंडित काशिनाथ शास्त्रीनी अध्यायन करून अनेक देश पर्यटन करून, अनेक प्रकारचे कष्ट सहन करून, सर्व देशातील शिलालेख ताम्रपटादिचे संशोधन करून अनुपम ग्रंथरत्नाची माला निर्माण केली आहे. व पुन्हा वीरशैव मतांच्या यथार्थ तत्वाचा सर्वत्र प्रचार व प्रसार केला आहे. त्या ग्रंथ रत्नमालेतील (वीरशैवरत्न) हा ग्रंथ शास्त्री बुवांनी कन्नड, मराठी व इंग्रजी भाषेमध्ये काढून वीरशैव समाजावर महान उपकार केले आहेत. हा

ग्रंथ म्हणजे पंडित काशिनाथ शास्त्रीनी श्री. जगद्गुरु दारुकाचार्य जयंतीच्या दिवशी दिलेली भाषणे आहेत. ही भाषणे एकत्रित करून श्री: पंडित काशिनाथ शास्त्रीनी वीरशैव रत्न नावाचा ग्रंथ लिहिला आहे. हे तिसरे प्रकरण येथून पुढे त्याचा सारांश लिहिला आहे.

सनातन वीरशेव धर्म मत प्रतिपादित अनेक ग्रंथ संस्कृत भाषेत आहेत. ते ग्रंथ सर्व लोकांना कळण्यास कठिण असल्यामुळे शास्त्रीबूवांनी वीरशैव रत्न हा ग्रंथ तयार केला आहे. या ग्रंथात वीरशैवमताचे मुख्या मुख्य विषय आहेत.

आपल्या या परमपूज्य भारत भूमीत आगम नियम, उपनिषदे पुराणादि ग्रंथ मतामुयायाचीच संख्या सर्वात अधिक आहे. आगम, अगमादि मतेच आर्यमते किंवा सनातन मते म्हणून प्रख्यात आहेत.त्यात द्वैत, अद्वैत, विशिष्ट अव्दैत व शक्ति विशिष्ट अव्दैत, ही चार प्रमुख आहेत. ही मते अनुक्रमे मध्वाचार्य, शंकराचार्य, समानुजाचार्य आणि रेणूकादि पंचाचार्य यांनी सूत्रे व भाषांची रचना करून प्रस्थापित केली आहेत. या आचार्यांच्या अनुयायांनी लिहिलेल्या ग्रंथावरून असे दिसून येते की श्री. शंकराचार्य इ. स. आठव्या शतकात होऊन गेले, श्री.रामानुजाचार्य नऊशे वर्षापूर्वी होऊन गेले आहेत.

कांही परमताचे लोक म्हणतात की, लिंगायत पंथ बाराव्या शतकात बसवेश्वराने काढला आहे. पण हे म्हणणे अज्ञानपणाचे आहे. बसवेश्वराने वीरशैवांची घसरत चाललेली बाजू सावरून भक्कम केली आहे. बसवेश्वराने नवीन वीरशैव पंथ स्थापन केला नाही, तो अनादि काळाचा विश्वरंभा पासुनचा जुना पुराणा आहे. हे मागच्या दुसऱ्या प्रकरणांत सिद्ध झाले आहे.

जगद्गुरू पंचाचार्य व तत्प्रणित मतावरील शास्त्र विरुद्ध मिथ्या प्रवाद दूर करून यथार्थ तत्व सर्वांना कळावा या सत् उद्देशाने कर्नाटक प्रांतातील मौजे नागुनुरच्या वृहनमठाचे अधिकारी वे. शा. सं. पंडित काशिनाथ शास्त्री यांनी भरत खंडात निरनिराळ्या भागांत संचार करून वेद आगमे, पुराणे, इतिहास, शिलालेख, ताम्रपट वगैरे प्रमाणांनी सिद्ध केले आहे. वीरशैव रत्न या ग्रंथात वीरशैव मतांचे संरक्षक व प्रसारक श्री. जगदगुरु पंचाचार्यांना, म्हणजे धर्म

पिठाला, हजारे वर्षापासून राजे, महाराजांनी ताम्रपटावर कोरिव अक्षरांत लिहून अत्यंत भक्तीने दिलेलीदान पत्रे आहेत. तसेच भारता बाहेरील देशांत सापडत असलेली शिवलिंगे व युरोप, आफ्रिका, अमेरिका, अन्नाम कंबोडिया, जावा, सुमात्रा, अरबस्तान, पाकिस्तानादि सर्व देशातून प्राचिन काळी राज्य करित असलेल्या शिवभक्ती संपन्न राजेमहाराजांनी, असाधारण भक्तिने बांधलेली, विशाल शिवालये, यांची माहिती असलेले शिलालेख, व प्राचिन वीरशैव पंडितांनी लिहिलेले महान ग्रंथ व पंचाचार्यांनी केलेले कार्य, वर्णाश्रम धर्माचे स्वरूप, शिवसर्वोत्तमत्व, वीरशैवमत व वैष्णवमत यांचा समन्वय, हल्लीची तिरुपती व्यंकटरमणाची मूर्ती पूर्वी वीरभद्राची मानली जात होती, याबद्दलचा पुरावा, श्री. रेणुका चार्यांनी शंकरचार्यांना चंद्रमौळीश्वरलिंग दिल्याची माहिती, लिंग धारण, आगम निगम उपनिषेदे, पुराणे, वगैरे धर्म ग्रंथातून प्रामुख्याने वर्णिलेले असल्याबद्दलचे आधार, शक्तिविशिष्ट अव्दैताचे सिद्धांत वर्णन, प्राचिनग्रंथातून पंचाचार्या संबंधी आसलेले उल्लेख, बनारस सब जज्ज कोर्टांत चाललेल्या काशिपीठासंबंधीच्या एका खटल्यात या पीठाला प्राचिन काळच्या अनेक चक्रवर्ती राजे महाराजांनी दिलेल्या इनाम गांवे व जमिनीचा न्यायाधीशांनी केलेला उल्लेख, व त्या दान पत्रावरून काशिपीठाच्या प्राचिनत्वाला त्यांनी आणलेला खंबीरपणा, वगैरे महत्वाचे विषय साधार व निःसंदेहपणे प्रतिपादित केलेले आहेत. वरिल अत्याद्भूत विषयांचे अमूलाग्र संशोधन करून, वीरशैव जनतेवर महत् उपकार केलेल्या श्री. वे. शा. सं. पंडित काशिनाथ शास्त्रि यांना शतशः प्रणाम.

## २८. वीरशैवाच्या लिंग धारणेचे अनादित्व.

हे परम पवित्र वीरशैवमत जगत् आरंभा पासून प्रथम देवमानवाने व नंतर ऋषी मुनींनी लिहिलेल्या वेद, शिवागमादि ग्रंथात सांगितले आहे. पंचाचार्यांनी सर्व भूमंडलावर संचार करून नास्तिक मताचे खंडण केले आहे. शिवच सर्वोत्तम आहे. शिवाहून श्रेष्ट अशी दुसरी वस्तू जगांत नाही, हे विलक्षण विश्व परशिवापासून (परमात्मापासून) निर्माण झाले आहे.

२९. शिवलिंगोपासना भरत खंडात विश्वारंभापासून आज तागायत सर्व श्रेष्ठत्वाने आहे.

प्रत्येक मानवाने परीशवाच्या पूजेत व ध्यानादिमध्ये असक्त होऊन शाश्वत कैवल्य सुखाचा अनुभव घ्यावा असा उपदेश करून सर्वांच्या हृदयात शिवभक्तिचे बीज पेरले आहे. पूज्यपाद पंचाचार्यांच्या उपदेशाच्या प्रभावाने भरतखंडात सर्वत्र शिव भक्तिचा प्रसार झाला आहे. भरतखंडात शिव उपासनेचा विशेष प्रसार करणारे पूज्यपाद पंचाचार्या शिवाय दुसरे ऋषीमुनी होते, असे निश्चय पूर्वक सांगता येते, कारण अनेक धर्मग्रंथांनी स्पष्टपणे सांगितले आहे की पंचाचार्य भूमंडळावर संचार करीत असता पाहावे तिकडे शिवभक्तिचा जय जय कार ऐकू येत होता, जिकडे तिकडे शिवलिंगाची स्थापना होत होती सर्वत्र शिवपूजेचे वैभव दिसत होते व चहुकडे शिवमंत्र जपाचा निनाद दुमदुमुन जात होता. अलिकडे अनेक मतमतांतरे उत्पन्न होऊन शिव भक्तिचा ऱ्हास होत चालला आहे. याबद्दल वाईट वाटते प्राचीनकाळी भारतातील व भारता बाहेरील तीर्थक्षेत्रांचा सर्व अधिकार वीरशैव गुरू पीठाकडेच होते असे शिलालेख आहेत.

३०. वैदिक आर्य, भारत अगमनापूर्वी भारतात २२ कोटी शैव व तीन कोटी वीरशैव होते (२२,००००००० ) ३,०००००००.

कलकत्ता येथे प्रसिद्ध होणाऱ्या अत्यंत लोकप्रिय असलेल्या वंगवासी नावाच्या साप्ताहिकात इ. स १९१६ साली संपादकांनी शिव भक्तिच्या प्रभावाविषयी एक सुंदर लेख प्रसिद्ध केलेला आहे. त्यात लिहिले आहे, की, प्राचीनकाळी ५००० वर्षापूर्वी वेदिक आर्य भारतात यायच्या अगोदर भरत खंडात बावीस कोटी शैव होते. व तीन कोटी वीरशैव होते.

कलिकाल प्रभावामुळे आणि राजसी व तामसी वैदिक आर्यांच्या आगमनाने व त्यांच्या कपट कारस्थानामुळे भारतीय आर्यांच्या शैव, वीरशैव धर्माची फारच मोठी हानी झाली, आणि शिव भक्तीचा प्रसार दिवसेदिवस कमी होत गेला.

मोक्षदायक लिंगधारण पद्धती प्रथम मानव सृष्टि निर्माण झाली. त्या प्रथम मानवानें (देवमानवाने) निर्माण केली आहे. ती परंपरा त्या

कालापासून ब्राह्मण क्षत्रिय व ऋषिमुनी यांनी चालू ठेवली, त्यापरंपरेचा विकास पंचाचार्यांच्या स्वामित्वाश्रित आज तागायत चालू आहे.

**(अ) पंचाचार्य निवासाचे पंच पीठाची क्षेत्र ठिकाणे.**

या महात्म्यांनी आपल्या आत्मबलाच्या जोरावर अखिल भरत खंडात व भरत खंडा बाहेर वीरशैव मताचा प्रसार करून त्याच्या रक्षणासाठी भारतात पांच धर्म पीठे कृतयुगात स्थापन केली होती. ती ठिकाणे कोठे होती. ते सांगता येत नाही. कलियुगात म्हैसूर संस्थानातील कडूर जिल्ह्यात बाळे बाळेहोन्नुर येथे एक, दुसरे बल्लारी जिल्ह्यातील उज्जयनी येथे, तिसरे गढवाल जिल्ह्यात हिमवत् केदार येथे, व चौथे कर्नूल जिल्ह्यात शैल क्षेत्रात, आणि पांचवे भू कैलास काशी, अशी पांच पीठे आहेत.

**(ब) या वरिल पाच पीठापैकी केदारपीठ हे द्वापार युगात विशेषश्रेष्ठत्वाने होते.**

या पीठाला अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु, त्याचा मुलगा परिक्षिती, त्याचा मुलगा जनमेजय राजा. याने युधिष्ठिर शक ८९ प्लवंगम संवत्सरात एक हजार १००० गावे दान दिले आहेत. असा ताम्रपट लेख आहे. त्यांच्या अगोदर श्रीकृष्णाचा मुलगा अनिरुद्धाच्या बायकोने (उषाने) या पीठाचा धिर्षोद्धर कला आहे. उषाने जीर्णोद्धार केल्यामुळे या मठाला 'उषामठ' असे नामाभिधान आहे. या वरील पुराव्यावरून सिद्ध होते की, हे केदार पीठ द्वापार युगांत सर्व श्रेष्ठ मान्यतेने होते.

प्राचिन काळी भरत खंडभर वीरशैव लोक असल्यामुळे त्यांच्या धर्म शिक्षणासाठी वरील प्रमुख ठिकाणी पांच धर्मपीठे स्थापन केली आहेत. चालु परिस्थितीचा बिचार केल्यास आंध्र, कर्नाटक व महाराष्ट्रात वीरशैवाची विशेष वस्ती आहे. तशी काशी, गढवाल प्रांतात नाही. पुर्वीही अशीच परिस्थिती असेल असे मानणे योग्य होणार नाही. कारण जिथे वीरशैवांची वस्ती जास्त होती, तिथेच पूर्व अचार्यानी धर्म पीठेकस्थापन केली आहेत. काशी व केदार पीठांची परिस्थिती पाहिली तर पूर्वी या भागात वीरशैवांची बरीच वस्ती होती. म्हणनच धर्म पीठे स्थापन केली आहेत. प्राचिनकाळी बंगाल, नेपाळ, काश्मीर, वगैरे भागातून वीरशैवांची बरीच

वस्ती होती, असे पुष्कळ अधार आहेत. प्राचिनकाळी विशेष भरभराटीचे असलेले वीरशैवमत अन्यमतीय (मुसलमानादि) राजांच्या जुलुमामुळे काही धर्म भ्रष्ट झाले असतील व काही महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्रादि भागात गेले असतील, त्यामुळें काशी गढवाल भागातील वीरशैव वस्ती कमी झाली आहे, हे पाहून फारच वाईट वाटते.

**३१. वैदिक आर्यांनी निर्माण केलेले देवदेवी (ब्रह्मा, विष्णु पार्वती सरस्वती आदि) शिवलिंग धारक आहेत.**

प्राचिन काळी म्हणजे भारतीय युद्धांनंतर वेदिक आर्यांनी देवी देवता निर्माण केल्या आहेत, (ब्रह्मा, विष्णु महेश, पार्वती, लक्ष्मी, सरस्वती वगेरे) त्या देव देवीनाही लिंग धारण करण्यात येत होते. त्यास पुरावे म्हणाल तर वेदिक आर्यांनी निर्माण केलेल्या देव देवींच्या दगडी, मूर्तींच्या कोणाच्या हातात, कोणाच्या गळयात, कोणाच्या डोक्यावर शिवलिंगे आता ही पाह्यला मिळतात. विस्तारा भयामुळे सविस्तर लिहिणे शक्य नाही. थोडक्यात विचार करू.

**३२. महर्षि व्यासांनी द्वापार युगात पंचाचार्य घंटाकर्ण यांच्याकडून शिवलिंग दीक्षा घेतली होती.**

जगत् विख्यात महर्षि व्यासांनी द्वापारयुगात घंटाकर्ण शिवाचार्य यांच्याकडून शिवलिंग दिक्षा घेऊन ते अखंड शिव उपासना करित होते. त्यांनी व्यासेश्वर नामक शिवलिंगाची स्थापना करून शिवभक्तिचा प्रसार केला आहे. एवढेच नव्हे तर लिंग धारणेचे महात्म्य अनेक प्रकारांनी वर्णिले आहे. असे लिंग पुराणातील एकविसाव्या अध्यायातील खालील श्लोकावरून कळून येते.

**(अ) सृष्टीवर प्रथम निर्माण झालेले देवमानव लिंग धारण करीत होते. त्या आधारे वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या दगडी मूर्तीवर शिवलिंगे निर्माण केली आहेत.**

विष्णु ब्रह्मादयो देवा मुनयो गौतमादयः ।
धारयन्ति सदा लिङ्गमुक्तमाङ्गे विशेषतः ॥ ९६ ॥

(लिंग पुराण, उत्तर भाग अध्याय २१)

भरत खंडातील वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या सर्व प्राचिन देवालयांतील मूर्तींचे सूक्ष्म दृष्टीने निरीक्षण केले तर प्रत्येक मूर्तींच्या

मस्तकावर, कंठात, किंवा हातावर लिंग आहे असे दिसून येते. पंढरपूरच्या विठोबाच्या मस्कावर, बार्शी शहरातील भगवंत (विष्णूच्या) मूर्तीच्या डोक्यावर, अनंत शयन शहरातील अनंत पद्मनाभाच्या मूर्तीचे हातावर, बल्लारी जिल्ह्यातील नरसिंह देव नांवाच्या पर्वतावरील नरसिंहाच्या मूर्तीच्या हातावर शिवलिंग आहे. सिद्धांत शिणामणितील खालील आधारावरूण लक्ष्मी पार्वती वगैरे देवीच्या मूर्तीही लिंगधारी आहेत असे सिद्ध होते.

लक्ष्म्यादिशक्तयः सर्वाः शिवभावविभावितः ।
धारयन्त्यलिकाग्रेषु शिवलिङ्गमहर्निशम् ॥ ५६ ॥

(सिद्धांत शिखामणि परिच्छेद – ६)

कोल्हापूरचे महालक्ष्मीचे डोक्यावर, काश्मिरातील शारदादेवीचे डोक्यावर, काशीक्षेत्रातील विशालाक्षीचे डोक्यावर शिवलिंग आहे.

या सर्व शास्त्रीय प्रत्यक्ष प्रमाणावरून असे दिसून येते की, भारतीय युद्धानंतर बुद्ध जैनांच्या कालापर्यंतच्या दरम्यान काळात देव देवी निर्माण केल्या आहेत. त्यासर्व देव देवीच्या मूर्तीच्या हातात, कंठात, डोक्यावर शिवलिंगे आहेत. ह्या देवी हजारो असतील त्या सर्वांच्या शरीरावर शिवलिंगे असतीलच:

**३३. कलियुगारंभापासून ते बुद्धाच्या दरम्यान कालात वीरशैवाची चांगली भराभराट होती.**

या वरून असे स्पष्ट दिसते की, भारतीय युद्धानंतर व बुद्ध जैनांच्या कालाच्या दरमानच्या कालात (२५००) वर्षाच्या कालात वीरशैवांची चांगली भरभराट होती. वरील पंचविसशे वर्षाच्या कालात जेवढ्या देव देवी निर्माण झाल्या आहेत; त्या सर्व वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या आहेत. कारण शैव, वीरशैवांना मूर्ती मान्य नाहीत. वरील पंचविसशे वर्षाच्या कालांत भारतीय आर्यांची (शैव वीरशैव) सर्वसाधारण भरभराट होती. असे सिद्ध होते. वैदिक आर्य भारतीय आर्यांच्या विरुद्ध होते हे मागे सिद्ध झालेय आहे. विरोधी वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या देव देवीच्या मूर्तीवर शिवलिंगे स्थापन करण्याचे कारण, आपण भारतीय आर्यांच्या विरुद्ध देव देवी निर्माण करीत आहोत. ह्या देव देवींच्या मूर्तीवर शिवलिंगे निर्माण केले नाहीत

तर भारतीय आर्यांना आवडणार नाही व आपणाला फारच विरोध करतील या भयाने वेदिक आर्यांनी निर्माण केलेल्या देव देवींच्या मूर्तीवर, मूर्ती तयार करतानाच शिवलिंगे कोरली आहेत, असे सिद्ध होते.

भारतीय आर्यांनी, वेद निर्माण केलेल्या मानव ऋषीमुनीनी, सृष्टीवर प्रथम निर्माण झालेल्या देवमानवाला देव मानले आहे. परंतु त्यांना मानवाकार, किंवा अवतार मानले नाही. आणि उपासना यज्ञयाग साधनेने केली आहे. यज्ञात हिंसा नाही. पुढे उत्तर ध्रुवीय वैदिकांनी वेदातील देवाना साकार (मानवाकार) बनवले आहे. काही देवांना अवतारी बनवून त्यांच्या उपासने करिता दगडधोंडयाच्या मूर्ती बनवल्या आहेत. हे देव निर्माण झाल्यापासून शिवलिंग धारण करित होते, म्हणून त्या मूर्तीवर शिवलिंगे कोरली आहेत. आणि या मूर्तीची उपासना करतात.

३४. कृतयुग, त्रेतायुग, द्वापारयुग यातिनही युगातील ऋषीमुनी व राजेमहाराजे शिवोपासकच शिवलींग धारक होते.

या जगांत आपल्या तपःसामर्थ्याने महात्म्यांनी ज्ञानबलाने व वैराग्य संपन्नतेने असामान्य किर्ती मिळवून आज तागायत प्रसिद्ध असलेले अगस्त्य, गौतम, दुर्वास, दधिचीं, सानंद, व्यास, काश्यप, उपमन्यू; हरकंठादि हजारो लाखो नव्हे अगणित ऋषीमुनीनी आपल्या काळी पूज्यपाद पंचाचार्याकडून लिंगधारणाची दीक्षा घेऊन लिंगांग सामरस्याचे ज्ञान मिळवून मुक्तीपद मिळविले आहेत. असे पाशूपत तंत्र, काशीखंड श्रीशैलखंड, सिद्धांत शिखामीण, शंकर संहिता, शिवपूराण, लिंगपुराणादि शैवाची १० पुराणे आगम निगमादि अनेक धर्म ग्रंथातून उत्तम रीतीने वर्णिलेले आहे. एका अचमनात संपूर्ण समुद्र प्राशन करणारे, आपल्या शापवाणिने नहुषा सारख्या चक्रवर्तीला सर्प बनविणारे, वातपिनावाच्या राक्षसात केवळ आपल्या जठराग्नीने भस्म करून टाकणारे, दुर्लंघ्य अशा विंध्यपर्वताला नमविणारे, असे अगाध सामर्थ्यवान महिमाशाली अगस्ति महर्षि, आपल्या शापाच्या प्रभावाने इंद्राची चतुर्दश संपत्तिही समुद्रात फेकून देऊन देवांनाही दंग करून सोडणारे दुर्वास महर्षी, शिव

पंचाक्षरी यंत्राच्या जपानुष्टाचे बलाने यम लोक उध्वस्त करणारे सानंद महर्षी, न्याय शास्त्राची रचना करून प्रसिद्धीस आलेले गौतम महर्षी, सर्व महर्षिमध्ये श्रेष्ट असलेले दधीची ऋषी वगैरे, सर्व महर्षिनी लिंग धारण केले होते. या वरुन शिवलिंगाचे पावित्र्य व थोरपण आपोआप सिद्ध होते. राजे महाराजे सुद्धा लिंग धारण करित होते असे अनेक ग्रंथातील आधारावरून कळून येते. पांच हजार वर्षापूर्वी होऊन गेलेले अनेक राजे महाराजे सर्व लिंग धारण करित होते. असे अनेक शिलालेख आहेत, तसेच ताम्रपटही पुष्कळ आहेत. वीरशैव मताच्या प्राचिनत्वाचा विचार शिलालेखादि आधाराने करू.

**३५. ५००० पाच हजार वर्षापूर्वी जनमेजय राजनेकेदार पीठाला १००० गोवे दान दिली होती.**

पाच हजार वर्षापूर्वी होऊन गेलेल्या जनमेजय राज्यने हिमवत केदार पीठाधिपती श्री. जदगुरु आनंदलिंग जंगममहास्मामिला एक अतिशय महत्वाचे व फारच मोठे दान शासन (जहागिरी) लिहुन दिलेले उपलब्ध आहे. ते खालील प्रमाणे आहे.

स्वस्ति श्री विजया भ्युदययुधिष्ठर शाके प्लवंगाख्ये एकोननवतितमवत्सरे सहसि मासि अमावास्यायांसोमवासरे श्रीमन्महाराजाधिराजपरमेश्वरवैयाघ्रपदगोत्रेज श्रीजनमेजय–भूपा इन्द्रप्रस्थनगरीसिंहासनस्थाः सकलवर्णाश्रमधर्मप्रतिपालका उत्तर हिमालये श्रीकेदारक्षेत्रे तत्रत्यमुनिरुंषामठस्य श्रीगोस्वमि आनंदलिग जगमः । श्रीमच्छिष्यज्ञानलिंग जग. मद्वारा आराधितश्रीकेदारनाथस्य पूजार्थं चतुस्सीमापरिमितिक्रमः । पूर्वभागे दक्षिणवाहिनी मन्दाकिनी, पश्चिम–दक्षिणभागे क्षीरगंगा उत्तरपश्चिमे मधुगंगा पूर्वोत्तरभागें स्वर्गद्वारनदी, दक्षिणे सरस्वतीमन्दाकिन्योस्सङ्गमः । एतन्मपध्ये श्रीकेदारक्षेत्रम् । भवच्छिष्यरंपरम्यरया चन्द्रार्कपर्यंन्त निधिनिक्षेपजलपाषाणागामिसिद्धसाध्यतेजस्स्वाम्यसहितम्। स्वबुध्यानुकुल्येनास्मन्मातृपितृणं शिवलोकप्राप्त्यर्थं श्रीकेदारेश्वरसन्निधावपरागसमये सहिरण्यमन्दाकिनीजलधारपूर्वक क्षेत्रमिदं हस्ते दत्तवानस्मि एतद्धर्मसाधनस्य साक्षिणः–

आदित्यचन्द्रावनिलोऽनलश्च द्यौर्भूमिरापोहृदयं यमश्च । अहश्च रात्रिश्च उभेच सन्ध्ये धर्मश्च जानाति नरस्य वृत्तम् ।। दानपालनयोर्मध्ये

दानाच्छ्रेयोऽनुपालनम् । दानात्स्वर्गंमवाप्नोति पालनाद्व्दिगुणे फलय् ।। स्वदत्त पुत्रक ज्ञेया पितृदत्ता सहोदरा । अन्यदत्ता तु जननी दत्तभूमि परित्यजेत् ।। स्वदत्तं परदत्तां वा ब्रह्मवृत्ति हरेच्चयः । षष्टिवर्ष-सहस्त्राणि विष्टायां जायते क्रिमिः ।।

या दान शासनाचा भावार्थ खालील प्रमाणे आहे. श्रीमन्महाराजाधिराज हस्तिनापुर सिंहासनाधिश्वर वर्णाश्रमधर्म प्रतिपालक जनमेजय भूपालानी, युधिष्ठीर शके ८९ प्लवंगम नाम संवत्सर, मार्गशिर्ष मास, आमावस्या, सोमवार रोजी केदार क्षेत्र निवासी उषामठाधिश श्री गोस्वामी आनंदलिंग जंगम माहस्वामीचे शिष्य ज्ञानलिंग जंगमस्वामी द्वारा अराधित श्री. केदारनाथ देवाच्या पूजेसाठी मंदाकिनी क्षीरगंगा, स्वर्गद्वारगंगा सरस्वती, मंदाकिनी संगम या सिमेमध्ये असलेले श्री. केदारक्षेत्र निधिनिक्षेप जलपाषाण आगामी सिद्ध, साध्य तेजो वस्तू वगैरे स्वामित्वासह आमच्या मातापितरांना शिवलोक प्राप्त व्हावा म्हणून श्री. केदारेश्वर समक्ष, सूर्यग्रहणाचे वेळी, सुवर्ण दक्षिणायुक्त, गंगोदकासह, महास्वामीच्या हाती दान केले, महाराजांनी केलेल्या या दानास सुर्य, चंद्र, अग्नी, वायु, आकाश, भूमि, जल, मनुष्य, यम, दिवस, रात्र, दोन संधिकाल, व धर्म हे साक्षी आहेत. ह्या दानाचा जे अपहार करतील ते साठ हजार वर्षापर्यंत विष्टेतील किडे होऊन राहतील. पण हे दान जें चालवितील त्यांना द्विगुणित फल मिळेल. कलियुगाच्या आरंभी जनमेजय राजा राज्य करीत होता ही गोष्ट पुराण इतिहास प्रसिद्ध आहे. अर्जुनाचा मुलगा अभिमान्यु त्याचा मुलगा परिक्षित आणि परिक्षिताचा मुलगा राजा जनमेजय होता. वरील दान शासनात युधिष्ठिर शके ८९ प्लवंग संवत्सरांत दान केल्याचा उल्लेख केला असल्यामुळें हे शासन पाच हजार वर्षाचे जुने आहे.

जनमेजय राजाने दान केलेली सर्व भूमि पाच हजार वर्षापासून केदार पिठाधिपतिच्याच स्वाधीन होती. या हद्दीत एक हजार गावे असून त्याचे अधिपत्यही केदार पिठाधीपतीकडेच होते. सत्तर ऐंशी वर्षापूर्वी श्रीगणेशलिंग जंगम महास्वामी पिठाधीपती असताना इंग्रज सरकारने पिठाची सर्व गावे काढून घेतले व १४१ गावाचे उत्पन्न पिठाला ठेवले आहे.

**३६. हिमालय प्रांतातील तेरा देशाचे राजे केदारपीठाचे शिष्य आहेत.**

वरीलप्रमाणे भरत खंडात प्रसिद्ध असलेल्या बारा ज्योर्तिलिंगातील सर्व श्रेष्ठ अशा श्री केदार लिंगाची हिमवत्केदारनाथ देवालयाची सर्व सत्ता अनादि कालापासून आजतागायत वीरशैव जगद्गुरुंच्याच हाती आहे. याशिवाय हिमालय प्रांतात अतिशय प्रसिद्ध असलेली गुप्तकाशी, गौरींकुंड, मध्यमेश्वर, त्रियुगीनारायण, नारायण तीर्थ-कालीमठ, नाली भगवती, मैखंड, सोमद्वार वगैरे बावीस क्षेत्रांचे सर्व अधिकार केदार पिठाधीपतीकडेच अनादि कालापासून आजतागायत आहेत. ही सर्व क्षेत्रे अती प्राचीन आहेत. या मठास उषामठ हे नाव पडण्याचे कारण श्रीकृष्ण पुत्र अनिरुद्धाची बायको उषादेवीं या गुरुस्थानी काही काळ राहिली होती व तिने हा मठ बांधला आहे. हिमालय प्रांतात असलेल्या टेहरी संस्थानचे अधिपती या पिठाचे शिष्य आहेत. तसेच उदेपूर, काश्मीर, नेपाळ वगैरे तेरा देशाचे महाराजे या मठाचे शिष्य-आहेत. व दरसाल बिनचूकपणे पिठाकडे नजराणा पाठवितात. ब्रिटिश सरकारनेही पिठाचे महत्त्व ओळखून भारतात कोठेही आडव्या पालखीतून मिरवण्यास पंचकलश वगैरे बाहत्तर बिरुदे वापरण्यास आणि वाटेल तितक्या बंदुका, पिस्तुले, तलवारी वगैरे हत्यारे वापरण्यास पिठाधीपतींना परवानगी दिली आहे, व श्रींना रावल हा गौरवास्पद किताब दिला आहे. इतके राजाधिराज मान्य धर्मपीठ भारतात दुसरे नाही.

**३७. काशी सिंहासन मठालाही दान दिलेल्या अनेक सनदा आहेत. त्यात मुसलमान राजानेही दाने दिली आहेत.**

श्री जगद्गुरु काशीसिंहासन मठालाही अनेक प्राचीन सनदा आहेत. त्यामध्ये काशी नरेश जयनंद देवाने केलेले दान शासन प्रमुख आहे, हे नरेश इ. स. च्या सहाव्या शतकात होऊन गेले आहेत. त्यावेळी विश्वाराध्य जगद्गुरु पीठाचे अधिकारी श्री मल्लिकार्जुन शिवयोगी महास्वामी हे होते. त्याना जयनंद देवाने गोचर भूमिचे दानपत्र करून दिले आहे. ही गोचर भूमि विक्रमार्क संवत ६३१ कार्तिक शुद्ध ११ दान दिल्याचा उल्लेख शासनपत्रात आहे. या शासन पत्रास आता चौदाशे वर्षं झाली आहेत. नेपाळ देशात काशीपीठाची एक शाखा मठ,

जंगमवाडीमठ, नावाने अजून विराजमान आहे. या मठाचे संरक्षण नेपाळच्या राजांनी फार प्राचीन काळापासून आजतागायत केले आहे. विश्वमल्लनृपति नावाच्या नेपाळ नरेशाने या जंगमवाडी मठाला जहांगीर देऊन शिला लेखा करून दिला आहे. तो खालीलप्रमाणे आहे.

श्रीविश्वमल्लनृपतेर्गङ्गादेवी सुतौ सुषुवे
त्रैलोक्यमल्लभूपस्त्रिभुवनमल्लश्च भूपालो ॥

- भावार्थ श्री. विश्वमल्ल राजाला गंगादेवीचे पोटी त्रैलोक्यमल्ल नावाचे दोन पूत्र होते या प्रमाणे अनेक श्लोकांतून आपला वंश पराक्रम वर्णन करून पुढे.

शैवप्रीतिमिमां च दैववशतो नष्टां पुनः सृष्टवान् ।
सृष्टां चापि शिवार्पितां प्रतिदधे शैवागमाचारतः ॥
शैवाचारकृतः शिवागमविधेः शैवाः शिवालम्बनाः ।
किं वा सन्ति न सन्ति हन्त जगति प्रख्यातसत्कीर्तये ॥
किन्तु क्षान्तिविवेकशान्तिपरमानन्देकवीरप्रभु-
र्वेद श्रीयुतमल्लिकार्जुनयतिः शैवश्च तत्वं परम् ॥

नेंपाळचे राजे प्राचीन कालापासून शिवभक्त होते. पण दैववशात विश्वमल्ल राजा शिवभक्ती हीन झाला. पुढे मल्लिकार्जुन स्वामिनी शैवागमपद्धतीप्रमाणे या राजाला पुन्हा शिवभक्त बनविले. या महास्वामीची शांती, दांती, विवेक, वैराग्य, वगैरे गुणावली पाहून विश्वमल्ल राजा भारून गेला. वगैरे अशयाचा वरील शिलालेख आहे. संस्कृत श्लोकाच्या खाली नेपाळी भाषेत काही महत्वाचा मजकूर लिहिला आहे. तरीपण या समयीसुद्धा दोनशे प्रमाण भूमि त्यांनी आणखी दान केल्याचा उल्लेख आहे. जय रुद्र मल्ल देव राजाने या जंगमवाडी मठास बरेच दान केले आहे. हे दान शासन विक्रम संवत ६९२ जेष्ठशुद्ध आष्टमिस करण्यात आले आहे. अर्थात ते आता तेराशे वर्षांचे जुने आहे. या सर्व शिलालेखाचा विचार केल्यास प्राचीन काळचे राजेमहाराजे शिवभक्त संपन्न असून जगद्गुरु पंचाचार्य पीठाचे शिष्य होते, असे दिसून येते, रिवा, मेहर, म्हेसूर, वगैरे देशांच्या महाराजानेही काशी पीठास दान देऊन दाशासन लिहून दिले आहे. हुमायुन, अकबर जहांगीर, शहाजहान, औरंगजेब, महमद शहा, वगैरे मोगल बादशहा-

नीही वीरशैव धर्म पीठाबद्दल भक्ती बाळगून जहांगिरीच्या सनदा करून दिल्या आहेत. व त्या अजून काशी पीठात आहेत. त्या सर्व उर्दु लिपित आहेत. शैव धर्माचा वैरी असलेला औरंगजेब बादशहा, काशी पीठावर चालून आला असता या धर्मपीठाच्या प्रभावामुळे त्याला व त्याच्या सैन्याला फारच त्रास झाला, तेंव्हा त्याचे आपले धर्मवेड दूर होऊन त्याने मठाला जहांगिरीची सनद करून दिली आहे. ( ती उर्दु लिपीत आहे. )

**३८. भारतातील पाच महापीठाला (मठाला) हजारो शाखामठ आहेत त्यांनाही अनेक दान मिळालेल्या सनदा आहेत.**

भावार्थ मी जंगमवाडी मठाला गेल्याबरोबर तेथील मूर्ती माझ्या डोळ्यापुढे चमकू लागली, ती काळी असून तिचे डोळे प्रलयाग्निप्रमाणे लाल होत. तिच्या मस्तकावर बकऱ्याच्या केसाप्रमाणे उभे रोमांच होते. ती मूर्ती लहान होती. तरीही ती आकाशापर्यंत पोहचली होती, तिला पाहून मी भ्यालो व मठाला शरण जाऊन मी इतके दान करीत आहे. वर दिलेल्या जहांगिरी सनदावरून वीरशैवाचार्यांच्या मूळ पीठाचे प्राचिनत्व सिद्ध होते. या पाच धर्मपीठाला प्रत्येकी हजारो शाखा मठ आहेत. त्या शाखा मठालाही दान शासनाने मिळालेले शिलालेख आहेत. मि. रैस साहेब, यांनी आपल्या नावाच्या पुस्तकात जि. सिमोगा, तालुका : शिकापूर मधील बेळगावी गावात सापडलेल्या शासनाचा उल्लेख केला आहे त्यागावात (१) हिरेमठ (२) पंचलिंग मठ (३) त्रिपुरांतक मठ (४) वामशक्ति मठ व (५) कोडिय मठ असे पाच मठ असून इ. स. १०५४ मध्ये पहिल्या तीन मठाचे अधिकारी अनुक्रमे (१) मुळिग मधुकेश्वर (२) सर्वेश्वर पंडितदेव (३) ज्ञानशक्ति देव नावाचे होते, पुढे इ. स. १११२ मध्ये शांतीशिव पंडित, क्रियाशक्ति पंडीत नावाचे मठाधिपती होते. चौथ्या वामशक्ति मठात इ. स. ११२९ मध्ये सोमेश्वरय्या व विद्याभरणय्या असे दोन महेश्वर असून पाचव्या कोडिय मठात श्रीकंठ शिवयोगी नावाचे स्वामी होते, श्रीकंठ शिवयोगी स्वामिचा सोमेश्वरय्या शिष्य होता. त्याचे शिष्य मल्लिकार्जुनाचार्य इ. स. ११२९ मध्ये होऊन गेले त्यांनीच हा लेख लिहून ठेवला आहे. या शासनातील नांवे पाहिली असता अती

प्राचिन काळी कसे जाडे विव्दान पंडित होते व त्याचे मठ कसे वैभवशाली होते ते दिसून येते.

इ. स. १८७५ साली प्रसिद्ध झालेल्या बॉम्बे रॉयल आशियाटिक सोसायटीच्या आकराव्या रिपोर्टात दोनशे सत्ताविस पानापासून दोनशे सत्याहत्तर पानापर्यंत जे कानडी ताम्रपट छापलेले आहेत त्यामधील एकात चाबुंडराज, त्यांची राणी महादेवीव पेर्नंडी नामक सिंधुवंशाच्या राजाची माहिती दिली आहे. त्यांना शिवागमसमाकर्णन कर्णपूररु, असे विशेषण दिले आहे. त्यांनी नीलकंठ पंडितदेव नावाच्या माहेश्वराना लिंग मुद्रांकित भूमी दान दिल्याचे खालील ताम्र शासनात आहे.

सर्वसमस्यवागि बिट्ट भूमियस्थलं । मुदमोळलदारियं
वहगणवयवलंदिं ।
तेंकणवासिगावुंडन बळदिं । उत्तरमूवत्तारक्के लिंगमुं
तपोधनरूं ।
कवितेयुं बेरसुमाडि ! ”

असे कानडीत लिहिलेले आहे. या ताम्रपठांत नीलकंठ देव नांवाच्या माहेश्वरांना भूदान केलेले आहे. भूदान करणारा पेर्मंडी राजा इ. स. ९५० मध्ये राज्य करित होता असे वरिल शासनावरून दिसून येते. चोथ्या शासनात :—

“ भस्मोध्दुळितगात्ररूं, कौपीनाजिनरूं, रुद्राक्षमालाधररूं, वातुलागमसमयसमुद्धाररूं, जंगमलिंगावताररूं ”

असे कोरलेले असून सर्वेश्वर नामक माहेश्वर पंडितांना भूमिदान केल्याचा त्यात उल्लेख आहे. प्राचिनकाळी वीरशैव मठाधिपती मोठे विद्वान पंडित होते. त्यांचे राजेमहाराजे शिष्य होते ते मठाला मोठमोठे दान शासन लिहून देत होते, असे दान मिळवन धर्माचे चांगले संरक्षण करून जगद् वंद्य होऊन गेले आहेत. पूर्वी मठाधिपति विद्वान पंडित असल्यामुळे राजेमहाराजे मठाचे शिष्य होतेच, त्यांनी मठाला मोठमोठे दान दिले आहेत. ते आजतागायत मठाकडेच आहेत.

काल वैचित्र्यामुळे आशा वीरशैव गुरुमठाची ख्याति हल्ली खालावली आहे.

**३९. वीरशैवधर्मसिद्धांताकरिता मठाधिपतिनी पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत तसेच अनेक ग्रंथावर भाष्यही केले आहेत.**

येथ पर्यन्त आम्ही अनेक आधार देऊन वीरशैव मताचे प्राचिनत्व सिद्ध केले आहे. आता या मताच्या प्राचिन ग्रंथाचे निरिक्षण करू वीरशैवाचार्य व वीरशैव पंडितांनी अनेक महत्वाचे ग्रंथ लिहिलेले आहेत. पण त्या ग्रंथातला विषय हल्लीच्या वीरशैवांना कळेनासा झाला आहे. श्री. जगदगुरु पंचाचार्यांनी भूलोकावर वीरशैव मताची प्रस्थापना करून वीरशैव सिद्धांत सर्वांना कळावा, म्हणून ब्रह्मसूत्र व उपनिषदादि ग्रंथावर भाष्य रचली आहेत. ही भाष्य दारूक भाष्य यकोराम भाष्य, पंडित भाष्य व विश्वाराध्य भाष्य या नांवाने प्रसिद्ध आहेत. अशी लोकोत्तर भाष्ये रचून पंचाचार्यांनी प्राचिन काळी वीरशैव मताला श्रेठत्व आणून दिले असले तरी दुर्दैवाने हल्ली त्यांचे एकही भाष्य उहलब्ध नाहीत. महानारायण उपनिषदावर भाष्य लिहिलेले वृषभ पंडिताराध्य यांनी आकराव्या अनुवाकांतील सहस्त्रषीर्ष देवं. विश्वाक्षं विश्वेशांभुवम्‌वगैरे मंत्रावर भाष्य करताना लिहिलेले आहे.

**४०. पंचाचार्यांनी ही काहो ग्रंथावर भाष्य लिहिली आहेत.**

" रेवणसिद्धमरुळशिद्धेकोरामसिद्धपण्डिताराध्यादयः
सहस्त्रषीर्षा
देवमित्यादिपरशिवधर्मप्रतिपादकवाक्यानां नारायणात्मक-
विष्णुप्रतिपादकत्वेऽपि
एतदनुवाकस्य शिवपरत्वे न कश्चिदपि दोषः ।
शिवस्य शक्तिर्विनियोगकाले चतुर्विधाऽभूच्छिवसत्प्रसादात्
उभ्दटाराध्यत्रेमनाराध्यविश्वाराध्यादयस्तु
"अस्यामुपनिषदि दहरोपासनाविषये
नारायणोपासकत्वशिवोपास्यत्वनिर्णये
सहस्त्रशीर्षानुवाकगतानि नारायणपरं
ब्रह्म तत्वं नारायणः परः इत्यादिवचनानि विरुध्येरन्निति
मा शङ्किषुः ।
तभ्दावंभावनापन्नास्य नारागणस्यानितरसाधारणहृदयान्तर्वर्ति
ज्योतिर्लिंगानुसंधानसामर्थ्यालिङ्गेन मुक्तः शिवसमो

भवेदिति न्यायाच्च तथैव योजयितु शक्यम् इति प्रोचुः

असे लिहून श्रीरेणुकादि ग्रंथाचार्यांच्या भाष्याचा अभिप्राय थोडक्यात दाखवून दिला आहे येवढ्यावरच आम्हाला तूर्त संतोष मानण्याची पाळी आली आहे. याच वृशभपंडिताराध्यांनी तैत्तीरीय उपनिषिदावर केलेल्या भाषात खालील श्लोक दिला आहे-

वेदव्याक्षं सूत्रकारं दुर्वासं वृत्तिकारकम् ।
भाष्यकृत्यत्पण्डिताराध्ये प्रपद्ये पाशमुक्तये ॥

या श्लोकांत ब्रह्मसूत्र रचणारे व्यासमुनीच्या सूत्रावर भाष्य करणारे मंडिताराध्य व वृत्ति लिहिणारे दुर्वासऋषी यांना संसारपाश-बंधमुक्तिसाठी शरण जातो असे लिहिले आहे. हा मंगलचरणाचा श्लोक आहे. यावरून पंडिताराध्यानी लिहिलेले भाष्य सर्वोत्तम व सर्व सिद्ध होते असे दिसून येते. पंचाचार्यांनी लिहिलेली भाष्य जरी अजून मिळाली नाहीत तरी ती ठिकठिकाणच्या ग्रंथ भांडारात आहेत. असे कळते ही भाष्ये आंध्र देशातील आराध्य ब्राह्मणाचे घरी विशेष करुन आहेत. शिकंदराबादच्या मार्कंडेय शास्त्री महाशयांच्या घरातील लायब्ररीचे यादीत रेणुका भाष्य व दारुकदिग्विजय हे दोन ग्रंथ दिसून येतात बर्लिन येथील पुस्तकालयांत रेणुकाभाष्य आहे. अशी वंदता आहे श्रीपती मंडितानी ब्रह्मजिज्ञासा या सूत्रावर भाष्य करताना श्रीपती पंडित लिहितात.

" सवन्वयसूत्रे एकोरामसिद्धभगवत्पादाचार्यैः
श्रोतव्य इति आत्मज्ञानविधिर्निराकृतेः । "

यावरून त्यांनी श्रीजगदगुरू एकोराम शिवाचार्यांनी लिहिलेल्या " तत्तु समन्वयात् " या ब्रह्मसुत्रावरील भाष्याचा अभिप्राय व्यक्त केला. आहे व त्यामुळे हे सिद्ध झाले की आचार्यांनी ब्रह्मसूत्रावर भाष्ये लिहिली आहेत.

आचार्यांनीच काय पण आचार्यांचा उपदेश घेऊन शिवज्ञान संपन्न झालेल्या अगस्ति वगैरे महर्षिनी वीरशैव सिद्धांतावर ग्रंथ लिहिलेले आहेत. श्रीशंकरभाष्यावरून कळून येते की, अगस्ति महर्षिनी ब्रह्म सूत्रावर वीरशैव सिद्धांतपरवृत्ति लिहिली आहे; श्रीपती पंडितांनी आपल्या भाष्य ग्रन्थारंभी लिहिले आहे.

अगस्त्यमुनिचन्द्रेण कृतं वैयासिकीं शुभाम् ।
सूत्रवृत्ति समालोक्य कृतं भाष्यं शिवङ्करम् ॥

म्हणजे अगस्ति महर्षिनी लिहिलेल्या व्यासकृत ब्रह्मसूत्रावरील वृत्तीच्या आधारानेच हे भाष्य रचलेले आहे. अगस्तिकृत हा वृत्तिग्रंथ हल्ली कुंभकोणम् येथे प्रसिद्ध झाला आहे. विश्वकर्ण शिवाचार्य यांचे शिष्य दुर्वास ऋषीनी लिहिलेली वृत्ति अजून उपलब्ध झालेली नाही. ही व दुर्वासांनी सर्व उपनिषदावर भाष्ये रचले आहेत. असे काही ग्रंथातून लिहिले आहे.

सदसदनुग्रहनिग्रहविग्रहो. . . . . . . . भगवान् ।
सर्वासामुपनिषदां दुर्वासा जयति देशिकः प्रथमऽ ॥

अशारितीने अनेक प्राचिन कविनी दुर्वास महर्षिचा जयजयकार केला आहे. उपनिषदावर सर्वात प्रथम भाष्य करणारे दुर्वासच आहेत. लोकविख्यात नंदिकेश्वरशिवाचार्यानी परमात्म्याच्या डमरुतून निर्माण झालेल्या "अ, इ, उ, ण्" वगैरे चौदा सूत्रा वर लिहिलेला शिवाद्वैत-सिद्धांतपर वृत्तिमध्ये प्रारंभी श्लोक आहे.

नृत्तावसाने नटराज राजे ननाद ढक्कां नवपंचवारम् ।
उद्धर्तुकामः सनकादिसिद्धानेतद्विमर्शे शिवसूत्रजालम् ॥

यावरून ही चतुर्दश सूत्रे केवळ शिवाद्वैत सिद्धांतपर आहेत. या शिवाद्वैत वृत्तीवर उपमन्युशिवाचार्यानी भारदस्त टीका लिहिली आहे. ती नंदिकेश्वर कारिका या नांवाने प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ लहान असला तरी त्याची योग्यता फार मोठी आहे. हा ग्रंथ काशीक्षेत्रनिवासी वीरशैवेतरपंडितानीच साठसत्तर वर्षांपूर्वी छापून प्रसिद्ध केला आहे. याशिवाय गुरुवंशोद्भूत अनेक पंडितांनी अन्य मताच्या लोकांबरोबर वादविवाद करून शिवसिद्धांतपर पुष्कळ ग्रंथ रचना केली आहे. परमत कालानल शिवाचार्य व परवादी भयंकर शिवाचार्य यांनी आद्य शंकराचार्याबरोबर वादविवाद केला आहे, असा उल्लेख शंकरार्याचा विजय (शंकरविजय) या ग्रंथात उल्लेख आहे. नीलकंठ शिवाचार्यांनी ब्रह्मसूत्रांवर भाष्य रचले आहे हे प्रसिद्धच आहे. कालहस्ती शिवाचार्यांनी उपनिषदावर लिंगधारण पर भाष्य रचले आहे असे लिंगधारण चंद्रिका नावाच्या ग्रंथात उल्लेख आहे.

४१. पंचाचार्यांनी केलेले काही दैवी चमत्कार

शैवमत प्रसंस्थापनाचार्य जगद्‌गुरुनी या भूमंडलावर काय काय महिमान केले आहे. ते आता आपण संक्षिप्त पाहू. भारतीय वैदिक मतातील प्रत्येक ग्रंथाचे अनुयायी शैवमत प्रस्थापनाचार्यांचे चरित्र जाणून घेऊन त्यांच्यावर असाधारण भक्ती ठेवत होते. श्री पंचाचार्यांनी हजारो चमत्कार केले आहेत. श्री जगद्‌गुरु रेणुकाचार्यांनी जगात प्रसिद्ध असलेल्या अगस्ती महर्षिना वीरशैव सिद्धांचा उपदेश करू या ऋषीवर्याला आपला शिष्य करून घेतले होते. चक्रवर्ती चिरंजीव परमशिवभक्त बिभीषणाच्या त्याची पूजा स्वीकरून एकाच वेळी तीन कोटी शिवलिंगाची प्रतिष्ठापना करण्याचा त्याचा तंकल्प पूर्ण सूरण्यासाठी श्री रेणुकाचार्यांनी एकदम तीन कोटी गुरुचेरूप धारण केले व बिभीषणाला शिष्य बनविले. शक प्रवर्तक म्हणून प्रसिद्ध असलेल्या उज्जनीच्या राजा विक्रमास जग जिंकण्यासाठी दिव्य खाड्‌गदान दिले व शिवसिद्धांताचा उपदेश करून त्याला आपला शिष्य केले. श्री आद्यशंकराचार्यांच्या विनंतीप्रमाणे सर्वसिद्धीप्रद चंद्रमौलीश्वर शिवलिंग देऊन उपदेश केला. सर्व जनांना पीडा करणाऱ्या यक्ष दंपतीला आपल्या सामर्थ्याने भस्म करून सर्व जनतेला अभय दान दिले. कुटिल सिद्धाग्रणी व मदांध अशा कोल्हापूर निवासी गोरक्षाचे गर्वहरण करून, रेणुकाचार्यांनी त्याला शिवसिद्धांताचा उपदेश करून, आपला शिष्य बनविले. कांची क्षेत्रातील श्री वरदराज नावाच्या विष्णुमूर्तीचे हलत असलेले मस्तक आपल्या तपोबलाने स्थिर करून, रेणुकाचार्यांनी कांची नगराधिपती विष्णु भक्त चोलभूपालला शिवसिद्धाताचा उपदेश करून त्याला आपला शिष्य बनविले सर्व भारतावर राज्य करीत असलेल्या नीलकंठ चक्रवर्तीच्या असामान्य दातृत्वाची पारख करण्यासाठी श्री रेणुकाचार्यांमी कोट्यावधी प्रमथाचे रूप धारण करून शेवटी अग्नीला आहुती पडलेल्या त्या महाराजांच्या भक्तीने संतुष्ट होऊन, त्यानी राजाला शिवसिद्धांचा उपदेश केला, व त्याच्या सती शिरोमणी पत्नीसह राजाल शिवपद प्राप्त करून दिले.

परशिवाच्या कृपेने, आपल्या स्वसामर्थ्याने, या भूमंडलावर, श्री. जगदगुरू रेणुकाचार्य महात्म्याने कांची क्षेत्रातील एका सर्व गुण संपन्न

मुलाला शिष्य करून त्याला त्यांनी रुद्रमुनी असे नांव ठेवले, व त्याला आपला उत्तर अधिकारी करून त्याच्या बरोबर जगभर संचार करून त्याला शिवानुभव ज्ञान करून दिले, व ज्या क्षेत्रात ते जन्मले होते, त्या कूल्यूपाक क्षेत्रांत ते शिव ऐक्य पावले. श्री. दारुकाचार्यांनी दधीचि-महर्षिला उपदेश केला. कोल्हापुरच्या महामायेचे गर्वहरण केले, देवनंदन नांवाच्या राजाची भक्ती पाहून त्याला शिवसिद्धांताचा उपदेश केला. अशा अनेक अदभूत लीला करून मल्लिकार्जुन शिवयोगी यांना आपला उत्तराधिकारी नेमून ज्या क्षेत्रांत ते जन्मले होते त्याच क्षेत्रात शिवैक्य पावले.

असे सर्वच पंचाचार्यांनी जगत् उद्धाराचे कार्य करून शिव ऐक्य पावले आहेत.

**४२. वीरशैवांना चार वर्ण विश्वारंभापासून बसवेरापर्यंत मान्य होते, बसवेश्वर चार वर्ण मानित नव्हते.**

वीरशैव मतात चारी वर्ण मान्य आहेत आणि ते आनादि काला-पासूनचे आहेत. पण अलीकडच्या कालातले वीरशैव बर्णाश्रम धर्ममानित नाहीत. कलियुगाच्या आगोदर विश्वरंभापासून शैव वीरशैववर्णश्रम धर्म मानित होते, आणि त्याप्रमाणे ते आचरण करीत होते. असे रेणूकादि पंचाचार्यांनी सांगितले आहे. आणि वर्णा श्रमधर्माच्या आधारानेच शैव व वीरशैव असे दोन भाग आहेत. वैश्य व शुद्र शैव आहेत, ते स्थावर शिवलिंगाची उपासना करतात, आणि वीरशैव क्षत्रिय व ब्राह्मण आहेत. ते शरीरावर शिवलिंग धारण करतात व त्याची पूजा उपासना करतात. असा वर्णाश्रम धर्म आनादि कालाचा आहे. चालू कालांत क्षत्रियालाच वीरशैव म्हणतात. व ब्राह्मणाला जंगम म्हणतात. वीरशैवांचा वर्णाश्रम धर्म श्री. बसवेश्वरापासून अलिकडेच बंद पडला आहे. त्यांच्या अगोदर विश्वरंभापासून ते श्री. बसवेश्वरापर्यंत व्यवस्थित चालू होता.

वैष्णवमतांत ज्याप्रमाणे चतुवर्णाश्रम धर्म आहे, त्याप्रमाणे वीरशैव धर्मात ही अनादि कालापासून वर्णाश्रम धर्म होता वीरशैवमत आणि वैष्णवमतामध्ये या बाबतीत काहीच फरक नाही. सिद्धांत विषय सुद्धां सारखेच आहेत. देवता उपासना व कांही कर्माचारामध्ये मात्र

थोडासा फरक आहे. मानव देवाने निर्माण केलेला आणि पंचाचार्यांनी जोपासलेला वीरशैवमताचा सिद्धांत व आचाराना धरूनच श्री. रामानुजाचार्यांनी आपले मत स्थापन केले आहे. असे निःसंदेहपणे म्हणायला हरकत नाही. थोडक्यात सांगायचे म्हणजे या दोन्ही मतांचा अनेक प्रकारात निकट संबंध आहे. तो आपण पाहू.

४३. आद्य वीरशैवधर्म व नूतनरामानुजाचार्यांनी निर्माण केलेला वैष्णव पंथ.

श्रीमत् पंचाचार्यांनी शिवसूत्र, ब्रह्मसूत्रावर भाष्य करून शक्ति-विशिष्ट अद्वैत सिद्धांत स्थापन केल्याप्रमाणे रामानुजाचार्यांनीही ब्रह्मसूत्रावर भाष्य रचना करून विशिष्ट अव्दैत सिद्धांत स्थापन केला आहे. पंचाचार्यांनी परब्रह्म शक्ति विशिष्ट आहे, म्हणून सांगितले आहे, तर रामानुजाचार्यांनी ते चिदचिव्दिशिष्ट आहे असे सांगितले आहे. पंचाचार्यांनी तत्वतः भेदाभेद मानल्या प्रमाणेच रामानुजाचार्यांनीही तो मानला आहे. पंचाचार्यांनी प्रत्यक्ष अनुमान, आगम ही प्रमाणे आंगिकारली आहे तशी रामानुजाचार्यांनी जगत सत्यत्व मानले आहे. व अध्यासवादाचे खंडण केले आहे. दोघांचाही सिद्धांत विशिष्ट अव्दैत असल्यामुळें दोन्ही मतांत फारसा भेद नाही. पंचाचार्यांनी शिवाला परब्रह्म म्हटले आहे तर रामानुजाचार्यांनी विष्णूला परब्रह्म म्हटले आहे. पंचाचार्यांनी परशिवापासून चराचर जगत उत्पत्ती झाली आहे, तर रामानुजाचार्यांनी ती विष्णू पासून म्हटली आहे. पंचाचार्यांनी परशिवरुप इष्टलिंग देहावर सतत धारण करावे म्हणून सांगितले आहे. तर रामानुजाचार्यांनी विष्णूचे आयुधरूप शंख, चक्र सतत देहावर दिसावे म्हणून तापलेली मुद्रा देण्याची पद्धती सुरू केली. पंचाचार्यांनी गोमयदग्ध भस्माचे त्रिपुंड्र धारण करण्यास सांगितले तर रामानुजाचार्यांनी मृत्तिका सिद्ध नामाचे ऊर्ध्वपुंड्र धारण करण्यास सांगितले. पंचाचार्यांनी रुद्राक्षमणि धारण करण्यास सांगितले. तर रामानुजाचार्यांनी तुलशीकाष्टाचे मणी सांगितले. पंचाचार्यांनी शिव पंचाक्षरीमंत्र जपण्यास सांगितले तर रामानुजाचार्यांनी नारायण अष्टाक्षरीमंत्र जपण्यास सांगितले, पंचाचार्यांनी बालकाला जन्मतःच शिसंबंध करावा म्हणून त्यास लिंग धारण, पंचाक्षरमंत्रोपदेश करावा असे सांगितले आहे,

तर रामानुजाचार्यांनी जन्मलेल्या बालकाला शीतशंकचक्राचे धारण व नारायण मंत्रोपदेश करावा म्हणून सांगितले. आठव्या वर्षी जाती संस्कार रूप, उपनयन व मत संस्कार रूप दीक्षा घ्यावी म्हणून पंचाचार्यांनी सांगितल्या प्रमाणेच, रामानुजाचार्यांनेहि सांगितले आहे. शिवदिक्षा समयी व्दिजांना षडध्व शुध्दी संस्कार करावा म्हणून पंचाचार्यांनी जसें सांगितले, तसेच रामानुजाचार्यांनीही वैष्णव दीक्षा काली षडध्वशुध्दि संस्कार करण्यास सांगितले आहे. ब्राह्मणादि चांडाळापर्यंत सर्वांनी आपापल्या धर्मांप्रमाणे लिंग धारण भस्म धारण, व रुद्राक्ष धारण करून वर्णाश्रम धर्मानुसार वागावे म्हणून पंचाचार्यांनी जसे सांगितले आहे, तसेच रामानुजाचार्यांनीहि चांडाळापर्यंत सर्वांना आपापल्या जातीप्रमाणे शंख चक्र उर्ध्वपुंड्र धारण करून वर्णाश्रम धर्मानुसार वागावे असे सांगितले आहे. पंचाचार्यांनी आपल्या मतास परंपरेने चालत असलेले वीरशैव नांव ठेवलें आहे तर रामानुजाचार्यांनी स्वमतास वीरवैष्णव किंवा श्री वैष्णव म्हटले. आहे. पंचाचार्यांनी शिवागमानांप्रमाण मानले आहे. तर रामानुजाचार्यांनी पांचरात्रागम प्रमाण मानले आहे. विधवा स्त्रियांनी केश वपन (मंडण) करू नये म्हणून पंचाचार्यांनी जसे सांगितले तसेच रामानुजाचार्यांनीही सांगितले. आहे. त्यांनी एकभुक्त असावे, काषाय वस्त्र धारण करावे, पति वियोगानंतर परशिवच पति समजून राहावे, असे पंचाचार्यांनी सांगितले, तसेच रामानुजाचार्यांनी ही एकमुक्त राहावे, रक्तवस्त्र धारण करावे, व पति वियोगानंतर नारायणच पति मानून राहावे, असे सांगितले आहे. पंचाचार्यांनी आचार्य सांप्रदायिक गुरूवर्गाला जसे महत्व दिले आहे तसेच रामानुजाचार्यांनीहि आचार्य सांप्रदायीक गुरूवर्गाला महत्व दिले आहे. वरील तुलनात्मक माहितीवरून विचार केल्यास पंचाचार्यांनी शिवभक्तीचा प्रचार जगभर अनादि कालापासून केला आहे. (विश्वारंभापासून) तर रामानुजाचार्यांनी स्वत: पासून प्रचार सुरू केला आहे. पंचाचार्यांचा सांप्रदाय विश्वारंभापासून आहे तर रामानुजाचार्यांचा सांप्रदाय रामानुजाचार्यांनी स्वतःच निर्माण केला आहे. वीरशैव धर्माच्या आरंभाला १९७२९४९ १०० इतके वर्षे झाले आहेत तर रामानुजाचार्यांच्या वीरवैष्णव धर्मारंभाला १००० (एक हजार) वर्षे

झाले आहेत. रामानुजाचार्यांनी वीरशैव मतातील सिध्दांत व अचाराचे रुपांतर करून स्वमत सिध्दांत अचार बनविले आहेत. असे उघड दिसून येते, रामानुजाचार्यांनी पंचाचार्यांचेच अनुकरण केले आहे. असे वरील कालनिर्णयावरून सिध्द होते, रामानुजाचार्य मद्रास इलाख्यातील पेरबंदरू गांवाच्या असुरी केशव सोमयाजी यांच्या पोटी इ. स. १०१७ जन्मले. त्यानी यादव प्रकाशाचे शिष्य होवून वेदांताचा अभ्यास केला व महापंडित बनून विष्णू भक्तिचा प्रसार केला.

८४. रामानुजाचार्यानी काही शिवमंदीरे, विष्णुमंदीरे बनविली आहेत.

त्यांच्यापूर्वी दक्षिण भारतात सर्वत्र शिवभक्तीचाच प्रसार होता. त्यांनी कांही देशाच्या भूतबाधापीडीत राजकन्यांना बरे केल्यामुळे अनेक राजेमहाराजे त्यांचे शिष्य बनले व त्यांनी श्री वैंशणव मताचा प्रसार केला, असे त्यांच्या चरित्रावरूनच कळते. कांही राजांनीच श्री वैशणव-भक्तीचा स्वीकार केल्यावर रामानुजाचार्यानी त्यांच्या सहाय्याने व आपल्या बुद्धीचातुर्याने अनेक मार्गाने विष्णु भक्तीचा प्रचार करून वैंष्णवभक्ताचा विशेष प्रसार केला. त्यामुळे अनेक शैवांनी वैष्णव-भक्तीचा अंगिकार केला. आदिकालच्या शिवभक्तीमय द्राविड देशात वैशणवमत पसरू लागले. प्राचिन काळी द्राविड देशांत वीरशैव च विशेष होते. रामानुजाचार्यांच्या विष्णुभक्तिच्या प्रभावाने वीरशैवाची संख्या कमी होत होत आता अगदीच नाममात्र राहिलीं आहे. राजाश्रयाने रामानुजाचार्यानी काही शिवालयेसुद्धा आपल्या ताब्यात घेऊन त्यामध्ये विष्णूमूर्तीची स्थापना केली आहे, व कांही ठिकाणी शैवमुर्तीच्या विष्णू मूर्ती बनविल्या आहेत. असे ग्रंथावरून व प्रत्यक्ष दर्शनाने दिसून येते. तिरूपती क्षेत्रात असलेली, व्यंकटरमणाची मूर्ती विष्णूमूर्ती नसून ती वीरभद्राची आहे. रामाणुजाचार्यांनी वीरभद्र मूर्तीचे द्रपांतर करून विष्णुमूर्ती केली आहे असे श्रीपती पंडितांनी श्रीकार भाष्यांत स्पष्टपणे लिहिले आहे.

" ननु वेङ्कटेश्वरविठलेश्वरस्थाने विष्णोरीश्वरशब्दश्रवणात्, परशरामावतारे तस्य ब्राह्मणकुलम्भवश्रवणात्, कथं क्षत्रियत्वमुपदिश्यते इति चेन्न । वेङ्कटेश्वरस्याभासविष्णुत्व, तदङ्गे नागभूषणादिधर्माणां द्योतनात्, मूलविग्रहे शङ्खचक्रा दिलाञ्छनाभावदर्शनात् वीरेश्वरस्य रामा-

नुजकल्पितवेङ्कटेश्वर त्वं सर्पवदाभासमात्रमेव । किञ्च तत्पाण्यधोदेशे शिवलिङ्गदर्शनादीश्वर शब्दो व्यवह्रीयते " ।

याचा विचार केला असता असे दिसून येते की तिरुपती क्षेत्रातील मूर्ती वीरभद्राची आहे. विष्णूर्तीची शंखचक्रादि प्रमुख चिन्हे तिला नाहीत ही सर्वाभरणभूषवित आहे. मूर्तीच्या हाताखाली शिवलिंग आहे. मूर्तीच्या बाहुमध्ये सर्पाचे वेष्टण आहे. हातामध्ये मूर्तीच्या दगडाप्रमाणे शिला निर्मित शंखचक्र नसून लोखंडाची करून घातलेली आहेत. धनूर्मास संपेपर्यंत दरसाल बिल्पपत्राने पूजा करतात. या सर्व प्रकारावरुन व्यंकटेशाची मूर्ती वीरभद्राचीच असावी असे वाटते.

आतापर्यन्त श्री वेष्णवमताचे व वेष्णवमत्वात आणि वीरशैव मतात असलेल्या तारतम्याविषंयी तसेच रामानूजाचार्यांच्या कालापासून शिवभक्तिचा ऱ्हास होत आला या विषयी सप्रमाण सिद्ध करण्यात आले आहे. आता वीरशैवांचे उपास्य दैवत परशिव त्याचे सर्वोत्तमत्वा विशयी थोडक्यात विचार करू.

परम पवित्र वीरशैव मताचे मुख्य चिन्ह म्हणजे लिंग धारण आहे, हा लिंग धारणेचा विषय कामिकादि आगमातून ऋगादि वेदातून ईशादि उपनिषदातून व शिवादि पुरणातून विषेश प्रकाराने सांगितले आहे. या विषयी सिद्धांत शिखामणित लिंग धारण स्थळांत वीरशैव मतसंस्थापक रेणूकाचार्यांनी अगस्ति महीर्षींना शिवसिद्धांताचा उपदेश करताना खालील प्रमाणे सांगितला आहे.

**४४. आगम, विगम, शैव, पुराणे, उपविषदे आदि ग्रंथांत लिंग धारणेचे वर्णन आहे.**

वेदशास्त्रपुराणेषु कामिकाद्यागमेषुच ।
लिङ्गधारणमाख्यातं वीरशैवस्य निश्चयां तू ॥

वेदशास्त्रपुराणे व कामिकादि आगमातून लिंगधारणा बीरशैवांना निश्चयपूर्वक सांगितले आहे. भगवत्पाद आचार्यांच्या वरिल महावाक्याला अनुसरून पुढील विवरण आहे.

**४५ ऋग्वेदात : लिंगधारणा**

पवित्र ते विततं ब्रह्मणस्पते प्रभुर्गात्राणि
पर्येषि विश्वतः । अतप्ततनूर्नतदामोऽश्नुते ॥
( अष्टक ७, अध्याय ३, वर्ग ८ )

हा मंत्र तर शिव्वळ लिंगधारणा संबंधीच आहे. लिंग धारण चंद्रिकाकार श्री नंदीकेश्वर शिवाचार्य यांनी वरील मंत्रावर खालील प्रमाणे टीका लिहिली आहे.

हे ब्रह्मणस्पते — लिंगरूपशरीरावच्छेदेन शरीरिभावेनाधिष्ठि.
तपरमशिव ते — तव, तत् — ब्रह्मपदवाच्यलिंगस्यं शरीरं,
पवित्रं — उक्तरीत्या शुच्यशुचिकालेऽपि धर्तुं योग्यं, विततं —
इष्टादिभेदेन भक्तशरीरादिभेदेन वा बहुविधं, प्रभुः — निग्रहा
नुग्रहसमर्थस्त्वं, विश्वतः — समस्तानि ( सार्वविभक्तिकस्तसिल्)
गात्रणि — भक्तशरीराणि, पर्येषि — व्याप्नोषि, धार्यमाणस्मन्
लिंगरूपशरीरद्वारा भक्ताङ्गसंयुक्तोऽसीत्यर्थः। अतप्ततनूः —
तप्ता वेधा – मनु — क्रियादीक्षात्रयेण निर्दग्धपापपंजरा तनूर्यस्य
सा न भवतीत्यतप्ततनूः दीक्षात्रयरहितः आमः — अपरि-
पक्वान्तःसन् तत् — परशिवस्वरूपं नाश्नुते"।

(लिंगधारणचंद्रिका, पान १२५ व १२६)

या वेद मंत्राचा अभिप्राय लिंग पुराणांत उत्तर भागाच्या २१व्या अध्यायात पूर्णपणे स्पष्ट केला आहे. कांची पूरचे आष्टादशपुराणोद्धारक पूव्वाड वेंकटराव यांनी हे पुराण १८७९ इ. स. मध्ये छापले आहे. त्यातील खालील श्लोक मननीय आहेत.

ब्रह्मेति लिंगमाख्यातं ब्रह्मणः पतिरीश्वरः ॥ ९८ ॥
पवित्रं तद्धि विख्यातं तत्संपर्कात्तनुः शुचिः ।
ऋगित्याह पवित्रं विततं ब्रह्मणस्पते ॥ ९९ ॥
तस्मात्पवित्रं तील्लडं. धार्यं शैवमनामयम् ।
अतप्ततनुरज्ञो वै ह्यघी संसारलक्षेणः ॥ १०० ॥
दीक्षया रहितः साक्षान्नाप्नुयाल्लिंगमुत्तमम् ।
यः करोति तपः पूर्वं स तप्ततनुरूच्यते ॥ १०१ ॥
परिपक्वो विमोक्षाय सोऽश्नुते लिंगधारणम् ।
न करोति तपः पूर्वं सोऽतप्ततनुरूच्यते ॥ १२० ॥

(लिंगपुराण, उत्तर भाग, अध्याय २१)

अर्थ :– लिंग म्हणजेच परब्रह्म ते पवित्र असून त्याच्या धारणानें

शरीर पवित्र होते. "पवित्र ते विततं, ब्रह्मणस्पते" अशी ऋग्वेदांत ऋचा आहे. म्हणून पवित्र असे ते लिंग धारण कराते. वेधा, मनु, क्रियारूप दीक्षेने ज्याची तनू (शरीर) तप्त झालेली नाही, तो अज्ञ व पापी होय, आणि ते संसारीपणाचे लक्षण होय, त्याला लिंग प्राप्त होणार नाही. ज्याने दिक्षा घेऊन पूर्वी तपाचरण केलेले असते तो तप्त तनू होय, आणि जो असे तप करित नाही तो अतप्त तनू होय. परिपक्व अंतःकरण झालेला मुक्तीसाठी लिंगधारण करतो. असे लिंगपुराणांत आहे.

॥ ऋग्वेद ॥

अयं मे हस्तो भगवानयं मे भगवत्तरः ।
अयं मे विश्वमेषजोऽयं शिवाभिमर्शनः ॥
अयं माता अयं पिता अयं जीवातुरागमात् ।
इदं तव प्रसर्पणं सुबन्धवेहि निरिहि ॥

(अष्टक ८, अध्याय १, वर्ग २५)

हा ऋग्वेदातील मंत्र तरी केवळ लिंग धारण परच आहे. लिंग धारण चंद्रिका ग्रंथात या मंत्राचा अर्थ विस्तृतपणे दिला आम. विख्यात षड्शास्त्र पारंगत काशीक्षेत्रनिवासी के. गहामहोपाध्याय, श्री. शिवकुमार मिश्र यांनी वरील ग्रंथाला संस्कृत टिका लिहून लिंगधारणेचे सनातनत्व सिद्ध केले आहे. हा ग्रंथ इ. स. १९०५ मध्ये काशी क्षेत्रातिल विश्वाराध्यपीठाच्या जगदगुरुनी छापून प्रसिद्ध केला आहे. त्याची टीका खालील प्रणाणे आहे.

अयं भगवान् – लिंगरूपसदाशिवः, मे हस्तः – मम हस्तगत इत्यर्थः ।
अयमेव सदाशिवः, मे भगवत्तरः – मम सर्वैश्वर्यवत्तरः ।
अयं मे विश्वभेषजः – विश्वेषां रोगाणां निवर्तकौषधस्वरूपः ।
अयं शिवाभिमर्शनः – सर्वेषां कल्याणानां प्रापकः ।
अयं माता – मातृवत् वात्सल्यवान् । अयं पितृवद्रक्षकः ।
"अयं जीवातुः जीवतासाधनभूतः । हे सुबंधो – निरुपाधिकविश्वसुहृत् ।
एहि – आगच्छ । इदं – मद्धस्तगत लिंगं, तव प्रसर्पणं

विहारस्थानम् ।

निरिहि – निर्गमचेष्टारहितस्सन् अस्मिन् शिवलिंगे तिष्ठेत्यर्थः ।"

( लिंगधारण चंद्रिका पान १५६ )

अर्थ : लिंगरूपी हा परशिव माझ्या हातात आहे. हातांत असलेले लिंगच मला सकलैश्वर्यस्वरूप आहे. माझे सर्व रोग हरण करणारे हेच दिव्य औषध आहे. हे इष्टलिंग माझे सर्व प्रकारचे कल्याण करील. पित्याप्रमाणे रक्षण करील, माझ्या जीवाचे साधन होऊन प्राप्त झाले आहे. हे विश्वबंधो ये, तुला हे विहार करण्यासाठी असलेले लिंग सोडून जाऊ नकोस.

**४६. यजुर्वेदांमत लिंग धारणा.**

या ते रूद्र शिवा तनूरघोराऽपापकाशिनी ।
तया नस्तनुवा शन्तमया गिरिशन्ताभिचाकशीहि ॥

(तैत्तरीय संहिता – कांड ४. प्रपाठक ५ अनुवाक १०)

या मंत्रात तर लिंग धारणाचे स्पष्टपणे सांगितलेले आहे. हाच मंत्र भगवत्पाद रेणुगाचार्यांनी सिद्धांत शिखामणितील लिंगधारणस्थलांत :

अघोराऽपापकाशीति या ते रूद्र शिवा तनूः ।
यजुषा गीयते यस्यात्तस्माच्छेवोऽघवर्जितः ॥ ६२ ॥
शिद्धांत शिखामणि ॥

अशी आज्ञा करून लिंग धारणाचा उपदेश केला आहे. यजुर्वेदातील श्री. रुद्राध्यायांना कानडीत मनोहर टिका लिहिलेले श्री रेवणाराध्य खालील प्रमाणे वरील मंत्राचे विवरण करतात :–

भोरुद्र – हे परमेश्वरा ते – तुझी, अपापकाशिनी – काया – वाचा – मेनें करून होणारी पापे प्रकट होऊ न देता नाश करणारी, अघोरा – शांत, यातनूः – जी तनु म्हणजे " लिंगंतु शियोर्देहस्ताभ्यां यस्मादधिष्ठित।, या वायवीय संहितेतील वचनाप्रमाणे इष्टप्राणलिंगरूपीतेह, शिवा–मंगलकारक, शांतमया भक्तांना महाभोग मोक्षरूपी सुख देणारी, तया तनुवा या इष्टप्राणलिगरूपी देहाने, भो गिरिशन्त – वाग्जप्रणवपीठांतून व अनाहत प्रणवपीठातून व अनाहत प्रणवपीठातूनही निरतिशय सुख पसरविणाऱ्या परमेश्वरा त्वम् – तू. नः " इष्टमूर्जं तपसानुयच्छेत प्राणैश्वसमनसा लिंगमाहुः " या अथर्वशिरो-

मंत्राप्रमाणे किंवा "इष्टलिंग प्राणलिंगमेकीकृत्यार्चनं परम्" या वातुलोत्तरतंत्रमंत्रा प्रमाणे देशिकोपदेशानें शिक्षित झालेल्या आमच्या करकमलांत, हृदयकमलांत अभिचाकशीही – अभीमुख होऊन प्रकाश पाव" या प्रमाणे ह्या मंत्राचा अर्थ केला आहे.

–: यजुर्वेदांत :–

निधनपनये नमः – निधनपतान्तिकाय नमः। अर्ध्वायनमः – अर्ध्वलिंगाय नमः। हिरण्याय नमः – हिरण्यलिंगाय नमः। सुवर्णाय नमः – सुवर्णालिंगाय नमः। दिव्याय नमः दिव्यलिंगाय नमः। भवाय नमः – भवलिंगाय नमः। शर्वाय नमः – शर्वलिंगाय नमः। शिवाय नमः – शिवलिंगाय नमः। ज्वलाय नमः – ज्वललिङ्गव्य नमः। आत्माय नमः – आत्मलिंगाय नमः। परमायः – परमलिंगाय नमः। एतत्सोमस्य सूर्यस्य सर्वलिंग स्थापयति पाणिमन्त्रा पवित्रम्। या मंत्रात लिंगधारण फारच उत्तम सांगितले आहे.

"सूर्यस्य सूर्यमण्डलान्तर्वर्ती सोमस्य – परशिवाचे, पवित्रं – परम पवित्र, सर्वलिंगं – वर वर्णिलेले दशविधलिंग, एतत्पाणिमंत्रं – या करतलावर विराजित असलेले लिंग, स्थापयति – श्रीगुरु शिवदीक्षेचे वेळी स्थापन करतात." असा वरील मंत्राचा भावार्थ आहे. हा अर्थ लिंगधारणाचंद्रिकेचे लेखक श्री. भवानीशंकराराध्य यांनी आपल्या ग्रंथातून लिहिले आहे.

यजुरप्याह सर्वं वै लिंङ्ग स्थापयतीति च ॥ १०३ ॥
तस्माद्धार्यं महालिंङ्ग पाणिमन्त्रेति मन्त्रतः।
पाणौ लिंङ्ग विनिक्षिप्य दीक्षाकाले गुरुः शिवम् ॥ १०४ ॥
येन स्तुवति तन्मन्त्रंपाणिमन्त्रं वदन्ति हि।
पवित्रत्वान्महेशस्य शिवस्य प्रतिपादनात् ॥ १०५ ॥
पवित्रकरणात्पुंसां पवित्रमिति कथ्यते।
अतः सर्वेषु कालेषु धारयेल्लिंगमुत्तमम् ॥ १०६ ॥
गच्छंस्तिष्ठन् स्वपन् जाग्रदुन्मिषन्निमिषन्नपि।
शुचिर्वाप्यशुचिर्वापि लिङ्गं सर्वत्र धारयेत् ॥ १०७ ॥
लिंगधारी सदा शुचौ निर्जलिङ्ग मनोहरम्।

अर्चयन् गन्धपुष्पाद्यैः करपीठे समाहितः ॥ १०८ ॥

(लिंगपुराण उत्तरभाग, अध्याय २१)

सर्वलिंग स्थापयति :- हा यजुर्वेदांतील मंत्र गलिधारणाचा बोध करीत असल्यामुळे शिवलिंगाचे धारण करावे. पाणिमंत्र म्हणजे दीक्षासमयी गुरु शिवलिंग करतलांत ठेऊन याचे रहस्य सांगतात, म्हणून हा पाणिमंत्र म्हणवितो. हा पवित्र शिवतत्वाचे प्रतिपादन करितो, म्हणून पवित्र म्हणवितो, यास्तव जाताना बसताना, जागृतीत, सुषुप्तीत, डोळे उघडताना किंवा झाकताना, शुचिअवस्थेत व असुचिअवस्थेत, सर्वकाळी मोक्षेच्छूंनी लिंग धारण करावे, इष्टलिंग करपीठावर ठेऊन गंधपुष्पादिकांनी त्याचे पूजन करणारा लिंगधारी सदाशुद्ध होय असा श्लोकांचा भावार्थ आहे.

-: यजुर्वेदांत :-

यश्छन्दसां वृषभो विश्वरूपः। इन्दोभ्भोऽध्यमृतात् संबभूव।
अमृतस्य देवधारणो भूयासम्। शरीरं मेविचर्षणं।
जीव्हा मे मधुमत्तमा। कर्णाभ्यां भूरिविश्रुवं।
ब्रह्मणः कोशोऽसि मेंधया पिहितः। श्रुतं में गोपाय ॥

(तैक्तिरीयं प्रथमवल्ली, अनुवाक ४)

या मंत्रावर कै. शिवकुमारमिश्र पंडित यांनी लिंगधारणचंद्रिकेतील टीकेत लिंगधारणपर अर्थ दिला आहे. (पान १०६ व १०७) नंदिकेश्वर शिवाचार्यांनी हा मंत्र केवळ लिंग धारण परच आहे असे सिद्ध करून सांगितले आहे.

-: यजुर्वेदात :-

नमो ब्रह्मणे धारणं मे अस्त्वनिराकरणम्।
धारयिता भूयास कर्णयोः श्रुतं माच्योढ्वं ममामुष्य ॐ ॥

हा मंत्र ही केवळ लिंगधारण सांगत आहे. लिंगधारणावर अशी हजारो श्रुतिवचने वरील प्रमाणे दाखवून देता येतील. या विषयाचे बाबतीत श्री. शिवपूजा शिवलिंगस्वामी नावाच्या प्राचिन दिग्जयी पंडितांनी श्रुतिसारभाष्य नावाचा एक महान ग्रंथ लिहिलेला आहे तो छापून तयार आहे. हा ग्रंथ वाचून लिंग धारणाची श्रेष्ठता व सनातनाता पूर्णपणे समजून घ्यावी.

येथपर्यंत लिंगधारणाची वेदोक्तता सिद्ध झाली आहे. आता उपनिषदाचे आधार लिंग धारणे विषयी पाहू.

४८. —: वेदान्तारोपनिषदांत :—

अथाश्वलायनो भगवन्तं परमेष्ठिनं परिसमेत्योवाच विमुक्त सद्योमुक्तिकरं ब्रूहीति। सहोवाच याज्ञवल्क्यः, परमेष्ठी शिवोऽद्वैतश्च तुर्थः शान्तः स एव ध्येयः स एव पूज्यः। तथ्यानपुजनादविमुक्ता भगन्त्ययं विशेषोऽस्त्याश्रमिणः। साक्षाद्मृता भूत्वा मोक्षी भवति। न कर्मणा न प्रजया धनेन शिवं प्रपूज्य अमृतत्वमान्पुयुः। परेणशुद्धे हृदयाब्जमध्ये लिंगं धृत्वा ज्योतिषि संविशन्ति॥ अत्याश्रमस्थाः परिमुच्यन्ति धीरास्तेषां सुखशाश्वतं नेतेरेषाम्। लिंगस्वरुपं धृतलिंगभावमंतर्बहिः स्वस्य च सामरस्यम्। ज्ञात्वा देवं शुद्धभावैरुपास्यमुपास्य धीराः परिमुच्यंति पाशात्॥ तदेवाग्निश्च तद्वातस्तत्सूर्यस्तदु चन्द्रमाः तदेव शुक्रस्सर्वे च बृहस्पतिमुखामराः॥ प्राप्योपास्य शिवं सांब ब्रह्म स्वहृदयांबुजे लिंगांगसामरस्याच्च शरीरे लिंगधारणाम् नियमेनैव कृत्वा ते मुक्ताः संसारसागरात्। वेदान्तसारसर्वस्वमनेनैव वशीकृतम्॥

४९. —: भक्तियोगोपनिषदात :—

अथ परशिवलिंगांगसामरस्यभक्तियोगं व्याख्यास्यामः। बहुजन्मान्तरेषु योगसिद्धानां परमशिवलिंगांगसामरस्यविविदिषूणामिन्द्रियव्यवस्था सर्ववेदांतसिद्धा। जन्मान्तरसंस्कृतानामेव तदधिकारात्र भक्तियोगः। शिवः प्राणः शिवभक्तस्य सेवा शिवप्रसंगे मीतरस्य सर्वदा। शिवप्रसादस्य धृतिर्निरंतरं शिवादन्य दैवविचिंतनं नः शैवमंत्रादपरोऽस्तिमंत्रो भस्मस्नानं नित्यतृप्तिहृदन्तः। रुद्राक्षाणां धारणं रुद्रमंत्रः प्रकीर्तनीयश्चगुरौ प्रणामः॥

५०. निर्लेपोपनिषदांतः

भस्मलेपः सर्वगात्रेषु नित्यं रुद्रक्षाण्द्र धारणं लिंगपूजा।
पंचाक्षर्याश्च जपश्चित्तवृत्या रुद्राध्यायः पंचकृतां न चान्यत्॥
लिंग सत्यं निष्कलं ब्रह्मरूपं धार्यं पूज्यं हृदये ज्योतिराद्यम्।
सत्तामात्रं वाङ्मनोऽतीतमेतत्पंचात्मक भासते येन मुक्तः॥

५१. चिदंबरोपनिषदांत



शिवेभक्तिर्जायते पुण्यशेषात् भक्तिर्मूलं सर्वसंसारमुक्तेः।

गुरुपदेशाद्विदितात्म तत्वाः शिवस्वरूपं प्रभजंति संतः ॥
तत्साधनानीह बहूनी संति तत्राद्यः स्मान्मंत्रराजः पुराणः ॥
पंचाक्षरः सर्वदेवर्षिसेव्यः तस्मि श्यैतज्जगदास्ते विलीनं ॥
अन्तर्लिंग ज्योतिषा संविभातं बाह्य लिंग हृदये सन्निविष्टम् ॥
शंभुः साक्षादद्वाद्यात्मा स एव रहस्यमेतन्न विदन्ति लोकः ॥

५२ सिद्धांत शिखोदनिषद

सद्योजाताद्ब्रह्मणाः संबभुवुः वामदेवात् क्षत्रिया विशाश्वाः घोराच्छुद्रा—स्तत्पुरुषात् शिवस्य पंचात्मकस्य गणा ईशानतः अत्याश्रमित्वाग्दणावंशजानां लिंगांगसंगिनां तत्रास्युः ! जन्मान्त-दीक्षा । यथा गंगा शिवसंगात्तथैव न सूतकं नाप्यशुचित्वमेषाम् ॥ गच्छस्तिष्ठान्निमिषन्नुन्मिषन्वा स्वयन् जाग्रन लिंगधारी शुचिः स्यात् । भूंजन् मूत्राद्युत्सृजन्वा कदाचिन्न तत्रोच्छिषं भजते शुद्ध-देही ।। शीर्षे कंठे वक्षसि कक्षदेशे हस्ते सर्वदा प्राणलिंग धार्यम् यथा संप्रदायं पुरस्ताद्गुरोर्विविदित्वा हृदयं मुख्यमुक्तम् ।।

५२. लिंगधारणोपनिषदांतः

चतुर्वर्णाना धारणां कुर्यात् । पशुपक्षिमृगकीटकानां लिंगधारण-मुच्यते । पिण्डाज्जननं तज्जननकाले धारणमुच्यते । सर्वलिंग स्थापयति पाणिमंत्र पवित्रां अं मे हस्तो भगवानिर्ति धारयेव । श्रौता श्रौतेषु धारणम् । वेदोक्तविधिना श्रौतम् । श्रुतरहितमश्रौतम कैवल्यसिद्धिर्भवति ।।

५४ प्रसादजाबालोपनिषदांत

रुद्रभूक्तं मुंजीत रुद्रपीतं पीबेद्रुघ्रातं जिघ्रेत् ।
यद्यद्वस्तु समर्पितं लैंगं तत्तदेव भुग्जीत ।।

५५ वीरलैंगोपनिषदांत

आत्मलिंगे यो धत्ते सोऽहमेव । तद्धीहि । द्विविधां लिंग इष्टं प्राणं च । यदक्षरं परं ब्रह्म तत्सूत्रमिति धारयेत् । धारणादस्य सूत्रस्य नोच्छिष्ठं नाशुचिभवेत् ।। प्राणलिंगम शिष्याय न दातव्यं कदाचन । अलिंगानामसायुज्यमलिंगानाम दर्शनम् । चतुवर्णानां लिंग मनुते । स पातकेभ्याः पूतो भवति

रुद्रमंत्रजापी भवति। स मुक्तो भवति। वेदागमसंप्रदायमाहेश्वर तत्वनिर्पंचाचार्येभ्यो दीक्षितो लिंगस्पर्शनः स एवाहम् ॥

वर दिलेल्या उपनिषदातील वचनातून लिंगधारण लिंगांग सामरस्य, लिंगधारण हेच मोक्षसाधन, वीरशैव मतसंस्थापक पंचाचार्यांच्या शिकवणीपासून ब्रह्मज्ञानप्राप्ति प्रसाद, भस्मलेपन, रुद्राक्षधारण मंत्र, शिवसर्वोत्तमत्व वगैरे वीरशैव वीरशैवसिद्धांताचेच श्वास विपय आलेले आहेत, वीरशैवमत याप्रमाणे उपनिषदातूनही वर्णिलेले आहेः

हे रहस्य न ओळखता काही विवेकशून्य मूर्ख लोक वेदातून वीरशैव सिद्धांत सांगितलेला नाही म्हणतात. वेदादि ग्रंथाचे अवलोकन न केलेले वैदिक नसलेले तेच लोक वीरशैव सिद्धांत वेदात नाही म्हणतात. आमम निगमादि पुराणउपनिषदादि पाहाणारे वेदिक असलेले विव्दान लोक असे कधींही म्हणणार नाहीत

वर उल्लेखीलेल्या उपनिषदा शिवाय पुष्कळ उपनिषदांत शैव — वीरशैव सिद्धांत आहेत, विस्तार भयास्तव लिहिणे शक्य नाही. आता आगमदि ग्रंथातून वीरशैवमता विषयी विचार करू.

५६. —ः सूक्ष्मागमांत :—

एककालं व्दिकालं वा त्रिकालंवापि शांकरि ।
पजयेन्नियतं लिंगं प्राणलिंगपरायणः ॥ ६१ ॥
एवं यः कुरुते भक्त्या प्राणलिंगार्चनं सदा ।
वीरशैवः व विज्ञेयः सर्वशैवोत्तमोत्तमः ॥ ६२ ॥

(सूक्ष्मागम. पटल ६)

तल्लिग स्थापयेच्छिष्ये सम्यग्घ्यात्वैकभावतः ।
घ्यात्वे शिष्याय तल्लिगं धारयित्वा निरूपयेत ॥ ४८ ॥
वीरमाहेश्वराचारनिष्ठा परमदुर्लभा ।
दत्तं लिगमिदं वत्स न कदाचिद्वियोजय ॥ ४९ ॥

(वूक्ष्मागम पटल ५)

५७ वातुलागमांत

मूर्ध्नि कंठें भुजे हस्ते हृत्स्थले नाभिमंडले ।
एतेषामेकदेशे तु धारयेच्छिवलिंगकम् ॥ ३२ ॥

(वातुलागम. पटल १०)

५८. पारमेश्वरागमांत

न वीरशैवसदृषं मतमस्ति जगत्त्रये ।
सर्वभोगप्रदं पुण्यं शिवसायुज्यदायकम् ।। ४२ ।।
यस्य भस्म ललाटेऽस्ति कंठे लिंग मदात्मकम् ।
रुद्राक्षधारणं देहे सोऽहं न संशयः ।। ४८ ।।

(पमेश्वरागम, पटल १)

या प्रमाणे सर्व शिवागमातून लिंग धारणादि वीरशैव मत विषयक वरेच विस्तारानें प्रतिपादिले आहे. वीरशैवांचे धर्म कृत्यादि विषय - शिवागमातून जसे वर्णलेले आहेत तसे इतर कोणत्याही ग्रंथातून नाहीत कारण शिवागम हेच वीर शैवांचे मुख्य धर्मग्रंथ आहेत. हे ग्रंथ चालू कालांत दुर्मिळ आहेत. कारण वीरशैव समाजाने आपल्या धर्म ग्रथाकडे दुर्लक्ष केले आहे. हिंदू धर्मियांनी वैदिक धर्मतत्वे सोडून अनेक धर्म व पंथ निर्माण केले तसेच ग्रंथ संपत्तिही विपूल निर्माण केल्यामुळे हिंदू धर्मात वैदिक धर्म नष्टप्राय झाल आहे. असेच वीरशैव धर्मात विपरीत घडू नये. आपली धर्मतत्वे गुप्त असावे असे त्यांना वाटले असेल, परंतु त्याचा परिणाम मात्र विपरीत झाला आहे. प्राचीन काळात हस्तलिखित वीरशैवांचे धर्मग्रंथ आगम मद्रास तंजावर, म्हैसूर, नेपाळ, लंडन, जर्मन, बर्लिन अशा मोठमोठचा सरकारी ग्रंथालयात आहेत असे संशोधक लोक म्हणतात. तसेच वीरशैवरत्न ग्रंथात लिहिले आहे.

आता पुराणातुन हा विषय कसा काय प्रतिपादिला आहे ते पाहू जगत्‌विख्यात व्यास महर्षिनी एका शिवपुराणाचे दहा भाग केलेल्या पुराणात शैव, वीरशैव मत फारच विस्तार पूर्वक लिहिलेले आहे. असे असून कांही लोक म्हणतात की वीरशैव मत पुराणातून वर्णिलेले नाही असे म्हणणाऱ्यांनी सर्व शैव पुराणे वाचले नाहीत. किंवा ते भ्रीमिष्ट झाले आहेत. असे म्हणावे लागेल.

शैवादि पुराणासह सर्व पुराणे मुंबई, पुणे, कलकत्ता, कांची वगैरे शहरात, छापलेली आहेत. त्यापैकी कांही ठिकाणी वीरशैवमत विषय छापतांना वगळण्यात आले आहे. याला कारण वीरशैवमता विषयी द्वेष असावा. तथापि कांही निःपक्षपाति लोकांनी पुराणे जशीच्या तशीच छापली आहेत. त्यांना सर्वांनी खरोखरच धन्यवाद दिले पाहिजेत.

कलकत्यातील अरूणोदयराय नांवाच्या गृहस्थानी इ. स. १८९० साली वंग वासी छापखान्यात शिवपुराण छापले आहे. या पुराणाच्या प्रत्येक संहितेत वीरशैवमत छापले आहे तें आगम निमादि ग्रंथाधारे आहे, तेच खाली लिहित आहे.

५९. शिवपुराण वायवीय संहितेत

पुरतः कल्पिते वाऽथ मंडले वर्ज्ञमंडिते ।
स्थापयेत् पंचकलशान् दिक्षु मध्ये च देशिकः ।। १६ ।।
तेषु ब्रह्माणि मूलार्णैर्बिन्दुनादसमन्वितैः ।
नमाद्यैश्च यकारान्तैः कल्पयेत् कल्पवित्तमः ।। १७ ।।
(वा. सं. उत्तर भाग, अध्याय १५)

श्री. गुरुनी रांगोळी घातलेल्या वेदिकेवर पंचकलश स्थापून त्यामध्ये नकार, मकार, शिकार, वाकार व यकार ही पंचबीजाक्षरे लिहावीत असा वरील श्लोकांचा भावार्थ आहे. दीक्षा विवाहादि सर्व मंगलकार्यामध्ये पंचकलशाची स्थापना वीरशैवात करतात. हे सर्वांना माहितच आहे.

हन्त ते कथयिष्यामि सर्वपापविशोधनम् ।
संस्कारं परमं पुण्यं शिवेन परिभाषितम् ।। ३ ।।
सम्यक्कृताधिकारः स्यात् पूजादिषु नरो यतः ।
संस्कारः कथ्यते तेन षडध्वपरिशोधनम् ।। ४ ।।
दीयते येन विज्ञानं क्षयिते पाशबन्धनम् ।
तस्मात् संस्कार एवायं दीक्षेत्यपि च कथ्यते ।। ५ ।।
शूद्राणामन्त्यजातीनां पतितीनां विशेषतः ।
तथा संकरजातीनां नाध्वशुद्धिर्विधीयते ।। ६७ ।।
तेऽप्यकृत्रिमभावाश्चेच्छिवे परमकारणे ।
पादोदकप्रदानाद्यैः कुर्युः पाशविशोधनम् ।। ६८ ।।
(शि. पु. वा. स. उत्तर भाग, अध्याय १३)

सर्वपाशनाशक, शिवोक्त असा संस्कार तुला सांगतो, म्हणून उपमन्यू श्रीकृष्णाला म्हणतात. पूजादिकार्यासाठी मनुष्य अधिकारी झाला म्हणजे "षडध्वशुद्धिसंस्कार" करावा; जो संस्कार ज्ञानानुग्रह करतो, पाशबंधांचा क्षय करतो; त्यालाच दिक्षा म्हणावे. शूद्र, अत्यज

पतित संकरोत्पन्न जातींना "षडध्वशुद्धि संस्कार" विहित नाही. शिवावर त्यांची असाधारण भक्ति असेल तर त्यांना पदोदकादि देऊन त्यांचे पाशविशोधन करावे. असा वरील श्लोकचा भावार्थ आहे. हेच वरील श्लोक श्री नीलकंठ शिवाचार्यांनी आपल्या "क्रियासार" नांवाच्या ग्रंथात सविस्तर उल्लेखीले आहे.

सर्वमंत्राधिकश्चायमोंअकाराद्यः षडक्षरः।
सर्वेषां शिवभक्तानामशेषार्थप्रसाधकः ॥ ४ ॥
(वा. सं उत्तर भाग, अध्याय १२)

सर्व मंत्रांत श्रेष्ठ "षडक्षरमंत्र" शिवभक्तांना सकल इष्टार्थप्रदायक आहे असे वरील श्लोकांत म्हटले आहे.

शिवपुराण विषेश्वरसंहितेत

शिवभक्तो वसेन्नित्यं शिवलिंग समाश्रितः।
स्थाणुलिंगाश्रयेणैव स्थाणुर्भवति भूसुराः ॥ १५९ ॥
पूजया चरलिंगस्य क्रमान्मुक्तो भवेद्ध्रुवम् ॥ १६० ॥

शिवभक्ताने नेहमी शिवलिंग धारण करावे, सदैव शिवलिंग धारण करून राहिल्यामुळे तो प्रत्यक्ष शिव होतो. चरलिंगाची (जंगममूर्तीची) पूजा केल्याने तो खात्रीने मुक्त होईल. असे वरील श्लोकांत म्हटले आहे.

गुरुपूजैव पूजा स्याच्छिवस्य परमात्मनः।
गुरुशेषां तु यत्सर्वमात्मशुद्धिकरं भवेत् ॥९५॥
गुरोः शेषां शिवोच्छिष्टं जलमन्नादिनिर्मितम्।
शिष्याणां शिवभक्तानां ग्राह्यं भोज्यं भवेद्द्विजाः ॥९६॥
(शि. पु. विद्येश्वरसंहिता, अध्यातां, १६)

गुरुची पूजा तीच शिवाची पूजा, गुरुचा प्रसाद आत्मशुद्धिकारक होय, अन्न जलरूप गुरुप्रसाद व शिवप्रसादच शिवभक्त शिष्यांनी सेवन करावा असे वरीलश्लोकांत म्हटले आहे. हा वीरशैव मतातील गुरुप्रसाद महिमा आहे.

दिवा वा यदि वा रात्रौ नारी वाऽथ नरोऽथवा।
पूजार्थं सजलं भस्म त्रिपुण्ड्रेणैव धारयेत् ॥७९॥
त्रिपुंड्र सजलं भस्म धृत्वा पूजां करोति यः।

शिवपूजाफलं सांगं तस्यैव हि सुनिश्चितम् ॥८०॥
भस्म वै शिवमंत्रेण धृत्वा ह्यात्याश्रमी भवेत् [
शिवाश्रमीति संप्रोक्तः शिवैकपरमो यतः ॥८१॥
(शि. पु. विद्येश्वर संहित अध्याय १३)

स्त्री व पुरुष या दोघांनी दिवसा व रात्री शिवपूजा करताना जल मिश्रित भस्म तीन बोटांनी तीन रेघा प्रमाणे सर्व देहावर धारण धारण करावे, जलमिश्रित भस्म धारण करून जो शिवपूजा करतो, त्याला यथासांग पूजाचे फल मिळते. शिवमंत्रोच्चार पूर्वक भस्मधारण करणारा अत्याश्रमी होतो. यालाच शिवाश्रमी म्हणतात. असा वरील श्लोकांचा अर्थ आहे. यात वीरशैव मत प्रणीत भस्मधारण माहात्म्य सांगितले आहे. एक्यांशीव्या श्लोकांत वर्णिलेला "अत्याश्रमी" व "शिवाश्रमी" वीरशैव वाचक पर्याय शब्द आहे. शिवागम व वीरशैव-मत ग्रंथातून वीरशैवाबद्दल "अत्याश्रमी व शिवाश्रमी" हे शब्द वारंवार योजिलेले आहेत.

यस्तु शुश्रूषणाद्यैश्च शिवभक्तस्य लिंगिनः।
आनंद जनयेद्विद्वान् शिवः प्रीततरो भवेत् ॥१४०॥
शि. पु. विद्येश्वरसंहिता अध्याय १५)

-लिंगधारी शिवभक्ताची सेवा वगैरे करुन सत्कार केल्यास परःशिव संतुष्ट होऊन असाधारण सुख देतो असे वरील श्लोकांत म्हटले आहे. यांत लिंगधरी शिवभक्ताचे श्रेष्ठत्व वर्णिले आहे.

सांगोपांगमिति प्रोक्तं शिवलिंगस्य पूजनम् ।
प्रवृत्तानां निवृत्तानां भेदतो द्विविधं द्विजाः ॥३२॥
प्रवृत्तानां पीठपूजा सर्वाभीष्टप्रदा भुवि ।
पात्रेणैव प्रवृत्तस्तु सर्वपूजां समाचरेत् ॥३३॥
नैवेद्यमभिषेकान्ते शाल्यन्नेन समाचरेत् ।
पूजान्ते स्थापयेल्लिंगं संपुटेच पृथग्गृहे ॥३४॥
करपूजानिवृत्तानां स्वभोज्यं तु निवेदयेत् ।
निवृत्तानां परं सूक्ष्मं लिंगमेव विशिष्यते ॥३५॥
विभूत्यभ्यर्चनं कुर्याद्विभूत्या च निवेदयेत् ।

पूजां कृत्वाऽथ तल्लिगं शिरसा धारयेत्सदा ॥३६॥
(विद्येश्वरसंहिता, अध्याय २२)

प्रवृत्ति व निवृत्तिमार्ग अशी शिवपूजा दोन प्रकारची आहे. प्रवृत्तिमार्गियांनी शिवलिंग बाह्य पीठावर स्थापून पूजावे व शाल्यन्नाचा नैवेद्य दाखवावा, पूजन समाप्त झाल्यावर ते शिवलिंग संवळीत ठेऊन देवघरात एकांत स्थळी नेऊन ठेवावे. निवृत्ति मार्गियांनी शिवलिंग करतलांत (तळहातात) घेऊन त्याचे पूजन करावे, आपल्या जेवणाचाच नैवेद्य दाखवावा. विभूतीने पुजून विभूतिनेच नैवेद्य दाखवावा. पूजा समाप्त झाल्यानंतर ते शिवलिंग सदैव मस्तकावर धारण करावे. असा वरील श्लोकाचा अभिप्राय आहे. करतलावर शिवलिंग स्थापून पूजा करणारे निवृत्ति मार्गीय व शिवलिंग मस्तकावर धारण करणारे लोक वीरशैवाशिवाय दुसरे कोणीही नाहीत. हे सर्वांना माहित आहेत. शिवगमात वीरशैवांना निवृत्तिमार्गशील म्हणून संबोधिलेले आहे.

**६०. स्कंदपुराणांत लिंगधारण.**

येथपर्यंत कलकत्यात छापलेल्या शिवपुराणाच्या आधाराने वीर शैवमत विषय सांगितला. आता मुंबईतील श्री. वैष्णवमतानुयायी म. रा. खेमराज श्रीकृष्णदास यांनी छापलेल्या व्यासोक्त पुराणातून वीरशैवमत कसे प्रतिपादिलेले आहे ते पाहू.

यथोक्ताः शिवधर्मा हि नन्दिना परिकीर्तिताः ॥ ४० ॥
शैलादेन महाभागा विचित्रा लिङ्गधारकाः ।
देहेस्योपरे लिंगं तु धार्यते हि पुरातनेः ॥ ४१ ॥
लिंगेन सह पंचत्वं लिंगेन सह जीवितम् ।
एते धर्माः सुप्रतिष्ठाः शैलादेन महात्मना ॥ ४२ ॥
(स्कन्दपुराण, केदारखंड अध्याय ७)

शिवधर्मयुक्त लिंगधारी अद्भूत चरित्राचे होत, सर्वोत्कृष्ट होत. लिंगधारी आपल्या देहावर लिंगधारण करतात. शिवलिंगासह आयुष्य काढतात व शिवलिंगासह ऐक्य पावतात हा शिवधर्म महात्मा नंदिश्वराने सांगितला आहे. असा वरील श्लोकाचा भावार्थ आहे.

इंद्रनीलमयं लिंग विष्णुः पूज्यते सदा ॥ २१ ॥
ब्रह्मा मणिमयं लिंगपूज्यस्यनिशां शुभम् ।

इंद्रो रत्नमयं लिंग चंद्रो मुक्तामयं तथा ।। २२ ।।
भानुस्ताम्रमयं लिंग पूज्यत्यनिशां शुभम् ।
रौक्मं लिंग कुबेरश्च पाशी चालक्तमेव च :। १३ ।।
यमो नीलमयं लिंग राजतं नैर्ऋतस्तथा ।
काश्मीरं पवनो लिंगमर्चयत्यनिशां विभो: ।। २४ ।।
एवं ते लिंगिता: सर्वे लोकयाला: सवासवा: ।
तथा सर्वेऽपि गंधर्वा: पाताले किन्नरै: सह ।। २५ ।।
( स्कं पु. केदारखंड अध्याय ७)

वैदिक व पौराणिकाचे देवसुद्धां लिंगधारण करतात. असे वरिल श्लोकांत म्हटले आहे. अर्थ सोपा आहे. विष्णू इंद्रनीलमण्याच्या, ब्रह्मदेव मौल्यावान लालमण्याच्या, इंद्र रत्नाच्या, चंद्रमोत्याच्या, सूर्य तांब्याच्या, कुबेर सोन्याच्या, वरुण लाखेच्या नीलसण्याच्या, नैऋते चांदिच्या, वायु कुकुंमलिंगाचे, असे इंद्रादिलोकपाल, गंधर्व, किन्नर, सर्व देव लिंग शरीरावर धारण करतात.

: सकंदपुराण अरुणाचलमाहात्म्य खंडांत :
भगवान सर्वधर्मज्ञ गौतमार्य मुनीश्वर ।। ५३ ।।
मयाऽ न्यधर्मरूपेण कौंऽ प्यधर्म: प्रकल्पित: ।
देवानां रक्षणं कर्तुमभयं दातुमुद्यता ।। ५४ ।।
अजानन्महिषं दैत्यं शिवभक्तममर्दयम् ।
रजताक्रांतबुद्धीनां न भवेद्धर्मसंग्रह :।। ५५ ।।
गुरुप्रसादसुलभ: स्फुरद्विशताकुल: ।
सुदुर्धर्षा निराचारदुर्दमा: शिवसंश्रया: ।। ५६ ।।
विशेषतो लिंगधरा: शिवस्तान् बहुमन्यतें ।
पुरा पुरत्रयावासा दैतेया लिंगधारक: ।। ५७ ।।
अजिता: शंभुना पूर्वं मुक्तलिंगा विदूषिता: ।
अस्य कंठस्थितं लिंग मम पाणिं न मुंचति ।। ५८ ।।
(सकंदपुराण, अरूणाचलमाहात्म्यखंड अध्याय ११ )
पूर्वजन्मनि भक्तो यमरुणाद्रियते: स्फुटम् ।।
महिषत्वे सदाक्रांत: परं लिंगेन संगत: ।
भक्त्या पुरत्रये पूर्वं रुद्रेण विजितास्त्रय: ।

त्वत्खड्गपरिकृत्तेन कण्ठेनास्य वरानने ।। ८३ ।।
दीक्षादिरहितं लिंग दत्त हंतीति चोदितम् ।
कृतं हि येणापि भक्तितो लिंगधारणात् ।। ८५ ।।
पूर्वंजन्मतपोयोगात् स्मरणाल्लिगधारणात् ।
त्वत्पादपद्म संस्पर्शादयं मुक्तो न संशयः ।। ८६ ।।

(स्कंदपुराण, अरुणाचलमाहात्म्यखंड, अध्याय ११)

वरील श्लोकांचा अर्थ देवीने लिंगधारी महिषासुराला मारल्यानंतर ती गौतम ऋषीना वरील प्रमाणे म्हणाली. मी अधर्म केला आहे. शिवभक्ताला मी मारले आहे. लिंगधारी मानव, राक्षस कोणिही असला तरी त्याला मारणे योग्य नाही. पूर्वी लिंगधारी त्रिपुरासुराला मारणे शंकरालाही कठीण गेले होते. विष्णुच्या मायेने त्याचे इष्टलिंग त्याच्यापासून दूर केल्यानंतरच त्याला मारता आले. महिषासुराच्या कंठात असलेले शिवलिंग मी हातात घेतल्यापासून ते माझ्या हातातून निघत नाहीं. तेव्हा गौतम ऋषी देवीला म्हणाले, हे देवी पूर्वजन्मी हा शिवभक्त होता. महिषाकार धारण करून तो मदोत्मत्त झाला. तरीपण तो लिंगधारी होता. या त्रिभुवनांत असाधारण भक्तिने लिंगधारण केलेल्याला मारण्यास कोणीही समर्थ नाही तुझ्या खड्गाने ज्याचे मुंडके कापले गेले त्यामहिषासुराच्या कंठातील लिंग दीक्षा विरहित होते. म्हणूनच महिषासुराचा नाश झाला आहे. दीक्षा संस्कार विरहित असले तरी असाधारण भक्तिने त्याने धारण केलेले होते. त्याने पूर्व जन्मी केलेल्या तपप्रभावामुळे शिव ध्नानामुळे व लिंग धारणामुळे त्याला तुझ्या चरण कमलांचा स्पर्श झाला. त्यामुळेच तो मुक्त झाला आहे या वरुन महिषासुर लिंगधारी होता. त्याने शिवदीक्षा विरहित लिंगधारण केल्यामुळे त्याचा घात झाला आहे. शिवदीक्षा पूर्वक लिंग धारण करणाऱ्याला जिंकण्यास त्रिभुवनात कोणीही समर्थ नाही असे सिद्ध होते. असा वरील श्लोकांत भावार्थ आहे.

"स्कंदपुराणांतर्गत शंकरसंहिता" मद्रास, मैसूर, सोलापूर वगैरे शहरी छापून प्रसिद्ध करण्यांत आली आहे. संहितेतील ८३ ते ८६ हे अध्याय केवळ वीरशैवमतप्रतिपादनानेच ओतप्रोत भरलेले आहेत. त्यातील अगदी थोडक्यात विचार करू.

–: स्कन्दपुराण शंकरसांहितामध्ये :–

यत्र माहेश्वरः कुर्याच्छिवलिंगार्चनं सकृत् ।
वसन्ति तत्र तिर्थानी सर्वाणि सततं गुहः ॥ ६५ ॥
वीरमाहेश्वरं मां च विभिन्नं प्रवदन्ति ये ।
ते मूढा एव मनुजा नात्र कार्या विचारण ॥ ६६ ॥

(सकंदपुराण, शंकरसंहिता, अध्याय ८१)

गुरु वंशोत्पन्न जंगम किंवा माहेश्वर ज्या जागी शिवलिंगार्चन करील, त्याठायी सकल तीर्थं अखंड वास करतात. शिव आणि वीर माहेश्वर यांच्यामध्ये जे भेद मानतील ते महामुर्ख आहेत असे सांगतात.

धारयेदवधानेन लिंग सद्गुरुणाऽर्पितम् ।
प्रमादात्पतिते लिंगे प्राणान्ऽपि परित्यजेत् ॥ ६७ ॥
पतिते प्राणलिंगे यो धत्ते प्राणान्नराधमः ।
स चंडाल इतिज्ञेयः शिवद्रोही न तं स्पृशेत् ॥ ६८ ॥

(स्कंदपुराण – शंकरसंहिता अध्याय ८३)

सद्गुरुने अनुग्रह करून दिलेले शिवलिंग देहावर सावधानपूर्वक धारण करावे. हे लिंग शरीरापासून वेगळे झाले तर प्राणहि सोडावेत. जो कोणी तसे करणार नाही तो नराधम चांडाल व शिवद्रोहीं होय. त्याला कोणी शिवूहि नये असा वरील श्कोकाचा भावार्थ आहे.

शिवलिंगांगसंबंध भाजां दर्शनमात्रता: ।
मुक्ति गच्छन्ति मनुजाः पशुपक्षिमृगादयः ॥ ८७ ॥
तेषां संरक्षणं यस्तु कुरुते मनुजोत्तमः ।
स धन्यः स कृताथः स्यात्स शिवऐक्यपदं व्रजेत् ॥ ८८ ॥
तस्मात्सर्वं परित्यज्य सर्वभावेन सर्वदा ।
पूजयेदादरेणैव व्दिजं लिंगांगसंगिनम् ॥ ८९ ॥

(संकदपुराण शंकरसंहिता, अध्याय ८३)

शिवलिंगांग संबंध युक्त वीरमाहेश्वरांचे दर्शन सुद्धा मानव, पशुपक्षी व कीटकादिकांना मुक्तिकारक आहे. अशांचे जो संरक्षण करतो तो धन्य होय व तो शिवपद खास प्राप्त करून घेईल. म्हणून इतर सर्व उपद्व्याप सोडून लिगांगी माहेश्वर ब्राह्मणांचे पूजन आदरानें सदैव करावे हा वरील श्लोकांचा अभिप्राय आहे.

उरस्थले हरिर्लिंगं धृत्वा शक्रपुरोगमाः ।
लिंगस्थं मां समाराध्य स्वं स्वं पदमवापिरे ।। ४३ ।।
लक्ष्मीसरस्वती मुख्या देव्यो मल्लिंगमादराद ।
धृत्वा निजांगे तल्लीनभावा जग्मु: परं सुखम् ।। ४४ ।।

(स्कंदपुराण, शंकरसंहिता, अध्याय ८४)

विष्णू, इंद्र वगैरे देव वक्षस्थलावर लिंग धारण करून लिंगस्थ अशा माझे पूजन करून आपापल्यापदवीप्रत पोहोचले. लक्ष्मी सरस्वती वगैरे देवता सुद्धा आपल्या देहावर शिवलिंग धारण करून व त्यांचे पूजन करून असाधारण असे सुख प्राप्त करून घेत्या झाल्या आहेत. असा वरील श्लोकांचा भावार्थ आहे.

तस्मिच्छ्रीपर्वते पुण्ये संसारामयभेषजे ।
अस्ति लिंगांगसंबंधी सदानंदाव्हयो मुनिः ।। ९१ ।।
सर्वोपनिषदर्थज्ञः शिवध्यानपरायणः ।
भस्मावलिप्तसर्वांगो रुद्राध्यायजपाश्रयः ।। ९२ ।।
रुद्राक्षमालाभरणो धृतपाशुपतव्रतः ।
अतिवर्णाश्रमी योगी जीवन्मुक्तो जगद्गुरुः ।। ९३ ।।
तं सदानंदनामानं शंकरध्यानलालसम् ।
निरस्वकुहकं विप्र सह पूत्रेण पूजय ।। ९४ ।।
तस्य प्रसादात्ते पुत्रो गच्छेन्नीरोगतां ध्रुवम् ।
तस्मादुत्तिष्ठ गच्छ त्वं श्रीपर्वतमतंद्रितः ।। ९५ ।।

(स्कंदपुराण, शंकरसंहिता, अध्याय ८५)

"भवरोगनिवारक परमपवित्र श्रीशैलक्षेत्री लिंगांगी, सर्वोपनिषदांचे मर्म जाणणारा, शिवध्यानमग्न, भस्मधारी, रुद्राक्षमालालंकृत, रुद्राध्यायजपासक्त, शिवव्रतस्थ, अतिवर्णाश्रमी, योगी, जीवमुक्त व जगद्गुरु असा सदानंद नावाचा एक यतिवर आहे. त्यांचे पूजन केल्यास त्याच्या अनुग्रहमात्रे करून तुझा मुलगा पिंगल रोगमुक्त होईल. म्हणून ताबडतोब तू श्रीशैलक्षेत्री जा" असे हरिप्रियानी श्वेताला सांगितल्याची कथा वरील श्लोकात आहे. हे श्लोक श्रीशैलक्षेत्री अनादि कालापासून प्रकाशित असलेल्या वीरशैव गुरुपीठाचे अधिपति श्रीजगद्गुरू सदानंद

शिवयोगी यांच्या बद्दल आहेत.

### ६१. :– पद्मपुराण पातालखंड :–

लिंगस्य स्थापनं पूजा उन्दसनमथैव च ।
धारणं शंकरस्यैव लिंगमेव महेश्वरम् ॥ १२१ ॥
सज्जिकं परमोऽत्कृष्टं स्वर्णेनैव विनिर्मितम् ।
राजतैर्वादिलैः कार्यं रोचते वैणवैस्तु यत् ॥ १२२ ॥
लतासूत्रैर थोवापि रचितं दारूणाऽथवा ।
वस्त्रेण वाऽथ रचितं मृदा विरचितं भवेत् ॥ १२३ ॥
तत्र संवेष्ठय वस्त्रेण सुगंधेन समन्विते ।
धौतववस्त्रयुगे शुद्धे मृव्दासनसमन्विते ॥ ११४ ॥
शीतोष्णरहिते पादचतुष्ठयसमन्विते ।
प्रावृतिच्छेदनोपेते क्रिमिकीटविवर्जिते ॥ १२५ ॥
धौतेन मृदुवस्त्रेण सर्वतो वेष्ठितं शिवम् ।
विन्यस्य सज्जिकामध्ये प्रावृत्य च पुनर्विभुम् ॥ १२६ ॥
एषा हि सज्जिका राम देवस्याग्रेति कीर्तिता ।
तस्य च स्थापनं पाठो. रहस्ये च महेशितुः ॥ १२७ ॥
अथवा भित्तिमूले स्यादेववेद्यामथापि वा ।
सुरक्षिते तथा देशे रक्षकं च नियोजयेत् ॥ १२८ ॥
धारणं मात्रसंस्पर्शमशेषदेहगोपनम् ॥ १३० ॥
मस्तके धारणं मुख्यं ब्रह्मणा च तथा कृतम् ।
विन्यस्य मकुटस्यान्ते धारणं शुभमुच्यते ॥ १३१ ॥
ललाटे धारणं शस्तं यथा लक्ष्म्या धृतं शुभम् ।
बाणेन च धृतं मूर्ध्नि दक्षिणोरसि वा पुनः ॥ १३२ ॥
कर्णे च हरकर्णेन मुनिना परमर्षिणा ।
विनिर्भिद्य तथा गात्रां लोहस्थानं प्रकल्प्य च ॥ १३३ ॥
धारयंति तथा लिंग राक्षसाः केचिदुत्तमाः ।
अनिकेतनमर्त्यानामशक्यानां शिरोधृतिः ॥ १३४ ॥
अधमाधममाख्यासं नीवीबंधादिधारणम् ।
तेषु तू[illegible] मस्तके धारणं भवेत् ॥ १३५ ॥

अधमाधमवृत्तीनां सदा वै लिंगधारणम् ।
पापिनामपि चाश्चर्यं यमलोको न विद्यते ॥ १३६ ॥

(पद-पुराण, पातालखंड, अध्याय १०)

श्रीशंकरानी श्रीरामचन्द्रांला उपदेशिलेले शिवलिंग धारणमाहात्म्य, व शिवलिंग ठवण्या करिता आवश्यक असलेले सज्जिकेचें स्वरुप वरील श्लोकांत वर्णिलेले आहे, विस्तार भयास्तव सविस्तर देता येत नाही, वरिल सर्व प्रकार वीरशैवांना माहित आहेत.

आता पुव्वाड व्यंकटराय यांनी कांचहि पट्टण गांवी इ. स. १८७९ साली छापलेल्या लिंग पुराणात वीरशैवमताचे वर्णन केलेले आहे ते पाहू.

६२. :– लिंगपुराणांमध्ये :–

दीयते लिंगतम्बन्धः क्षीयते व मलत्रयम् ।
दीयते क्षीयते यस्मात् सा दीक्षेति निगद्यते ॥ ८१ ॥
सा दीक्षा परमा शैवी त्रिधा भवति निर्मला ।
एका वेधात्मिका साक्षादन्या मंत्रात्मिका मता ।
क्रियात्मिका परा काचिदेवमेव त्रिधा भवेत् ॥ ८२ ॥
हस्तमस्तकसंयोगाव्देधेति परिगीयते ।
गुरुणोदीरिता कर्णे या सा मंत्रेति कथ्यते ।
शिष्यपाणितले दत्ता या दीक्षा सा क्रिया मता ॥ ८३ ॥
पाशानशेषान् कर्तर्या छित्वा लिंग समादिशेत् ।
कर्तरी शिवदीक्षा स्याद्यया पाशान छिनत्त्यसौ ॥ ८४ ॥
कृत्वा शैवी परां दीक्षां तत्वविद्यां शिवात्मिकाम् ।
छित्वाऽविद्यामहाकोशं कलाध्यानं विचिन्तयेत् ॥ ८५ ॥
यथा कला तथा भावो यथा भावस्तथा मनः ।
यथा मनस्तथा दृष्टिः यथा दृष्टिस्तथा स्थलम् ॥ ८६ ॥
या कला परमा सूक्ष्मा मंत्राणां बोधिनी परा ।
तामाकृष्य यथान्यायं लिंगे समुपवेशयेत् ॥ ८७ ॥
ततस्तालिङ्गमस्याङगे शिष्यस्यामिततेजसा ।
संयोजनीयं गुरुणा पूर्वोक्तेनैव वर्त्मना ॥ ८८ ॥
तनुमध्यगतानादिमलत्रयमसौ गुरुः ।

दीक्षात्रयेण निर्दग्ध्वा लिंगत्रितयमादिशेत् ॥ ८९ ॥
लिंगं तु त्रिविधं प्रोक्तं स्थूलं सूक्ष्मं तु कारणम् ।
धारयन्तो नराः स्थूलं कारणं संप्रयांति हि ॥ ९० ॥
कुर्यात्त्रिपुटिसन्धानं शिवसायुज्यकारणम् ।
वक्ष्ये त्रिपुटिसंधानलक्षणं शिवयोगिनाम् ॥ ९१ ॥
स्थूलस्य लिंगदेहस्य सूक्ष्मस्य मनसस्तथा ।
कारणस्यात्मनो नित्यं कुर्यादैक्यमतंद्रितः ॥ ९२ ॥
लिंगेन धारये लिगं ध्यायेच्चित्तेन शंकरम् ।
स्वात्मना भावयेत्पूर्णमैक्यभावेन सर्वतः ।
एतत्त्रिपुटिसंधानलक्षणं परिकीर्तितम् ॥ ९३ ॥
कीटो भ्रमरयोगेन भ्रमरो भवति ध्रुवम् ।
मानवः शिवयोगेन शिवो भवति निश्चयम् ।
अनेन वर्त्मना गच्छन् स जीवन्नेव शंकरः ॥ ९४ ॥
ब्रह्मविष्ण्वादयो देवा मुनयो गौतमादयः ।
धारयंति सदा लिंगमुत्तमांगे विशेषतः ॥ ९५ ॥
वेदेषु शास्त्रसंवेषु पुराणेष्वागमेषु च ।
ब्राह्मणस्य समाख्यातं लिंगधारणमुत्तमम् ॥ ९६ ॥
आचारलिंगं प्रथमं गुरूलिंगं व्दितीयकम् ।
शिवलिंगं तृतीयं स्याच्चरलिंगं चतुर्थकम् ।
प्रसाद पंचमं लिंगं महालिंगं तु षष्ठकम् ॥१२२॥
भक्तो माहेश्वरश्चैव प्रसादी प्राणलिंगकः ।
शारणैक्यौ स्थलैः षड्भिः क्रमाल्लिंगमुदाहृतम् ॥१२३॥

(लिंगपुराण–अध्याय २१)

लिंगसंबंध घडवून आणण्यासाठी मलत्रयाचा नाश करणे ही शिवदीक्षा, या शिवदीक्षेचे वेधादीक्षा, मंत्रदीक्षा व क्रियादीक्षा, असे तीन प्रकार आहेत. हस्तमस्मकसंयोग ही वेधादीक्षा, गरुमंत्रोपदेश ही मन्त्र-दीक्षा, ही शिष्याच्या हातात शिवलिंगाची स्थापना करणे, ही क्रिया दीक्षा, श्रीगरु शिवदीक्षारूपी कातरीने सर्वपाश छेदून लिंगज्ञान करून देतात; ते शिवतत्त्वदायक शिवदीक्षा देऊन अविद्या कोश फोडून टाकतात. नंतर कलेचे ध्यान करून तथा कलेला आकर्षण करून घेऊन,

विधिपूर्वक शिवलिंगात समाविष्ट करावी. नंतर ते कलायुक्त शिवलिंग शिष्याच्या शरीरावर अरूढ करावे. कारणादी तनुत्रयाने आवृत असे प्रणवादि मलत्रय, वेधादि दीक्षातत्रयानें नाश करून इष्ट, प्राण, भावरूप लिंगत्रयांचा बोध द्यावा. लिंग स्थूल, सूक्ष्म, व कारण असे तिन प्रकारचे आहे. स्थून सिग धारण करणारे, कारणलिंग प्राप्ती करून घेतात. हे त्रिपुटी संधान शिवसायुज्यतेला कारण आहे. स्थूललिंग देहाशी, सूक्ष्म-लिंगमनाशी, कारण लिंग आत्म्याशी नित्याऐक्य साधीत असतो, चित्तामध्ये शंकराचे ध्यान करीत पूर्णैक्याची भावना करणे, हेच त्रिपुटीसंधान होय. भ्रमराच्या ध्यसाने कीटक ज्याप्रमाणे भ्रमर होतो, त्याप्रमाणे जीव शिवलिंगाच्या निदिध्यासाने साक्षात शिव होतो. हा मार्ग अनुसरताना जीवधारी शिव होतो. ब्रह्मा, विष्णु वगैरे देव, गौतमादि ऋषी मस्तकावर सदैव शिवलिंग धारण करतात. वेदशास्त्र पुराणातून ब्राह्मणाने लिंगधारण करावे असे सांगितले आहे. आचार-लिंग, गुरुलिंग, शिवलिंग, चरलिंग, प्रसादलिंग व महालिंग असे सहा प्रकारचे लिंग आहे. भक्त महेश प्रसादी, प्राणलिंगी, शरण व ऐक्य असे सहा प्रकारचे स्थल आहे. वगैरे सहा प्रकारच्या लिंगाशी सहा प्रकारच्या स्थलाचा अनुक्रमाने संबंध आहे. वगैरे वरील श्लोकांचा भावार्थ आहे.

कलशान् विन्यसेत् पंच पंचभिर्ब्राह्मणैस्ततः
होमं च चरुणा कुर्याद्यथा विभवविस्तरेम् ।।३६।।
(लिंगपुणार उत्तरभाग, अध्याय २१)

शिवदीक्षाकाली श्रीमत्पंचाचार्यांचे प्रतिनिधी म्हणून पंचकलश पांच माहेश्वर ब्राह्मणाकडून स्थापन करावेत आणि मग मोठ्या वैभवाने चरूनी होम करावा असा वरील श्लोकाचा भावार्थ आहे. हा श्लोक वीरशैवदीक्षा प्रकरणांत आहे.

**६२. सौरपुराणात लिंग धारण**

आता पुणे शहरी स्थापन झालेल्या "आनंदाश्रम संस्कृत ग्रंथ-माले" तर्फे प्रसिद्ध झालेल्या सौरपुराणांत सांगितलेल्या वीरशैवगणा-संबंधी विषयाचा विचार करु.

**६३. –: सौरपुराणांत :–**

यस्तु माहेश्वरो विप्रोजातिमात्रोऽपि यद्यपि ।

उत्तमः सर्वपात्राणां तस्मै दत्तं तदक्षयम् ॥ १२ ॥

(सौरपुराण, अध्याय १०)

जो माहेश्वरब्राह्मण केवळ जन्माने विप्र असला तरी (मग तो विद्वान असो वा नसो) तोच दान घेण्यास सर्वोत्तम होय, त्याला दिलेले दान अक्षय होय. असा वरील श्लोकाचा अभिप्राय आहे. या श्लोकांत वीरशैवांना गुरू असलेले माहेश्वरांचे वंशमहत्व वर्णिलेले आहे.

शंभोगणेश्वरा ये च नावर्तंते भवे पुनः ।
भोगान् यथेप्सितान् भुक्त्वा शंभोः सायुज्यमाप्नुयुः ॥ ४८ ॥
स्वेच्छाविग्रहिणः सर्वे स्वेच्छाचारा गणेश्वराः ।
शिवेन सह ते भोगान् भुक्त्वा यांति शिवं पदम् ॥ ४९ ॥

(सौरपुराण, अध्याय ३२)

हे शिवगणाधिश्वर वीरशैवमत प्रवर्तक असलेले सर्वांना माहित आहेत.

भृंगी पूरत्रयं हंतु लक्षकोटिगणैर्युतः ॥ २५ ॥
जगाम शंकुकर्णश्च गोकर्णश्च महाबलः ।
कुंददंतो महाकालो डिंडी मुंडी गणेश्वरः ॥ २६ ॥
शतजिह्वाः सहस्त्राक्षो वीरभद्रो महाबलः ।
शिवाख्यो विशिखश्चैव तथा पंचशिखो महान् ॥ २७ ॥

त्रिपुरासुराला मारण्यासाठी शंकुकर्ण, गोकर्ण, महाबल, कुंददंत डिंडी, मुंडी, शतजिह्वा, सहस्त्राक्ष, वीरभद्र, शिव, विशिख, पंचशिख, वगैरे अनेक प्रमथाना घेऊन भृंगी निघाला. असा या श्लोकाचा भावार्थ आहे. वरील पैकी सर्व प्रमथ लिंगधारी असून शंकुकर्ण आणि गोकर्ण हे वीरशैव संस्थापक पंचाचार्या पैकी दोघे आहेत. ही कथा शिवागमांतून वर्णिलेली आहे. कारण शंकुकर्ण व गोकर्ण ही नांवे घांटाकर्ण व धेनुकर्ण या नांवाचे पर्यायनांव म्हणून शिवगमातून वापरलेले आहेत.

६४. —: महाभारत अनुशासनपर्व :—

किमाहुर्भरतश्रेष्ट पात्रं विप्राः सनातनाः ।
ब्राह्मणं लिंगिनं चैव ब्राह्मण वाऽप्यलिंगिनम् ॥ १ ॥
स्ववृत्तिमभिपन्नाये लिंगिने चेतराय च ।
देयमाहुर्महाराज उभावेतो तपस्विनौ ॥ २ ॥



(महाभारत, अनुशासनपर्व, अध्याय २२)

हे भरत श्रेष्ठ भीष्मा लिंगिब्राह्मण व अलिंगिब्राह्मण या दोहो मध्ये दान घेण्यात अधिक पात्र कोण ? असा धर्मराजोने प्रश्न केला असता, हे धर्मराजा स्वधर्मनिष्ठ असलेला लिंगिब्राह्मण असो किंवा अलिंगिब्राह्मण असो त्या दोघांनाही दान द्यावे; कारण हे दोघेही तपस्विच होत. असे भीष्माने उत्तर दिले आहे. या श्लोकांतून लिंगधारी-माहेश्वरब्राह्मणाबद्दलची पूज्यता स्पष्टपणे प्रतिपादन करण्यात आली आहे. हे महाभारत कलकत्याचे प्रतापचंद्रराय महोदयांनी शके १८०९ मध्ये छापले आहे.

येथपर्यंत आगम – निगम उपनिषदे, पुराणे, महाभारतादि धर्मपंथातून वीरशैवमत कसे प्रतिपादन केले आहे. त्याचा आपण सप्रमाण विचार केला आहे.

पुढच्या चौथ्या प्रकरणांत वीरशैवाचा लिंग संस्कार व लिंगाचाराचा संक्षिप्त विचार केला आहे.

प्रकरण तिसरे, समाप्त



## ॥ ॐनमः शिवाय ॥



करचरणकृतं वाक्कायजं कर्मजं
ना श्रवणनयनजं वा मानसं वाऽपराधम् ।
विहितमविहितं वा सवमेतत्क्षमस्व
जच जय करुणाब्धे श्रीमहादेव शंम्भो—

आकाशंलिग मित्याहुः पृथ्वीं तस्य पीठिका ।
आलयः सर्व देवानां लयनाल्लिगमुच्यते ॥
लिंगमध्ये जगत्सर्वं मानवादि सचराचरम् ।
लिग वाह्यात् परंनास्ति तस्मैलिंगायते नमः ॥
चतुर्युगे लिंगार्चनं श्रेष्ठं

प्रकरण चौथें

॥ चतुर्युगे लिंगार्चनं श्रेष्टम् ॥ (लिंगार्चम चंद्रिका)

# वीरशैवांचा लिंगाचार व लिंगसंस्कार

१. मानव जीवनाचे अंत म ध्येय काय आहे.

मनुष्य जीवनाचे अंतीम ध्येय काय आहे. महात्म्यांनी स्वानुभवाने सांगितले आहे की, शिवस्वरूपांत लीन होण हे जीवनाचे अतिम ध्येय आहे.

जीव कसा शिव होईल. मानव कसा देव होईल.

नर कसा हर होईल. भक्त कसा भगवान बनेल.

प्रश्न अनेक असले तरी उत्तरमात्र एकच आहे आणि ते म्हणजे योग. योग साधनेनेच मानवाला मुक्ती मिळेल. महात्म्यांनी अनेक योग सांगितले आहेत, त्यात सर्वांत सुलभ व सुदर शिवयोग आहे. योग साधन आहे आणि मोक्ष साध्य आहे. सामान्यतः सर्वच धर्मांनी मोक्षांच्या तत्वाचा स्विकार केला आहे, मोक्षाचे स्वरूप व साधनाचे मार्गात भेद असले तरी प्रत्येक धर्मांचा अभिमानी मोक्ष प्राप्तीसाठी उत्सुक आहे हे मात्र खरे.

योग हा शब्द युज (संस्कृत) धातूपासून, उत्पन्न झाला आहे, त्याचा अर्थ (१) जुळणे, (२) मिलन, (३) समरस होणे, (४) ऐक्य पावणे, कोण कोणाशी समरस होणार ? (५) भक्त आणि भगवान् यांचे मिलन म्हणजे योग (६) जीव आणि शिव यांचे ऐक्य होणे म्हणजे योग (७) आत्मा परत्म्याशी जुळणे म्हणजेच योग्य, (८) आंग, लिंग सामरस्य म्हणजे योग. (९) आंग आपले मलत्रय दूर करून, लिंग त्रयीचा स्वीकार करून ते लिंगच स्वयंमेव स्वयं होणेच शिवयोग होय. त्यालाच लिंगाग म्हणतात.

२. श्री गुरु शिष्यावर अनुग्रह करून त्याला आपणासारखा करतात.

श्रीसद्गुरु शिष्याला वेधादिक्षाद्वारे आपला हात शिष्याच्या

मस्तकावर ठेवून, हस्तमस्तक संयोगाने शिष्याच्या कारण तनुच्या पूर्वाश्रयांना दूर सारून, भावलिंगाशी संबंध घडवितात. मंत्र दिक्षाद्वारे श्रीगुरु आपल्या शिष्यांच्या कानांत प्रणव पचाक्षरी मंत्राचा उपदेश करून, त्याच्या सूक्ष्म तनुच्या पूर्वाश्रयास दूर करून, प्राण लिंगाशी संबंध जुळवितात आणि क्रिया दिक्षाव्दारे श्रीगुरु शिष्यांच्या करस्थलांत, (तळ हातांत) त्याच मंत्राला इष्ट लिंगाच्या स्वरूपात साकार करून, त्यांच्या स्थूल तनुच्या पूर्वाश्रयास दूर करून, इष्टलिंगाशी संबंध करवितात. अशाप्रकारे शिष्याने तनुत्रयांत करणाऱ्या, मलत्रयास दूर करून, लिंगत्रयांचा स्विकार करून, शिवांत (आत्म्यांत) ऐक्य पावणे म्हणजेच शिवयोग होय.

श्री गुरु शिष्याला लिंग दिक्षा संस्कार करून मवीला भक्त बनवितो. नरजन्म मिटवून हरपद प्राप्ती करवितो. पुनर्जन्माचा परिहार करून 'पुनार्जत' करतो. मांस पिन्डांचे परिवर्तन मंत्र पिन्डात करतो. वायु प्राण्यात लिंग प्राणी बनवितो. विधीचा ललाट लेख (प्राक्तन) पुसून, शिवमंत्राचा संस्कार करून, शिवपथ दाखवितो जीवभाव दूर करून, शिवभाव उत्पन्न करतो. शेवटी सद्गुरु लिंग संस्कार करून शिष्याला आपल्यासारखे (गुरु) बनवितो.

श्री गुरु शिष्यावर अनुग्रह करून लिंग संस्कारव्दारे त्याला आपल्यासारखा करतात. हा किती उदात्त विचार आहे. शिव शरणांच्या धार्मिक समतेसारखे उच्च प्रकारचे उदाहरण अन्यत्र दुर्लभ आहे. म्हणून अष्टावरणांत गुरुला प्रथम पूजनीय स्थान दिले आहे. सद्गुरुपासून दीक्षा संस्कार करून घेणे हे महाभाग्य होय. जीवनात संस्काराचे महत्त्व असाधरण आहे. मानवाला संस्कार आवश्यक आहेत. प्रत्येक वस्तुला संस्कार आवश्यक आहेत. मानव जन्म प्राप्त झाल्यावर महादेवाचे स्थान मिळविण्यासाठी संस्काराची आवश्यकता आहे.

३. मूळ वस्तुवर संस्कार केल्याने त्याला श्रेष्टत्व येते. लिंग संस्काराने मानव हर बनतो.

१) मातीवर संस्कार केल्याने मडके बनते. २) गोवऱ्यावर संस्कार केल्याने भस्म बनते. ३) गवतावर संस्कार केल्याने कागद बनतो. ४) रुईवर संस्कावर केल्याने कापड बनते. ५) लाकडीवर संस्तार केल्याने

गरम वस्त्र बनते. ६) लाकडावर संस्कार केल्याने बासरी बनते. ७) लोखंडावर संस्कार केल्याने हत्यार बनते. ८) दुधावर संस्कार केल्याने तूप बनते. ९) गव्हावर संस्कार केल्याने खीर बनते. १०) ज्वारीवर संस्कार केल्याने भाकरी बनते. ११) पाण्यावर संस्कार केल्याने तिर्थ बनते. १२) पक्कान्नावर संस्कार केल्याने प्रसाद बनतो. १३) शब्दावर संस्कार केल्याने मंत्र बनतो. १४) दगडावर संस्कार केल्याने मूर्ती बनते १५) शीलेवर संस्कार केल्याने लिंग बनते. १६) उसावर सस्कार केल्याने साखर बनते. १७) भवीवर लिंग (दिक्षा)) संस्कार केल्याने भक्त बनतो. १८) जीवाला लिंग (दिक्षा) सस्कार केल्याने शिवरुप बनतो. १९) नराला लिंग संस्कार केल्याने तो हर बनतो.

लिंग संस्काराचे महत्त्व विसरून भटकणाऱ्या दुःखी लोकांची दया येते. शिवयोगाची साधना करून, शिव स्वरूप होण्यासाठी साधकास लिंग संस्कार आवश्यक आहे. सद्‌गुरुपासून लिंग दिक्षा घेतल्याचा पुरावा कोणता ? त्या सद्‌भक्तांच्या गळयात शिवाचे प्रतिक लिंग असणे हाच पुरावा आहे. लिंग कल्पनेंचा विचार, त्याचे स्वरुप, त्याची आवश्यकता, इत्यादि विषयांचा विचार पुढे करु.

## लिंगाचा विचार

### ४. लिंगा विषयीं प्रथम मानवाची (देवमानवाची) कल्पना.

ऐतिहासिक दृष्टिने पाहिले तरीही लिंग पूजा फारच पुरातन मानल्या गेलेल्या हरप्पा मोहोजोदारो संस्कृतित लिंग पूजा प्रचलित होती. तेथील उत्खननांत शिबालय व शिवलिंगे संशोधकांना सापडली आहेत. त्यांत कृष्ण (काळचा) वर्णांची आवरण केलेली (कांतीयुक्त) शिवलिंगे आहेत. हरप्पा संस्कृतिचा काल इ. स. पू. चार ते पांच हजार वर्षाचा जुना आहे. म्हणजे त्याला आता सात हजार वर्षं तरी झाले आहेत, असे विद्वानांचे मत आहे. लिंग संस्कृती, शैव संस्कृति, अथवा द्रविड संस्कृति ही 'वैदिक आर्याच्या आगमना पूर्वी श्रेष्ठ नागरिक संस्कृति होती असे विद्वानांचे मत आहे. शिवाय फादर हेरास सारख्या संशोधक पंडितानेही सांगितले आहे. कीं, द्रविडाकडूनच वैदिक अर्यानी देवालयात जाऊन देवपूजा करावयास शिकले. मग देवपूजा करू लागले. असे अनेक विद्वानांचे मत आहे. केवळ भारतातच नव्हे तर सर्व जगातील

देशात प्राचिन काळी लिंग पूजा प्रचलित होती. लिंग पूजा अतिपुरातन व वीश्व व्यापक आहे. यांस संदेह नाही. सृष्टीवर प्रथम निर्माण झालेल्या मानवला 'देव' म्हणतात. त्या देवमाने विचार केला की. आपणाला यावर चराचरा विश्वाला) निर्माण करणारी कोणीतरी, सर्व शक्तीसंपन्न, सर्व श्रेष्ठ बस्तु आहे. त्याला प्रसन्न ठेवण्याकरिता त्याची आपण उपासना केली पाहिजे. म्हणजे तो प्रसन्न होईल व आपणावर येंणारी अनेक प्रकारची संकटे निवारण करील. विश्व निर्मात्याची पूजा आर्चा करण्याकरिता, विश्वाचे प्रतिक 'शिवलिंग' बनवले आहे. त्याची अशी कल्पना आहे. पीठिका, लिंग, आणि गोमुख. खाळचा चपटागोल भाग 'पृथ्वी' आहे. वरचा अर्धगोल 'आकाश' लिंग आहे आणि पुढचा लांबट भाग लिगावर घातलेले पाणी एका बाजूला वाहजाण्या करिता तयार केला आहे त्याला गोमुख म्हणतात. ही शिवलिंगाची पूजा आर्चा आदिमानवाने निर्माण केली आहे. त्याला आज दोनशे कोटी वर्ष झाले आहेत. ही आदि कालांत निर्माण झाली आहे, आज तागायत सर्व श्रेष्ठवाने चालू आहे. तशीच ती विश्वांत्ता पर्यंत चालू राहाणार आहे शिबलिंगाला आकाशाचे प्रतिक का मानले आहे त्याचा थोडा विचार करू.

### आकाशाचे प्रतीक शिवलिंग

५. परमात्म्यापासून प्रथम आकाश व त्यातून सर्व सृष्टी निर्माण झाली आहे.

> तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः आकाशाद्वायुः
> वायोरग्निः अग्नेरापः अद्भ्यः पृथिवीति ॥ (तैत्तिरिय उपनिषद्)

भक्ताचे अनन्यगतिक प्रार्थनातरंग व कृपाळु ईश्वराची वरद आकाश वाणी याचे माधुमीलन जेथे होते तेच हे आकाशलिंग प्रतीक होय.

ब्रह्मसूत्र भाष्यांत (१/१/२२) आकाश हे ब्रह्मलिंग मानले आहे. ब्रह्म म्हणजे 'परशिव' अर्थात आकाश हे शिवलिंग आहे. वायुसहित आकाश म्हणजे सक्रिय ब्रह्माचे अथवा सशक्तिक शिवाचे प्रतीक आहे.

छांदोग्यात नारदास सनाकुमाराने सांगितले की व आकाशाचीच परमात्म भावनेने उपासना कर कारण आकाश सर्वात मोठे आहे.

त्यातच सर्वांची उत्पत्ति, स्थिति व गति आहे. बोलणे आणि ऐकणे आकाशामुळेच संभवते. जो आकाशलिंगाचे ठायी ब्रह्माची उपासना करतो, तो आकाशवान्, प्रकाशवान्, पीडारहित व विस्तीर्ण प्रकारच्या लोकास प्राप्त होतो. यास्तव (दुर्घट असून ही) आज अनेकास इष्ट वाटत असलेल्या विश्वधर्मात आकाश हेच ब्रह्मलिंग, हेच श्रेष्ट असे उपासनीय प्रतीक ठरते.

'वायुसंपरिश्वक्त'. आकाश हे ईश्वराचेलिंग म्हणजे चिन्ह अथवा प्रतीक आहे. आकाश म्हणजे केवळ पोकळ घुमटा प्रमाणे दिसणारे आभाळ नव्हे. ते खाली–वर सर्वत्र व्यापक आहे, ते स्वतः स्थिर वाटले तरी त्यातील प्राणतत्वामुळे ते स्पंदयुक्त आहे. ही जी आकाशाची प्राणस्पंदमयता तेच तत्वतः विश्वाचे स्वरूप होय. अर्थात तेच विश्वधर्माचे मूळस्वरूप होय. अशी विश्वरूप दर्शनाची धारणा या आकाशरूप शिवलिंगाच्या ठिकाणी सहज प्राप्त आहे.

६. आकाश व पृथिवी. ही जगताचे मातापितां आहेत.

कारणरूप शिवाचे लिंग अरुप आणि व्यापक असले पाहिजे. हे उघड आहे. आकाश लिंग हे तसे आहे. आणि त्या विराट आकाश लिंगाचीच रूढ अरुप, पार्थिव 'शिवलिंग' ही उपासनेला व्यवहारी अशी प्रतिमा आहे. ऋग्वेदांत (६।५१।५) (११९११६) म्हटले आहे की 'द्यावा पृथिवी' अथवा 'आकाश पृथिवी' हीच आपल्या जगताची माता पितरे होत.

शिवाचे आकाशलिंग हे विवक्षित धर्म पंथ निरपेक्ष असे सामान्य व व्यापक प्रतिक मानता येईल, सर्वोत्कृष्ट, सर्व सामान्य होण्यासारखे असे अरुप व व्यापकता दर्शक प्रतीक आहे. देवालयातील स्थानर मूर्तीची अशी वेगळी लहान उत्सव मूर्ती करतात, तसेच स्थावर आकाशलिंगाचीच पार्थिव शिवलिंगही लघुत्तम प्रतिमा आहे.

एको ही रुद्रो न व्दितीयाय तस्थुर इमाँल्लोकानीशिते.
ईथनिभिः प्रत्यङ्जनास्तिष्ठति ।। श्वे. उप. ३।२
असंख्याताः सहस्त्राणि ये रुद्राः ।। (यजु. १६।५४)
'ये चैनं रुद्रा अभितो दिक्षु श्रिताः ।
(ऋ. ६।५१।५) (११९११६) पहा.

॥ चिन्मयः परमाकाशो ये एव कथितो मया ॥
॥ एषोऽसौ शिव इत्युक्तो भवत्यष सनातनः ॥ यो. वा. ॥
आकाश लिंग मित्याहुः पृथिवी तस्त पीठिका ॥
आलयः सर्व देवाना. लयनाल्लिंगमुच्यते. ॥१॥ स्कंद. पुराण.

ब्रह्मरूप शिवाला आकाशासारखे दुसरे उपमान नाही. उपमान हे उपमेयाहून भिन्न असते हे उघडच आहे. पण ज्ञाता वरून अज्ञात परम शिवत्व जाणण्यास आकाशाहून योग्य अशी अन्य शिव विभूती आगर प्रतीक मिळणार नाही. ते पोकळ म्हणावे तर शिवशक्तीने व्याप्त आहे. अमूर्त म्हणावे तर वायुतेजादि भूत भौतिकास धारण करणारे प्रत्यक्ष आहे

**७. ब्रह्म (शिव) संपूर्ण चराचर विश्वव्यापक आहे. त्याप्रमाणे आकाशही संपूर्ण चराचर व्यापक आहे.**

ते सर्वच सम, नित्य, एकरस, अखंड निर्विकार, निश्चल, विभु व्यापक व निर्मल आहे, प्रणव हीच त्याला व शिवाला संज्ञा शोभते. भौतिक दृष्टया ते सर्व प्रथम व सर्वात मोठे असे जगत कारण आहे. ते उपासनीय मानले आहे. नामरूपाचा निर्वाह करणारे आहे. ते याप्रमाणे अखिल जगत असे या आकाशरूप शिववलिंगाच्या पोटात आहे. तसेच उलट ते आकाशरुप शिवलिंग अणुरेणुच्चाही पोटात अनुस्युत्त आहे. भौतीकाचे जल, वायु, विद्युत आणि तेज ही तत्वे त्या आकाशरुप शिवलिगात आहेत. सारे अधिदैवत जगत या आकाश लिगात अव्यक्त आहे. सर्व धर्मियांचे देव त्यात अव्यक्त आहेत. अंतःकरण आणि ज्ञानेंद्रियाचा सारा तत्वांश त्यात आहे. पार्शी भक्तांचा सूर्य, मुसलमानांचा चंद्र, ज्यातिर्विदाची ग्रह व नक्षत्रे, आणि भौतिय शास्त्रज्ञांची विद्युतादि शक्ति त्यात आहे. सर्वभूताचे लयस्थान तेच आहे. ईश्वराप्रमाणे सर्वोत्पत्तिस आधार तेच काहे.

॥ निष्क्रमणं प्रवेशमित्याकाशस्य लिंग ॥ वैशे. दर्शन (२।१।१)

आकाश हे त्याचे (परशिवाचे) जड पार्थिव लिंग हेच व्यवहाय प्रतिक योग्य ठरते. सर्व देशात, सर्व धर्मात आणि तिन्ही काळात जे एकमेव उपासनिय आहे. तेहे परमात्म्याचे व्यापक अथवा सहज सर्वच उपलब्ध असे लिंग होय. आकाश लिंग हीच परशिवाची परम श्रेष्ठ

विभूती आहे.

अशा या शिवलिंगात सर्व चराचर विश्व आहे. याची पूजा आर्चा केल्याने विश्वाची पूजा आर्चा होते. विश्वाची पूजा आर्चा म्हणजे विश्व-निर्मात्याची, विश्वपित्याची पूजा आर्चा होते. या उदात्त विचारानें आदिमानवाने (देवमानवाने) आकशाचे प्रतिक शिवलिंग निर्माण केले आहे.

८. शिवलिंग का निर्माण केले आहे.

उपासकातील जीव व उपास्य शिव हे दोघेही अमूर्तच आहेत. या दोघामधील उपासनादि व्यवहार होण्याकरिता जसे उपासकाचे शरीर असते, तसेच शिवाचे शिवलिंग हे प्रतिकाची गरज आहे. उभयताच्या या भौतिक उपाधीप्रमाणेच त्या भौतिक उपाधीना भौतिक पूजा उपचाराची गरज लागतेच, म्हणून देवमानवाने विश्वारंभी विश्व निर्मात्या ईश्वराचे (शिवाचे) अमूर्त-निरवयव, निराकार प्रतिक भौतिक पाषाणाचे शिवलिंग निर्माण केले आहे.

९. वर्तमान कालांत जगातील थोरपुरुष विश्वधर्म निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहेत.

कृत, त्रेता, द्वापार या तिन्हीयुगांत भरतात. चारी वर्णाचा एकच धर्म होता 'विश्वधर्म' चारवर्ण होते ते गुणकर्मानुसार होते. चारी वर्णाचे आचार, विचार सारखे होतें. ते पवित्र आणि शुद्ध होते. चार वर्णाच्या विरूद्ध आचार विचाराच्या लोकांना असूर म्हणत होते. ते असुरी वृत्तीचे लोक वेळोवेळी भारतावाहेर गेले. काही थोडेफार भारतात होते, त्यांना विशेष प्राध्यान्य मिळाले नाही. त्यामुळे तिन्हीयुगांत भारतात एकच धर्म होता. तो विश्वधर्म. वर्तमान कालातील थोरपुरुष विश्वधर्म प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत आहेत.

वर्तमान कालांत जगाचा एकच एक विश्वधर्म होणे व्यवहार्य ठरो वा न ठरो, ज्याअर्थी आज जगातील अनेक थोर पुरुष त्या विचारांत आहेत असे दिसते, त्या अर्थी हेंही येथे सांगावेसे वाटते की, आशा विश्वधर्मात शिवलिंग उपासना ही एकच एक योग्य परमार्थरूप होईल. याची थोडक्यात कारणे अशी सांगता येतील.



१. प्राचीनकाळी साऱ्या जगभर शिवलिंग उपासना रूढ होती.

२. सृष्टीच्या आरंभापासूनची ती श्रेष्ट व तात्विक उपासना आहे.
३. एका शिवलिंगाला प्रतिकरूप ईश्वर ही संज्ञा आहे ईश्वर साऱ्या जगाचा एकच एक आहे, हे सर्व जगातील धर्म मानतात.
४. शिवलिंग हे अप्रतीम व अरूप आहे म्हणून उपासनीय आहे.
५. ज्याने पाषाणाच्या शिवलिंगांत उपासनाव्दारा ईश्वर पाहिला त्याला सर्वत्र ईश्वर दिसेल.
६. शिवलिंग उपासना म्हणजे विश्वनिर्मात्या ईश्वराची उपासना आहे.
७. शिव उपासनेविना विश्वधर्म अर्थ शून्य ठरेल. कारण तो जगत्कारणाधीश्वराची उपासना आहे.
८. ही धर्मभेद रहित निरपेक्ष तात्विक शिवउपासना अथवा ईश्वराची अंतर्मुख उपासना साऱ्या जगाचा उद्धार करील.

**१०. लिंगाचे स्वरूप.**

शिवपुराणात म्हटले आहे की, ओंकाराचे स्वरूप लिंग आहे, सिद्धीचा दाता ओंकारात अ. उ. म. तीन अक्षरे आहेत ही तीन अक्षरेच क्रमशः लिंगाचे पिठ गोमुख व पिंडी आहेत.

न जे शिता नैवच तस्य लिंगम् ।। (स्वेता.)
तदेव लिंग प्रणवं सार्व कायिकं । (शिवपुराण)
अव्यक्तस्तुपरः पुरुषो व्यापको लिंग एवच (कठो)

सर्व कामनांची पूर्ती करणारा प्रणव लिंग आहे. ओंकारच लीनार्थ गमकं चिन्हं लिंगमित्यभिधीयते (शि. पु.)

महदाद्यं विशेषांतं लिंगम् ।। (मै. उप.)

आता वीरशैव आपल्या अंगावर (देहावर) जे इष्ट लिंग धारण करीतात त्यांस त्यांच्याच प्रक्रियेने जाणून घेऊ, शिवशरण (संत) परात्पर वस्तूला (आत्म्याला) लिंग, शिव म्हणतात.

लीयते गम्यते यत्रनेत्र सर्वचराचरम् ।
तदेतल्लिंग मित्युक्तं लिंगतत्व परायणैः ॥



(शिवानुभव सुत्र)



ॐ नमः शिवाय



महात्मा बसवेश्वर



ही दृश्यमान असलेली चराचर सृष्टी ज्यापासून उत्पन्न झाली ज्यांत तिचे पोषण होते. ज्यात तिचा लय होणार, तेच लिंग आहे. दृश्य दृष्ट सर्वांना आधारभूत होऊन त्याची सृष्टी स्थिती व लय यास कारण अव्यक्त चैतन्य म्हणजेच लिंग.

११. चित्त चैतन्य जगत चैतन्य होऊन सृष्टि उत्पन्न झाली आहे.

१. लिंग म्हणजे परम शक्तियुक्त २. लिंग म्हणजे परशिव निज देह. ३. लिंग म्हणजे परशिवाचे घन तेज. ४. लिंग म्हणजे परशिवाचे निरतीशयानंद सुख. ५. लिंग म्हणजें परशिवाचे परज्ञान. ६. लिंग म्हणजे स्वयंपरशिव, आलयं सर्वभूतांना लिंगमुच्यते. हे मर्म ज्यांनी जाणले तोच ज्ञानी लिंग आहे. ७. लिंग निर्मल आहे. सर्वकारण आहे. ८. लिंगच सच्चिदानंदन परिपूर्ण आहे. ९. लिंगच सकल लोकोत्पत्तीचे कारण आहे १०. लिंगच सर्वतत्व पूर्ण निजचैतन्य आहे. ११. लिंगच जन्म मरणाच्या महासागरातून पार नेणारा नावाडी आहे. १२. लिंग म्हणजे शरणाच्या (संताच्या) हृदयातील ज्योनिर्भय आत्मलिंग आहे.

लिंगच सच्चिदानंदमय, सृष्टी स्थिती लयास कारण, निजचैतन्य निरंजन आणि शरणांच्या (संताच्या) हृदयात चिज्जोति होऊन प्रकाशमान होणारा, भवसागर पार करणारा नावाडी, जीवनाचे अंतिम अवसान मुक्तीप्रदान करणारे आहे. हे लिंगाचे मर्म जाणून, त्यानुसार आचरण करणाराच शिवानुभवी होय. अशी परवस्तू गोलाकार होऊन शरणाच्या सद्भक्तिने उपास्य वस्तू बनून, भक्ताच्या करतली विराजमान होते.

परतत्वं गोलाकरं चिन्मचं चिद्‌विलासितम्
शरण्यं सर्व तत्वानां लिंगाकारेण वर्तते

परतत्व ज्ञानस्वरूप होऊन लिलायुक्त होऊन सर्व तत्वाचे उत्पत्ती स्थान लिंग आहे. तो आनादि परशिव अणोरणीयान् महतोंमहीयान् अर्थात सूक्ष्मातिसूक्ष्म आणि पृथ्वीहून महान आहे, उपमातीत आहे. वाक् व मनाला अगोचर, श्रुतिस्मृतिनेही त्याच्या जवळ जाता येत नाही. ज्ञान तर्कानेही ज्याला ओळखता येत नाही, तो परशिव भाररहीत होऊन आपल्या करतळी विराजमान झालेला पाहून भक्त लिंगांग समरस होतो.



वि. १८

१. 'यतोवाचो निवर्तंते अप्राप्य मन सासह' असे हे लिंग आहे. २. 'अत्यतिष्टद्दशांगुलं', असे हे लिंग ३. अणोरणियान महतोमहियान, असे हे लिंग आहे. ४. अयं मे हस्तो भगवान् अयं मे भगवत्तरं असे हे लिंग आहे.

१. सच्चिदानंदलक्षणपरमात्म्याचा आनंद न भाव शिवभक्तांचे उपास्य असते. त्या निरतिशयानंदाचे जे ताटस्थ्य तेच या लिंगात आहे.

२, ईशान म्हणजे आकाश, तत्पुरुष म्हणजे वायु, अघोर म्हणजे अग्नि, वामदेव म्हणजे जल, आणि सद्योजात म्हणजे पृथ्वी ही शिवाची पाचही तात्त्विक रूपे या पाषाणलिंगात अनुप्रविष्ट व अव्यक्त आहेत.

३. सृष्टी उपासक व अधुनिक सृष्टी. विज्ञानवादी असे सांगतात की, सृष्टी उत्पन्न होण्यापूर्वीचा अंतराळातील तेजो मेघ प्रथमत: सृष्टीक्रमात थंड होत होत चपटा झाला व त्याची एक प्रचंड दीर्घ वर्तुळ ततकडी बनली. त्या तबकडीच्या मध्यभागी शनिच्या गोलाप्रमाणे पिन्डी उत्पन्न झाली. तोच सूर्यमालेतील सूर्य व त्यासभोवतालच्या कडेपासून पुढे ग्रहगोल व लोक बनले. त्याच जगत्कारण रूपाची ही प्रतिमा आहे. मधली पिन्डी हे ज्योतिस्वरूप सूर्याचे लिंग व सभोवतालची शाळुंका हीच प्रकृति पीठाची वलये आहेत.

४. ज्याप्रमाणे बीजातूनच वृक्ष उत्पन्न होतो व त्यारुपातच पुन्हा परिणाम पावतो, त्याप्रमाणे हे ब्रह्मवन ज्यातून व्यक्त झाले व ज्यात लय पावले, ते अद्यंन अधिष्ठान शिवरुप होय. यास्तव शिवतत्वाला नाशक न मानता पुनरुत्पादक असे मानतात. सुष्टयुन्मुख चिज्जोतिचे भौतिकदृष्टचा पाषाणलिंग हे सृष्टीक्रमातले अखेरचे खनिज पर्यवसान तसेच प्रथमचे पुनरुस्थान होय.

५. अतिदीप्तिमान वस्तु कृष्ण वर्ण भासते, अतिदूरची वस्तु तशीच दिसते, अतिगतीमान वस्तु स्थिरशी भासते, ज्ञात्याचे मौन ताटस्थ्यरूप असते, तसे हे दिव्यानुभूतीचे जड भासणारे प्रतीक शिवलिंग होय.

६. शिवाची पिन्डी म्हणजे जणुं आकाशाचा घुमट अथवा अंतराळातील वातस्तंभ किंवा स्थंडिलांतील भस्माच्छादित अग्नि, नाही तर

समष्टि कर्मसलिलावरील एक दिव्य लाट, अथवा भूपृष्टावरील क्षुद्र जीवाचे निर्भय आश्रयस्थानरूप वारूळ मानावे.

७. पाषाणाचे शिवलिंग जगत्कारण कसे असू शकेल ? अर्थात त्यांत अंतर्निहित असलेले शक्तिविशिष्ट शिवचैतन्य तेच तत्त्वत: शिवलिंग होय. तेच जगत्कारण समजावे. अखिल नामरूपात्मक विश्वकार्य ज्या जगत्कारणांत अव्यक्त आहे त्याचे हे प्रतीक आहे.

८. ज्याच्या ध्यानप्रकर्षांत उपास्य प्रतीक, उपासक जीव व उपासना या त्रिपुढीसह अखिल जगाची अनुपलब्धि होते तेच शून्याचे निष्कर्षरूप वस्तुमाहात्म्यपूर्ण शिवलिंग होय.

९. पाषाणालाही दयेचा पाझर फोडणाऱ्या निस्सीम त्यागरूप शिवभक्ताच्या प्रपन्नावस्थेचे कसोटीरूप हे लींग आहे.

१०. गुणसाम्यावस्थेच्या साळुंकेतून उद्‌भूत होणारे हे सबीज सद्‌ब्रह्माचे प्रतीक आहे.

११. निष्फल परमशिवाच्या भावनेला आलंबनरूप शून्याचे निष्कर्षरूप हे प्रतीक आहे.

१२. संतत जलधारेच्या वर्षावांतहि कोरडे राहणारे हे परम अलिप्ततेचे वैराग्य सूचक लिंग आहे.

१३. असंख्य मोहक विषयांच्या मात्रास्पर्शांनी अविचल राहाण्यासाठी उपासकाने आपले हृदय किती कठीण केले पाहिजे त्याचे आदर्शरूप हे लिंग आहे.

१५. पृथ्वी ही साळुंका व आकाशचा घुमट हींच पिन्डी अशा व्यापक ब्रह्मांडलिंगाचे शिवलिंग हे प्रतीक आहे.

१६. द्यावा-पृथ्वी या जगाच्या आईबापांचे द्योतक असे हे प्रतीक आहे.

१७. जगाच्या अजातीरूप पसरलेल्या घुमटांत नित्य असणारे असे हे स्वयंभू ब्रह्मात्मलिंग आहे.

१७. भूमीत पुरून ठेवलेल्या गुप्तधनाची स्थलनिर्देषक काही दृश्य पण गूढ अशी खूण ठेवतात. त्याप्रमाणे भौतिकसृष्टीत गडदलेले ब्रह्मात्म धन शोधण्याचे साधनक्षेत्रदर्शक हे लिंग आहे.



१८. हे जड पाषाणलिंग नि:संकल्प शुद्ध ब्रह्मात्म्याचे बोधक

चिन्ह आहे.

१९. हे सत् व असत् यांचा मध्यरूप जे ब्रह्म त्याचेच लिंग हे प्रतीक आहे.

२०. शिवलिंग आणि आत्मलिंग ही दोन्ही ब्रह्मलिंगाचीच नावे आहेत. ते ब्रह्मलिंग माझ्या हृदयात आहे आणि तेच माझ्यापुढील शिवलिंगात आहे.

२१. ज्यांत असंख्य कल्पांचा त्रैकालिक इतिहास लिहिला आहे, व ज्यांत अगणित ब्रह्मांडाची चित्रें कोरलेली अव्यक्त आहेत असे हे शिवलिंग विश्वकोश आहे. असे हे शिवलिंग मानव कल्याणाकरिता आदिमानवाने (देवमानवानें) निर्माण केले आहे. त्याच्या उपासकांत व उपासनेंत दोन प्रकार आहेत.

१२ लिंगपूजा दोन प्रकारची असते

एक बाह्य व दुसरी अभ्यंतर. ब्रह्मलिंग हे स्थूल आहे. उपासकांतही दोन प्रकार आहेत. १) कर्ममार्गी व अज्ञानी आणि २) ज्ञानी. १) कर्ममार्गी व अज्ञानी, ज्यास अभ्यंतरीचे सूक्ष्म लिंग उमजत नाही अशा लोकांच्या मनात भावना उत्पन्न करण्यास स्थूल लिंगाची आवश्यकता आहे. २) ज्ञानी जनांस अभ्यंतरीचे आध्यात्मिक सूक्ष्म लिंग नेहमी प्रत्यक्ष दिसत असते. ज्ञान्यांना स्थूल लिंगाची गरज नाही. ज्ञान्याकरिता वीरशैव शरीरावर लिंग धारण करतात. त्या शिवलिंगावर काळ्या (कृष्ण) वर्णाचे कवच बनवलेले असते. त्याला कांतिलिंग म्हणतात. त्या कांतियुक्त लिंगाची गरज असते. त्याची सविस्तर माहिती याच प्रकरणांत पुढे आहे.

१३. सर्व चराचर विश्व शिवलिंगात आहे. ' लिंगज्ञान ' म्हणजे ' आत्मज्ञान ' झाल्यावर इतर ज्ञानाची गरज नाही.

लिंग मध्ये जगत सर्वं मानवादि सचराचरम् ।
लिंग बाह्यात परं नास्ति तस्मै लिंगायते नमः ॥

सचराचर त्रैलोक्याला आपल्यामध्ये समाऊन लिंग जगत्‌रूप झाले आहे. म्हणून लिंगबाह्य जगात कोणतीही वस्तू नाही. अशा ब्रह्मांडगत लिगाचे स्वरूप या संस्कृत श्लोकात आम्ही पाहू शकतो. लिंगाला अंत नाही. लिंगाशिवाय कोणतेही स्थळ नाही. लिंगात सर्व जग लपले आहे.

हेच लिंगाचे महत्त्व होय. लिंग ज्ञानाशिवाय (ब्रह्मज्ञानाशिवाय) इतर ज्ञान व्यर्थ आहेत. लिंग ज्ञानानंतर (आत्मज्ञानानंतर) इतर ज्ञानांची गरज नाही. सर्वांस कारण (मूळ) लिंगच आहे. लिंगाचे ज्ञान झाल्यावर सर्वच ज्ञानें आपोआप येतात.

लिंगाचा प्रकाश पाहाण्याचे साम्यक् ज्ञान झाले नसले तर आगम निगमापासून मिळाले तरी त्या ज्ञानाचा काहीच उपयोग होत नाही. सम्यक ज्ञान होऊन लिंग, प्रकाश पाहिल्यावर दृढ भावानुसार स्वानुभवी व्यक्तिला अन्य काहीही जाणण्याची गरज नाही. या दृश्य जगताचे कारण व कर्ता लिंगच (आत्माच) आहे, हे जाणून लिंगसंगाच्या आनंदाचा 'लिंगानंद' अनुभवून आनंद सागरात भक्त विलीन होतो. जे समजत नाही ते समजून घेणे, जे दिसत नाही ते पाहाणे, यालाच अनुभव म्हणतात.

सत् चित्आनंद नित्य परिपूर्ण होऊन, परवस्तू प्रत्यक्ष होऊन, माझ्या तळहाती आल्यानंतर आता अन्य तत्त्व जाणून घेण्याची मला इच्छा नाही, असे वीरशैव संत म्हणतात.

लिंग परात्पर वस्तू आहे.    लिंग परब्रह्म आहे.    लिंग परशिव आहे.
लिंग परमात्मा आहे.    लिंग परंज्योती आहे.    लिंग चैतन्य आहे.
लिंग निरंजन आहे,    लिंग निरवयव आहे.
लिंग निराकार आहे.    लिंग निरुपम आहे.    लिंग परतत्त्व आहे.
लिंग सच्चिदानंद आहे.    लिंग नित्य परिपूर्ण आहे.

आणि आत्माच लिंग आहे.

हे परात्पर लिंग साकार होऊन शिष्याच्या करतली विराजमान होते. त्या इष्टलिंगातच आत्मस्वरूप जाणून त्याचे आचरण सर्वांग लिंगी होते. त्याच्या प्राणांत गंधग्राहक शक्तियुक्त प्राणतत्त्व आचार लिंग होऊन, त्याच्या मुखात शब्दच गुरुलिंग होऊन, वाणी ज्योर्तिलिंग होऊन, त्याच्या नेत्राचा प्रकाश शिवलिंग (दिव्य तेजोमय लिंग) होऊन, त्याच्या त्वचेत स्पर्शशक्तीच जंगम लिंग होऊन, त्याच्या कानात नादच प्रसाद होऊन, त्याच्या हृदयांत तृप्तीच महालिंग होते. अशा लिंगाचे निजरूप संतच जाणू शकतात असे वीरशैव संत म्हणतात.

जी गोष्ट आपणाला आकलन होत नाही. ती ज्ञानी लोकांकडून

समजावून घ्यावी. तिच सत्यान्वेशाची दृष्टि होय. ज्या विषयात आपली गती नाही त्याबाबत काहीतरी बरळणे ठीक नाही.

**१४. साकारापासून निराकाराचे ज्ञान**

लिंगाचे सुन्दर समन्वय स्वरूप पाहून ते लिंग सदगुरुच्या अनुग्रहाने शिष्याच्या करस्थली विराजमान होते. ही गोष्ट आम्हांला आकलन झाली, साकार इष्टलिंगाची पुजाअर्चा करून निराकार निरंजन परवस्तु हस्तगत करणाऱ्या, शिवानुभवी संताची दिव्यवाणी आम्ही ऐकली, निराकाराचे ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी साकारांची काय आवश्यकता आहे. असा प्रश्न उद्भवेल, होय निराकाराचे ज्ञान होण्यास साकाराची आवश्यकता आहे. ज्ञानोपासनेसाठी चिन्हाची आवश्यकता आहे. लौकीक तथा पारलौकिक जीवनांत चिन्हानेच ज्ञान प्राप्ती होऊ शकते.

उदाहरणार्थं :—

१. भगवे वस्त्र त्यागाचे (संल्यास) चिन्ह आहे.
२. खादी स्वदेशाभिमानाचे चिन्ह आहे.
३. खाकी पोशाक अधिकाराचे (पोलीस) चिन्ह आहे.
४. राष्ट्रध्वज स्वातंत्र्याचे चिन्ह आहे.
५. मंगलसूत्र सौभाग्याचे चिन्ह आहे.
६. हस्ताक्षर संमत्तीचे चिन्ह आहे.
७. हसणे आनंदाचे चिन्ह आहे.
८. रडणे दुःखाचे चिन्ह आहे.
९. चित्र वस्तूचे चिन्ह आहे.
१०. मुकूट राजाचे चिन्ह आहे.
११. लाल कंदील संकटाचे चिन्ह आहे.
१२ अतिथीच्या आगमन प्रसंगी उभे राहणे गोरव करण्याचे चिन्ह आहे.

अशी अनेक उदाहरणे जीवनात आपण पाहतो. त्याचप्रमाणे इष्ट लिंगपरशिवाचे (परब्रह्माचे) चिन्ह आहे. पिडांत आत्म्याचे चित्ह आहे. ब्रह्मांड परत्म्याचे चिन्ह आहे.

इष्टलिंग पिन्डांत ब्रह्मांड यौरैक्यम् ।। या तत्वाचे चिन्ह आहे.

आम्ही जे काही बोलतो ते चिन्हाव्दारेच बोलतो. आम्ही जो विचार करतो. तोहीं ग्रचिन्हाव्दारेच करतो. जशी साकार चिन्हांची आवश्यकता आहे. तशीच अध्यात्यातही चिन्हांची आवश्यकता आहे. शरणांनी (संतांनी) इष्टलींग नामक चिन्हानेच परशिव ज्ञान प्राप्त करून घेतले आहे. असे वीरशैव संत मानतात. आपल्या नित्याच्या जीवनांत साकारापासून निराकाराचे ज्ञान आम्ही अनुभवतो. वात्सल्य निराकार आहे. पण बालकाच्यामुखाचे चुन्बन साकार आहे.

| | |
|---|---|
| दया निराकार आहे. | सेवा सहाय्य करणे साकार आहे. |
| भक्ति निराकार आहे. | पूजाअर्चा साकार आहे. |
| बिन्दू निराकार आहे. | ० हे चिन्ह साकार आहे. |
| रेखा निराकार आहे. | — हे चिन्ह साकार आहे. |
| समय निराकार आहे. | घड्याळ साकार आहे. |
| परशिव (परमात्मा) निराकार अहे. | इष्टलिंग साकार आहे. |

वरीलप्रमाणे निराकाराचे ज्ञान साकाराने होते. त्याचप्रमाणे इष्टलिंगाव्दारे परशिव परमात्म्याचे ज्ञान होते. साकारामुळे निराकाशचे ज्ञान होते. म्हणूनच निराकार निरंजन परशिवाची पूजा अर्चा करण्यासाठी ईष्टलिंगाचे ज्ञान प्राप्त करून घेऊन त्याची पूजाअर्चा करणे आवश्यक आहे. माझ्या करतली परमनिरंजनांनी आपले चिन्ह देवून त्या चिन्हांत ज्ञान कला दाखविली आहे. माझ्या रूपात आपले रूप दाखविले. मला आपल्यात समाविष्ट करून घेतले. त्याला मी हजारो वेळा वंदन करतो.

शिवशरण (संत) करस्थलांत परम निरंजन इष्ट लिगाचे अनिमिषा नेत्राने अनुसंधा करतो. इष्ट लिगाच्या अनुसंधानात प्राणलिगाच्या चित् ज्योतीरूपी ज्ञानाचे किरण पाहतो. त्या ज्ञान किरणांत भाव लिंगाची (महाज्ञानाची) परंज्योती पहातो. त्या महातेजाच्या प्रकाकात शरण (संत) स्वतः आपणास पहातो. स्वतःमध्ये त्या परशिवाचा अस्तीत्वाचा अनुभव घेतो. आणि तो शरण त्यापरशिवांच्या चिद्गर्भात मातेच्या उदरात वास करणाऱ्या बालकाप्रमाणे समावून गेल्याचे विस्मित

होऊन पहातो. तेव्हा त्याची वाणीच ज्योतिर्लिंग होऊन चिन्हाव्दारे ज्ञान सागरात प्रवेश करते. असे शिवशरण म्हणतात.

करस्थलातील इष्टरूपी ज्योतीच परमात्म्याचे चिन्ह आहे. तेच निराकाराचे साकार रूप आहे. असे समजून त्याचे स्वरूप आकलन करून अंगावर लिंग धारण केल्यानें, निस्सीम असलेल्या परमात्म्याचे स्वरूप जाणून, निजलिंगानंदात तल्लीन, होऊन तो स्वतः शिव स्वरूपात विलीन होतो.

मानवाला संसारांत (जन्ममरणांत) तडपयविणाऱ्या दुर्गुणांचा परिहार करून माझा उद्धार करण्यासाठी तो दयाघन परशिव माझ्या करतलांत आला आहे. त्याला सहस्रशः वंदन करतो असे शिवशरण म्हणतात.

तुम्ही निराकार परमात्म्याला विसरू नका. या उद्देशाने गुरुंनी हे इष्टलिंग प्रतिमा तुमच्या (शिष्याच्या) हाती दिली आहे.

**१५. इष्टलिंगाची आवश्यकता**

आत्मज्ञान प्राप्तीसाठी शिवलिंगाची पूजा केली पाहिजे, निराकाराचे ज्ञान प्राप्त करण्यासाठी साकाराची आवश्यकता आहे. हे आम्ही पाहिले आहे. आता आत्मज्ञानरुपी परशिवास जाणण्यासाठी इष्टलिंग नामक चिन्हांची आवश्यकता आहे. हा प्रकार शरणांच्या अमृतवाणी. द्वारेच पाहू.

जसे पतंग उडविणाऱ्याला भूमिचा आधार, शूरांना युद्धासाठी शस्त्रास्त्राचा आधार व गाडीला पृथ्वीचा आधार असतो, त्याचप्रमाणे परशिव प्राप्तीसाठी साकार इष्टलिंगाचा आधार पाहिजे.

डोळयांना दिसते म्हणून दिव्याच्या सहाय्याशिवाय अंधारात दिसू शकेल काय ? सूर्याच्या प्रकाशाचे सहाय्य घेऊन लोक म्हणतात की मी माझ्या डोळयांनी पाहिले. सूर्यप्रकाशाशिवाय कोणी पाहू शकेल काय ? अंग (शरीर) सोडून आत्म्याचे अस्तित्व असू शकते कां ? त्याप्रमाणे स्थल, सूक्ष्म कारण हे तनुत्रय असल्यावर इष्टलिंग, प्राणलिंग, भावलिंग आदि त्रिविध लिंगसंबंधाची आवश्यकता आहे.

आम्ही आपल्या डोळयाने पाहू शकतो हे म्हणणे योग्य नाही. त्याला सूर्यप्रकाश हवा तसेच करस्थलांत इष्टलिंगरूपी ज्योती धरून

परवस्तू पहावी लागते. अंगाशिवाय आत्मा, शक्तीशिवाय शिव, जसे राहू शकत नाहीत, त्याचप्रमाणे इष्टलिंग सोडून भक्ताने (जिवाने) राहू नये, यासाठीच स्थूल सूक्ष्म कारण शरीर त्रयांचा इष्ट प्राण, भाव, या लिंग त्रयांचा संबंध ठेवला पाहिजे, असे शरणांचे (संतांचे) मत आहे.

अचरण सत्क्रियेचे नसेल तर, शब्दज्ञानाद्वारे परमेश्वराला जाणल्याने काहीही कार्य होणार नाही. जसे अंध पाहू शकत नाही, लंगडा चालू शकत नाही. एक जरी नसला तरी काम होणार नाही. ज्ञानाशिवाय क्रिया जड आहे. क्रियेशिवाय ज्ञान भ्रांती आहे. ज्ञान आणि क्रिया दोन्हीही हवेत.

अंधाच्या स्कंधावर पंगूने बसून मार्गदर्शन केले तरच दोघे मिळून इच्छित साध्य करू शकतील. ज्ञानहिन क्रिया जड आहे. क्रियाहीन ज्ञान भ्रांती आहे. म्हणूनच साधकाला ज्ञान (प्राणलिंग) व क्रिया (इष्टलिंग) ही दोन्ही आवश्यक आहेत. असा ज्ञान क्रिया यांचा समन्वय संतांनी केला आहे.

इष्टलिंग पूजेने साधकाला लिंगात आचाराचे ज्ञान व्हावे, प्राणलिंगाच्या पूजेने मनांत ज्ञानोदय व्हावा, भावलिंगाच्या पूजेने भावात अनुभाव यावा, आचार, भाव, अनुभव इत्यादीने शरण (संत) शिवानुभावी होऊन, शिवांत समरस होऊन एकात्म व्हावा, हाच शरणांचा (वीरशैव संतांचा) सिद्धांत आहे.

प्राणायामाने शरीरसौष्ठवाचे रक्षण होईल, त्याने आत्म साक्षात्कार होणार नाही. गुरुने दिलेल्या इष्टलिंगाद्वारेच प्राणलिंग जाणून शिव सानिध्य प्राप्त केले पाहिजे.

आगम, निगम, उपनीषदे पुराणादि ग्रंथांच्या अध्ययनाने शिवदर्शन किंवा शिव प्राप्ती होणार नाही. बौद्धाप्रमाणे शून्याला शरण जाऊन शोधल्याने शिव भेटणार नाही. हृदयाच्या अनहत चक्रात, अथवा भ्रूमध्याच्या आज्ञाचक्रात किंवा ब्रह्मरंध्राच्या सहस्त्रार चक्रात शिवदर्शन मुळीच होणार नाही. त्या परशिवाचा साक्षात्कार प्राप्त करण्यासाठी माझ्या गुरुने देवाप्रमाणे माझ्या तळहातात इष्टलिंगांचा अनुग्रह करून, निर्निमेश दृष्टिने लिंगानुधान करून, देवोन्मादाच्या आनंदात देहभाव विसरून, लिंग मग्न व्हावे. असा वीरशैव संतांचा सिद्धांत आहे.

अंजनाच्या सहाय्याने भूमिगत असलेले धन दिसले तरी काही लाभ होणार नाही. त्याला कुदळीच्या टिकावाच्या सहाय्याने खणून प्राप्त करण्यास प्रयत्नांची आवश्यकता असते, तसेच शास्त्र ज्ञानाने अहं ब्रह्मास्मि, मी ब्रह्म आहे असे म्हटल्याने ब्रह्म होऊ शकत नाही. त्याला भक्ती, ज्ञान, वैराग्य, सत्क्रिया इत्यादी साधनाने ब्रह्मरूपी धनप्राप्त केले पाहिजे. असे न करीता कोणीही वितंडवादी कोणतीही साधना न करता, केवळ मी साक्षांत ब्रह्मस्वरूप आहे, असे सांगतात, ते हास्यास्पद आहे, जसे आठ दहा वर्षाच्या मुलीने मी माता आहे. म्हणणे हास्यास्पद आहे. त्या कन्येत माता बनण्याची शक्ती सूप्त अवस्थेत असतेच पण ती मोठी होऊन, ऋतुमती होऊन, विवाह करून, पतिगृही जावून, संसार करून बाळकाला जन्म दिल्यानंतरच ती मातृपद प्राप्त करू शकते.

आम्ही सर्व शिवस्वरूप आहोत. पण आम्हांला शिवस्वरूप प्राप्त केले पाहिजे. मुमुक्षु भावनारूपी ऋतुमती होऊन, गुरु अनुग्रहरुपी विवाह करून, स्वानुभवरूपी पुत्रास जन्म दिल्यानंतर आम्ही शिवस्वरूपी माता बनु शकतो. असा वीरशैव संताचा सिद्धांत आहे.

कोणीही व्यक्ति मग ती कोणत्याही पंथाची असो जर त्या व्यक्तिची पूर्वग्रह दूषित दृष्टि नसेल, तर ती व्यक्ति लिंगतत्व जाणून घेऊन, लिंगाला शरीरावर धारण करून, शिवयोगी होईल. लिंग धारण हे जातीचे चिन्ह आहे, असे समजणारे किती तरी सुशिक्षीत आहेत. कित्येक लिंगायत लिंग धारण करणे हे जातीचे चिन्ह समजतात. ते चुकीचे आहे. लिंग हे जातीचे चिन्ह नाही, वीरशैवात जात विजात नाही. सर्व मानव शिवपुत्र आहेत. सर्व सहोदर आहेत. सर्वजण भाऊ भाऊ आहेत. विश्व कुटुंबाला शिवानुभव सुत्रांत गोवणाऱ्या उदात्त तत्वाचे चिन्ह इष्ट लिंग आहे. शिवाला प्रसन्न करण्याचे साधन इष्ट लिंग आहे. आमुक व्यक्ति इटष्लिंग धारण करू शकत नाही. असा काही नियम नाही, इष्टलिंग मुक्तीचे साधन आहे. कोणत्याही जातीचा मुमुक्षु निःसंकोच भावाने त्याला आपल्या गळचात धारण करू शकतो.

गायीच्या शरीरात दुध आहे, म्हणून गाय पुष्ट होईल का ? गायीचे दूध काढून, गरम करून, दही व लोणी करून, तूप केल्यानंतर

त्या गाईस ते तूप पाजल्यानंतर ती गाय दुष्ट होईल. त्याचप्रमाणे आपल्या अंतरंगात वस्तू असून काय उपयोग, ती वस्तू गुरुंकडून आपल्या तळहातात इष्टलिंग रूपात प्रविष्ट झाल्यावर सत्क्रियाव्दारे प्राणाला अनुसंधित केले नाही, तोवर ते प्राणलिंग बनणार नाही. इष्टलिंगाला सत्क्रियेने प्राणाशी अनुसंधित करुन मी हे अनिष्ट दूर केल्याविना प्राणलिंग संबंध होणार नाही. गुरुमुखाने करस्थली इष्टलिंगाला प्राप्त करावे, असे वीर शैव संत म्हणतात.

पिन्डात परमेश्वराचा वास असला तरी परमानंद होत नाही. देहांत देही रहात असला तरी दिव्य आनंद होणार नाही. अंगात प्राण-लिंग असूनही आत्मानंद होणार नाही. नाही, तो अंतरंगात वस्तु होऊन अव्यक्त रुपाने स्थित असल्याकाराणाने ज्याप्रमाणे, मातेच्या गर्भात वास करणारा बाळ मातेचे मुखावलोक करू शकत नाही, आणि ती माताही आपल्या गर्भांत असलेल्या बाळाचे तोंड पाहू शकत नाही, त्याप्रमाणे आपल्या पिन्डात परमोत्म्याचे स्वरुप आम्ही पाहू शकत नाही. कारण आम्ही माता (भक्त) बनले पाहिजे. आपण माता बनून, आपल्या हाताच्या तळव्यांत इष्टलिंग नामक बाळाला ठेवून, त्याचे मुख चुन्बन घेऊन, मंगल केल्यावर त्या मातेला जो आनंद होतो, तो आनंद ती माताच जाणते. वंध्या स्त्रिला त्या सुखाचा अनुभव येणार नाही म्हणून आम्ही माता (भक्त) बनून तो लिंगानंद घ्यावा.

१६. लिंगाचें साकार रूप.

अव्यक्त परशिव या विशाल विश्वातच व्यक्त होतो. प्रगट होतो. अर्थात हे विश्व शिवाचे साकार रुप आहे. हे ब्रह्मांड देवाचा देह आहे. हे विशाल विश्व शिवाचा आकार असल्याने, या विश्व आकारात पूर्वजानी (शरणांनी) लिगाची कल्पना केली आहे. विश्व अंड्याच्या आकाराचे आहे. लिंग हे विश्वाचे चिन्ह (प्रतिक) आहे. वीरशैव ज्या इष्टलिगाची पूजा करतात. ते इष्टलिग, अशा विश्वाच्या आकारात शिवाचे साकार चिन्ह आहे. हे समजल्यानंतर, वीरशैव धर्माच्या बाबतीत कोणाच्याही मनात श्रद्धा प्रेम निर्माण झाल्याशिवाय रहाणार नाही, कारण हा विश्वधर्म आहे.

शरण (संत) ज्याची पूजा करतात, अशा परम निरंजनाचे

चिन्हरूपी इष्टलिंगाला असे उदात्त स्वरूप प्राप्त झाले आहे. बाह्यलिंग (काळ्या रंगाचे कवच असलेले) ब्रह्मांडाशी आकृती आहे. शरणांच्या पूज्या समयी शांभवी मुद्रेच्या आकारात त्याची रचना अंडाकार काळ्या कवच्यांत पंचलिंग सूत्राला ठेवून इष्टलिंगाच्या रूपांत रचना केली आहे. परमात्म्याचे अस्तित्वाचे चिन्ह ब्रह्मांड अथवा विश्व आहे. तर जिवात्म्याचें चिन्ह पिंडांड तनु (शरीर) झाले आहे. विश्वाचे चिन्ह इष्टलिंग ब्रह्मांडाच्या आकारात साकार होऊन, तळहातात येऊन लहान रूप धारण करून, गोलाकार झाले आहे. आत्म्याचे चिन्ह इष्टलिंग पिंडांच्या आकारात साकार होऊन तळहाती येऊन शांभवी मुद्रेचे रूप पावते. लिंगपूजा करतेसमयी भक्त आपल्या डाव्या हातात लिंग धारण करून पूजा करण्याचा संकेत शांभवी मुद्रा आहे. भक्ताचे पद्मासनच पीठ, शीर्ष गोलक, लिंग धारण केलेला डावा हात, गोमुख होऊन, त्या पिंडाच्या आकारात पंचसूत्र लिंगाची रचना करण्यात आली आहे. तसेच बाह्यलिंगात (गोलाकार काळीकांती) अंतर लिंगाची (पंचसूत्रलिंग) रचना करून एकाच इश्टलिंगाची साकार कल्दना केली आहे.

'पिंड ब्रह्मांड योरैक्यम्' या स्मृतिम् वचनाचे खरे अनुसरण लिंगवत (लिंगायत) अर्थात वीरशैवच करतांत. यात शंका नाही. हीच शरणांची अहंग्रह उपासना आहे असे वीरशैव संत म्हणतात.

**१७. वीरशैव विश्वपूजक आहेत**

वीरशैव विश्वपूजक आहेत. आधिभौतिक कल्पनेत भौतिक वस्तूंची पूजा कशी करतात, असा प्रश्न उपस्थित होऊ शकतो. त्याचे उत्तर इष्टलिंगाच्या चिन्हात जगताला बाहेर ठेवून, लिंगाला आत ठेवण्यात आले आहे. विश्व प्रलय होऊ शकतो, विश्वात्मा परशिव प्रलयाच्या आतीत आहे म्हणून वीरशैव विश्वाची पूजा करतात. विश्वाच्या आकारात करतात, ते पिंडीची पूजा न करता, पिंडीत स्थित असलेल्यांची पिंडाकारात (शांभवी मुद्रेच्या आकारांत) पूजा करतात. यास्तव वीरशैवांचे विश्व हे साधन आहे. विश्वात्मा साध्य आहे. साधनाने साध्याची प्राप्ती करताना. साधनेचा तिरस्कार करणे उचित नव्हे, ते योग्य नव्हे. पुस्तकाच्या साधनाने ज्ञान प्राप्त केल्यानंतर त्या पुस्तकांचा तिरस्कार करणे, अविवेक होईल. त्याचप्रमाणे शरण विश्वांच्या आकारात विश्वा-

त्म्यांची पूजा करतात, म्हणून त्यांना विश्वात्म्याप्रमाणे विश्वहीं त्याज्य नसून पूज्य आहे. ते मिथ्या नसून सत्य आहे. शिवलिंग रचनेचा रंगमंच झाला कर्त्याची सुंदर आकृती झाली. विश्व पूजा होत असल्याने चराचर सर्व विश्व शरणांच्या दृष्टीत मंगलमय झाले. शिवमय झाले, कल्याणमय झाले, म्हणून सकल जीवात्म्याचे कल्याण करणारे विश्व कुटुंब महानुभाव महात्मा झाले. दया धर्माचे मूळ आहे. या गोष्टीला जाणून विश्वाच्या जीव राशी विषयी अनुकंपा अथवा दयाभाव दाखवून शिवशरण महात्मे झाले आहेत, म्हणूनच वीरशैवाचा धर्म विश्वधर्माच्या सर्व लक्षणांनीयुक्त आहे. विश्वधर्मच आहे.

प्रचारा अभावी वीरशैव धर्म मागे पडला आहे. परंतु या धर्माची तत्त्वे सर्व धर्माहून फारच श्रेष्ठ आहेत. सर्व धर्मांच्या सुंदर तत्त्व रत्नांचा समन्वय वीरशैव धर्माच्या विशाल महासागरांत आहे. त्या तत्त्वाचे संशोधन करून त्याचा प्रचार केल्यावर वीर शैवांचा हा धर्म विश्व धर्म बनेल

**१८. वीरशैव देहाला देवाचे (आत्म्याचे) मंदीर मानतात.**

शरणांना ब्रह्मांडाप्रमाणे पिन्डांडही (शरीरही) पूज्य आहे. जे शरीर शिवार्पण झाले त्याला विकारादी होत नाहीत. ज्या देहांत देही (आत्मा) वास करतो तो देह अपवित्र होत नाही. त्या देहाच्या बाबतीतही शरणांची पूज्यभावना आहे. मंदीरात देव असतो. भक्त देवाच्या दर्शनास जातो. त्यावेळी अगोदर मंदीर दिसते. मंदीराला पाहून भक्त मंदीराला अगोदर नमस्कार करतो. कारण त्या मंदीरात देव आहे. म्हणून मंदीर हे देवाचे आश्रयस्थान आहे. देवळाशिवाय देव नाही. तसेच देहाशिवाय देही (आत्मा) नाही. देह व देव (आत्मा) यांचा अन्योन्य संबंध आहे, त्यामुळे शिवचरण देही बरोबर देहालाही पूज्य मानतात.

**१९. वेदांती देहाला हीन, मिथ्या, जड मानतात.**

वेदांती (शांकरमतानुयायी) देहाला हीन मानतात, मिथ्या मानतात, ते योग्य नाही. कारण हा देह परमात्म्याचे निवासस्थान आहे. देह देवाचे मंदीर आहे. देव मंदीरात असतो. हे सामान्य माणसालासुद्धा माहित आहे. उदाहरणार्थं एका माणसाने दुसऱ्याला विचारले

की, देव कोठे आहे. दुसरा माणूस सहजच सांगतो. की, देव त्या देवळात आहे. तसेच संत महात्मेसुद्धा सांगतात की, वेव देहांत (देहरुपीदेवळात) आहे त्या देहाला हीन मिथ्या मानने योग्य नाही. साकारात निराकार पाहणे म्हणजे साकाररुपी देहात निराकार रुपी परमात्म्याला पाहणे. हा सर्व महात्म्यांचा सिद्धांत आहे. साकार देह नसल्यावर निराकार परमात्म्याचा शोध करणे जमेल का ? तर जमणार नाही, अशा या देहाला वेदांती हीन मिथ्या आणि जड मानेतात हे योग्य नाही.

२०. जीवंत देह चेतन व सत्य आहे. मृतावस्थेतील देह जड असतो.

देहाला जडत्व फक्त देह प्रेत अवस्थेत असल्यावेळीच असले. देहाला कनिष्ठ व आत्म्याला श्रेष्ठ मानणे योग्य होईल. वेदांती देहाला जड मानतात. तसेच मिथ्याही मानतात. देह जड तर नाहीच आणि देह मिथ्याही नाही. देह मिथ्या नसून सत्य आहे. आणि जड नसून चेतन आहे.

**देह कनिष्ठ व आत्मा श्रेष्ठ उदाहरणार्थ.**

| | |
|---|---|
| पितळ कनिष्ठ | सोने श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| गारगोटी कनिष्ठ | हिरा श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| प्रजा कनिष्ठ | राजा श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| शिष्य कनिष्ठ | गुरु श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| रात्र कनिष्ठ | दिवस श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| अज्ञान कनिष्ठ | ज्ञान श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| भक्त कनिष्ठ | देव श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| अंधत्व कनिष्ठ | दृष्टीत्व श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| बहीरेपणा कनिष्ठ | ऐकू येणे श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| वेडा कनिष्ठ | शहाणा श्रेष्ठ पण दोन्दी सत्य आहेत. |
| पाप कनिष्ठ | पुण्य श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| देवाचे देउळ कनिष्ठ | देव श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| विश्व कनिष्ठ | विश्वात्मा श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| जगत कनिष्ठ | जगदात्मा श्रेष्ठ पण दोन्ही सत्य आहेत. |
| तसेच देह कनिष्ठ | आणि देही (आत्मा) श्रेष्ठ आहे पण दोन्हीही सत्य आहेत. |

वरील तुलनात्मक प्रकारांत कनिष्ठ श्रेष्ठभाव आहे. तसाच देह व आत्मा यांत कनिष्ठ श्रेष्ठ भाव आहे, परंतु मिथ्या सत्य भाव नाही, आहे त्याला नाही म्हणणे अज्ञात आहे, दिसते त्याला दिसत नाही म्हणतो तो अंधळा आहे.

आहे त्याला नाही म्हणणाऱ्या व दिसते त्याला दिसत नाहीं म्हणणाऱ्यापेक्षा अंधळा बरा, कारण आंधळा आहे त्याला, नाही म्हणत नाही. तो म्हणतो की, आहे पण मला ते दिसत नाही. कारण मी आंधळा आहे. आंधळ्याला दिसत नसून आहे त्या वस्तूला नाही म्हणत नाही. परंतु वेदांती आहे त्याला (देहाला) नाही म्हणतात. देह आहे तो सर्वांना पहातो. त्याला वेदांती नाही म्हणतात, आणि (देही) (आत्मा) दिसत नसून त्याला वेदांती आहे म्हणतात. तसेच जगत दिसते त्याला नाही म्हणतात, व ब्रह्म दिसत नसून त्याला आहे म्हणतात. वेदांती देहाला मिथ्या तर मानतातच पण जडही मानतात, देह मिथ्या तर नाहीच पण जडही नाही. देहाला जडत्व फक्त, देह प्रेत अवस्थेत असतो ! त्यावेळीच असते. प्रेतावस्थेच्या अगोदर तो देह व त्याचे माता पिता अशी परंपरा सर्व चेतन असते, या सर्व परंपरेचे मूळ ब्रह्म तेही चेतनच आहे. परमात्म्याने निर्माण केलेले जगत चेतनच आहे. तसेच मिथ्या नसून सत्य आहे. हालत्या चालत्या बोलत्या देहाला जड म्हट-ल्यास दगड धोंड्याला काय म्हणावे ते वेदांती (शंकरमत अनुयायी) सांगतील का ?

या देहाची मागची परंपरा मूळ इश्वरापर्यंन्त चेतन आहे हे आपण पाहिले आहे. ईश्वरापासून निर्माण झालेले या देहाचे आई-वडील चेतनच आहेत. चेतन पित्याच्या चेतन बिजापासून, चेतन आईच्या उदरांत गर्भ धारणा होते, तो गर्भ आईच्या उदरात वाढतो. त्यावेळीही तो चेतनच असतो, म्हणून गर्भ वाढतो, योग्य वेळी तो बालक देह गर्भातून बाहेर येतो. तोही चेतनच असतो. पुढें तो मरेपर्यंन्त चेतनच असतो. अशा ह्या चालत्या बोलत्या जिवंत देहाला वेदांती जड म्हणतात, वेदांत्याचीही विपरित भावना आहे. ज्या वस्तूला सुखदुःखाची जाणीव होत नाही, ती वस्तु जड असते, व ज्या वस्तूला सुखदुःखाची जाणीव होते ती वस्तू चेतन असते. असा अनुभव असून, हे वेदांती आहे. त्याला

नाही म्हणतात व नाही त्याला आहे म्हणतात. जगत दिसते त्याला मिथ्या म्हणतात. आणि दिसत नांही. त्या ब्रह्माला सत्य म्हणतात. वेदांत्यांच्या या सर्व प्रकारचा सारासार विचार केल्यावर असे वाटते की, वेदांती भ्रमिष्ट आहेत. त्यांचे ज्ञान ब्रह्मज्ञान नसून भ्रमज्ञान आहे अनेसच म्हणावे लागेल. ह्या वेदांत्यांनी ब्रह्मज्ञानाऐवजी भ्रम ज्ञानाचा प्रचार करून फारच घोटाळा केला आहे.

वेदांती देहाला हीन व मिथ्या दर्शवून तो देह कोणत्याही स्थितीत असला तरी काय अशी उदासिनता बाळतात. परंतु शिवशरण (संत) परमात्म्या शिवाला (आत्म्याला) प्रसन्न करण्याचे (प्राप्त करण्याचे) साधन हा देह आहे. त्यामुळे तो मिथ्या नाही. व हीनही नाही, असे म्हणतात.

अनाहत चक्रात (हृदय कमलात) असलेला अंतर आत्मा अंगावर इष्टलिंग होऊन आल्यावर त्याला छातीवर धारण केले पाहिजे. विशुद्धी चक्राच्या कुटांत काही लोक लिंग धारणा करतात. आणि काही लोक दंडावर धारण करतात. कामधंदा करतेवेळी छातीवर लिंग असल्याने कामात बाधा होत असेल तर लिंग दंडावर बांधावे. काही लोक बेंबीच्या खाली लिंग ठेवतात. चालू कालातले तरुण लोक कमरेजवळ लिंग बांधतात. ह्या सर्व चुकीच्या पद्धती आहेत, अंतर आत्म्याचे चिन्ह इष्टलिंग, अनाहत चक्रावर (छातीवर) असले पाहिजे. याला आणखी एक महत्त्वाचा आधार आहे. योग दृष्टीने आधार चक्रात परमात्मा आहे, ब्रह्मरंध्र चक्रात परमात्मा आहे. हृदय अथवा आधार चक्रात अंतर आत्म्याचे अस्तित्व आहे. तप अनुष्ठान पूजेने अंतरिकतेचा उदय होऊन, अधोमुख जीवात्मा उर्ध्वमुख होऊन, एक चक्रात प्रवेश करतो. हा प्रमाणानुगुण ब्रह्मरंध्रस्थित परमात्मा खाली उतरून येतो. जीव उर्ध्वमुख होणाऱ्या क्रियेला उत्क्रांती तत्त्व म्हणतात तसेच. परमात्म्याचे चैतन्य उतरून येणाऱ्या क्रियेला उद्धारक तत्व म्हणतात जीवाचे व शिवाचे मिलन अनाहत चक्रांत होते. खालून वर चढणाऱ्या जीवाची भक्ती आणि वरून खाली प्रवाहीत होणारी शिवाची शक्ती यांचे हृदयांत मिलन होते. दोन्ही एकमेकांत समरस होतात. हीच मुक्ती होय, असे शीव योग्याचे मत आहे. म्हणून इष्ट लिंग मुक्तीचा प्रतिनिधी

आहे. मुक्ती प्रदान करणारे चिन्ह आहे. म्हणून या चिन्हाला हृदय कमलावर (छातीवर) धारण करावे, आम्ही भोजन करतो तेव्हां प्रत्येक वस्तू लिंगाला मागे चढवून, त्याला अर्पण करून, प्रसाद रूपामध्ये त्या वस्तू स्विकार केल्याने, आमचीं कायाही प्रसाद काया बनते. आमचे जीवन पावन होते, असे वीरशैवांचे मत आहे.

**२२. वीरशैवांचा देव जन्मा अगोदर पासून ते शेंवटी मेल्यावर सुद्धां अखंड त्याच्या बरोबर असतो.**

आम्ही कोठेही गेलो तरी आमचा देव समोरच असतो. आम्ही चालतो. तेव्हा आमच्या देवावरोबर चालतो. आम्ही त्याच्या पावलावर चालतो. आमचा देव आमच्याबरोबर असल्यामुळे आम्हाला कधीच अपयश येत नाही, दुःख व दारिद्रय जवळसुद्धा येत नाहीत. यमसुद्धा आमच्यासमोर येत नाही. विघ्नांची बाधा होत नाही. अपघाती मृत्यु येत नाही. याकरिता इष्टलिंग नित्य छातीवर धारण केले पाहिजे. त्याची पूजा करून कोठेही ठेवणे योग्य नाही. माझ्या आत शिव आहे. बाहेर आणि समोर शिव आहे. त्याला सोडून आम्ही क्षणभरही रहात नाही. अशी सद्भावना जागृत रहाण्याकरिता, अंगावर लिंग सदासर्वदा धारण करणे मंगलकारक आहे. वीरशैवांचा देव जन्माबरोबर असतो, तो मेला त्यावेळीही त्याच्यावरोबर असतो.

**२३. काळचा कांतियुक्त लिंगाचे महत्व आणि गुरु दीक्षा घेण्यास भिणाऱ्याचे समाधान.**

आतापर्यंत इष्टलिंगाचे आकार आकृती वगैरे तात्त्विक प्रकार पाहिला, आता त्याच्या काळचा रंगाचे मर्म समजण्याचा प्रयत्न करू. बालक जन्मल्याबरोबर लिंगायत त्याला लिंग दीक्षा करतात. काही लोक मातेच्या गर्भालाच आठव्या महिन्यात लिंग दीक्षा करतात. जन्मतच बालकाला जे लिंग दिले जाते त्याला कन्नडमध्ये हुट्टुलिंग म्हणतात. सद्गुरू शिलेच्या निर्जीव लिंगात मंत्रद्वारे प्राण फुंकून बालकाच्या गळचात लिंग बांधतात. त्यामुळे वायुप्राणी प्राणीलिंग बनतो. तो दहा वर्षाचा झाल्यावर सद्गुरु त्याला लिंग दिक्षा करतात. लिंग धारण व लिंग दीक्षा या दोन क्रियांत बरेच अंतर आहे. विवाहात

ज्याप्रमाणे वाङ्‌मनिश्चय हे एक कार्य आहे, आणि विवाह अंतिम कार्य आहे, असे समजावे, लिंग दीक्षा विवाह कार्य समजावे. लिंग पतीला साथी करण्याला लिंगाबरोबर दिक्षा क्रिया द्वारा विवाह होणे आवश्यक आहे. गुरुचा हात शिष्याच्या मस्तकाबरोवर संयोग पावल्यास तीच क्रीया दिक्षा म्हणविली जाते. काही लोक दिक्षा घेण्यास भितात. दिक्षेला भिणारे लोक धार्मिक म्हणविले जाणार नाहीत. दिक्षा घेतल्यावर बऱ्याच नियमांचे पालन करावे लागते. त्या नियमाचे पालन करू शकलो नाही तर मोठे पाप लागते. अशा कल्पनेचे खंडण केले आहे. वीरशैवात व्यर्थ कर्मठपणाला विशेष महत्व नाही. सदाचाराला महत्व आहे. काही लोक कर्मठपणाला महत्व देतात परंतु ते चुकीचे आहे. नवतरुणावर त्याचा विपरित परिणाम होत आहे.

**२४. लिंग दीक्षा घेण्याकरिता शुष्क नियमाची कांहीच गरज नाही.**

लिंग दीक्षा मिळविण्याकरिता शुष्क नियमांचे पालन करण्याची मुळीच आवश्यकता नाही, असे वीरशैवांचे स्पष्ट मत आहे. प्रत्येक व्यक्तिने लिंग दिक्षा घ्यावी. दिक्षा देतेवेळी सद्‌गुरु (हुट्टुलिंग) जातक लिंगावर चढवलेल्या काळचारंगाच्या अवरणावर चित्काला भरून शिष्याला देतो, म्हणून ही काळी कांती अतिमहत्व पूर्ण आहे. लिंगावर जे काळी कांती (कृष्ण वर्ण कवच) चे शास्त्रीय नांव आष्टबंध सज्ज रस आहे. कापूर अथवा तुपाचा दिवा जाळून त्याच्या काळचा काळजाला काजुच्या तेलांत मिसळून कांती तयार करतात. त्यांत आणखी कांही वस्तू मिसळतात. कांती सिद्ध करून मूळ शिला. लिंगावर अवरण चढवतात. त्यामुळे इष्टलिंग चमकते. जांभळासारखा चकमकीत काळा रंग येतो. तो फारच आकर्षक असतो. गुरुनें त्यांत चित्काला भरल्यावर त्यांत दिव्य तेजही येते त्याला निर्निमीष पाहात रहाण्याची प्रबल इच्छा होते, ही काळी कांती डोळयाच्या काळचा पुतळचांना आकर्षित करते, डोळयातल्या पुतळचा काळचा आणि लिंगाची कांतीही काळी हा काळा रंग त्या काळचा रंगास आकर्षित करतो. दोन्ही एक होतात. तेव्हा लिंग पूजकाची दृष्टी लिंगात एकाग्र होऊन लय पावल्यावर मनोलय होऊन, लिंगांग समरस होऊन जातो. म्हणजे जीव शिवांत विलिन होतो. याला त्राटक योग म्हणतात. शिव योग्याचा त्राटक

महिमा विशेष महत्वपूर्ण आहे आणि फारच सोपा आहे.

२५. लिंगानुसंधान कसे करावे त्याची माहिती.

आता लिंगानुसंधान कसे करावे ते पाहू. उत्तम कांतीयुक्त लिंगाला डाव्यां हातात ठेवून नाकाच्या शेंडयापासून १०–१२ इंचाच्या अंतरावर धरावे. डोळयावर बाहेरचा उजेड पडू नये, पुजेला वसताना आपल्या मागे एक लहानसा तेलाचा दिवा लावून ठेवावा. त्या दिव्याच्या ज्योतिची लहान प्रतिमा लिंगात दिसेल, त्याला बिंदू म्हणतात. त्या बिंदूला अर्धोन्मिलित डोळयाने एकटक पाहात रहावे, काळया कांतीच्या लिंगात दृष्टि स्थिर केल्यावर, त्या दृष्टिबरोबर जे मन असते तेही स्थिर होतें. आणि त्या मनात जो चंचल भाव असतो तोही स्थिर होतो. याप्रमाणे शिवात्मलिंगात, भाव उन्मादाने मग्न व्हावे, हेच लिंगानुसंधान होय, इतर बाह्य कर्माची मुळीच आवश्यकता नाही. इष्टलिंगात दृष्टिस्थिर झाली, त्या दृष्टीत मन स्थिर झाले. त्या मनांत भाव स्थिर झाले. त्या भावात अचल होऊन, परमात्मलिंग स्थिर होऊन त्या महालिंगात एक होणे म्हणजे लिंगाशी समरस होणे होय. यालाच मोक्ष मुक्ती म्हणतात. असे शिवशरणांचे मत आहे.

२६. लिंगानुसंधान करण्याची क्रिया प्रत्यक्ष गुरुकडून समजावून घ्यावी.

लिंगानुसंधान करण्याची क्रिया प्रत्यक्ष गुरुकडून समाजावून घ्यावी. लिंगानुसंधानाने साधक लिंगानंदाच्या उन्मेषांत स्थिर होतो. शिवानुभवी होतो, या सर्वांचे कारण, एक काळी कांती आहे, हे विसरता कामा नये.

इष्टलिंगाच्या कांतित दृष्टि ग्राहक शक्ती आहे. दृष्टिला आकर्षित करण्याची शक्ती आहे. दृष्टिचा लय करण्याची शक्ती आहे. इतकेच नव्हे तर साधकाला शिवाजवळ घेऊन जाण्याची शक्ती तळ हातातल्या इष्ट लिंगातल्या ज्योतीत आहे, हे इष्टलिंग रूपाचे सार सर्वस्व आहे, आता पर्यन्त लिंगाचे साकार स्वरूप पाहून घेतले, आता पुढे लिंगपूजा व मूर्ती पूजा यांचा विचार करू.

२७. लिंगपूजा आणि मूर्तीपूजा यातील साम्य व भेद. ( लिंगपूजा श्रेष्ठ व मूर्तीपूजा कनिष्ठ)



इष्टलिंगाची पूजा करणे करणे म्हणजे मूर्ती पूजा करणे होय.

असे सामान्य लोक समजतात. सुशिक्षित लोकांची देखील हीच धारणा आहे. परंतु ती चुकीची आहे, मूर्ती पूजा करा, किंवा करू नका, या विषयी चर्चा न करता लिंग पूजा ही मूर्ती पूजा नव्हे, हे स्पष्ट करतांना लिंग ही मूर्ती आहे. या भ्रामक कल्पनेचे निराकरण करू या. त्यातील साम्य व भेद कोणते ते पाहू या.

| लिंग पूजा श्रेष्ठ | मूर्ती पूजा कनिष्ठ |
|---|---|
| १. साकार पूजा | १. साकार पूजा |
| २. अहं ग्रह उपासना | २. प्रतिक उपासना |
| ३. परमात्म्याच्या चिन्हाची पूजा | ३. महात्म्याच्या मूर्तीची पूजा |
| ४. मुक्ती दात्याची पूजा | ४. मुक्तात्म्याची पूजा |
| ५. नित्य मंगल दात्याची पूजा | ५. सावयव साकाराची पूजा |
| ६. निराकाराची साकार पूजा | ६. साकाराची साकार पूजा |
| ७. शिवाद्वैत भावनेने पूजा | ७. व्दैत भावनेने साकार पूजा |
| ८. अर्चना अनुसंधानास स्थान आहे | ८. केवळ अर्चनेकरिता (भक्तांना) स्थान आहे. |
| ९. विश्वाच्या आकारात पूजा | ९. मानव, प्राण्याच्या आकारात पूजा. |
| १०. निर्गुण साक्षात्कार साध्य | १०. सगुण साक्षात्कार साध्य |
| ११. समुद्र पूजा (सर्वमहात्म्याची पूजा | ११. नदीची पूजा (एकाच महात्म्याची पूजा |
| १२. एक देव उपासना | १२. बहुदेव उपासना |
| १३. अंगावर धारण करून हातात ठेवून पूजा | १३. मंदीरात अथवा घरी ठेवून बाजूला ठेवून पूजा |
| १४. हर जन्माने पूजा | १४. नर जन्माने पूजा |

आतापर्यंत लिंग व मूर्ती यांच्यामधील साम्य व विरोध स्थूल मानाने पाहीला आता सूक्ष्म दृष्टिने पाहू.

(१) लिंग आणि मूर्ती पूजा साकार पूजा आहे. (२) लिंग पूजा अहं ग्रह उपासना आहे. अर्थात स्वरूपाची पूजा आहे. (३) लिंग पूजा परमात्म्याच्या चिन्हाची पूजा आहे. ही शिवाची साकार पूजा आहे. परंतु मूर्ती पूजाही परवस्तूची साकार पूजा नसून कोण्यातरी

महात्म्याची प्रतिमा बनवून तिची पूजा आहे. ही लिंगपूजा नव्हे हे स्पष्ट आहे. (४) लिंग पूजा ही मुक्तीदात्याचीं पूजा आहे. कारण मानव जातीच्या सृष्टि स्थिती लय आदिना कारण तसेच कर्ता आणि योग्य मुमुक्षूंना मुक्ती देणारी जी परत्परवस्तू आहे. अशा, परशिव परमात्म्याचे चिन्ह इष्टलिंग आहे. म्हणून इष्टलिंगपूजा मुक्तिदात्याची पूजा आहे. परंतु मूर्ती पूजाही मुक्तात्म्याची पूजा आहे. मुक्तीची इच्छा करून त्याकरिता प्रयत्न करून मुक्त झालेल्या महंताच्या मूर्तीची पूजा, आहे. लिंग पूजा ही इच्छित फल देणाऱ्या महादानीची पूजा आहे. आम्ही दात्यास मागत आहोत. पण मूर्ती पूजा ही स्वतः मागून मुक्त झालेल्या मुमुक्षूंना मागणे आहे. तो दुसऱ्याला मुक्ती देऊ शकणार नाही. (५) लिंग, पूजाही मंगलमय, दया सागर, कल्याणनिधी परमात्म्याची पूजा आहे, नित्य मंगल दात्याची पूजा आहे. परंतु मूर्ती पूजा महात्म्याची पूजा आहे. तो मंगल दाता नाही. (६) लिंग पूजा ही निरावयव साकार पूजा आहे. कारण लिंगाला अवयव नसतात. परंतु मूर्तीपूजा साकार सावयाची पूजा आहे. लिंग पूजा निराकार, निरंजन, परस्तूची पूजा आहे. परंतु मूर्तीपूजा एका साकार व्यक्तिची प्रती साकार पूजा आहे. लिंग पूजेत शिवअद्वैत भावना आहे. या तत्वावर लिंगाची रचना झाली आहे. मूर्तीत मी आणि तुम्ही ही द्वैत भावना रहाणारच (९) लिंग पूजेत लिंगानुसंधान आहे. आणि लिंगाची कांती काळ्या रंगाची असल्याने त्राटक योग करण्याची चांगली सोय आहे. परंतु मूर्ती पूजेअ त्राटक करण्याची सोय नाही. (१०) लिंग पूजा ही शिवाचे साकार रूप विश्व, त्या विश्वाच्या आकाराची कल्पना लिगात आहे. विश्वात्म्याची विश्वाच्या आकारांत पूजा करणे हीच लिग पूजा आहे. परंतु मूर्तीपूजा मानव किंवा पशु. (नंदी, गाय, हत्ती, घोडा, सर्प) च्या आकारात होते. (११) लिंग निरंजन निराकाराचे चिन्ह असल्याने आत्मसाक्षात्कार पावणे, लिंग साधकाला सरळ मार्ग आहे. मूर्ती सगुण साकार असल्याने सगुण साक्षात्कारातच थांबते. यांत निर्गुण साक्षात्कार फारच कठीण आहे अशक्य आहे. (१२) लिंगपूजा म्हणजे समुद्र पूजा आहे, मूर्तीपूजाही नदीची पूजा आहे. सर्व नदी रूप महात्मे जेथे जाऊन लिन होतात. अशा समुद्रात सर्व महात्म्यांना आश्रय देणाऱ्या मुक्ती दात्याची

ती लिंग पूजा आहे. (१४) लिंग पूजा करणारे आपल्या लिंगाला नित्य अंगावर धारण करुन, हातात ठेवून पूजा करतात. यात देवाचे स्मरण नित्य जागृत रहाते. मूर्ती पूजक मंदीरांत किंवा घरात ठेवून पूजा करतो, यात सदाकाल देवाचे स्मरण रहातेच असे नाही. (१५) सद्गुरु शिष्याचा नरजन्म हटवून, हरजन्म प्रदान करतात. आणि इष्टलिंग संबंध करतात, त्यायोगे लिंगवत हरजन्मापासून हराची (शिवाची) पूजा करतो.

मूर्ती पूजेत लिंग भेद आहे. लिंग पूजेत लिंग भेद नाही. रामकृष्ण शिव काली, सरस्वती, इत्यादिकांच्या मूर्ती समोर ठेवल्यास सहजगत्या स्त्री पुरुष कल्पना दृष्टी पुढे येते. लिंगात स्त्री-पुरुष भेद नाही मूर्तीत स्त्री पुरुष भेद येतो.

आता पर्यन्त आपण लिंग पूजा व मूर्ती पूजा यांच्या विविध पैलुंचे सूक्ष्म दृष्टिने निरीक्षण केले आहे. आता इष्टलिंग पुजा व स्थावर लिंग पूजा यातील फरक पाहू.

२८. इष्टलिंग पूजा श्रेष्ठ आणि स्थावर लिंग पूजा कनिष्ठ याचा तुलनात्मक विचार

| | |
|---|---|
| वीर शैवांचे उपास्य दैवत | १. शैवांचे उपास्य दैवत |
| भक्त नित्य अंगावर धारण करतो. | २. मंदीरात किंवा अंगणात पूजा करतो. |
| पर शिवाचे चिन्ह आहे. | ३. शिवाचे चिन्ह आहे. |
| अहं ग्रहोपासना | ४. लिंग उपासना. |
| गुरु निचितकाला भरून शिष्याला देतात. | ५. समाजाकरीता मंदीरात प्रतिष्ठापना करतात. |
| भक्त एकटाच त्याची पूजा करतो. | ६. पुजारी पूजा करतात. |
| शिवयोग त्राटक योग होतो. | ७. केवळ भक्ती योग होतो. |
| भक्त कोठेही जावो सोबत घेऊन जातो. व पूजा करतो. | ८. भक्त आपल्या सोबत घेऊन जावु शकत नाही. तो कोठे गेला तर त्याची पूजा बंद पडते. |
| चेतनामय देहच देवालय आहे. | ९. अचेतन मंदीर हेच आलय आहे. |
| ही पूजा रिस्टवॉच (हात घड्याळ) आहे. | १०. ही पजा टॉवर क्लॉक प्रमाणे आहे. |

| | |
|---|---|
| इच्छा झाल्यावर कितीही वेळ पूजा करू शकतो. | ११. निर्दीष्ट वेळेपर्यंत पूजा करू शकतो. |
| या पूजेत अव्हान विसर्जन नाही. | १२. यांत आव्हान विसर्जन आहे. |

इष्टलींग व स्थावर लिगाचे तुलनात्मक अध्ययन केल्यावर इष्टलिग भक्ताला किती सुविधा जनक आहे ते समजुन आले.

२९. लिंग आगम प्रतिपादित निराकार परब्रह्माचें (शिवाचें) चिन्ह आहे.

लिंगरूपी ब्रह्म चिन्हाची, पत्र पुष्पादि पूजा द्रव्याने पूजा करून, खाद्य पेयादि वस्तु ब्रह्मार्पित भावनेत समर्पण करून, तीर्थ प्रसाद रूपांत सेवन करण्याचा सुयोग लाभून येतो. तसेच शांभची योग मुद्रेच्या त्राटक प्रयोगानें दृष्टी व मन स्थिर करण्यासाठी (ब्रह्मचिन्ह) कांति युक्त लिंग उपयुक्त आहे. आणि मानव तनुवर (शरीरावर) शिलामय शिवलिंग अखंडपणे धारण करण्यास उपयुक्त आहे. तनुत्रय अचरणमय मानव पशूला, पशूपति असलेल्या शिवलिंगाची धारणा अखंडपणे पाहिजे असे सिद्ध होते. शिवलिंग दीक्षा व शिवलिंग शरीरावर धारणा श्रीगुरुच्या हस्ते करावी.

जगातील सर्व आस्तिक धर्मानी या गोष्टीला मानले आहे कीं, ईश्वर एक आहे. हिन्दू धर्मात ही देव एकच आहे. परंतु हिन्दू धर्मात उपासनेत एक देवतेचा सिद्धान्त दिसत नाही. हिन्दूच्या उपासनेत अनेक देवतांची कल्पना आहे. लिंगायत धर्म समाज समन्वय दृष्टि प्रत्यक्षांत तत्व साधणारा ज्ञानियांचा संघ आहे.

वीरशैव अथवा लिंगायत एक जात आहे असे अनेक लोक समजतात. पण ती चुक आहे, अन्याय आहे. लिंगायतासारखा आचार विचार असलेला व लिंगधारण करणारा असेल त्याला वीरशैव अथवा लिंगायत म्हणावे.

पतीव्रता स्त्रीला एकच पती असतो तसेच श्रद्धावान भक्ताला एकच देव असतो. शरण (संत) सती, लिंग पती, या वीरशैव सिद्धांताला आत्मसात करून इष्टलिंग धारण केल्यावर अन्य देवतांची पूजा आराधना करणे, आध्यात्मिक व्यभिचार आहे, लिंग भक्त झाल्यावर आपल्या अंगावर धारण केलेल्या लिंगाची अनन्य निष्ठेने पूजा केली

पाहिजे. लिंगच पती मी सती हा भाव दृढ झाला पाहिजे.

वीरशैव धर्माचे अनेक विषय शैव धर्मात आहेत. वीरशैवांनी नंतर काही नवीन तत्त्व रचना करून अधिक प्रगती केली आहे. वीरशैव व शैव धर्म यांत मुख्य भेद इष्टलिंग पूजा व स्थावर लिंग पूजा यात आहे.

३०. स्थावर शिवलिंग पूजेचा विरोध करण्याचे कारण

स्थावर लिंगपुजेचा विरोध करण्याची अनेक कारणे शरणांनी (संतांनी) पाहिली असतील. मोठमोठ्या तीर्थक्षेत्रात प्राचीन काळीच नव्हे तर आजही अनेक अत्याचार होतात. हे जाणण्याकरिता दयानंद सरस्वती यांचा सत्यार्थ प्रकाश ग्रंथ वाचावा अथवा त्या क्षेत्री काही दिवस राहून सूक्ष्म दृष्टीने तेथे चाललेला अत्याचारी व्यवहार पाहावा पुजाऱ्याच्या तावडित फसून दुःख पावणाऱ्या भक्तांना पाहून वीरशैवांनी स्थावर शिवलिंग पूर्वजचा विरोध केला आहे. मंदिराला न जाता सरळ आध्यात्मजीवी होऊन शिवाला प्राप्त करण्याचा सरळ मार्ग इष्टलिंग अंगावर धारण करणे व त्याची पूजा करणे हे आदिकालापासून आजतागायत निर्वेधपणे चालू आहे.

दूध मिळाले असता तुपाची चिंता का करु ? इष्टलिंग माझ्या हातात असता, तीर्थक्षेत्री कशाला जाऊ ? लिंग तीर्थप्रसाद मिळाल्यावर अन्य बोध व अन्य शास्त्रांची इच्छा का करु ? इष्टलिंग धारण करून स्थावर लिंगाला शरण जाणे म्हणजे व्यभिचार केल्याचे पातक लागेल. आपल्या जवळ इष्ठलिंग असताना तीर्थक्षेत्राला जाण्याची गरज नाही. लिंग विश्वाचे प्रतिक आहे. लिंगात सर्व विश्व आहे. त्या लिंगाची पूजा केल्याने सर्व विश्वाची पूजाअर्चा आपोआपच होते. त्यामुळे तीर्थक्षेत्राला जाण्याची काहीच आवश्यकता नाही. तीर्थक्षेत्रांत विशेषतः जेव्हां यात्रा भरते, त्यावेळी जी घाण, अत्याचार, पापाचरण होते ते पाहवले जात नाही, आणि जिकडे पहावे तिकडे मलमुत्र विसर्जन करतात. नंतर त्याच तीर्थक्षेत्रामध्ये हात पाय धुतात व स्नानही करतात, कपडे धुतात. अशा अनेक प्रकाराने घाण झालेल्या पाण्याला पवित्र तीर्थ मानून पितात सुद्धा. हे सर्व पाहून शहाण्या माणसाला अतिशय वाईट वाटते व पुन्हा तीर्थक्षेत्राला जाणे नको वाटते. कधीही तीर्थ यात्रा करू नये असे वाटते. तीर्थक्षेत्रात चोरीमारी, व्यभिचार, छळ कपट इत्यादी

अन्याय राजरोस चालतात या सर्व प्रकारांचा विचार करून शरणांनी (संतांनी) देवाच्या नावावर चालणाऱ्या ह्या पापाला थांबविण्यासाठी तीर्थक्षेत्री जावू नको असा उपदेश केला आहे. आणि तीर्थक्षेत्रातल्या देवाला स्वतःमध्ये पाहण्याचे उदात्त आध्यात्मिक तत्त्व दाखविले आहे. आणि स्वतः व इतरांना शिवानुभवी बनविले आहे. दगड, माती, वृक्ष, तांबे, पितळ आदी वस्तूंच्या बनवलेल्या प्रतिकांत किंवा मूर्तीत देव नाही. काशी केदार, रामेश्वर, गोकर्ण वगैरे क्षेत्रांत व मंदिरांत देव नाही. माती शिवाय घट नाही व आपणाशिवाय देव नाही. तो आपल्या अंतःकरणात आहे. बाहेर कशातही नाही, देवाला बाहेर हुडकत न बसता त्याला आपल्या अंतःकरणात पाहिले पाहीजे. ब्रह्मांडात जे विश्व चैतन्य आहे, तेच पिंडात आहे. (पिंड म्हणजे आपले शरीर) असा दृढ विश्वास ठेऊन आनंदाने त्याच्या शोधार्थ व्याकूळ होणे हेच आध्यात्म आहे. आध्यात्माच्या या उदात्त कल्पनेला समोर ठेवून तीर्थक्षेत्रांत देवाला न हुडकता आपल्या अंतःकरणांत त्याला हुडका असा वीरशैव शरणांचा (संतांचा) संदेश आहे. देहातच देहीला (देवाला) मिळवले पाहिजे. देवाला बाहेर हुडकणे मूर्खपणा आहे. येथे एक शंका निर्माण होते. वीरशैव इष्टलिंगरूपी बाह्य वस्तूची पूजा करतो. तेव्हा तोही यात्रेकरूप्रमाणेच मुढ नाही का ? वीरशैव जर इष्टलिंगातच परमात्म्याला हुडकत असते तर ते ही मूढच झाले असते. परंतु वीरशैव परमात्म्याला इष्टलिंगातच हुडकत नाहीत तर तळ हातातील ज्योतीत गुरुकृपेने मिळालेल्या इष्टलिंगाची चित्कला रूपी ज्ञान ज्योती घेऊन आत पिंडात जो अंधार आहे. त्याला पळवून अंतःकरण किरण असून जगमगणाऱ्या चिदंशीक प्राणलिंगाचा (आत्मलिंगाचा) साक्षात्कार करतो. रश्मींच्या सहाय्याने जसे रविला (सूर्याला) पहातो, तसेच चिदंशीक रूपी रश्मी धरून मूळ चैतन्य (परमात्मा) रूपी सूर्याला शरण (संत) पहातात. अंतरआत्मा परमात्म्याला पावतो. आणि स्वयं स्वयंमेव होऊन जातो. आत्मतत्त्वात विलीन होऊन जातो.

**२१. इष्टलिंग हे देहरूपी गुहेत असलेल्या आत्मलिंगाला पाहाण्याकरिता प्रकाशयुक्त दिवा आहे.**



इष्टलिंग ज्योती आहे. तो दिवा आहे असे अनेक संत वचनात

संतांनी सांगितले आहे. शिवशरण तळहातातील लिंगरूपी ज्योती घेऊन (दिवा घेऊन) देहरूपी देवालयात प्रवेश करून, आत्मलिंगरूपी देवाला पाहातात व त्यांचा देहच देवालय बनला आहे, असा देव निर्मित चैतन्ययुक्त देह देवालयाला सोडून, मानव निर्मित दगड धोंडयाने बांधलेल्या देवालयाला जाण्याची इच्छा त्यांना राहिली नाही, देहरूपी देवालयात भाव सिंहासनावर जीवरूपी मालकाची पूजा करण्याचा उपदेश त्यांनी (संतांनी) आपल्या आचरणांनी केला आहे. मानव निर्मित देवालयात जे अनिष्ट प्रकार घडतात ते पाहून देवळातील देवाची आराधना करण्याच्या पद्धतीचा शरणांनी विरोध केला आहे. देहालाच देवालय बनवून, अंतरआत्म्याची आराधना करून अध्यात्म-जीवी झाले आहेत.

**३२. साकार मानवरूपी देहमंदिरात निराकार आत्मलिंग रूपी देव राहातो. ज्ञानी लोक त्याची पूजा करतात.**

माझा देहच तुमच्याकरीता मंदिर झाल्यावर, हे देवा मला भय कसले. शिवलिंगा मला भय नाही. माझे दोन्ही पायच देवालयाचा पाया आहे. देहच मंदिर आहे. देवालयाचे शिखर आणि सुवर्ण कलश माझे शीर आहे. माझे कान किर्तीमुख आहेत. जीभ घंटा आहे. डोळे निरांजन आहे. तोंड दार आहे. दंतपंक्ती मोत्याच्या माला आहेत. ओठ हेच कवाड आहे. समय हेच जल आहे. सद्‌गुण हेच गंध आहे. माझी स्थिती ह्याच अक्षता आहेत. माझे ज्ञान हेच पुष्प आहे. माझे मन हाच पुजारी आहे. अशातऱ्हेने मी तुमची नित्य पूजा करतो, अशा शरणांस कशाचीही चिंता नाही.

देहाचेच देवालय बनवून, आपल्या हृदयस्थ पिंडात वास करणाऱ्या पिंडस्थ देवालयात वास करणारा देही, (परमात्मा) त्या परमात्म्याची पूजा करण्याचा आग्रह शिवशरण करतात. अशा प्रकारे विश्वधर्माच्या मूळ तत्वांचा उपदेश आणि प्रचार करतात.

येशू ख्रिस्त, बुद्ध, राम कृष्ण आदि सर्वांना पूज्य होऊ शकले नाहीत. यांतून कोणीही जगातील सर्व मानवांना पूज्य होऊ शकले नाहीत. ते आपआपल्या अनुयायांनाच पूज्य झाले आहेत. पण जगातील सर्वांना कोण पूज्य आहे असा प्रश्न उद्‌भवतो. असे वाटणे सहाजिकच

आहे. याचे उत्तर हृदय पूज्य आहे. हृदय सर्वांना आवश्यक आहे. विना हृदयाचा या जगात कोणीच नाही. प्रत्येक मानवाच्या हृदयात वास करणारा देव एकच आहे. तोच हृदयस्थ देव सर्व मानवांना वंद्य आहे, पूज्य आहे. तोच सर्वश्रेष्ठ आहे, तो विश्वव्यापी आहे, तोच विश्व निर्माता आहे, तोच विश्वात्मा आहे अशा सर्व वंद्य, सर्वप्रिय, सर्वांतर्यामी देवाची आराधना करण्याचा दिव्य संदेश शिवशरणांनी दिला आहे. म्हणून वीरशैवांचा धर्म, मानव धर्म आहे. तोच विश्वधर्म आहे. आणि तोच विश्वारंभापासून आतापर्यंत भारतीय आर्यांचा. (वीरशैवांचा) धर्म आहे. तो अनादि आहे. अनंत कालाचा आहे. आणि तोच धर्म सर्व श्रेष्ठ आहे.

**३३. प्रत्येक मानवाने शरीरावर धारण केलेल्या बाह्यलिंगाची ( इष्टलिंगाची ) पूजा करावी आणि ती आपण स्वतःच करावी, दुसऱ्याकडून करवू नये.**

ज्याप्रमाणे आपल्या पत्नीचे रतीसुख व आपले भोजन लोकांकडून करविले जात नाही, त्याप्रमाणेच आपल्या देवाची पूजाअर्चा दुसऱ्याकडून करू नये. ती आपली आपणच करावी असा वीरशैवांचा सर्वश्रेष्ठ सिद्धांत आहे.

पुजारी पोटाकरीता पूजा करतात. पैसा मिळवण्याकरिता करतात. आमच्या भावनेची, आमच्या श्रद्धेची, त्यांना काहीच किंमत नसते.

असे श्री बसवेश्वराचे मार्मिक वचन आहे. या वचनातील विचार देश कालातीत आहे. कोणत्याही देशातील, जातीतील, पंथातील, धर्मातील, शहरातील, खेड्यातील, जंगलातील मानवाला हे मानावे लागेल की, आपल्या आश्रयात राहणाऱ्या पत्नीचे रतीसुख आपणच घेतो. त्या ठिकाणी अन्य व्यक्तीची नेमणूक करीत नाही. तसेच आपली भूक मिटविण्यासाठी अन्य व्यक्तीला भोजन घातले तर चालेल का ? केव्हाही चालणार नाही. त्याचप्रमाणे आपली अध्यात्मिक भूक भागविण्याकरीता, आपणच पूजाअर्चा केली पाहिजे. ती अन्य व्यक्तिकडून (पुजाऱ्याकडून) पूजा करून आपली आध्यात्मिक भूक शमविणे शक्य नाही. देवाला पुजारीरूपी कमिशन अेजंटाकडून विकत घेतले जाते का ? कमिशनद्वारे देवाच्या खरेदीचा मूर्खपणा वीरशैवांना मान्य नाही.

यात पुण्याचा व्यवहार (व्यापार) होत नाही.

**३४. पूजाअर्चा करणे पुण्य नव्हे ते नित्यकर्म आहे. परोपकार व सहकार पुण्य आहे.**

सहकार्य व परोपकार करून पुण्य संपादन केले पाहिजे, आराधना पूजाअर्चा करणे हे पुण्य नाही. ते एक आपले कर्तव्यच आहे. आराधना केल्याने मनाला आनंद होऊन त्याचा चंचलपणा विसरून ते स्थिर होते. स्थिर चित्ताने लिंगानुसंधान केल्याने जीवांचे कल्याण होते (मोक्षप्राप्ती होते).

**३५. शंका–इष्टलिंग पूजा श्रेष्ठ आहे तर देवालयाचे काय करावे ?**

आता अशी एक शंका उत्पन्न होते की ही जी देवालये आहेत त्यांचे काय करावे, काय ती मंदिरे पाडून पुजाऱ्यांना तुरुंगात टाकावे की काय ? असे आम्ही काही गजनी महंमद किंवा औरंगजेब नाही, की या मंदिरास सरकारी कचेऱ्या बनवून पुजाऱ्याला एखाद्या कारखान्यात मजूर करावे असेही आमचे म्हणणे नाही. असे म्हणायला आम्ही मुसलमान नाही. मुसलमान राष्ट्रातही असे कोठे केले जाणार नाही. आमचे म्हणणे असे की पुजाऱ्याविना देवाला प्राप्त करण्याचा सुलभ सोपा मार्ग शिवशरणांनी आणि देवमानवानी दाखविला आहे. मंदिरात तीर्थक्षेत्रात पुजाऱ्याकडून जो अन्याय केला जातो, त्याला थांबवून, सुलभ रीतीने देवाला प्राप्त करण्याची आध्यात्मिक रीत शरणांनी (संतांनी) दाखविली आहे.

**३६. मंदिरे व तीर्थक्षेत्रे सर्व सामान्य लोकांकरिता फारच उपयोगी आहेत.**

आता जी मंदिरे व तीर्थक्षेत्रे आहेत ती सर्वसामान्य लोकांत आस्तिक भाव टिकवून धरण्यास सहायक आहेत. ती तीर्थक्षेत्रे नसती तर नास्तिकता फारच वाढली असती. आस्तिक भाव सांभाळण्यासाठीच मंदिराची आवश्यकता आहे. ती आध्यात्मिक साधनेला सहाय्यक नाहीत. तसेच भारतात अहिंसा व सदाचारयुक्त काही धर्म पंथ आहेत. ते हिंसा व असद्आचार विचारांच्या धर्मपंथापेक्षा फारच चांगले आहेत. मूर्तीपूजा, तीर्थक्षेत्रे अल्पज्ञानी समाजाला, हिंसादि घातक प्रकारातून थांबवण्याकरिता फारच उत्तम आहे. अल्पज्ञ समाजाला हिंसादि घातक प्रकारातून थांबवण्याकरिताच मूर्तीपूजा, तीर्थक्षेत्रे ज्ञानी लोकांनी निर्माण

केली आहेत आणि ते चांगले आहे. परंतु मानवाने या मूर्तीतच गुंतून राहणे घातक आहे; त्याच्याही पुढे जायला पाहिजे.

लिंग दर्पण

**३७. देहाच्या आवरणात अदृश्य असलेल्या आत्म्याला पाहाण्याकरिता काळ्या कांतियुक्त लिंगरूपी आरशाची गरज आहे.**

आत्मज्ञानाच्या आनंदाला, लिंगानंदाचा अनुभव आधार आहे. त्या लिंगानंदाने, आत्मज्ञानाच्या तृप्तीने, तुम्हांस पावून मी आणि आपण एक होऊन, मी लिंगात अभिन्न होऊन, माझा मीच विसरुन गेलो आहे असे बसवेश्वर म्हणतात.

विश्वचैतन्य आपल्या अंतरंगात आहे. त्याचे ज्ञान करुन त्याला हुडकण्याची आध्यात्मविद्या अनुभव होय. आपल्या अंतरंगात स्वरुपाचे ज्ञान मिळविणेच अनुभव होय. आपल्या स्वरुप दर्शनाने आपल्या चैतन्यात समरस होणे एक होणे, अनुभव होय. असे संतांनी अनुभवाचे रहस्य दाखविले आहे.

देहाच्या आवरणांत अदृश्य जिवात्मा आहे, तो जिवात्माच लिंगाचे (आत्म्याचे) प्रतिरुप आहे हे जाणल्यावर लिंग अंग दोन्ही एकच वस्तू आहेत, याचे ज्ञान आपल्या अंतरंगात झाल्यावर, लिंग संबंध झाल्यावर, लिगांग संबंध झाल्यावर शरणरुपी अंग लिंग होऊन, अंग लिंग भेद दुर होवून, लिंगच झाल्यावर पूजा करणारा आणि पूजा घेणारा हा भेद न रहाता, तू मी हा भेद न रहाता, स्वयंमेव स्वयं होवून जातो. असे वीरशैव संतांचे अनुभव अभंग वचने आहेत.

**३८. देहात असलेल्या आत्म्याला बाहेर शोधणे म्हणजे कडेवर असलेल्या बालकाला गावभर शोधणाऱ्या मूर्ख स्त्री प्रमाणे आहे.**

आपल्या कडेवर असलेल्या बालकाला गावभर हुडकणाऱ्या मूढ स्त्रीप्रमाणेंच आपल्या शरीरात वास करणाऱ्या आत्मतत्त्वाला न जाणून, आत्मदेवाला बाहेर हुडकणे आणि कडेवरच्या बालकाला गावभर शोधणे सारखेच आहे. आत्मतत्त्व बाहेर नाही ते आपल्या आत आहे. जीवभाव नष्ट होवून, शिवभावाला संपन्न होऊन, ज्ञानोदय झाल्यावर आपले आपल्यातच लिंग (परवस्तु) तन्मय होवून आहे.



ध्याता – ध्यान – ध्येय, ज्ञाता – ज्ञान – ज्ञेय, उपासक – उपासना

– उपास्य, पूजक – पूजा – पूज्य या सर्वंच त्रिपुटीला मिटवून सत्यमेव स्वयं झाले पाहिजे. ते कसे तर ज्ञातृत्व ज्ञेय व्हावे, हे सर्वाहून कठीण आहे. आपल्याला आपण कसे ओळखावे हे त्याहून कठीण आहे. भारतीय तत्त्ववेत्त्यांनी पुन्हा पुन्हा म्हटले आहे की, आपणाला आपण ओळखा. आपल्याला आपली ओळख झाल्यावर ज्ञाताच ज्ञेय होतो. ओळखणारा ओळखला जातो.

३९ परब्रह्माला (शिवाला) आपल्या देहातच पहावे. तो बाहेर नाही.

या जगातील चराचर वस्तूंना तुम्ही जाणू शकाल, ओळखाल, परंतु या सर्वांना जाणणारा मी कोण आहे हे जाणून घेतले पाहिजे. ज्योतीचा प्रकाश पाहून त्याचे रहस्य जाणले जाते. डोळ्यांनी आरशात पाहून डोळ्यांत जी कला असते ती जशी जाणली जाते, त्याचप्रमाणे स्वयं आपणास आपण पाहून जाणून घेतले पाहिजे. दिव्याच्या प्रकाशात दिप्ती दिसून येते. आरशात डोळ्यांचे तेज पाहू शकतो. तसेच आपल्यातच आपणास हुडकून, आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून घेतला पाहिजे, असे शिवशरणांचे मत आहे.

आपले डोळे आपणांस दिसावेत म्हणून आरशात पाहण्याची आवश्यकता असते. तसेच आपल्या स्वरूपाचे (आत्म्याचे) ज्ञान आपणांस (जीवास) मिळविण्याकरिता लिंगरुपी दर्पण सद्गुरुने आपल्या हातात दिले आहे. इष्टलिंगात चित्त एकाग्र होण्याकरिता, लिंगांग साधन होण्याकरिता, आत्मस्वरुपाच्या निजानंदात आत्ममग्न होऊन, दृश्य इष्टलिंग अदृश्य होऊन लिंगांग सामरस्य होते.

वायुत जसा सुगंध, विस्तवात जसा अग्नी, भाव विभावात जसे आकाश, अग्नीत जसा कापूर, ज्ञानात जसे विस्मरण तसे लिंगात शरण समरस होऊन जातो. येथपर्यंत वीरशैव संत महात्म्यांनी आपल्या अभंगरूपी अनुभव वचनाने उपदेश केलेल्या तत्त्वाचे वर्णन व माहिती आपण संक्षिप्त प्रकारात पाहिली आहे.

आतापर्यंत या प्रकरणात वीरशैवांच्या संत महात्म्यांनी आपल्या अनुभव वचनाने सांगितलेले लिंग संस्कार, लिंगाचा विकास, लिंगाचे स्वरुप साकारापासून निराकाराचे ज्ञान इष्टलिंगाची आवश्यकता, लिंगाचे साकार रुप, लिंग पूजा आणि मूर्तीपूजा, लिंग दर्पण, अशा

आठ प्रकारांनी असलेली संक्षिप्त माहिती आपण पाहिली यावरील तत्त्वाप्रमाणे प्रत्येक वीरशैवांनी आपले आराध्य परशीवरूपी इष्ट-लिंगाची उपासना करून लिंगानंदाच्या आनंद सागरात यथेच्छ डुंबावे व परशिवात एकरास व्हावे.

४०. वीरशैव धर्माचे वैशिष्टय

एखाद्या धर्माचे श्रेष्ठत्व हे त्याच्या केवळ प्राचीनतेवर अवलंबून नसून त्याच्या तत्त्वांवर असते. प्राचीन तितके सर्वश्रेष्ठ व नवीन तितके कनिष्ठ असे समजणे चिकत्सक बुद्धिवंतांच्या कसोटीला योग्य ठरणार नाही. कितीही प्राचीन धर्म असला आणि त्याची तत्त्वे जर श्रेष्ठ नसतील तर तो किंमतीला चढणार नाही. तसेच कितीही नवा धर्म असला आणि त्याची तत्त्वे जर श्रेष्ठ असली तर तो वाढेल व जिवंत राहील आणि जगात सर्वांपेक्षा जास्त किंमत होईल. या दृष्टीने विचार केला तर वीर शैव धर्माची श्रेष्ठता त्याच्या उच्च तत्त्वावरून मोठमोठ्या निःपक्षपाती पंडितांना स्पष्टपणे कळून येईल. म्हणून वीरशैव धर्म नवीन आहे असे नव्हे; तर जसा तो तत्त्वाने श्रेष्ठ आहे तसा कालानेही ज्येष्ठ आहे. तत्व व प्राचीनता या दोन्ही दृष्टीने जगाच्या पाठीवर धर्म हा एकच, श्रेष्ठ असा धर्म आहे.

४१. वीरशैव धर्म म्हणजे विश्व धर्म होय.

प्रत्यक धर्माचा उत्तम अभ्यास करणाऱ्या महापंडिताला त्या त्या धर्मातील एकेक विशिष्ट तत्त्वे वीरशैव धर्मामध्ये सहज आढळतात. म्हणूनच धर्मसंशोधक वीरशैव धर्म हा परिपूर्ण असून विश्वधर्म होण्यास योग्य आहे, असे निश्चितपणे सांगतात. विश्वधर्म लक्षणयुक्त असा वीरशैव धर्म, इतर सर्व धर्मापेक्षा विलक्षण व सुलक्षण असा आहे.

वीरशैव धर्म हा कोण्यातरी एका विशिष्ट काली व कोणा एकाच्या बुद्धिविशेषाने निघालेला नाही. असे ख्रिस्त, बुद्ध, महंमद पैगंबरादि यांच्या बुद्धिविशेषाने निघालेले धर्म-ख्रिस्तधर्म, बुद्धधर्म, महंमदी धर्म वगैरे जसे आहेत, त्याप्रमाणे वीरशैव धर्म कोणा एका व्यक्तिविशेषापासून निघालेला नाही, तर तो शिवधर्म म्हणवला जातो. हा धर्म फार पुरातन कालापासून सृष्टी आरंभी निर्माण झालेल्या देवमानवाने निर्माण केलेला अनेक जनमहानुभावी यांच्या अनुभवामृताच्या झऱ्याच्या संमीलनाने

महाप्रवाहरूपाने वाहात आलेला आहे. काहीजण बसवादि वीरशैवधर्म संस्थापक व काहीजण पंचाचार्य धर्मस्थापक म्हणून वाद करतात. वस्तुत: बसवरेणुकादि सर्वजण या धर्माच्या वाढीला ( विस्तारास ) कारणीभूत आहेत. अन्यथा ते ह्या धर्मास जन्म देणारे नाहीत, कारण ह्यांनीसुद्धा या धर्माला वीरशैव धर्म म्हणूनच संबोधिले आहे.

**४२. वीरशैव धर्मामध्ये स्त्री–पुरुषांना धार्मिक स्वातंत्र्य व समता आहे.**

भूक तहान इत्यादी ज्याप्रमाणे स्त्री–पुरुष व बालकांना साहजि· करिता समान असते, त्याप्रमाणे सत्यान्वेषणबुद्धीही त्यांच्यात समानच राहते. देहभेदाने आत्मभेद होत नाही, म्हणून आत्मतत्त्ववेत्ते सांगतात. याबाबतींत आमच्या एका शिवशरणाने स्तन आले म्हणून तिला स्त्री म्हणतात. दाढीं मिशा आल्या म्हणून पुरुष, म्हणतात. त्यांच्यात राह· णारा आत्मा न स्त्री आहे न पुरुष असे निर्भिडपणे स्पष्ट सांगून टाकले आहे. मानवाच्या जीवनक्रमाकडे अगदी बारकाईने नजर टाकली तर स्त्री–पुरुषाच्या आशा आणि आकांक्षामध्ये किंवा त्यांच्या जीवनाच्या ध्येयामध्ये काहीच फरक नाही. असे असताना स्त्रियांची आध्यात्मिक मनोभावना बाजूस सारून त्यांना आत्मोन्नतीपासून वंचित करून, केवळ पुरुषांच्या भोग्य वस्तुमध्ये तिची गणना करणे याहून मोठे पाप कोणते ? अशा संकुचित भावनेचा सोस वीरशैव धर्मामध्यें सापडणार नाही. या धर्मात स्त्री–पुरुष असा लिंगभेद नसून उभयतांना धर्म स्वातंत्र्य आहे.

**४३. लिंगधारणा हेंच वीरशैवाचे मुख्य लक्षण (चिन्ह) आहे.**

वीरशैव धर्मामध्ये जन्म घेणाऱ्यांना या धर्माचे मुख्य चिन्ह अशा लिंगाचा संबंध जन्मत:च असतो इतकेच काय पण मातेच्या गर्भाला आठव्या मासीच लिंग संस्कार करतात. जीवाला लिंगसंस्कार योग्य प्रकारे झाल्यास, त्या जीवाला लिंगमय होण्याकरिता हा उत्तम संस्कार आहे. ज्याप्रमाणे गर्भाच्या आठव्या महिन्यापासून देहावसानापर्यंत लिंग आपल्या देहावर धारण करून, त्याला किंचितहीं वेगळे न करता मोठ्या जागरुकतेने त्याच्या पुजेचे व्रत धारण करणाऱ्या वीरशैवांना कोणत्याही प्रकारच्या सूतक व पातकांचा संबंध राहात नाही. देहच मुख्य समजून धर्माचरण करणारे व आत्माच मुख्य समजून धर्माचरण करणारे, असे दोन वर्ग धर्माचरणामध्ये आहेत. पहिला वर्ग कर्मठ म्हणवला जातो.

त्याच्या शरिराला थोडा जरी विटाळ झाला की, वस्स, त्याच्या परिमार्जनार्थं आपल्या आयुष्याचा पुष्कळसा भाग ते खर्ची घालत असतात. तरी पण त्यांना देहधर्माचे अतिक्रमण साध्य होत नाही. अशा कर्मजड किंवा कर्मठ लोकांना सुखासमाधानाचे क्षण फार कमी मिळतात. नित्य सुखापेक्षा यांनी नित्य चैतन्यमय आत्मसुखापेक्षा होऊन धर्मपरायण होण्यात, वीरशैव दुसऱ्या मार्गाचे अवलंबी होतात. वीरशैव धर्माचे यथा योग्य ज्ञान नसणारे काही लोक अपरिपक्व बुद्धीनें इतरांप्रमाणे आपणाला (पंच) सुतक ? आहेत असे समजून वागत आहेत. ही फार शोचनीय गोष्ट होय. यज्ञारंभ करणाऱ्या याज्ञिकाला यज्ञामध्ये जर सुतक आले तर त्याला तो मानीत नाही. आणि न मानावे असे त्यांचे धर्मशास्त्र आहे. असे जर आहे तर मग वीरशैव लिंगधारणरुपीं व्रत धारण केलेले असताना त्याला सुतक असतात असे सांगणे किती अनुचित होय. म्हणून लिंगायतांनी सुतक मानू नयेत. जाती–जनन–मरण–रज–उच्छिष्ट. हे पंच सुतक, वीरशैव मानीत नाहीत.

४४. वीरशैव धर्मात ईश्वर कल्पना

प्रत्येक धर्मात उपासनाकर्मासाठी एक ना एक प्रकारची इश्वर कल्पना आढळणे साहजिक आहे. वीरशैव धर्मामध्ये मात्र इश्वरकल्पना इतर सर्व धर्मापेक्षा अगदी भिन्न आहे. वीरशैव लोक आपण पूजित असलेले लिंग आपणाहुन वेगळे आहे असे समजत नाहीत, आपल्या मस्तकातील सहस्त्र कमलांतील जे चित्कला तेच लिंग म्हणून भावना करतो. ते आपले स्वरुपच असते. त्याची लिंगपूजा म्हणजे स्वरुप –अनुसंधानच होय. यासंबंधी महानुभावी मग्गी मायीदेव आपल्या शतकत्रयांत असे म्हणतात की आरशामध्ये पाहणाऱ्या स्त्रीचा उद्देश–सौन्दर्य–लावण्य–विलासयुक्त आपला देह पाहण्या व्यतिरिक्त आरसा पहावा म्हणून नसतो. तद्वतच शिवशरण लिंगार्चनानुभवरुप आरशामध्ये स्वस्वरुप पहातो. आपल्या इष्ट लिंगाशिवाय अन्य देवतेची उपासना खरा वीरशैव केव्हाही करीत नाही. वीरशैव धर्माचे रहस्य न समजणारे काही जण अन्य दैवतेची उपासना करींत असतात. त्यायोगे ते स्वधर्मावर निष्ठा न ठेवण्याचे पातक करींत आहेत असे कष्टाने म्हणावे लागते.

### ४५. वीरशैव धर्मात समतेचे महत्त्व

वीरशैव धर्ममंदिर समता भावनेच्या पायावर आधारलेले आहे. खऱ्या सुखशांतीची अपेक्षा बाळगणारे निर्मळ – पवित्र अंतःकरणी सर्व जातीय स्त्रीपुरुषांना या मंदिराचे महाद्वार केव्हाही उघडे आहे. प्रत्येक जण वीरशैवदीक्षा घेऊन या धर्मतत्त्वाप्रमाणें वागून अधिकारवंत होतो.

" जाति–भेद, उच्च नीचता अशा भांडणाला यात आवकाश नाही. शिवदीक्षा पावलेले सर्वजण समान होत. " विप्रापासून ते अंत्यजापर्यंन्त शिवभक्त सर्व एकच होत " असे म्हणणाऱ्या श्रीबसवेश्वरांच्या वचनांचे मर्म तरी हेच ! शिवसंस्कार (दीक्षा) झाल्यावर पूर्व – (जन्म) कर्म नष्ट होऊन त्यांना एकाच जन्मात मुक्ति मिळण्याकरिता या धर्माचे अनुयायी पूर्वजन्म मानीत असले तरी पुनर्जन्म मानू नये, श्राद्ध, पितृतर्पण इत्यादिकांची यांना मुळीच आवश्यकता नाही. मानवतेच्या दृष्टीने सर्वांना कल्याणप्रद व्हावे ही इच्छा बाळगणारा व त्याला पूरक तत्त्वे ज्यांत आहेत असा एकच एक धर्म म्हणजे तो वीरशैव धर्म होय.

### ४६. वीरशैव धर्मात कायक – स्थान

जगात जीवधारी मानव प्राण्यांना जिवंत राहण्याकरिता कोणता तरी एक उद्योग करणे हे न्यायाचे आहे. पण ह्या न्यायमार्गापासून लोक जितके च्युत होतात, तितके ते जगाला वाईट होत. अकर्मण्य जीवना-सारखे पाप–जीवन दुसरे कोणतेही नाही. म्हणूनच वीरशैव धर्मामध्ये प्रत्येकाने आपला मनपसंत उद्योग (शारीरिक कायक) करावाच म्हणून मोठी बलशाली शर्त ठेवली आहे. त्या उद्योगाला कायक म्हणून सांगतात हे विशेष होय. आपली आराध्य वस्तू गुरु – लिंग – जंगम, तसेच शिवभक्तांच्या (समाज) सेवेसाठी करावा लागणारा जो उद्योग त्याला 'कायक' म्हणावे.

कायक व्रत नसलेला शिवभक्त होऊ शकत नाही. इतकेच नव्हे तर – जंगमांनाही त्या मानाने कायक आहे. म्हणून अनुभवी सांगतात दुसऱ्यांनी परिश्रम करून मिळवून ठेवलेले धन, शहाणपणाने हस्तगत करून, आपले पोट भरणाऱ्यांकडून, मानव जगात शांतिभंग होतो, असे आधुनिक समाजसुधारक समजतात, हे अगदी खरे आहे. आपण परिश्रम करून इतरांच्या सेवेकरिता खर्च करणाऱ्यांकडून जगात

शांतता नांदते हे का सांगावे लागते ? इतरांची सेवा करण्यामध्येच धर्माचरणाचे परिणामरूपी हृदयाच्या पवित्रतेत विशालतेचा परिचय होतो. तेथेच खरी सुखशांति वास करिते. म्हणूनच आण्णा बसवण्णा म्हणतात "कायक ते कैलास."

**४७. जीवभावाचा त्याग आणि देवभावाची प्राप्ती हे या धर्माचे शेवटचे साध्य आहे.**

बीजामध्ये झाड होण्याची जशी शक्ती असते, तसे जिवांत देवत्व पाहण्याचीही शक्ती भरून असते. मात्र त्याप्रमाणे साधनक्रमाने विकास पावत गेल्यास मरणापूर्वीच परिपूर्ण शिवस्वरूपी तो होतो. मरणाचा रस्ता अडवून धरण्याची आवश्यकता नाही, मरुन परत येऊ म्हणेन तर उसाचा झेंडा (वाडे) चोखून खाण्याप्रमाणे होईल, असे श्री बसवेश्वर म्हणतात.

"क्रिया म्हणजे ज्ञान व ज्ञान म्हणजेच क्रिया ज्ञान म्हणजे समजणे. क्रिया म्हणजे समजल्याप्रमाणे वागणें. परस्त्रीभोग नको म्हणजेच ज्ञान, व त्याप्रमाणे वागणेच क्रिया, व न वागणेच अज्ञान" असा बसवेश्वरांनी स्पष्टपणे ज्ञानक्रिया यांचा सुन्दर समन्वय उपदेशिला आहे.

सत्यसुखशांति निर्भयपणे भोगण्याची अपेक्षा करणारास संसारिक त्रासानें, दूर पळून निर्जन अरण्य, गुहा वगैरेमधे जावे लागते. असे शिवानुभवी सांगत नाहीत. जीवनाच्या सर्वविध दुःखाला विषय कारणीभूत नसून मोह (विपरीत ज्ञान) च कारणीभूत आहे. म्हणून त्याचा मोह दूर करून, सर्व शिवप्रसादबुद्धीने सेवन करणाऱ्यास, शिव-योगसुखाचा लाभ होतो, असे यांचे मत आहे. "द्रव्य माया नव्हे, स्त्री माया नव्हे, जमीन माया नव्हे, तर मनाच्या एका काठाला राहणारी आशा हीच माया आहे." एखाद्या वेळी विषय कसल्याही बुद्धि-वंताला आपल्याकडे बलात्कारानें ओढून घेण्याचा त्याचा स्वभाव असतो. असे कळूनही तसल्या मोहक वस्तूच्या सान्निध्यात राहून हृदयाची समता ढळू न देता, आत्मसुख भोगण्यात आध्यात्मिक परीक्षा झाली तर होऊ द्या, म्हणून वीरशैव, जग मायिक असत्य आहे असे समजून, विषयादि सर्वसुखत्याग करण्यात, अथवा त्याचे निजस्वरूप जाणून न घेता, भोग-ण्यास महत्त्व न देता, ज्ञानाने 'त्यागभोगाचा' सुन्दर समन्वय करुन

त्यायोगे शिवयोगसुख साधणारे महानुभवी झालेआहेत. ' योगः कर्मसु कौशलं ' या गीतावाक्याप्रमाणे कृतीं करुन दाखविणारे वीरशैवच आहेत. अशा प्रकारे कित्येक उत्तमोत्तम तत्त्वाने युक्त असा वीरशैव धर्म किती गंभीर, महोन्नत आहे हे वेगळे सांगणे नको. या धर्मात अष्टातवरण, पंचाचार, षटस्थल हे मुख्य होत. ते क्रमेण सामाजिक, नैतिक, तात्विक, विषयबोधक आहेत. त्यानुसार आचरणाने जीवनामधे सुप्त (झालेली) शिवशक्ती विकास पावून, जीवनाचा अंतिम उद्देश ' परिपूर्णता ' याचा लाभ होतो. ( सुखशांती प्राप्त होते. ) निजसुखाभिलाषी अशा सर्वांनी वीरशैव धर्मतत्व समजून घेऊन त्याप्रमाणे वागणे आवश्यक आहे.

अष्टावरण

१) गुरु २) लिंग ३) पादोदक ४) जंगम
५) प्रसाद ६) विभूति ७) रुद्राक्ष ८) मंत्र

पंचाचार

१) लिंगाचार २) सदाचार ३) शिवाचार
४) भृत्याचार ५) गणाचार

षट्स्थल

१) भक्त २) महेश ३) प्रसादि
४) प्राणलिंगी ५) शरण, ६) ऐक्य

अष्टावरण

४८. अष्टावरण

१) गुरु हा लिंग धारणा करवतो.

२) लिंग हे शरीरावर धारण केलेले डाव्या तळहातात पुजावयाचे.

३) जंगम भक्ताचे क्रियादि म्हणजे भक्तीची परीक्षा पाहून चुका दुरुस्त करतो.

४–५) पादोदक व प्रसाद लिंग अंग सामरस्याचे उपाय होत.

६–७–८) भस्म, रुद्राक्ष व मंत्र ही पुजेची साधने आहेत. लिंग (इश्वर) एकच असून, क्रियाभेदाने इष्ट – प्राण व भाव असे त्रिविध होतात. लिंग डाव्या हातात घेवून जेव्हा पूजा करतो तेव्हा ते इष्टलिंग म्हणवले जाते. हृदयात ध्यान करताना प्राण लिंग म्हणवतो. व भावनेत

निमग्न होवून विस्मृत होतो. तेव्हा भावलिंग होतो. ही सर्व बाह्य अष्टावरण आहेत.

१) जाणीव (ज्ञान) हेच गुरू, (२) अनुभव हेच लिंग (आत्मा), ३) चिन्मय शांती हेच जंगम, (४-५) मानसिक शांती हेच पादोदक व प्रसाद, (६) षडविकार जाळून केलेली राख हीच विभूति, (७) चित्प्रभेने युक्त दिव्य इष्टी हेच रुद्राक्ष, (८) नामस्मरण (ॐ नमः शिवाय) हेच मंत्र हे अंतर अष्टावरण आहेत.

४९. पंचाचार

१) लिंगाचार २) सदाचार ३) शिवाचार ४) गणाचार ५) भृत्याचार

(१) लिंगाचार – लिंग हेच पर (परम) जाणुन अन्य देवतांची पूजा न करता आपल्या इष्टलिंगाचीच पूजा करून, लिंगांगी गौरवित. त्याच्या समवेतच पादोदक प्रसाद सेवित जाणारेच लिंगाचारी होत.

(२) सदाचार – परस्त्रीची अभिलाषा न धरता, परधनाची आशा न करता, कसलीही हिंसा न करता, शील सांभाळून, आपले कायिक उद्योग (धंदा) निष्ठेने चालवून, निर्वाह चालवणाराच सदाचारी होय.

(३) शिवाचार – ईश्वरभक्त कोणीही असो त्याच्याशी प्रेमाने वागून, मी मोठा हा अहंकार न बाळगता, तसेच इतरांना कमी न लेखता (हीन भावना न ठेवता) भक्तैक्य पक्षपातीपणे बनून रहावे, हाच शिवाचार होय.

(४) गणाचार – शिवमत – शिवशरणांना डावलून त्यांच्याशी द्रोह करणाऱ्या दुष्टाचे परिपात्य करुन, त्यांना योग्य शासन घडवून समाजाची भद्रता सांभाळणारा धर्माभिमानीच गणाचारी होय.

(५) भृत्याचार – शिवभक्त सर्व थोर. आपण लहान व नम्र भावनेने किंकर होऊन वागणारा– आचरण करणारा सद्भक्तच भृत्याचारी होय.

## ५०. षट्स्थल

(१) भक्त, (२) महेश, (३) प्रसादी, (४) प्राणलिंगी (५) शरण व (६) ऐक्य ही सहा षट्स्थले होत, ती अशी.

(१) भक्त– इष्टलिंगात श्रद्धा भक्ती ठेवून, काम (धंदा) करून, धन कमवून, गुरु-लिंग–जंगम दासोह चालवण्या सारखा, भक्ता-मध्ये जातीभेद न करता, सर्वजण एकच समजून, भोजन, विवाहादि कार्ये यथासांग पार पाडणाराच भक्त होय.

(२) महेश–परधन, परस्त्रीची आशा सोडून, देवता पूजन बाजूला ठेवून (त्यागून), परहिंसा मनामध्येही न आणता, निष्टा-भक्तीने इष्टलिंगाला पूजणारा, न्यायनिष्ठा, निर्दाक्षिण्य, निर्भय, निष्कपट हृदयी असणाराच महेश होय.

(३) प्रसादी– इश्वराने दिलेल्या भोग्य वस्तूंना प्रसादरुपाने शिवाला अर्पून, प्रसाद अवधान भक्तिने सेवन करणाराच प्रसादी होय. हा मितहारी, मितभाषणी, प्रसन्नचित्त असा असतो.

(४) प्राणलिंगी–अनुभव भक्तीने लिंगच प्राण व प्राणच लिंग असे जणून, शरिरातील षड्चक्राचे वर्म जाणून घेवून, योग मार्गाने त्या त्या चक्रामध्ये सदा लिंगाची भावना (जणीव) ठेवून पूजा करतो, तोच प्राण लिंगी होय.

(५) शरण–नांक, जीभ, डोळे, त्वचा व कान भोगाच्या सुखाला लिंगमुखी करुन शरण सती, लिंगपती अशा आनंद भक्तीने स्वीकार-णाराच शरण होय.

(६) ऐक्य–जल जलात मिसळते. दूध दुधात मिसळते. या प्रमाणे अंगलिंगात समरस भक्तीने बीरुन वेगळे नाही असा राहाणाराच ऐक्य म्हणवतो.

अष्टाचरण वीरशैवाला अंग होय. पंचाचार प्राण व षट्स्थल आत्मा होय. सहा स्थल असे विदीत भक्त, महेश, प्रसादी, प्राणलिंगी, शरण व ऐक्य. असे हे षट्स्थल ब्रह्मी क्रमेन आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग प्रसादलिंग व महालिंग यात मिळून एक होणेच लिंगांग सामरस्य होय. म्हणून भक्ताला आचारलिगात श्रद्धा भक्ति पाहिजे. महेशाला गुरुलिगात निष्ठाभक्ती पाहिजे प्रसादियाला शिवलिगात अवधान भक्ती पाहिजे. प्राणलिंगीयाला जंगमलिंगात अनुभव भक्ती पाहिजे. शरणाला प्रसाद लिंगात आनंद भक्ती अनुभव भक्ति पाहिजे. शरणाला प्रसादलिंगात आनंद भक्ती पाहिजे. ऐक्याला महालिंगात

समरसभक्ति पाहिजे.

षट्स्थल संपन्न अशा भक्ताचें नाक आचारलिंग म्हणवते. जीभ गुरुलिंग म्हणविते. नेत्र शिवलिंग म्हणविते. त्वचा जंगमलिंग म्हणवते. कान प्रसादलिंग म्हणवते व मन महालिंग म्हणवते.

श्रीगुरु आपल्या योगबलाने शिष्याच्या मस्तकांत असलेल्या शिवकलेला हस्तमस्तक संयोगाने हृदयांत उतरवून, नेत्र मुखांतून बाहेर काढून शिष्याच्या करस्थली इष्टलिंग देवून उपकार करतो. त्या योगे इष्टलिंगाला धारण करवून अष्टविधार्चन पूजा करावी. साक्षांत परशिव (परमात्मा) जंगम रुपाने संचार करुन लोकहित करतो. म्हणून जंगमामध्येही भक्ति पाहिजे. क्रियाचार चालवणे असेल तर भक्ति पाहिजे. ज्ञान संपादन करणें असेल तरी भक्ति. शिवाला जाणून ध्यायचे असेल तरी भक्ती पाहिजे. क्रिया ज्ञान सर्व पाहिजे. इष्टलिंगाला पूजा, प्राणलिंगाला अनुसंधान, भावलिंगाला सामरस्य पाहीजे. अशा तऱ्हेनें वीरशैवतत्त्वच अंगीकारुन चालले तर शीव (परमात्मा) आमचे इष्टार्थ पूर्ण करील.

न भवती समतुल्य वीरशैवधर्मा समानम् ।
चतुर्युगे वीरशैव धर्म श्रेष्ठम् ।।

चौथे प्रकरण समाप्त

शीवं भूयात्, शीवं भूयात्, शिवं भूयात्
ॐ शांतिः शांतिः शांतिः

# धार्मिक आगमनिगमपुराणादि ग्रंथांचा रचना काल,

## संस्कृत वाङ्मयाचा इतिहास या ग्रंथाधारे.

१. आगम रचना काल व सृष्टीवर प्रथम मानव निर्माण काल एकच आहे. १९७२९८६१०० वर्षं झाले. हाच भारतीय आर्यसंवत आहे.

२. वेद रचना काल आगम रचना काला नंतर आहे.

| पुराणादि ग्रंथ रचना काल | इ.स. पूर्व | इ.स. २००० पर्यन्त |
|---|---|---|
| ३. वैदिक आर्य भारतात आले तो काल | ५०००–३००० | ७०००–५००० |
| ४. व्यासाचा वेदभाष्य काल. | ३००० | ५००० |
| ५. ब्राह्मण ग्रंथ रचना | ३०००–२००० | ५०००–४००० |
| ६. ब्राह्मण ग्रंथ रचना कालानंतर अरण्यके उपनिषदे, प्रथम उपनिषदे १० च होती. नंतरची उपनिषदे इ. स. १६०० पर्यन्त झाली. | –२००० | –४००० |
| ७. वेदांगे | १८००–८०० | ३८००–२८०० |
| ८. पणिनीचा काल | –८०० | –२८०० |
| ९. भारतीय युद्ध व व्यासांचा काल | –३१०१ | –५१०१ |
| १०. व्यासाचा जय (भारत) नावाचा श्लोक ८८०० रचना काल | ३००० | ५००० |
| ११. वैशंपायनाचा भारत श्लोक २४००० चोवीस हजार व्यासानंतर | | |
| १२. सौतीचा महाभारत श्लोक १२५००० सव्वा लक्ष | २५० | २५०० |
| १३. वाल्मिकी रामायणाचा प्रथम रचना काल २४००० श्लोक साडेआठलक्ष वर्षं झाले. ८५०००० | | |
| १४. रामदास स्वामीच्या म्हणण्याप्रमाणे शंभरकोटी श्लोक रचना झालीच नाही | | |
| १५. एका पुराणाचे १० पुराणे व्यासानी केले तो काळ | ३००० | ५००० |
| १६. बाकी पुराण रचना काल | | |
| १७. भागवत पुराण रचना इ. स. | | इ. स. ३०० ते ८०० |
| १८. शुद्ध गीता रचना काल | | इ. स. ८०० |
| १९. भगवद्गीता अशुद्ध रचना काल | ३०००<br>१५०० | ५०००<br>३५०० |

| | | |
|---|---|---|
| २०. अनुगीता रचना काल | ४०० | २४०० |
| २१. पूर्वमिमांसा व उत्तर मिमांसा | १५० . | २१५० |
| २२. सांख्य शास्त्र | २०००–१५०० | ४०००–३५०० |
| २३. वेदांग ज्योतिष | –१४०० | –३४०० |
| २४. चैत्र वैशाखादी नांवे | –२००० | –४०००, |
| २५. ज्योतिष राशी प्रवेश | –२००० | –४००० |

## १. पंथांचे उदय

| | | |
|---|---|---|
| बौद्ध धर्म जैन धर्म | | इ. स. पू. ५००–२५०० |
| गणपती उदय | | इ. स. ६०० |
| वारकरी पंथ | उदय – श्री. पुंडलिकापासून<br>विकास–श्री. ज्ञानेश्वर महाराजा पासून | इ. स. ६०० |
| दत्त पंथ | उदय – इ. स. ६००. विकास नरसिंह सरस्वती पासून | इ. स. ६०० |
| वैष्णव पंथ | रामानुजाचार्या पासून | इ. स. १,१०० |
| महानुभव पंथ | चक्रधरा पासून | इ. स. १,३०० |
| रामदासी पंथ | श्री संत रामदास स्वामीं पासून | इ. स. १,५३० |
| नाथ पंथ | मच्छिंद्रनाथांपासून | इ. स. १,२०० |
| आद्य शंकराचार्य | | इ. स. ७८० |
| श्री. सांप्रदाय | | इ. स. ९०० |
| यामुनाचार्य सांप्रदाय | | इ. स. ९१६ |
| सनक सांप्रदाय | | इ. स. १,११४ |
| विष्णु स्वामी सांप्रदाय | | इ. स. १,००० |
| वल्लभाचार्य पुष्ठी सांप्रदाय | | इ. स. १,४७९ |
| चैतन्य सांप्रदाय | | इ. स. १,४८५ |
| रामानुजाचार्य | | १, ०१७ |
| मध्वाचार्य | | इ. स. १,१९९ |
| वल्लभाचार्य | | इ. स. १,४७८ |
| मीराबाई | | इ. स. १,४९८ |

## २. युग वर्ष संख्या

| | | |
|---|---|---|
| सत्य युग | – | १७,२८,००० |
| त्रेना युग | – | १२,९६,००० |
| द्वापार युग | – | ८,३२,००० |
| कलियुग | – | ४,३२,००० |
| चतुर्युग | – | ४३,२०,००० |

एक हजार चतुर्युगांचा एक मन्वंतर, चौदा मन्वंतराची एक मानव सृष्टी.

## ३. श्रीकृष्णाचा जन्म व वैकुंठगमन काल

श्री महाभारतकार चिंतामणराव वैद्य लिहितात. शके पूर्व शके १८८८

| | |
|---|---|
| ३,२६३ | शतपूर्व शके १,८८८ |
| ५,१५१ | श्रीकृष्ण जन्म |
| १८ | १८ व्या वर्षी कंसवध (वयाच्या) |
| २५ | २५ व्या वर्षी रुक्मिणी बरोबर लग्न केले. |
| ८३ | ८३ व्या वर्षी भारत युद्ध झाले. |
| १२५ | १२५ व्या वर्षी निजधामाला गेले. |

मराठी व बंगाली वगैरे प्राकृत भाषा इ. ८०० च्या सुमारास उत्पन्न होऊन इ. स. १२०० च्या सुमारास चांगल्या जोमात आल्या. निरनिराळ्या प्राकृत भाषांतून ग्रंथ निर्माण होण्यास इ. स. १२०० नंतर सुरुवात झाली.. मराठीतला पहिला ग्रंथ ज्ञानेश्वरी तयार झाला. त्यानंतर संस्कृत वाङ्मय होणे बंद झाले.

सायणाचार्यांचे वेद भाष्य इ. स. १,४०० च्या सुमारास झाले.

## सत्यधर्म प्रकाश ग्रंथाधारे

### ४. प्रचलित संवतमधील कांही प्रमुख संवत इ. स. २००० पर्यंत.

| नाव, | संवत | केव्हां सुरू झाले. | वर्ष संख्या. |
|---|---|---|---|
| सृष्टि | संवत | मानव सृष्टि उत्पत्ति पासून | १९७२९८९१०० |
| चीनी | ,, | चीनच्या पहिल्या राजापासून | ८६००२१०० |
| खताई | ,, | | ८८८४०३७३ |
| कालडिया | ,, | पहिल्या राजापासून | १५१९९८ |
| पारशी | ,, | पहिल्या राजापासून | १९९९८ |
| फिनोशिया | ,, | देशाच्या स्थापनेपासून | २००१८ |
| इराण | ,, | पहिल्या राजा पासून | १८९९४१ |
| शालिवाहन | ,, | शालिवाहन राजा पासून | ८२२० |
| नोह | ,, | हजरत नोहा पासून | ५०९८ |
| इब्राहिम | ,, | इब्राहिम पासून | ३९१९ |
| मुसवी | ,, | मूसा पासून | ३९१९ |
| युधिष्ठिर | ,, | युधिष्ठिरच्या राज्याभिषेका पासून | ३५७१ |
| दाऊदी | ,, | दाऊद पासून | ५०९८ |
| रूस | ,, | रूसनगरीच्या स्थापने पासून | ३०२३ |
| विक्रम | ,, | विक्रमाच्या राज्याभिषेका पासून | २७५१ |
| इ. स. | ,, | येशूच्या जन्मा पासून | २०५६ |
| महमदी | ,, | महमदा पासून | २००० |
| | | | १४१८ |

बौद्ध, जैन, अवैदिक धर्मीयांच्या विचारातून गढूळ झालेला व विकृत झालेला धर्म आहे.

(५९) **वेदांत मांसाहार श्रेष्ठ** ('ऋग्वेद दर्शन' पा. क्र. ४५१-५२): वेदकालीं मांस हे मुळीच निषिद्ध नव्हते. इतकेच नव्हे तर ते त्यांच्या प्रिय आहारातच मोडत होते. वैदिक देवांना तर त्याची भारीच आवड होती. देवराज इंद्राने एकाच वेळी वीस बैलांचे मांस खाल्ल्याच्या उल्लेख आहे (१०।८।१४) (१०।२८०।२), आणि एका ठिकाणी म्हटले आहे की, इंद्राकरिता मरुतांनी ३०० रेडे शिजविले होते. 'विश्व मरुत: सज्जोष: पचच्छत् महिषा इंद्र तुभ्यम्' (६।१७।११). अग्नीला तर तूप, मांस, मेद, गाईचा वपा यांची आहुती म्हणजे मोठी मेजवानीच आणि मग या देवांचे अनुकरण करण्यात धर्म मानणाऱ्या वैदिक आर्य ऋषींना ते वावडे व निषिद्ध कसे असणार ?

याज्ञवल्क्यांनी तर स्पष्टच म्हटलें आहे की, मांसान्न म्हणजे परमान्न होय. 'यत दु ह परमान्न यन्मांसम्' (श. प. ११।७।१।३) अर्थात् मांसान्न हे सर्व अन्नांत श्रेष्ठ आहे. आपल्या घरी राजा, ब्राह्मण, चांगला प्रतिष्ठित पाहुणा, अतिथी आल्यावर त्याच्या प्रित्यर्थ एखादा लठ्ठ बोकड किंवा चांगला पुष्ट बैल मारून त्याचे पक्वान्न–मिष्टान्न तयार करावे, असे शतपथात स्पष्ट म्हटले आहे. 'यथा राज्ञे वा ब्राह्मणाय वा महोक्ष वा महारंज वा पचतदहमानुष हवि:' (३।४।२). त्याचप्रमाणे ऐतरेय ब्राह्मणातही तोच अगर तशासारखाच उल्लेख आहे (१।३।४) हे याज्ञवल्क्य ऋषी कोणते ?

(६०) **वैशंपायन शिष्य वलक्य** : हे याज्ञवल्क्य महर्षी व्यासांचे शिष्य वैशंपायन, त्यांचे भाचे व प्रमुख शिष्य होते. या याज्ञवल्क्यांनी शुक्ल यजुर्वेदी आणि शतपथ ब्राह्मण हे दोन महान् ग्रंथ निर्माण केले. त्यानंतर चारही वेदांचे 'ब्राह्मण' ग्रंथ निर्माण केले. यज्ञाचे प्रकारही हजारो निर्माण केले. त्या कालांत याज्ञवल्क्याइतका विद्वान्, त्याच्या तोडीचा एकही ऋषी नव्हता. जनकराजाच्या महासभेत त्या कालातील मोठमोठ्या विद्वान् ऋषींनी व अनेक विद्वान् राजे--महाराजांनी याज्ञवल्क्यांना व त्यांनी निर्माण केलेल्या [illegible] मान्यता दिली होती. या याज्ञवल्क्यांना शंकर, सूर्य आणि सरस्वती प्रसन्न होते. सूर्याने त्याला असा

वर दिला होता कीं, त्याचा कोणी अपमान केल्यास अपमान करणाराचे डोके तुटून पडेल. शंकराने त्याला दिव्य शरीरी बनवले होते. सूर्याच्या वराच्या अनुभव जनकाच्या महासभेत घडून आला होता. 'शाकल्य' हे याज्ञवल्क्यांचे एका विद्येचे गुरु होते. त्या शाकल्य ऋषींनी त्यांचा अपमान केला आणि सूर्याच्या वराप्रमाणे शाकल्याचे डोके तुटून पडले.

याच कालात मांसान्नप्रेमी याज्ञवल्क्याने आपल्या इच्छेप्रमाणे पशुहिंसेला धार्मिक श्रेष्ठत्व देण्याकरिता मूळ यजुर्वेदाचा आपल्या बुद्धि-सामर्थ्याने कायापालट केला. नव्हे, संपूर्ण नवीनच निर्माण केला. आणि त्या कालातील विद्वान ऋषींकडून, विद्वान् राजे-महाराजांकडून आपल्या शुक्ल यजुर्वेदाला महान् धार्मिक स्थान मिळविले. याच कालांत हजारो प्रकारचे यज्ञ व त्यांत अगणित पशूबळी सुरू झाले; आणि याच कालांत चारही वेदांत हिंसात्मक प्रकार समाविष्ट झाला. 'अहिंसा परमो धर्मः' या अनादि कालापासून चालत आलेल्या सर्वश्रेष्ठ धर्मसूत्राचा कायापालट होऊन, हिंसाचारच धर्म होऊन बसला. संपूर्ण भारतात हिंसाचारालाच धर्माच्या नावाखाली श्रेष्ठत्व प्राप्त झाले. याज्ञवल्क्याने वेदाचा व धर्माचा कायापालट केल्यासंबंधी सविस्तर माहिती श्री. कोलंगडे यांनी लिहिलेल्या 'श्रीमद् योगीश्वर याज्ञवल्क्य' नांवाच्या ग्रंथात सविस्तर दिली आहे. विस्तारभयास्तव ती येथे देत नाही.

(६१) **वेदातील ऋषी व देवतांचे आचार :** चारही वेदांत अनेक देवतांची अनेक ऋषींनी उपासना केली आहे. त्यात ९९ टक्के ऐहिक सुखाचीच मागणी आहे आणि भक्तांनी मागितलेल्या मागण्या त्या देवता पूर्ण करतात असे स्पष्ट उल्लेख आहेत. मला वाटते की, त्या कल्पना अज्ञानी मानवांच्या अंधश्रद्धेतील निरर्थक आणि अशुद्ध मनाच्या आहेत.

भक्ताने खायला प्यायला दिल्याशिवाय ज्या देवांना जगात जगता येत नाही, त्या देवता भक्तांनी मागितलेले सर्व कांही देतात असे म्हणणे कोणाही विचारवंताला पटण्यासारखे नाही. स्वतःजवळ असेल तरच तो दुसऱ्याला देऊ शकेल. ज्याच्याजवळ काहीही नाही ती व्यक्ती परान्ना-वर जगते, असा सर्वत्र अनुभव आहे आणि अशी व्यक्ती हीन, दीन, दरिद्री असते; हाही अनुभव सर्वत्र आहे. परान्नाशिवाय (भक्ताने

दिल्याशिवाय) ज्या देवांना जगता येत नाही, त्या हीन, दीन, दरिद्री देवता भक्ताला काय आणि कुठले देणार ?

कोणीही आपल्याजवळ असल्याशिवाय दुसऱ्याला देऊ शकत नाही आणि वेदांतील देवतांना भक्ताने दिल्याशिवाय जगता येत नाही. त्या देवता भक्तांना काय देणार ? भक्त देवांना मागतो आणि देव भक्तांना देतो, ही कल्पनाच मुळी निरर्थक आणि चुकीची आहे.

(६२) **शंका आणि प्रश्न :** देवता नाहीत का ? असल्यास त्यांची उपासना केल्याने त्या भक्तांच्या मागण्या पूर्ण करणार नाहीत का ? **उत्तर**-वेदातील देवतांना काहीही देता येणे शक्य नाहीं. कारण दुसऱ्याने दिल्याशिवाय त्यांनाच जगता येत नाहीं. या काल्पनिक देवतांची उपासना न करता, विश्वनिर्मित्या विश्वपित्याची उपासना केल्याने मात्र मानवाला सर्व काही मिळेल. त्यालाही भक्ताने मागितलेले सर्व काही देता येणार नाही. तरी त्याचीच उपासना करावी. त्याची उपासना केल्याने भक्ताच्या मनाची चंचलता नाहीशी होऊन मन शुद्ध आणि स्थिर होते. आणि त्या शुद्ध, स्थिर झालेल्या मनाने केलेल्या कर्माचे फल पण शुद्ध, स्थिर आणि सुखदायी असते. चंचल, अस्थिर आणि अशुद्ध मनाने केलेल्या कर्माचे फल दुःखदायी ठरलेलेच. चांगल्या-वाईटाचा वृक्ष आपणच निर्माण करतो आणि चांगले अथवा वाईट फल आपणच भोगतो. त्यात देवांचा अथवा ईश्वराचा काहीही संबंध नाही.

(६३) श्री. चित्रावशास्त्रींच्या "संपूर्ण ऋग्वेदा"तील आणि श्री. कोलंगडे यांच्या "ऋग्वेद दर्शन" व "लघु ऋग्वेद" ह्या तीन ग्रंथातील सारांश अगदी थोडक्यांत वर दिला आहे. तो वाचल्यावर असे वाटते की, ऋग्वेदातील देवता आणि मंत्ररचनाकार ऋषी यांनी मंत्ररचना करण्यात व यज्ञविधी करण्यात आणि देवतांना यज्ञात अर्पण केलेल्या वस्तू खाण्यात व ऐषआराम भोगण्यात संपूर्ण आयुष्य खर्ची घातले आहे. यज्ञात निरपराध पशूंचे मांस व सोम (मद्य) या दोन वस्तू ऋषींच्या देवतांच्या अत्यंत आवडत्या ऋषींमुनी त्या देवतांना अर्पण करतात, त्या देवांना मिळतात, आणि देव त्या खातात, पितात आणि भक्तांना प्रसन्न होतात व देव ऋषींनी मागितलेले सर्व काही देतात !

**सारांश :–** वेदातील ऋषी आणि देवता संपूर्ण आयुष्यभर पशूंच्या मांसान्नावर आणि सोम (मद्य) पानावरच जगत होत्या, असे स्पष्ट दिसते. वैदिक ऋषी आणि देवता यांचा आचार, विचार व उपासनेचा आणि दैत्य, दानव, राक्षस यांचा आचार, विचार व उपासनेचा तुलनात्मक विचार केल्यास असे वाटते की, वैदिक आर्य ऋषी आणि देवतांपेक्षा असुरांचा आचार, विचार नि उपासना श्रेष्ठ आहे. कारण असुर यज्ञप्रेमी नव्हते. ते एकाद्या विशिष्ट देवतेला प्रसन्न करून घेण्यासाठी आयुष्यात एखाद् दुसरा यज्ञ करीत त्यात हिंसा, अभिचार प्रमुख असत. त्यांचा मुख्य उपास्य देव "शंकर" आणि तो मांसाहारी, मद्यपानी नाही. काही वेळा त्यांनी ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेऊन विशिष्ट वर मागून घेतल्याच्या कथा पुष्कळ आहेत. आणि शंकराकडून अनेक असुरांनी अनेक वर मागून घेतल्याच्या कथाही हजारोंनी आहेत. रावणाने शंकराकडून आत्मलिंग आणि पार्वतीलाही मागून घेतले होते!

(६४) राक्षसांचे आवडते देव शंकर, ब्रह्मदेव आणि सरस्वती. त्यांना प्रसन्न करून घेण्याकरिता कोणत्याही असुराने यज्ञादी निंद्य कर्म केले नाही त्यांना प्रसन्न करून घेण्याकरिता ते तपश्चर्या (त्या देवतेचे ध्यान) करीत. तपश्चर्येच्या काळात फळे व कंदमुळे खात. असुर मांसाहार आणि मद्यपान करीत होते. परंतु त्यात त्यांचे देव सहभागी नव्हते.

(६५) वेदांत अध्यात्म, एकेश्वरी–एक नामी उपासना, अहिंसा आणि नीती-तत्त्वे भरपूर आहेत. परंतु हिंसक वैदिक आर्य आणि ऋषी व त्यांच्या हिंसाचारी देवता यांच्या आचारात ती तत्त्वे अजिवात नव्हती, असे म्हटले तर ते वावगे होणार नाही. नव्हे तर ते सत्यच आहे.

वरील विचारांती असा निष्कर्ष निघतो की, वैदिक आर्य ऋषी आणि त्यांच्या वैदिक देवतांच्या आचार-विचारांपेक्षा दैत्य, दानव व राक्षस यांचे आणि चार्वाकांचे व लोकायतांचे आचार, विचार, उपासना श्रेष्ठ आहेत आणि वैदिक ऋषी आणि देवतांच्या निकृष्ट आहेत.

## —: तुलनात्मक विचार :—

| (६६) दैत्य, दानव, राक्षस (असुर) आचार-विचाराने श्रेष्ठ | वैदिक आर्य ऋषी आणि त्यांच्या देवता हिंसाचारामुळे कनिष्ठ. |
| --- | --- |
| १. हे मांसाहारी आणि मद्यपानी होते. | १. हे मांसाहारी, मद्यपानी नेहमीच होते; आहेत. |
| २. त्यांच्या मांसाहारात यांचे देव सहभागी नव्हते. | २. तें—भक्त आणि देवता दोघेही मांसाहारी, मद्यपानी होते व आहेत. |
| ३. त्यांचा मुख्य देव एकच होता. | ३. त्यांचे हजारो देव होते आणि आहेत. |
| ४. त्यांचा देव मांसाहारी व मद्यपानी नव्हता आणि नाही. | ४. त्यांचे ऋषी आणि देवता मांसाहारी व मद्यपानी होते व आहेत. |
| ५. ते देवाला प्रसन्न-करून घेण्याकरिता तपश्चर्या (देवाचे ध्यान) करीत. | ५. त्यांच्या देवाला प्रसन्न करून घेण्याकरिता ते मांसाहार आणि मद्य देत होते; देतात. |
| ६. त्यांचा देव प्रसन्न व्हायला हजारो वर्षे तप करावे लागत असे. | ६. त्यांचे देव मांसाहार आणि मद्य मिळाले की, तावडतोब प्रसन्न होत आणि होतात. |
| ७. याचे देव निसर्गनियमांविरुद्ध वर देत नव्हते. | ७. त्यांचे देव निसर्गनियमांविरुद्ध वर देत. बायको नसताना पुरुषांना मुलें देत. पती नसतांना स्त्रीलाही मुलें होत. असे निसर्गनियमांविरुद्ध अनेक चमत्कार त्यांचे देव आणि ऋषी करीत होते असे वेदांत दिसून येते. |

८. ते यज्ञयाग करीत नव्हते.

८. त्यांचे ऋषी यज्ञ करीत होते. यज्ञात देवताप्रित्यर्थ १४ प्रकारचे पशु बळी देत. देव ते पशुमांस खात आणि मद्यही पीत. तसेच त्यांचे ऋषी २९ प्रकारचे पशुपक्षी खात असत.

९. त्यांच्या संभोगकथा रामायणात लिहिल्याप्रमाणे होत्या.

९. त्यांच्या संभोगकथा त्यांच्याही पेक्षा विचित्र आहेत. त्यांचा मुख्य देव इंद्र ह्याने अत्री ऋषींच्या त्वचारोगी मुलीला संभोग दिल्याने तिची रोगी त्वचा गळून पडली आणि ती सूर्यासारखी तेजस्वी झाली. तिच्या गळून पडलेल्या रोगी त्वचेपासून अनेक क्षुद्र प्राणी निर्माण झाले. अशा अनेक चमत्कार-कथा वेदात आहेत. असेच चमत्कार ऋषी आणि देव करीत होते.

१०. त्यांचा देव कोणत्याही निरप-राधी प्राण्यांना मारीत नाही.

१०. त्यांच्या हजारो देवांनी त्यांचा अपराध न केलेल्या शेकडो भारतीय आर्यांच्या दास, पणि या नावांनी संबोधलेल्या, यज्ञ न कर-णाऱ्या राजांना, त्यांच्या सहकाऱ्यांना आणि कोटच-वधी प्रजेला मारल्याच्या कथा ऋग्वेदात आहेत.

११. हे स्वतःच मांसाहार व मद्य-पान करीत.

११. त्यांचे देवता ऋषी, राजा, प्रजा, सर्वच मांसाहारी होते. त्यांचे मुख्य देव अग्नी आणि इंद्र होते. इंद्राला एका वेळेच्या भोजनाला ३०० रेडयांचे मांस आणि ३ हांडे मद्य लागत होते. त्याचे हजारो देव अमर होते. तेव्हा एकाटच्या इंद्राला त्याच्या संपूर्ण आयुष्यात किती पशू आणि मद्य लागले असेल ? त्याचे आयुष्य विश्वारंभापासून ते द्वापार युगाअखेर २०० कोटी वर्षांचे होते. तेव्हा एका इंद्राला किती पशू लागले असतील आणि हजारो देवतांनी किती पशू फस्त केले असतील ते ब्रह्मदेवालाही सांगता येणे कठीण !

१२. त्यांना (असुरांना) आणि जगातील सर्व मांसाहारी मानवांना जिवंतपणीच मांसाहार लागतो.

१२. त्यांच्या देवता, ऋषी, राजे, या सर्वांना जिवंतपणी मांसाहार लागतोच. परंतु मेल्यावर यांच्या प्रेतांनाही बोकडाचे आणि गायीचे मांस लागते.

१३. त्यांच्या देवाला (शंकराला) भारतातीलच नव्हे तर जगातील सर्व लोक मानीत होते, आणि मानतात.

१३. त्यांच्या हजारो देवतांना त्यांच्याशिवाय कोणीही मानीत नव्हते आणि आताही मानीत नाहीत.

१४. त्यांचा देव व्यापक असून हिमालयावरील स्वर्गात राहतो. १४. त्यांच्या हजारो देवता अंतराळातील स्वर्गात राहतात.

वरील तुलनात्मक विचारांत भारतीय असूर श्रेष्ठ आणि वैदिक आर्यांचे ऋषी व देवता कनिष्ठ असल्याचे स्पष्ट दिसून येते. कारण, वैदिक आर्यांच्या देवता आणि भक्त, ऋषी यांचा विचार केल्यास असे वाटते की, त्यांच्या देवता " श्रीसंत तुकाराम महाराज म्हणतात त्या कोटीतल्या ( सेंदरी हेंदरी दैवते। कोण ते पूजीती भूते खेते । ते आपल्या पोटासी रडते । मागती शिते अवदान..." संत तुकाराम. ) होत्या.

याप्रमाणे वैदिक आर्यांच्या देवता म्हणजे निव्वळ भुते–खेतेच होत असे वाटते. ह्या भुताखेतांना त्यांनी देव मानवाची नावे देऊन, त्यांना काल्पनिक चमत्काराने नटवून, सजवून स्वतःच्या असुरी आचार-विचाराना धार्मिक स्वरूप देऊन, मूळच्या सर्वश्रेष्ठ वेदात समाविष्ट केले आहे. मानव जातीतील सर्वात कनिष्ठ दैत्य, दानव, राक्षस (असूर) आहेत असे वाटते; परंतु असुरांपेक्षाही वैदिक आर्य, ऋषी व त्यांच्या हजारो देवता आणि वैदिक आर्यांचे सर्वश्रेष्ठ धर्मग्रंथ जे " वेद" ते कनिष्ठ आहेत, असा वेदातूनच स्पष्ट अर्थ निघतो. तसेच चार्वाकाच्या आचार-विचारांपेक्षाही वैदिकांचे आचार-विचार कनिष्ठ आहेत.

" **विश्वधर्म** " ग्रंथांत पान क्र. ७९ ते ८४ मध्ये पारशी, मुसलमान व ख्रिस्ती धर्म श्रेष्ठ आणि हिंदू धर्म कनिष्ठ हा तुलनात्मक लेख आपण वाचलाच आहात. आता असुरांपेक्षाहि वैदिक आर्यांचा हिंदू धर्म कनिष्ठ कसा आहे तोही आपण पाहिला.

(६७) **वेदरचनाकाल** : आधुनिक भारतीय विद्वानांची मते

| | इ. स. पूर्व |
|---|---|
| (१) श्री. वा. गं. टिळक | ५०००–३००० |
| (२) श्री. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ५०००– ८०० |
| (३) डॉ. भांडारकर | २५०० |
| (४।५) श्री. उमेशचंद्र पावगी आणि विनाशचंद्र दास लाखो वर्षापूर्वी झाली असे म्हणतात. | |
| (६) श्री. वांदर | १५००० वर्षांपूर्वी |
| (७) श्री. ए. डॉ. पुलसकर | २५०० |

(८) श्री. व्यंकटेश ११००
(९) श्री. बी. आर. कराडीकर ४०००
(१०) श्री. राधामुकुंद मुकर्जी २५००
(११) श्री. सी. बी. वैद्य ४५००
(१२) श्री. जैकोबी ४०००
(१३) श्री. मॅक्स मूलर (पाश्चात्य पंडितांची मते) १०००
(१४) श्री. होगें २०००–१४००
(१५) श्री. हवीट्नी २०००–१५००
(१६) श्री. व्रेन्फी २०००
(१७) श्री. ब्लूम फील्ड २०००
(१८) श्री. मॅक्डोनल १३००–१०००
(१९) श्री. एफ्. मूलर विल्सन १०००–१५००
(२०) श्री. केशी मी. १०००–२०००
(२१) श्री. विंटर नित्स २५००
(२२) आधुनिक विद्वान् महर्षी दयानंद म्हणतात : वेदरचना विश्वारंभी झाली. चार ऋषींनी चार वेदांची रचना केली.
(२३) डॉ. चित्रावशास्त्री ३३००–१३००
(२४) श्री. कोलंगडे म्हणतात : वेदरचना सत्ययुगात झाली.
(२५) श्री. देवधर म्हणतात : ३७,३२,४८० वर्षांपूर्वी वेद निर्माण झाले आहेत.
(२६) संत ज्ञानेश्वर म्हणतात : " प्रलय कालात भगवंत झोपलेले असता त्यांच्या घोरण्याचा जो नाद प्रगट झाला, त्यामधून वेद नादरूपाने जन्म पावले. ज्ञानेश्वरांप्रमाणेच सर्व महाराष्ट्रीय संतांनी, मध्वाचार्यादी पंथीयांनी निरनिराळ्या प्रकारभेदाने वेदांची थोरवी गायिली आहे.
(२७) माझे स्वतःचे साधार मत :– वेदरचना तीन काळांत झाली आहे. प्रथम रचना सत्ययुगाच्या शेंवटच्या काळात झाली. तीं श्री. म. दयानंदांनी म्हटल्याप्रमाणे चार ऋषींनी चार वेदांची रचना केली असावी. त्या चार वेदांवर महर्षी रावणाने भाष्य केले, असा रामायणात आधार आहे. वेदांवरील भाष्यकारांच्या यादीत रावणाचे नाव आहे. वेदरचनेचा दुसरा कालखंड संपूर्ण त्रेतायुग आणि संपूर्ण द्वापारयुग होय. या

युगातील वेदमंत्ररचना श्रीव्यासांनी द्वापार युगाचे शेवटी एकत्रित करून, पहिल्या चार वेदांत समाविष्ट केली असावी. तिसऱ्या वेद-रचना कालांतील वेदमंत्र भारतीय आर्यांचे नसून, उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांनी भारतात येताना आपले वेदमंत्र बरोबर आणले असावेत. ते श्रीव्यासानंतर व्यासशिष्य वैशंपायन, त्यांचे शिष्य व भाचे महर्षी याज्ञवल्क्य यांनी भारतीय आर्यांच्या पूर्वीच्या चार वेदांत समाविष्ट केले. याला आधार याज्ञवल्क्यांच्या चरित्रात सापडतो. याज्ञवाल्क्य ऋषींनी स्वतःच्या मताला अनुकूल शुक्ल यजुर्वेद आणि शतपथ ब्राह्मण हे दोन महान् ग्रंथ निर्माण केले आहेत.

माझ्या पहिल्या कालखंडाबद्दलच्या मताला आधार दयानंद सरस्वती आणि श्री. कोलंगडे या दोघांचा आहे. रामायण, भारत याही ग्रंथात भरपूर आधार आहेत. महर्षी व्यास आणि डॉ. चित्रावशास्त्री या दोघांचा दुसऱ्या कालाला आधार आहे आणि तिसऱ्या कालखंडाला आधार महर्षी याज्ञवल्क्यांच्या चरित्रात सापडतो.

(६८) वर उल्लेखिलेल्या मंडळींपैकी उमेशचंद्र पावगी, विनाशचंद्र दास, दयानंद सरस्वती आणि कोलंगडे सोडून इतर वेदोत्पत्तीचे काल सांगणाऱ्या मंडळींच्या मते, वेद-रचनाकार उत्तरध्रुवीय वैदिक आर्य आहेत. श्री. बाळशास्त्री हरदास यांनी आपल्या " वेदातील राष्ट्रदर्शन " या व्याख्यान ग्रंथात पा. क्र. २२५ मध्ये लिहिले आहे की, वैदिक संस्कृतीच्या इतिहासाचे उत्तर ध्रुवावरील हिमप्रलयाच्या विपत्तीने दोन विभागच केलेले आहेत. आजचे वेदाचे संहितीकरण, हिमप्रलयानंतर त्रुटीत असलेले वेदवाङ्मय एकत्रित करून, श्रीव्यासांनी केलेले हे वेदाचे दुसरे संहितीकरण आहे. याच्यापूर्वी हिमप्रलयपूर्व कालीं, यज्ञप्रधान वैदिक संस्कृती व त्याला आवश्यक ते वेदाचे संहितीकरण अस्तित्वात होते, असे ऋग्वेदावरूनही उघड दिसते. त्या स्थितीचा उल्लेख (देवांना पूर्वे युगे) (तानि धर्माणि प्रथमान्यासन्) इत्यादी शब्दांनी वेद वाङ्मयातून प्रगट होतो. या बाळशास्त्रींच्या आणि इतर मंडळींच्या मताप्रमाणे वेदांच्या जन्माचा काल वरील मंडळींनी दिला आहे. या सर्व मंडळींच्या मते संपूर्ण वेद हे उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांचेच आहेत.



(६९) माझे (लेखक) साधार मत असे आहे की, वेदरचना तीन

कालांत झाली. पहिली रचना सत्ययुगाच्या शेवटच्या काळात भारतात झाली. दुसरा रचना-काल फार मोठा एकवीस लक्ष अठ्ठावीस हजार वर्षांचा म्हणजे, त्रेतायुग व द्वापारयुग या संपूर्ण दोन युगांचा आणि तिसरा रचना काल कलियुगारंभी म्हणजे इ. स. पूर्व ३००० वर्षे ते इ. स. १४ व्या शतकापर्यंतच्या दरम्यानचा कालावधी होय.

(७०) पहिल्या व दुसऱ्या कालांतील वेदरचना भारतनिवासी भारतीय आर्यांनी केलेली आहे. याला आधार त्रेतायुगातील "रामायण" व द्वापारयुगातील "भारत" तसेच "भारत वर्षाचा शुद्ध इतिहास," या तीन ग्रंथांत भरपूर आहेत. चार वेदांचे संहितीकरण व त्यावरील प्रथम भाष्य सत्ययुगातील महर्षी रावणाने केले. याला आधार रामायणात आहे. त्याच चार संहितेत (वेदांत) त्रेतायुग व द्वापार युगातील अनेक ऋषींनी निर्माण केलेले, विखुरलेल्या अवस्थेत असलेले मंत्र पूर्वीच्याच चार वेदांत समाविष्ट केले आहेत; आणि तिसरी रचना, उत्तर ध्रुवीय वैदिक आर्यांची आहे. त्याचे विलीनीकरण पूर्वीच्याच चार वेदांत याज्ञवल्क्य आदी कलियुगातील वैदिक आर्य ऋषींनी केले आहे.

(७१) या तिसऱ्या काळातील उत्तर ध्रुवीयांच्या वेदमंत्राच्या विलीनीकरणाने भारतीय आर्यांच्या वेदाचे श्रेष्ठत्व, धर्मग्रंथत्व नष्ट होऊन, वेद किती कनिष्ठ झाले आहेत हे मागे आपण पाहिलेच आहे. अशा प्रकारे निंद्य बनवलेल्या वेदांची निंदा चार्वाक, बौद्ध, जैनांनीच फक्त केली. या वेदविरोधी लोकांचे वर्चस्व नष्ट करण्याकरिता माध्व, रामानुज, शंकराचार्यादी विद्वानांनी आणि वारकरी सांप्रदायी ज्ञानेश्वर, तुकारामादी ४०-४५ संतांनी मात्र अशा निंद्य बनवलेल्या वेदांची सर्वत्र श्रेष्ठत्वाने स्तुती केली आहे. असे का ? हा प्रश्न समोर उभा रहातो. त्याचे उत्तर असे की, या सर्व मंडळींना प्रत्यक्ष वेद पहायला, वाचायला मिळालेच नसावेत. कारण वैदिक आर्यांनी वेदांना निंद्य बनवून, वेदांवरील ब्राह्मणेतर तिन्ही वर्णांचे अधिकार नष्ट करून, ते वेद गुप्त ठेवून, त्याच्या श्रेष्ठत्वाचे वर्णन ब्राह्मणे, सूत्रे, स्मृती, उपनिषदे, शास्त्र-पुराणादि हजारो ग्रंथातून करून ठेवले आहे. या वेदानंतरच्या वाङमयाच्या आधाराने वरील सर्व मंडळींनी वेदांचे श्रेष्ठत्व मानिले आहे. त्यातील थोडे पुढे देत आहे. याला शेकडो लोकांचे, वेगवेगळ्या मतांचे आधार आहेत.

विस्तारभयास्तव ते सर्व येथें देणे अशक्य आहे.

(७२) वेदांच्या श्रेष्ठत्वाचे चमत्कारिक असंभाव्य वर्णन (वेदातील राष्ट्रदर्शन पा. क्र. ११ ते २०): (१) सर्वात्मक विराट पुरुषास पशू करून त्याचा देवांनी जो यज्ञ केला त्यापासून ऋचा, साम, छंद व यज्ञ उत्पन्न झाले. (ऋ. पुरुष सूक्त). (२) इंद्र ऋचापासून झाला व ऋचा त्याच्यापासून झाल्या. (अर्थववेद) (३) प्रजापतीपासून अग्नि, वायू, सूर्य, हे उत्पन्न झाले व या त्रिविध तळपणाऱ्या प्रकाशांपासून तीन वेद उत्पन्न झाले. अग्निपासून ऋवेद, वायुपासून यजुर्वेद व सूर्यापासून सामवेद (शतपथ ब्राह्मण). (४) हे मैत्रेयी, महद्‌भूत अशा परमात्म्याचे श्वास हेच ऋग्, यजु, साम व अथर्व वेद आहेत. (बृहदारण्यक). (५) ब्रह्मदेवानें भारद्वाजाला पर्वतप्राय असे तीन वेद दाखवले व त्या वेदांच्या तीन पर्वततुल्य राशीतून एकेक मूठ वेद हातात घेऊन तो म्हणाला, "हे भारद्वाजा, हे तीन पर्वत दिसत आहेत त्या वेदांच्या राशी आहेत. त्यांच्यातील एकेक कण म्हणजे एकेक स्वतंत्र वेदच आहे असे समज. वेद अनंत आहेत व त्यांचा अंत लागणे अशक्य आहे." (तैत्तिरीय ब्राह्मण). (६) मनुचेही म्हणणे वरील तीन क्रमांकातील लेखातील (शतपथ) मताप्रमाणेच आहे. (७) भारत : अच्युताने आपल्या मनापासून सरस्वती व वेद निर्माण केले (भीष्मपर्व ३।३९) व (शांतीपर्व १२९।२०). (८) ब्रह्मदेवाने गायित्री निर्माण केली व तिच्यापासून चार वेद निर्माण केले. (हरीवंश ११।५-६) (१०।४७). (९) प्रजापतीने आपल्या चार मुखापासून चार वेद व ॐकार व्याहृतिसहित उत्पन्न केले (भागवत स्कंध १२). अनेक पुराणानींही असेच म्हटले आहे. (१०) ॐकाराचे निरनिराळे प्रस्तार म्हणजे वेद होत. (११) पूर्वी ॐकार हा एकच वेद होता व नारायण हा एकच देव होता. आणि लौकिकाग्नी हा एकच अग्नी होता. त्रेतायुगाचे आरंभी पुरुरव्यापासून तीन वेद झाले. अग्नी व प्रजा यांच्या योगाने धन्य होऊन तो गंधर्वलोकाला गेला. (१२) महाभारतकार म्हणतात– 'युगान्तेऽन्तर्हितान् वेदान् सेतिहासान् महर्षयः लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा' युगप्रलयाचे वेळी इतिहाससहित गुप्त झालेले वेद तपश्चर्येने व ब्रह्मदेवाच्या कृपेनें पुनः ऋषींना मिळाले. (१३) हे वेद, त्रैलोक्याची हत्या करून व हवे त्याचे

अन्न भक्षण करूनही ऋग्वेद तोंडात (तोंडपाठ) असलेला मनुष्य निष्पाप व निष्कलंकच असतो (महाभारत). (१४) दयानंद सरस्वती म्हणतात की, ईश्वराच्या प्रेरणने विश्वारंभी चार ऋषींनी वेदरचना केली. त्याला आज २०० कोटी वर्षे झाली. दयानंदांचे 'विश्वारंभी वेद निर्माण झाले' हे म्हणणे योग्य वाटत नाही आणि त्याला दुसऱ्या कोणाचा आधारही नाही. वेद सत्ययुगाचे शेवटी निर्माण झाले हेच योग्य वाटते.

(७३) ह्या वरील मतांचा विचार केल्यावर हे सर्व निसर्ग-नियमांविरुद्ध असंभाव्य, चमत्कारिक असून त्यांच्यात एकवाक्यताही नाही. अशा श्रेष्ठ ग्रंथाच्या उत्पत्तीबाबत अनेकांची एकवाक्यता होऊन ती विचारवंतांच्या विचाराला पटणारी असायला पाहिजे. उदाहरणार्थ– रामाच्या, कृष्णाच्या जन्मकथांविषयी लाखो लोकांची एकवाक्यता आहे. त्याप्रमाणे वेदांविषयी एकवाक्यता नाही. वेदांविषयी वर उद्धृत केलेली मते म्हणजेंज निव्वळ अज्ञानी, अंधश्रद्धाळू लोकांच्या, निरर्थक, भ्रामक कल्पना आहेत असे वाटते. परंतु हा प्रकार अज्ञानातून निर्माण झाला नसून, मुद्दाम हेतुपुरस्सर वैदिक आर्यांनी निर्माण केला आहे. ५००० वर्षे गुप्त होते ते वेद आज बाजारात विकत मिळत आहेत. ते वाचल्यास कोणाही विचारवंत वाचकांना पटेल की, वेदाइतके कनिष्ठ ग्रंथ फक्त वेदच होत, यात तिळमात्र शंका नाही.

(७४) **वेदांवरील भाष्यकार :–** ( १ ) यास्काचार्य इ. स. ६००. ( २ ) व्यंकटतनय माधवभट्ट इ. स. ११००. ( ३ ) माधव यांचा काल माहित नाही. (४) मध्वाचार्य इ. स. १३००–१४००. (५) सायणाचार्य इ. स. १३००–१४००. हे शेवटचे भाष्यकार होत. (६) लक्ष्मण, (७) आत्मानंद, (८) रावण, (९) मुद्गल, (१०) चतुर्वेदस्वामी, (११) देवस्वामी, (१२) भट्ट भास्कर, (१३) उवट. (१४) हरदत्त. क्रमांक ६ ते १४ यांची भाष्ये अर्धवट व उपलब्ध नाहीत. (१५) महर्षी दयानंद सरस्वती इ. स. १९३३. (१६) पं. सातवळेकर, चारही वेदांवरील हिंदी व मराठी भाषांतर (१७) श्री. रामशर्मा, चारही वेदावर हिंदी भाषांतर. (१८) श्री. पटवर्धन यांनी मराठी 'श्रुतीबोध' लिहिला आहे. (१९) श्री. कोलंगडे– लघुऋग्वेद मराठी भाषांतरासह; (२०) डॉ.

चित्रावशास्त्री– ऋग्वेद व अथर्व वेदांचे मराठी भाषांतर. (२१) श्री. देवधर–चारही वेदांचे संक्षिप्त मराठी भाषांतर.

**पाश्चात्य भाष्यकार** : (२२) इंग्रजी पंडित ग्रिफिथ व विल्सन; (२३) जर्मन पं. ग्रासमन व लूडविंग; (२४) लॅटिन पं. रोशन्. ही वरील भाष्यकारांची यादी श्री. कोलंगडे यांच्या 'लघु–ऋग्वेद' ग्रंथात प्रथमारंभीच्या पान क्र. १९ वरून घेतली आहे.

(७५) ह्या वरील भाष्यकारांच्या यादीत क्रमांक ८ वर रावण नावाचा भाष्यकार आहे. हा रावण ब्रह्मदेवाचा मुलगा पुलस्त्य, त्याचा मुलगा वैश्रवण ऋषी व त्याचा मुलगा हा रावण होय. याला आधार "भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोश." (ले. चित्रावशास्त्री; पान क्र. ४८८). रावणाने वेदांची खंडे केली, अशी प्रसिद्धी असून, रावणकृत पदपाठ नुकताच सापडला आहे. रावणकृत ऋग्वेदभाष्यही सापडते. हा रावण सत्ययुगाच्या शेवटच्या काळात होता आणि रामाने मारलेला रावण त्रेतायुगाच्या शेवटच्या काळात होता.

प्राचीन इतिहासांत चार रावण असल्याची माहिती मिळते. पहिला रावण सत्ययुगाच्या शेवटच्या काळांत झालेला, ब्रह्मदेवाचा अपौत्र होय. याची माहिती डॉ. वर्तक लिखित 'वास्तव रामायणा'तील पान क्रमांक ९ ते ११ मध्ये आहे. दुसरा, तिसरा व चौथा रावण त्रेतायुगाच्या शेवटच्या काळांत रामाने मारलेला दशमुखी व शतमुखी आणि सीतेनें मारलेला सहस्त्रमुखी अशा तीन रावणांची व पहिला रावण या चारही रावणांची माहिती "भारतीय प्राचीन चरित्रकोश" (लेखक म. म. डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव.) या ग्रंथातील पान क्रमांक ४८७ ते ४८८ मध्ये आहे.

पाचव्या रावणाची एक माहिती मिळते. एक विद्वान रावण कर्नाटकात राहात होता. त्याने दोन ग्रंथ लिहिले आहेत: (१) 'अर्कप्रकाश,' (२) नाडीसंबंधी माहिती असलेला ग्रंथ. याची माहिती बहालगढ (सोनीयत हरयाणा) येथून प्रकाशित होणाऱ्या 'वेदवाणी' मासिकच्या सहाव्या अंकात पान क्र. चार मध्ये आहे. श्री. कोलंगडे म्हणतात कीं, प्रथम वेदरचना सत्ययुगात सुरू झाली आणि दयानंदही तसेच म्हणतात. रामायणांत रावणाने वेदांचे चार खंड केले असा उल्लेख आहे.

हा पहिला रावण ऋषीपुत्र होता. त्याचे प्रथमाचरण महान् ऋषीतुल्य होते. नंतर तो राक्षसाचारी झाला असा उल्लेख आहे. आणि हा रावण सत्ययुगाच्या शेवटच्या कालांत होता. याला आधार " वास्तव रामायणात" आहे. याच्या पुढचे सर्व रावण राक्षसाचारी राक्षसच होते. शेवटचा रावण त्रेतायुगाच्या शेवटी रामाच्या कालांत होता आणि रामाने त्याला मारले. तेव्हापासून रावण नावाची परंपरा बंद पडली. महर्षी रावणाशिवाय, रावण नांवाचा कोणी ऋषी होता असे आतांपर्यंत कोठेही आढळले नाही. त्यावरून त्या सत्ययुगातील प्रथम रावणानेच वेदांचे चार भाग केले हे सिद्ध होते. दयानंद म्हणतात की, वेदरचना चार ऋषींनी केली आहे. त्यावरच रावणाने प्रथम भाष्य केले असावे. त्या वेळी वेदमंत्रही अल्पच असतील. त्या नंतर २१,२८,००० या प्रदीर्घ कालात जी वेदमंत्र रचना झाली. ती सर्व विखुरलेलीच असावी. त्रेता व द्वापार युगातील विखुरलेले वेदमंत्र एकत्र करून द्वापार-युगाचे शेवटी महर्षी पाराशर्य व्यासांनी एकत्र करून पूर्वीच्याच चार ग्रंथात समाविष्ट केले असावेत.

वेदांचे प्रथम भाष्यकार सत्ययुगातील महर्षी रावण व दुसरे महर्षी व्यास, द्वापारयुगाचे शेवटी आणि शेवटचे भाष्यकार कलियुगातले सायणाचार्य. रावणाला २१,२८,००० वर्षे झाली. व्यासांना ५००० वर्षे झाली आणि सायणाचार्यांना ६०० वर्षे झाली.

(७६) ह्या वरील भाष्यकारांत विशेष महत्वाचे चारही वेदावर भाष्य लिहिणारे (हिंदी भाषांतरासह) आधुनिक युगांतील भाष्यकार 'महर्षी दयानंद सरस्वती' हे स्वतंत्र बाण्याचे, विद्वान महापंडित असून त्यांनी वेदांवर सुंदर भाष्य लिहिले आहे. त्यांची अगाध विद्वत्ता, सखोल वेदाभ्यास व स्वतंत्र विचारसरणी आणि संस्कृत भाषेवरील प्रभुत्व ही चांगली प्रतीत होतात. त्यांनी वैदिक धर्माची बहुमोल सेवा केली आहे. तिला तोड नाही. परंतु त्यांच्या भाष्याला परंपरेचा आधार नाही म्हणून कित्येक सनातनी पंडितांना ते मान्य नाही, हे एक वैदिकांचे दुर्दैवच म्हणावे लागेल.

(७७) याज्ञवल्क्यानें मोठा प्रयास करून मूळ वेदांचे स्वरूप बदलल्याने वेद निंद्य झाले. ते असह्य झाल्यानें, आधुनिक महान् विद्वान

पंडित महर्षी दयानंद सरस्वतीने, निंद्यत्व पावलेल्या वेदांना अबाधित करून वंदनीय केले आणि पाच हजार वर्षांपूर्वीची आच्छादलेली, वेदांची कनिष्ठता दूर करून वेदांचे पूर्वश्रेष्ठत्व प्रकाशित केले. वेदांच्या कनिष्ठत्वाला श्रेष्ठ मानून त्यास चिकटून वावरणाऱ्या, सनातनी वैदिकांना ते मानवले नाही, सहन झाले नाही, हे त्यांच्या कृतींवरून स्पष्ट होते; म्हणून वेद निंद्यच राहिले.

तुलनात्मक दृष्टीने विचार केल्यास, वेदांन निंद्य बनवणाऱ्या महर्षी याज्ञवल्क्यापेक्षा वेदाचे पूर्वश्रेष्ठत्व प्रस्थापित करणारे महर्षी दयानंदांना श्रेष्ठ मानावे लागेल.

## यजुर्वेदातील यज्ञाचार

### यजुर्वेदातील देवतांप्रित्यर्थ पशू-हत्याकांडाची व मानवहत्याकांडाची माहिती

(महाराष्ट्रीय ज्ञानकोश : प्रस्तावना खंड–विभाग दुसरा.

लेखक श्री. व्यं. केतकर, एम्. ए, पीएच्. डी.)

(श्री. केतकरांच्याच शब्दात देत आहे– पा. क्र. १३४ ते १४१. फक्त) दोनच यज्ञांची माहिती :

**अश्वमेधांगभूत एकादशिन संज्ञक पशू**

**संघ पहिला**

| देवता : | पशू : |
|---|---|
| इंद्रराजा | डुक्कर |
| वरुणराजा | काळवीट |
| यमराजा | एका जातीचे हरिण |
| ऋषभराजा | मानेखाली पोळी नसते असा गायीसारखा पशू |
| शार्दूल राजा | पांढरा किंवा तांबडा हरिण |
| पुरुष राजा | वानर |
| क्षिप्रश्येन (शकुनीराजा) | चिमणीसारखे एक पाखरू |
| निलंगु ( निलवर्ण सर्पांचा राजा ) | शेणकिडा |

| | |
|---|---|
| देवता : | पशू : |
| सोमराजा | कर्णकटु आवाज करणारा चित्रक नावाचा पशू |
| समुद्र राजा | मगर |
| हिमवान (पर्वत राजा) | हत्ती |

संघ दुसरा

| | |
|---|---|
| प्रजापती | रानमोर |
| धाता | घुबड, हिरव्या अगर काळ्या रंगाची चिमणी व मांजर |
| सरस्वती | तांबड्या रंगाची बोलकी साळुंकी |
| सरस्वान् | पांढरा बोलका राघू |
| पूषा | कवडा, मुंगुस व माशी किंवा लांब कानाचा हरिण |
| वाक् | क्रौंच (करकोचा) |

संघ तिसरा

| | |
|---|---|
| अपान् पात् | माशासारख्या तोंडाचा मगर |
| अकूपार (समुद्र) | लांबट तोंडाचा मगर किंवा लांब शेपटीचा मासा व वळविलेल्या तोंडाचा मगर आणि पुष्कळ पायांचा एक जातीचा मासा |
| वाक् | लाल डोळ्यांचा भारद्वाज पक्षी किंवा चकोर |
| भग | समुद्र कावळा |
| वायु | हरिण किंवा चाष पक्षी, पाठीवर लहानसा शंख वाहणारा एक जंतु व पाणकोंबडा |
| दिशा | चक्रवाक |

संघ चौथा

| | |
|---|---|
| बल | अजगर |
| मित्र | उंदीर, नीलवर्ण पक्षिका किंवा पांढरा सर्प व सरडा |
| मृत्यु | कृष्णसर्प |
| मन्यु | आपोआप बिळात निर्माण होणारा सर्प |
| त्वष्टा | झोपाळू सर्प, भ्रमर व तांबूस पांढरा साप |
| प्रतिश्रुत्का | फुरसे (एक अगदी लहान जातीचा सर्प) |

संघ पाचवा

| | |
|---|---|
| चंद्रमा | माणसाच्या तोंडासारख्या तोंडाचा हरिण |
| वनस्पती | घोरपड, सरडा व झाडाच्या ढोलीत राहाणारा कोंबडा |
| अहः | हरिणी |
| रात्री | काळवीट |
| अर्यमा | कोकीळ, लाल तोंडाची व काळ्या डोक्याची वानरी |

### संघ सहावा

| देवता : | पशू : |
|---|---|
| धाता | खेकडा |
| सूर्य | वगळी |
| गंधर्व | हरिण, मोर व ससाणा |
| वसू | चातक किंवा कवडा |
| रुद्र | तित्तिर नावाचा पक्षी (माणसासारख्या स्वराचा) |
| अप्सरा | रोही, घूस व फिकट पिवळचा रंगाचा 'ताजवा' नावाचा पक्षी |
| अरण्य | पांढऱ्या शेपटीचा गवा |

### संघ सातवा

| | |
|---|---|
| विश्वेदेव | पांढऱ्या ठिपक्यांचा हरिण |
| अनुमती | व्याघ्र, हरिण व कश नावाचे हरिण |
| अर्धमास | अन्यवाप जातीचे हरिण |
| मास | कश्यप जातीचे हरिण |
| सिनीवाली | क्वयि (?), कुरूट व पानकोंबडा |
| बृहस्पती | मांजरासारखा एक प्राणी |

### संघ आठवा

| | |
|---|---|
| भूमि | माशी |
| पितर | पांत्र नावाचा पक्षी, कश नावाचा पक्षी व कोंबडा |
| ऋतू | बिळात राहाणारा कोल्हा |
| संवत्सर | स्मशानांत राहणारा घुवड किंवा कावळा |
| निर्ऋति | होलगड, घुबड व ससा |
| सविता | रानकोंबडा |

### संघ नववा

| | |
|---|---|
| रुद्र | रोही |
| शरव्या | सरडा, कावळा व पिप्पक नावाचा पक्षी |
| मरुत् | हरिण |
| ब्रह्मा | रानचिमणी |
| इतरजन | गाढवाच्या आकाराचा वाघ व डोळ्यावर ठिपके असलेला कुत्रा व गाढव |
| अग्नि | पांढरी कावळी |

### संघ दहावा

| | |
|---|---|
| अंतरिक्ष | आस नावाचा पशू |

| देवता : | पशू : |
| --- | --- |
| आप | पाणमांजर, पाणकावळा व एक जातीचा वानर |
| अदिती | पांढऱ्या रंगाचा हंस |
| इंद्राणी | कुंभारीण नावाचे पाखरू |
| द्यौ | गिधाड, पांढऱ्या पोटाचा गिधाड व खड्गमृग |
| द्यावा पृथ्वी | साळू नावाचा पशू |
| | **संघ अकरावा** |
| पर्जन्य | गरुड |
| इंद्र | हंस, लांडगा व एका जातीचे मांजर |
| आप | पाणमांजर |
| अर्यमा | कोल्हा |
| महेंद्र | सिंह, मुंगूस व वाघ |
| काम | रेडा |
| | **संघ बारावा** |
| अग्नि | मानेवर काळा रंग असलेला कोंबडा |
| सरस्वती | मेंढी |
| सोम | पिंगट वर्णाचा बोकड |
| पूषा | श्यामवर्ण बोकड |
| बृहस्पती | पांढऱ्या पाठीचा बोकड |
| विश्वेदेव | अनेकवर्णी बोकड |
| मरुत | काळ्या ठिपक्याचा बोकड |
| इंद्राग्नि | काळ्या पांढऱ्या मिश्र रंगाचा बोकड |
| सविता | काळ्या पांढऱ्या पोटाचा बोकड |
| वरुण | आंड वडविलेला मेंढा |
| | **संघ तेरावा** |
| प्रजापती | घोडा, शिंगे नसलेला बोकड व गवा |
| अग्नि | काळ्या रंगाच्या मानेचे दोन बोकड |
| त्वष्टा | मांड्यावर पुष्कळ केस असलेले दोन बोकड |
| बृहस्पती | पांढऱ्या पाठीचे दोन बोकड |
| धाता | पोटावर पांढरे ठिपके असलेला बोकड |
| सूर्य | पांढऱ्या रंगाचा आंड वडविलेला बोकड |
| | **संघ चौदावा** |
| अग्निरनीकवान् | लिंगावर तांबडा रंग असलेला बोकड |
| सविता | पांढऱ्या व काळ्या मिश्रवर्णाच्या पोटाचे दोन बोकड |

| देवता : | पशू : |
|---|---|
| पूषा | पांढऱ्या रंगाच्या बेंबीचे दोन बोकड |
| विश्वेदेव | गोरोचनाच्या रंगाचे दोन बोकड |
| मरुत् | विर्नाशिंगाचे दोन बोकड |
| अग्नि | काळ्या ठिपक्यांचा बोकड |

## (१) अश्वमेधांगभूत अष्टादशिन पशूसंघ

### संघ पहिला

| | |
|---|---|
| प्रजापती | तांबड्या वर्णाचा बोकड, फिकट तांबडा बोकड व काळा कुळकुळीत बोकड |
| रुद्र | पिंगट पांढरा बकरा, तांबूस पिंगट बोकड व पोपटी रंगाचा बोकड |
| पितर | तांबड्या रंगाचा बोकड, लाल डोळ्यांचा बोकड व तांबड्या मानेचा बोकड |
| वरुण | काळ्या रंगाच्या तीन शेळ्या |
| सूय | पांढऱ्या रंगाच्या तीन शेळ्या |
| मित्रा बृहस्पती | बिर्नाशिंगाच्या व कपाळावर धुरकट रंगाचे पान असलेल्या तीन शेळ्या |

### संघ दुसरा

| | |
|---|---|
| मरुत् | पांढरे ठिपके असलेला पांढरा बोकड, पांढऱ्या रंगाचे आडवे पट्टे असलेला बोकड व पांढरे उभे पट्टे असलेला बोकड |
| सरस्वती | मिठाच्या रंगाचा बोकड, तांबूस केसांचा बोकड व पांढऱ्या रंगाची शेळी |
| विश्वेदेव | पांढऱ्या ठिपक्याची, मोठाल्या पांढऱ्या ठिपक्याची व लहान लहान पांढऱ्या ठिपक्याची अशा ती शेळया |
| पूशा | काळ्या रंगाच्या तीन शेळ्या |
| मित्र | तांबड्या रंगाच्या तीन शेळ्या |
| इंद्राबृहस्पती | तांबड्या रंगाचे कपाळावर पान असलेल्या तीन शेळ्या |

### संघ तिसरा

| | |
|---|---|
| इंद्र वायू | एका बाहुट्यावर एक ठिकाणी पांढरा रंग असलेला, दुसऱ्या बाहुट्यावर पहिल्याहून निराळ्या जागी पांढरा वर्ण असलेला व सर्व बाहुटे पांढरे असलेला असे तीन बोकड |
| मित्रावरुण | पांढऱ्या रंगाचा भोवरा असलेले तीन बोकड |

| देवता : | पशू : |
|---|---|
| अश्विनौ | शेपटाचा काही भाग पांढरा असलेला, सर्व शेपूट पांढरे असलेला व काळचा-पांढऱ्या अशा मिश्र रंगाच्या शेपटाचा असे तीन बोकड |
| विश्वेदेव | नाना रंगाच्या शेळचा तीन |
| परमेष्टी | पांढऱ्या रंगाच्या शेळचा तीन |
| सोमा पोष्ण | कपाळावर भस्मासारखी श्यामवर्णाची खूण असणाऱ्या शेळचा तीन |
| | **संघ चौथा** |
| इंद्र वरुण | उंच पाठीचा, तरुण व ठेंगणा असे तीन बोकड |
| इंद्राबृहस्पती | पांढऱ्या वशिंडाचा, पांढऱ्या पाठीचा व पांढऱ्या ढुंगणाचा असे तीन बोकड |
| इंद्राविष्णु | पांढऱ्या पायांचा, पांढऱ्या ओठांचा व पांढऱ्या भिवयांचा असे तीन बोकड |
| विश्वकर्मा | पांढऱ्या पायांच्या व भुऱ्या अंगाच्या तीन शेळचा. |
| धाता | पोटावर ठिपकेठिपके असणाऱ्या तीन शेळचा. |
| इंद्रा पोष्ण | कपाळावर पांढरे पान असणाऱ्या तीन शेळचा. |
| | **संघ पांचवा** |
| यम | कान कापलेल्या तीन शेळचा. |
| सोम | पांढऱ्या पायाच्या तीन शेळचा. |
| अग्नियविष्ठ | मुंगुसासारख्या तीन शेळचा. |
| वसू | तांबूसवर्णाच्या व दीड वर्षाच्या वयाच्या तीन शेळचा. |
| रुद्र | अरुण वर्णाच्या व दोन वर्षे वयाच्या तीन शेंळचा. |
| सोमेंद्र | पिंगवर्णाचे पान कपाळावर असलेल्या तीन शेळचा. |
| | **संघ सहावा** |
| विष्णु | तीन ठेंगु बोकड. |
| विष्णुउरुक्रम | कानावर कान वाढलेले तीन बोकड. |
| विष्णुऊरुगाव | लांब शेंपटाचे तीन बोकड. |
| आदित्य | साडेतीन वर्षांच्या वयाचे तीन बोकड. |
| अंगिरस | तीन वर्षे वयाचे तीन बोकड. |
| इंद्राविष्णु | कपाळावर गोरवर्णाची खूण असणारे भुंडे तीन बोकड. |
| | **संघ सातवा** |
| अदिती | तांबूस पिंगळ्या रंगाचे पशू तीन |
| इंद्राणी | काळे तांबूस वर्णाचे पशू. तीन |

| देवता : | पशु : |
|---|---|
| कुहू | गर्द तांबूस रंगाचे पशू तीन |
| राका | गायी तीन. |
| अग्राविष्णु | कपाळावर तांबूस पान असलेले तीन बोकड. |
| सिनीवाली | बैल तीन |
| | **संघ आठवा** |
| इंद्रराट् | पांढऱ्या पाठीचे पशू तीन. |
| इंद्राधिराट् | पांढऱ्या वशिंडाचे बैल तीन. |
| इंद्रस्वराट् | पांढऱ्या ढुंगणाचे तीन पशू. |
| साध्य | साडे चार वर्षे वयाच्या शेळ्या तीन. |
| विश्वेदेव | चार वर्ष वयाच्या शेळ्या तीन. |
| अग्निंद्र | काळ्या शेपटीचे पशू तीन. |
| | **संघ नववा** |
| सोम | गोरोचन वर्णाचे पशू तीन. |
| सोमराजा | सारंगवर्णाचे पशू तीन. |
| पर्जन्य | काजळी रंगाच्या तीन शेळ्या. |
| इंद्राणी | गळ्याशी स्तने असलेल्या तीन शेळ्या. |
| अदिती | मेंढ्या तीन. |
| द्यावा पृथ्वी | मोठ्या शरीराच्या शेळ्या तीन. |
| | **संघ दहावा** |
| वरुण | काळ्या रंगाचे पान कपाळावर असणारे पशू तीन. |
| वरुण राजा | तांबूस रंगाचे पान कपाळावर असलेले पशू तीन. |
| वरुणरिशादस | अरुण रंगाचे पान कपाळावर असलेले पशू तीन. |
| विश्वेदेव | नाना वर्णांचे पशू तीन. |
| सर्व देवता | ठिपक्या ठिपक्याचे पशू तीन. |
| इंद्रसूर | पांढऱ्या शेपटीचे पशू तीन. |
| | **पशूंच्या जोड्या** |
| सोमस्वराट् | गाडी ओढणाऱ्या बैलांची जोडी. |
| इंद्रग्नी (ओजोद) | गाडी ओढणाऱ्या उंटांची जोडी. |
| इंद्राग्नी (बलद) | नांगर ओढणाऱ्या व शेळीसारख्या लहान खुरांच्या बैलांची जोडी. |
| भूमि | दोन गायी. |
| दिशा | दोन घोड्या. |
| भूमि | गायी दोन |

| देवता : | पशू : |
|---|---|
| विराट् | मानवी स्त्रिया दोन. |
| भूमि | गायींची जोडी. |
| वायू | माणसाच्या गाडीला जोडण्याचे बैल दोन. |
| वरुण | काळवीट जातीच्या दोन हरिणी. |
| द्यु | ज्याच्या अगोदरचे व पाठचे भाऊ मेले आहेत अशा वोकडाची जोडी. |

अश्वमेधाच्या शेवटच्या दिवशी होणाऱ्या अतिरात्रामध्ये मारावयाचे पशू.

| | |
|---|---|
| प्रजापती | गायीच्या आकाराचे एक जातीचे अकरा पशू. |
| त्वष्ठा | बोकडाचे पिल्लू काळ्या पांढऱ्या रंगाचे, तित्तिरपक्षी व एक प्रकारचा कोंबडा. |
| सूर्य | पांढऱ्या रंगाच्या वांझ शेळचा ९. |

याशिवाय आहवनीयाकडे ज्याची एक कोर केलेली असते त्या उंच व मुख्य युपाच्या ठिकाणी अग्नी, ऐंद्राग्न, आश्वीन या तीन देवांच्या उद्देशाने तीन पशू मारण्यात येतात.

ऋतु पशू

| | |
|---|---|
| वसंत | गोरोचनाच्या रंगाचे तीन पशू. |
| ग्रीष्म | सारंग वर्णाचे तीन पशू. |
| वर्षा | निरनिराळ्या रंगातील ठिपक्यांचे पशू तीन. |
| शरद् | पांढऱ्या रंगाचे पशू तीन. |
| हेमंत | पांढऱ्या कंबरेचे पशू तीन. |
| शिशिर | मिश्रवर्णाने युक्त असे पशू तीन. |
| संवत्सर | उतरत्या छातीचा पशू एक. |

## (२) पुरुषमेध

| देवता | जाती |
|---|---|
| ब्राह्मण जात्यभिमानी देव | १ ब्राह्मणजातीय ब्रह्मवर्चस्युक्त पुरुष |
| क्षत्रिय जात्यभिमानी देव | २ क्षत्रियजातीय पुरुष |
| वैश्य जात्यभिमानी देव मरुत् | ३ वैश्यजातीय पुरुष |
| कृच्छ्रादि दुःखरूप तपाचा देव | ४ शूद्रजातीचा पुरुष |
| अंधकाराचा देव | ५ अंधकारप्रिय असा चोर |
| नरकाधिपती देव | ६ अग्नीचे उद्वासन करणारा |
| पापाधिपती देव | ७ नपुंसक माणूस |
| सर्व पदार्थांच्या विक्रीचा अधिपती देव | ८ आयोगू—अशास्त्र वर्तनाचा माणूस |

| देवता | जाती |
|---|---|
| काम देव | ९ पुंश्चलु–साधारण स्त्री |
| अतिनिंदित देव | १० मागध–मगध देशीय अथवा क्षत्रिय स्त्रीस वैश्यापासून झालेला |
| गीताभिमानी देव | ११ सूत–ब्राह्मणस्त्रीच्या ठिकाणी क्षत्रिय बीजाने झालेला, अथवा गायनावर पोट भरणारा माणूस |
| नृताभिमानी देव | १२ शैलूष–दुसऱ्याला आपली बायको देवून पोटाला पैसे मिळविणारा माणूस |
| धर्माभिमानी देव | १३ नेहमी सभेत जाऊन प्रवचन करणारा सभाचर |
| विनोदाभिमानी देव | १४ रेभ–बुद्धिवान, मधुरभाषी माणूस |
| दुसऱ्याच्या जीवावर अवलंबून राहणारी पारतंत्र्याभिमानी देवता | १५ भीमल–भित्रा व चपलनेत्र असा मनुष्य |
| हास्याभिमानी देव | १६ कारी–नाचत नाचत वेडावाकडा चालणारा माणूस |
| आनंदाभिमानी देव | १७ स्त्रियांच्या मनांत भरणारा पुरुष-स्त्रीषख |
| अत्यंत हर्षाभिमानी देव | १८ कुमारी पुत्र–मुलीचा मुलगा |
| ग्रंथार्थधारणाभिमानी देवता | १९ रथकार-रथ तयार करणारा हुषार माणूस |
| धैर्याभिमानी देवता | २० तक्षा–वर्धकी–लाकडे तासणारा माणूस |
| श्रमाभिमानी देवता | २१ कौलाल–कुंभाराचा मुलगा |
| विचित्रक्रिया शक्ती-देवता | २२ कामीर–लोहार |
| काळ्या-गोऱ्या रंगाचा अभिमानी देव | २३ मणिकार–मण्याचे व मोत्याचे काम करणारा |
| चांगल्याचा अभिमानी देव | २४ वप–बी पेरणारा |
| बाणसमूहाभिमानी देवता | २५ इषुकार–बाण तयार करणारा |
| आयुधाभिमानी देव | २६ धन्वकार–धनुष्याचे काम करणारा |
| हालचालीचा अभिमानी देव | २७ ज्याकार–धनुष्याचे दोरीचे काम करणारा |
| भवितव्याभिमानी देव | २८ रज्जुसर्ग–दोऱ्या वळणारा माणूस |
| मरणाभिमानी देव | २९ मृगयु–हरिणादि पशूंना मारणारा |
| प्राणापहारी देव | ३० श्वनित–कुत्र्यावरोबर खेळ खेळण्यावर पोट भरणारा माणूस |
| संघटनाभिमानी देव | ३१ जार–परस्त्रीगामी पुरुष |
| गृहाभिमानी देव | ३२ उपपति–नवऱ्याला माहित नसलेला जार |

| देवता | जाती |
|---|---|
| निर्ऋतिदेवता | ३३ परिवित–वडिल भावाच्या पूर्वीच लग्न करणारा धाकटा भाऊ |
| दुःख देवता | ३४ परिविविदान–प्रथम विवादशील म्हणजे आधी माझे लग्न करा म्हणणारा |
| कार्यसिद्धी प्रतिबंधाभिमानी देवता | ३५ दिधीषूपती–दोनदा लग्न करणाऱ्या बायकोचा नवरा |
| शुद्धाभिमानी देव | ३६ वैद्य |
| कालज्ञानाभिमानी देवता | ३७ ज्योतिषी |
| कार्यनिष्पादनाभिमानी देवता | ३८ सोनाराची स्त्री. |
| बलाभिमानी देवता | ३९ अन्न देऊन घेतलेली मुलगी |
| शुक्ल कृष्णाभिमानी देव | ४० दुसऱ्याच्या तंत्राने चालणारा माणूस. |
| नदी देवता | ४१ कैवर्त–कोळी जातीचा माणूस |
| शून्यस्थलाची देवता | ४२ निषाद जातीचा माणूस |
| श्रेष्ठत्वाचा अभिमानी देव | ४३ अत्यंत मदांध माणूस |
| युद्ध करणारी देवता | ४४ उन्मत्त प्रकृतीचा माणूस |
| गंर्वा व त्याच्या अप्सरा | ४५ शास्त्रीय संस्कारहीन पुरुष. अथवा व्रात्य |
| सर्पाभिमानी व इंद्रजालाभिमानी देवता | ४६ संस्कारांनी अयोग्य माणूस. |
| रक्षणाभिमानी देवता | ४७ द्युतासक्त माणूस – कितव. |
| अन्नसमृद्धयाभिमानी देवता | ४८ द्युतादि व्यसनरहित माणूस |
| देवयानी विशेष. | ४९ बुरुड जातीचा माणूस. |
| राक्षसांपैकी एका जातीचा देव | ५० बागेभोवती कांट्याचे कुंपण करणारा माणूस. |
| कार्यविनाशाभिमानी देव | ५१ कुबडा माणूस. |
| हर्षाभिमानी देव | ५२ खुजा माणूस. |
| द्वाराभिमानी देव. | ५३ रोगी माणूस. |
| स्वनाभिमानी देव. | ५४ आंधळा माणूस. |
| पापाभिमानी देव. | ५५ बहिरा माणूस. |
| सम्यग् ज्ञानाभिमानी देव. | ५६ औषधाने किंवा मंत्रतंत्र उपायांनी आपल्या नवऱ्याला कामेच्छा उत्पन्न करणारी स्त्री. |
| बहुप्रलापाभिमानी देवः | ५७ सभेत बहुत व्यर्थ बडबड करणारा माणूस. |

| देवता | जाती |
|---|---|
| वेदशास्त्राविषयी अल्पपरिज्ञानाभिमानी देवता. | ५८ शास्त्राविषयी शंका घेवून प्रश्न करणारा माणूस |
| वेदशास्त्र परिचयाभिमानी देवता. | ५९ शंकानिवारण करणारा माणूस. |
| शास्त्रार्थ व्यवस्थाभिमानी देव. | ६० दुसऱ्याच्या प्रश्नाचे विचारपूर्वक उत्तर देणारा. |
| चौर्य कर्म करून पळून जाण्याची अभिमानी देवता. | ६१ चोरी करण्यात पटाईत माणूस. |
| वीर हत्याभिमानी देवता | ६२ चहाडखोर माणूस |
| विशेषलाभाभिमानी देवता | ६३ सारथी |
| राजभांडाराभिमानी देवता | ६४ भांडारखान्यावरील अध्यक्ष माणूस |
| बलाभिमानी देव | ६५ चाकर माणूस |
| महत्त्वाभिमानी देवता | ६६ हुजरेगिरी करणारा माणूस |
| प्रियाभिमानी देवता | ६७ मृदुभाषणी माणूस |
| अहिंसाभिमानी देवता | ६८ घोडेस्वार |
| यज्ञवुद्धयाभिमामी देवता | ६९ परटाची स्त्री |
| प्रकृष्टकामाभिमानी देवता | ७० रंगाऱ्याची स्त्री |
| दीप्त्यभिमानी देवता | ७१ मोळीविक्या |
| अत्यंत दीप्त्याभिमानी देवता | ७२ अग्नि पेटविणारा माणूस |
| स्वर्गाभिमानी देव | ७३ राज्याभिषेक करणारा माणूस |
| आदित्यलोकाचे पालन करणारा देव | ७४ भांडी घासणारा माणूस |
| देवलोकाभिमानी देव | ७५ शांततेच्या ठिकाणी वैर उकरून काढणारा माणूस |
| मनुष्य लोकाभिमानी देव | ७६ एकत्र असणारात बिघाड आणणारा माणूस |
| सर्व लोकाभिमानी देव | ७७ वैर शमविणारा माणूस |
| आपत्तीरूपवधाभिमानी देव | ७८ आपण होवून वैर उत्पन्न करणारा माणूस |
| स्वर्ग लोकाभिमानी देवता | ७९ प्रजेपासून राजाचा वसूल घेणारा माणूस |
| अतिशय उंच अशा स्वर्गाचा अभिमानी देव | ८० वाढपी–जेवणाची पंगत वाढणारा माणूस |
| गति विशेषाभिमानी देव | ८१ महात |
| वेगाभिमानी देव | ८२ चाबुकस्वार |
| पुष्टयाभिमानी देव | ८३ गुराखी |

| देवता | जाती |
|---|---|
| तेजोभिमानी देव | ८४ शेळचा पाळणारा धनगर |
| वीर्याभिमानी देवता | ८५ मेंढचा राखणारा मेंढपाळ माणूस |
| अन्नाभिमानिनी देवता | ८६ नांगर हाकणारा माणूस |
| जलाभिमानी देव | ८७ पिण्याची दारू तयार करणारा माणूस |
| कल्याणाभिमानी देव | ८८ घराची राखण करणारा माणूस |
| श्रेयोभिमानी देव | ८९ धनसंरक्षक |
| प्रत्यक्ष कारणाभिमानी देव | ९० सारथ्याचा जोडीदार–सैस |
| मानस कोपाभिमानी देव | ९१ लोहार |
| बाह्यकोपाभिमानी देव | ९२ वध्य लोकांना बाहेर हाकून लावणारा |
| शोकाभिमानी देव | ९३ रथापुढे धावणारा माणूस |
| अपेक्षेपेक्षा जास्त लाभाभिमानी देव व अपेक्षेपेक्षा कमी लाभाचा अभिमानी देव | ९४ पायानी किंवा काठीच्या साहाय्याने चालता न येणारा माणूस |
| अलब्ध लाभाभिमानी देव | ९५ रथाचे घोडे जुंपणारा |
| प्राप्तधनाचा रक्षाणाभिमानी देव | ९६ रथाचे घोडे सोडणारा |
| शरीराभिमानी देव | ९७ सुंदर रूपाकडेच मन गुंतवून ठेवणाराचा पुत्र |
| शीलाभीमानी देव | ९८ डोळचांत काजळ घालणारा माणूस |
| पापी देवता | ९९ भाता फुंकणारी कुशल स्त्री |
| प्राणापहारक देव | १०० वंध्या स्त्री |
| यमाची स्त्री देवता | १०१ जुळे मुले होणारी स्त्री |
| अथर्वशाखाभिमानी देवता | १०२ गर्भस्त्राव होणारी स्त्री |
| संवत्सराभिमानी देव | १०३ उशीरा प्रसूत होणारी स्त्री |
| द्वितीय संवत्सराभिमानी देव | १०४ पहिल्या खेपेची बाळंतीण |
| तृतीय वर्षाभिमानी देव | १०५ योग्य मुदतीच्या आतच प्रसूत होण्याची सवय लागलेली स्त्री |
| चतुर्थवर्षाभिमानी देव | १०६ मुदतीच्या बाहेर प्रसूत होण्याची सवय लागलेली स्त्री |
| पंचमवर्षाभिमानी देव | १०७ बाळंतपणामुळे म्हातारपण आलेली स्त्री |
| जगताचे आच्छादन करणारा वर्षाभिमानी देव | १०८ पूर्ववयात म्हातारपणाची चिन्हे असलेली स्त्री |
| वनाभिमानी देव | १०९ अरण्यरक्षक माणूस |
| एकाच बाजूच्या अरण्याचा अभिमानी देव | ११० वणव्याचे संरक्षण करणारा माणूस |

| देवता | जाती |
| --- | --- |
| सरोवराभिमानी देव. | १११ मासे धरणारा धीवर. |
| डबक्याचा अभिमानी देव | ११२ गळाने मासे पकडणारा. |
| झाडाच्या आळ्यामधून साच-लेल्या पाण्याचा अभिमानी देव. | ११३ जाळ्याने मासे पकडणारा. |
| गवताळ प्रदेशांत साठलेल्या पाण्याचा अभिमानी देव | ११४ मासे मारण्याकरिता गळाला लावण्याचे आमीष तयार करून त्याच्यावर उपजीविका करणारा माणूस. |
| परतीराभिमानी देव. | ११५ पाण्याच्या तीरावर मासे जमवून मारणारा कोळी. |
| अलीकडच्या तीराभिमानी देव. | ११६ हाताने मासे पकडून मारणारा माणूस. |
| उतरण्याच्या जागेचा अभिमानी देव. | ११७ खुंट्या ठोकून, जाळे लावून मासे धरणारा. |
| कोणीही वस्ती करीत नाही अशा स्थानाचा देव. | ११८ जाळी विणून उपजीविका करणारा. |
| सशब्द जलाभिमानी देवता. | ११९ विषारी पान पाण्यावर टाकून मासे धरणारा |
| गुह्याभिमानी देव. | १२० किरात–रानशिकारी, हरणे मारणारा. |
| पर्वत शिखराभिमानी देव. | १२१ जांभया देण्याची सवय असणारा. |
| पर्वताभिमानी देव. | १२२ वनवासी गायक. |
| प्रतिध्वन्यभिमानी देव. | १२३ हेराचे काम करणारा. |
| ध्वन्यभिमानी देव. | १२४ असंबद्ध भाषण करणारा. |
| अंतवंत शब्दाचा अभिमानी देव. | १२५ फाजिल बोलण्यात हुषार. |
| अनंत शब्दाभिमानी देव | १२६ मुका माणूस |
| मंजुळ ध्वनिविषयी अभिमानी देव | १२७ वीणावादन कुशल माणूस |
| मोठ्याने ओरडण्याचा अभिमानी देव | १२८ अलगुज वाजवणारा माणूस |
| सभोवार घुमत राहणाऱ्या शब्दघोषाचा अभिमानी देव | १२९ नगारजी |
| लहानमोठ्या आवाजाचा अभिमानी देव | १३० शंख वाजविणारा माणूस |
| ऋतूंच्या अभिमानी देवता | १३१ कातडी शिवण्यावर उपजीविका करणारा |

| देवता | जाती |
|---|---|
| कालसाद्गुण्याभिमानी देव | १३२ वीणा वगैरे वाद्यांच्या गवसणी तयार करणारा |
| दुष्टवस्तुविषयीच्या तिटकाऱ्याचा अभिमानी देव | १३३ अतिशय खालच्या जातीचा माणूस |
| ऐश्वर्याभिमानी देव | १३४ सावधान वृत्तीचा माणूस |
| दारिद्र्याभिमानी देव | १३५ झोपाळू माणूस |
| तराजूचा अभिमानी देव | १३६ दुकानदार वाणी |
| रत्नाप्रमाणे चमकण्याच्या अभिमानी देवता | १३७ जडावाचे अलंकार करणारा |
| विश्वेदेव | १३८ कुष्टरोगी माणूस |
| कुष्टाव्यतिरिक्त रोगाभिमानी देव | १३९ किडकिडीत माणूस |
| गत्यभिमानी देवता | १४० लोकांची निंदा करणारा माणूस |
| समृद्धीच्या अभावाची अभिमानी देवता | १४१ नेभळट वृत्तीचा मनुष्य |
| नाशाभिमानी देवता | १४२ एकदम एक घाव दोन तुकडे करणारा माणूस |
| उपहासाभिमानी देवता | १४३ स्वैरिणी स्त्री |
| गीताभिमानी देव | १४४ वीणावादनकुशल व स्वरमात्रागणन कुशल माणूस |
| जलचर प्राण्याभिमानी देव | १४५ शबलपर्ण शरीराची स्त्री |
| प्रियवचनाभिमानी देवता | १४६ सुलक्षण शरीराची स्त्री |
| नृत्याभिमानी देव | १४७ तोंडाने शीळ वाजविणारा ग्रामाधिपती ( पाटील ) व हाताने ताल धरणारा माणूस |
| हर्षाभिमानी देवता | १४८ नाच चालला असताना त्या ठिकाणी लोकांना बोलविणारा माणूस |
| आनंदाभिमानी देव | १४९ काहल नावाचे वाद्य वाजविणारा माणूस |
| खेळण्याच्या फाशांचा अभिमानी देव | १५० द्यूत खेळण्यात पटाईत माणूस |
| कृतयुगाभिमानी देव | १५१ जुगाराच्या अड्ड्यात बैठक घालून बसणारा |
| त्रेतायुगाभिमानी देव | १५२ जुगार पाहणारा माणूस |
| द्वापर युगाभिमानी देव | १५३ जुगाराच्या अड्ड्याबाहेर बसणारा |

| देवता | जाती |
|---|---|
| कलियुगाभिमानी देव | १५४ जुगार खेळ चालू नसला तरीसुद्धा अड्डयाच्या जागेत बसून राहणारा माणूस |
| दुर्घट कार्य करण्याचा अभिमानी देव. | १५५ कळकावर कसरत करणारा कोल्हाटी, गोपाळ वगैरे. |
| मार्गाभिमादी देव. | १५६ उपनीत माणूस. |
| पिशाच देवता. | १५७ डोंगरात राहून लोकांचीं लूटालूट करणारा. |
| पानेच्छाभिमानी देवता | १५८ गायीचा पाळा जमविणारा माणूस. |
| पाप देवता. | १५९ गोघातकीं माणूस. |
| क्षुद्राभिमानी देवता | १६० गायीची चामडी सोलणारा माणूस. |
| क्षुत्तृष्णाभिमानी देवता. | १६१ गायीचे चामडे सोलून मांस काढणाऱ्या-जवळ दारिद्र्यामुळे पोटासाठी मांस मागणारा |
| भूमि देवता. | १६२ पांगळेपणामुळे लाकडी कुबडीच्या आश्रयानें चालणारा. |
| अग्नि देवता. | १६३ बळकट माणूस. |
| वायु देवता. | १६४ चांडाळ जातीचा माणूस. |
| अंतरिक्ष देवता. | १६५ वेळूवर कसरत करणारा डोंबारी. |
| द्युलोक देवता. | १६६ टक्कल पडलेला माणूस |
| सूर्य देवता | १६७ घाऱ्या डोळ्यांचा माणूस |
| चंद्र देवता | १६८ डोळे मिचकाण्याची सवय असणारा माणूस |
| नक्षत्र देवता | १६९ कोडाचे पट्टे अंगावर उठलेला माणूस |
| अहर् देवता | १७० गोरा व पिंगळ्या डोळ्यांचा माणूस |
| रात्री देवता | १७१ काळ्या व पिंगळ्या डोळ्यांचा माणूस |
| वाग्देवता | १७२ लठ्ठ माणूस |
| वायु देवता | १७३ पूर्वोक्त माणसाचे पंचप्राण |
| सूर्य देवता | १७४ पूर्वोक्त माणसाचे चक्षुरिंद्रिय |
| चंद्र देवता | १७५ पूर्वोक्त माणसाचे मन |
| दिशा | १७६ पूर्वोक्त माणसाचे श्रोत्रेंद्रिय |
| प्रजापती | १७७ पूर्वोक्त माणसाचा जीवात्मा |

| देवता | जाती |
|---|---|
| कुत्सित रूपाभिमानिनी देवता | १७८ (१) अतिशय ठेंगू. (२) अति उंचट (३) अति किडकिडीत. (४) अति लठ्ठ. (५) अति गौरवर्ण. (६) अतिशय काळा. (७) अति सुंदर. (८) अति केसाळ. (९) थोडया दाताचा. (१०) उंचउंच दाताचा. (११) डोळे मिचकावणारा. (१२) वटारलेल्या डोळयांचा. |
| आशाभिमानी देवता | १७९ विटाळ गेलेली स्त्री. |
| प्रतिक्षाभिमानी देवता | १८० अविवाहित मुलगी. |

ही वरील माहिती फक्त "अश्वमेध" व "पुरुषमेध" या दोन यज्ञातीलच आहे या दोन यज्ञात किती महाभयंकर हत्याकांड आहे ! असे लहान–मोठे हजारो यज्ञ भारतात चालत होते आणि हा कार्यक्रम हजारो वर्षे चालत होता.

चारही वेदात यज्ञकर्म प्रामुख्याने आहे. त्यात मुख्य ऋग्वेद आहे. ऋग्वेदाची ऋचासंख्या १०५२२ आहे. सामवेदाची १८७५ आहे. त्यातील १८०० मंत्र ऋग्वेदातील आहेत. यजुर्वेद मंत्रसंख्या १९७५ आहे. त्यातीलही बरेच मंत्र ऋग्वेदातील आहेत. अथर्व वेदाची मंत्रसंख्या ५९७७ आहे. त्यात १२०० मंत्र ऋग्वेदातील आहेत.

**अथर्व वेदाचा विषय :–**त्यात यज्ञयाग आहेतच आणि फारच मोठया प्रमाणावर अभिचार कर्म आहे. विनाशन, पीडन, मारण, वशीकरण, विद्वेषण, मोहन, स्तंभन, चेतन, उच्चाटन आदि प्रकार आहेत. त्यांतील काही देवतांची नावे पुढीलप्रमाणे आहेत :–गर्भिणी स्त्रीच्या रोगनिवारणाकरिता २७ देवता आहेत. पिशाच्च देवतांची २१ नावे आहेत. गंधर्व देवता १२ आहेत. यातुधान देवतांची नावे ६ आहेत. ऋतुदेवता १२ आहेत. नक्षत्र देवता २५ आहेत. सर्प देवता १७ आहेत. औषधी देवता ९ आहेत. राक्षसदेवता ९ आहेत. यज्ञीयसाधन देवता १२ आहेत. अनुडुत् देवता ५९ आहेत. वृषभसाव देवता १८ आहेत. अन्य दुर्मीळ देवता १३५ आहेत.

वर उल्लेखिलेल्या ३२३ देवता ऋग्यजु:साम या तीन वेदातील देवतांपेक्षा निराळया आहेत.

अशी ही चार वेदांची माहिती आहे.

काही विद्वान मंडळी म्हणतात की, अथर्ववेद नंतर निर्माण केला आहे, हे बरोबर वाटत नाही. कारण हा नंतरचा असता तर ऋग्वेद, साम व यजुर्वेदांत याचा उल्लेख आला नसता. चारही वेदात एकमेकांचा उल्लेख आहे. (पहा-यजुर्वेद ३१।७) चार वेदांची नावे आहेत. (ऋ. १०।७१।११). यज्ञाचे चार ऋत्विज चार वेदांचे असतात. (ऋ. ८।६०।९) सामवेदांत (१।४।२) चार वेदांचे वर्णन आहे. महाभारतात चार वेदांचे वर्णन आहे. चारही वेदांचे वर्णन रामायणात आहे.

चारही वेदांची उत्पत्ती सत्ययुगात एकाच वेळी झाली आहे, यात शंका नाही.

यात अभिचारकर्म फार असल्यामुळे याला नंतरचा मानतात. अभिचार कर्म पूर्वीही होते. परंतु त्याला विशेष महत्त्व नव्हते. वेदाच्या तिसऱ्या कालखंडात याज्ञवल्क्याच्या कालांत व त्यानंतरच्या काळात अभिचार कर्माची मोठ्या प्रमाणांत भर घातल्यामुळे आणि अगोदरच्या मंत्राच्या अर्थाच्या बदलामुळें या वेदाला फारच कनिष्ठत्व आहे.

चार वेदातील ऋषींचे व देवतांचे आचारविचार आणि देवताप्राप्त्यर्थ अगणित निरपराध पशुहत्या व सृष्टीतील सर्व प्राण्यांत श्रेष्ठ असलेल्या मानवहत्याकांडी उपासना याविषयीं विचार केल्यास असे अनुमान निघते की, भारतीय वैदिक उपासनेपेक्षा वैदिक उपासना सोडून भारतातील व जगातील सर्व धर्मपंथियांची देवताउपासना फारच श्रेष्ठ आहे आणि वैदिक उपासना अति कनिष्ठ आहे. तसेच वैदिक धर्माचे वेद हे धर्मग्रंथ सोडून भारतातील व जगातील सर्व धर्मपंथियांच्या धर्मग्रंथापेक्षा वेद हे धर्मग्रंथ कनिष्ठ आहेत. नव्हे ते मुळी धर्मग्रंथ नाहीतच असे म्हणणे अयोग्य होणार नाही; आणि भारतातील शैव-वीरशैव धर्माचे आद्य धर्मग्रंथ "शैवागमे," तसेच प्राचीन व अर्वाचीन शैव-वीरशैव संत-वाङ्मय व महाराष्ट्रातील प्राचीन व अर्वाचीन संतवाङ्मय, या वाङ्मयातील अवतारवाद, चमत्कारवाद आणि मूर्तीपूजा बाजूला सारल्यास, जगातील सर्व धर्मपंथीय वाङ्मयापेक्षा श्रेष्ठ आहे, असे माझे स्पष्ट मत आहे.

## सहाव्या प्रकरणाचे संदर्भ ग्रंथ


| | |
|---|---|
| १. ऋग्वेदाचे मराठी भाषांतर | म. म. डॉ. चित्राशास्त्री |
| २. ऋग्रत्न भांडार (लघु ऋग्वेद) | पं. रा. गो. कोलंगडे |
| ३. ऋग्वेद दर्शन | पं. रा. गो. कोलंगडे |
| ४. अथर्व वेदाचे मराठी भाषांतर | म. म. डॉ. चित्रावशास्त्री |
| ५. ऋग्वेदांतील राष्ट्रदर्शन | साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास |
| ६. महाराष्ट्रीय ज्ञानकोश विभाग दुसरा | श्री. व्यं. केतकर |
| ७. श्रीमद्योगेश्वर याज्ञवल्क्य | पं. रा. गो. कोलंगडे |
| ८. श्री. सायणाचार्य-चरित्र | पं. रा. गो. कोलंगडे |
| ९. भारतीय प्राचीन चरित्रकोश | म. म. डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव |

# मानवाने काय केल्याने मोक्ष मिळेल ?

१. तीन गोष्टी लक्षपूर्वक करा– १) ईश्वर स्मरण, २) दुसऱ्याचा सन्मान; आणि आपल्यातील दोष पहाणें.

२. तीन गोष्टींपासून सावध रहा– १) आपली स्तुती, २) दुसऱ्याची निंदा, ३) दुसऱ्यांचे दोष पहाणें.

३. तीन गोष्टी सदा आचरणात आणा–१) सत्य, २) अहिंसा, ३) ईश्वर नामजप

४. तिघांबरोबर सत्याने राहा– १) धन, २) इंद्रिय, ३) वचन

५. तिघांवर प्रेम करा– १) ईश्वरावर, २) सदाचारावर, ३) गरिबांवर

६. तिघासमोर सदा नम्र राहा– १) माता, २) पिता, आणि ३) आपले गुरु

७. तिघांवर प्रेम करा १) ईश्वरावर, २) धर्मावर, ३) आपल्या देशावर.

८. तिघांना अखंड हृदयात ठेवा– १) दया, २) क्षमा, आणि ३) शांती.

९. तिघांची सदा सेवा करा– १) संत, २) सच्छास्त्र, आणि ३) पवित्र भूमी.

१०. तीन व्रताचे पालन करा– १) परस्त्रीगमनाचा त्याग, २) परधनाचा त्याग आणि ३) असहाय्य यांची सेवा.

११. तिघांचे पालन पोषण करा– १) माता–पिता, २) बायका-मुले, ३) दीन–दुःखी

१२. तिघांकडे विशेष लक्ष द्या– १) विधवा स्त्री, २) अनाथ बालक. ३) अनाश्रित प्राणी.

१३. तिघांची पर्वा करू नका– १) धर्मपालनाकरिता कष्टाची, २) परोपकाराकरिता धनाची, आणि ३) रोग्याची सेवा करतांना शरीराची.

१४. तिघांचा सन्मान करा– १) वृद्धांचा, २) ब्रह्मज्ञान्यांचा, ३) निर्धन्यांचा

१५. तिघांचा मनःपूर्वक आदर करा– १) ईश्वराचा, २) संत महात्म्यांचा, ३) सच्छास्त्रांचा.

१६. तिघांसमोर नम्र रहा– १) माता-पिता, २) गुरुजन, ३) विद्वान

१७. तीन कामे मनःपूर्वक करा– १) भजन, २) ईश्वराचे चिंतन, ३) सत्संग

१८. तीन अश्रूंना पवित्र माना– १) प्रेमाचे, २) करुणेचे, आणि ३) सहानुभूतीचे

१९. तीन गोष्टींचा आग्रह धरा– १) सत्याचा, २) सद्धर्माचा. ३) सच्चारित्र्याचा

| | |
|---|---|
| २०. तीन बनवा– | १) धर्मशाळा, २) सर्वोपयोगी विहीर, ३) विद्यामंदीर |
| २१. तीन ठिकाणी दररोज जा– | १) देवमंदीर २) संताची झोपडी, ३) नोकरीची जागा |
| २२. तिघांना दररोज नमस्कार करा– | १) ईश्वर, २) माता-पिता, पति आणि गुरुजन, ३) संत–महात्म्यांना |
| २३. तीन गोष्टी मनाच्या उन्नतीकरिता दररोज करा– | १) स्वाध्याय, २) ईश्वराचे ध्यान, ३) आपल्या मानसिक दोषांचे दर्शन |
| २४. तीन आवश्यक साधने करा– | १) समता, २) संयम, ३) सर्व प्राण्यांचे हित |
| २५. तीन वस्तूंचे चिंतन करा– | १) ईश्वराचे, २) संतवाणीचे, ३) भगवन्नामाचे |
| २६. तीन मुख्य साधने करा– | १) वैराग्य, २) अभ्यास, ३) नामस्मरण |
| २७. तीन महान शक्तींचा आश्रय करा– | १) ईश्वराचा, २) संतवाणीचा, ३) आत्मशक्तीचा |
| २८. तीन वस्तूंवर विश्वास ठेवा– | १) ईश्वरकृपेवर, २) आत्मशक्तीवर, ३) सत्य-शुद्ध आचारावर |
| २९. तीन गोष्टी विसरून जा– | १) आपण दुसऱ्यावर केलेले उपकार, २) दुसऱ्याने आपणांवर केलेला अपकार, ३) आपली कीर्ति |
| ३०. तीन गोष्टींची आठवण ठेवा– | १) आपण दुसऱ्याचे केलेले वाईट, २) दुसऱ्याने आपणावर केलेले उपकार, ३) नाशिवंत धनमान जीवन |
| ३१. तीन बना– | १) नम्र, २) सरळ, ३) परमेश्वर-विश्वासी |
| ३२. तिघांचा आश्रय करा– | १) ईश्वरांचा, २) महात्म्यांचा, ३) अभिमानरहित विद्वानांचा |
| ३३. तीन गोष्टी पहा– | १) आपले दोष, २) दुसऱ्यांचे गुण, ३) संतांचे त्यागपूर्वक आचरण |
| ३४. तिन्हीचे खंडन करू नका– | १) दुसऱ्यांच्या आवडींचे, २) सद्धर्मोपदेशकाचे, ३) आपल्या निश्चयाचे |
| ३५. तीन गोष्टी प्रगट करा– | १) आपले पाप, २) दुसऱ्याचे गुण, ३) परोपकाराची साधने |
| ३६. तीन प्रकारचे वचन बोला– | १) सत्य, २) हितकारी आणि ३) मधुर |

| | |
|---|---|
| ३७. तिघांबरोबर प्रेमपूर्वक वर्तन करा– | १) आपली पत्नी, २) आपले कर्मचारी, ३) गरिबांबरोबर |
| ३८. तिघांच्या सेवेत आपणाला– भाग्यवान समजा– | १) माता-पिता, २) संत-महात्मे, ३) दीनदुःखी जीव |
| ३९. तीन गोष्टी गुप्त ठेवा– | १) साधन, २) धन आणि ३) मैथुन |
| ४०. तीन निश्चयाने सांभाळा– | १) पातिव्रत्य, २) पत्नीव्रत, ३) एक-ईश्वरनाम |
| ४१ तिघांवर दया करा– | १) अबालांवर, २) वेडया माणसावर, ३) वाट चुकलेल्या प्रवाशावर |
| ४२ तीन आचारांचा अंगिकार करा– | १) अहिंसाचार, २) सदाचार, ३) शुद्धी-नीतितत्त्वांचा |
| ४३ तीन गोष्टी माना– | १) परस्त्री मातेसमान, २) परधन माती-समान आणि परान्न विषासमान |

वरील प्रमाणे आचरण केल्याने मोक्ष मिळेल.

—: ह्या गोष्टी लक्षात ठेवा :—

जप तप कर्म क्रिया नेम धर्म । वावुगाचि श्रम व्यर्थ जाय ।। (ज्ञानेश्वर महाराज)
न लगती सायास जावे वनांतरा । सुखे येतो घरा नारायण (ईश्वर) ।।
(तुकाराम)
मोक्ष देवाघरी नाही । लटिक्या घायी विव्हळत ।। (तुकाराम)
मोक्ष दुसरा कोणीही देत नाही, तो आपण स्वतःच मिळवावयाचा असतो.

## मानवाने काय केल्याने अधोगती होईल ?

| | |
|---|---|
| १. तीन होऊ नका– | १) महंत, २) दीक्षा देणारा गुरु, ३) मुर्खांचा मालक |
| २. तीन गोष्टीपासून वेगळे रहा– | १) दुसऱ्याची निंदा, २) वादविवाद, ३) पुढारीपणा |
| ३. तिघांवर सदा तावा ठेवा– | १) मन, २) मुत्रेंद्रिय, ३) जीभ |
| ४. तिघांपासून मुक्त रहा– | १) अहंकार, २) ममता, आणि ३) आसक्ती |
| ५. तिघांची भीती बाळगा– | १) अभिमान, २) लोभ, आणि ३) दंभ |
| ६. तिघांना हृदयांतून काढून टाका– | १) राग, २) द्वेष, ३) मत्सर. |

| | |
|---|---|
| ७. तिघांवर दया करू नका– | १) आपल्या पापावर, २) आळसावर, ३) स्वैराचारावर |
| ८. तीन गोष्टीविषयी शंका धरू नका– | १) शास्त्रवचन, २) गुरुवचन, ३) मनाची शुद्ध प्रेरणा |
| ९. तिघांची संगती सोडून द्या– | १) व्यभिचाऱ्याची, २) जुगाऱ्याची, ३) खोटे बोलणाराची |
| १०. तीन कामे करतांना काहीही–क्रिया न करता थांबा | १) क्रोध आल्यावेळी, २) परस्त्री कामवासनेच्या वेळी, ३) लोभ उत्पन्न झाल्या वेळी. |
| ११. तीन अश्रूंना अपवित्र माना– | १) शोकाचे, २) क्रोधाचे, आणि ३) दंभाचे |
| १२. तिघांचा तिरस्कार करू नका– | १) रोग्याचा, २) अतीताचा, ३) खालच्या जातीचा |
| १३. तिघांचा तिरस्कार करा– | १) पापाचा, २) अभिमानाचा; ३) मलीन मनाचा |
| १४. तीन ठिकाणी जाऊ नका– | १) वेश्यालय, २) जुगारी अड्डा, ३) कलालाचे घरी |
| १५. तिघांची मस्करी करू नका– | १) अपंगाची, २) विधवा स्त्रीची, ३) दीन-दुःखितांची |
| १६. तीन नरकाच्या दारात कधीही घुसू नका– | १) काम, २) क्रोध, ३) लोभ |
| १७. तिघांना गुरु करू नका– | १) स्त्रीलंपट, २) धनलोभी, ३) दांभिक |
| १८. तिघांचे चिंतन करू नका– | १) स्त्रीचे, २) धनाचे, ३) नास्तिकाच्या उपदेशाचे |
| १९. तीन बनू नका– | १) कृतघ्न, २) दांभिक, ३) नास्तिक |
| २०. तीन गोष्टी पाहू नका– | १) आपले गुण, २) दुसऱ्याचे दोष, ३) दुसऱ्याची रतीक्रीडा |
| २१. तीन प्रकारचे वचन बोलू नका– | १) असत्य, २) अनिष्ट करणारे, ३) कठोर |
| २२. तिघांच्या सोबत कधी संकोच करू नका– | १) मित्र, २) स्वस्त्री, ३) अतिथी |
| २३. तीन गोष्टी गुप्त ठेवा– | १) साधन, २) धन, ३) मैथुन |
| २४. तीन कामनेत फसू नका– | १) धन, २) पुत्र, ३) सन्मान |

२५. तीन गोष्टी मानू नका– १) अवतारवाद, २) चमत्कारवाद, ३) मूर्तीपूजा

२६. तीन प्रकारच्या गोष्टी करू नका– १) या 'विश्वधर्म' ग्रंथातील ६ व्या प्रकरणांत वर्णन आलेल्या वेदांतील ऋषीप्रमाणे हिंसाचार, २) वेदातील देवतेप्रमाणे मांसाहार, ३) वेदांच्या शिकवणीप्रमाणे कोणत्याही देवतेला पशू व मानव बळी देऊ नका

२७. तीन गोष्टी करू नका– १) परस्त्री-गमन, २) परधनाभिलाषा, ३) परान्न-सेवन

मानवाने वरील सूचनांविरुद्ध आचरण केल्यास त्याची अधोगती होईल.

——



(मागील पान क्र. ८८ वरून पुढे चालू)

## (८) श्रीसंत शिवगंगादेवी

(वार्शीकर ट्रस्ट संस्थापिका व अध्यक्ष, ५६९ शिवाजीनगर, पुणे.)



प्रति—श्री. का. शि. संकाये, आळंदी यांना शुभाशीर्वाद. कळविण्यास आनंद वाटतो की, आपला " विश्वधर्म " ग्रंथ मला आवडला. वीरशैव धर्माच्या निर्मिती, उपपत्तिसंबंधी आपण केलेले संशोधन आणि मीमांसा वाचून समाधान वाटले. तत्संबंधी बऱ्याच वर्षांपासून मला जिज्ञासा होती. ती हा ग्रंथ वाचनानें दूर झाली. " लिंग " हे प्रतिक विश्वमय आहे, हे आपण अनेक दृष्टांताद्वारे सिद्ध करून दाखवले आहे. जगांतील सर्व राष्ट्रांतील धर्मांचे मूळ वीरशैव धर्मात आहे व त्याप्रमाणेच अहिंसेचे तत्त्व जगात सर्वप्रथम वीरशैवांनी रुजवले, याबाबत आपल्या ग्रंथात आपण साधार चर्चा करून सिद्ध केले आहे. ' आगमा ' बद्दल आपण केलेले विवेचनही फारच आवडले. आपल्या या प्रयत्नांबद्दल आपणांस धन्यवाद व आपल्या कार्याला शुभाशीर्वाद.

दि. १५–८–८३ —श्रीसंत शिवगंगादेवी वार्शीकर, पुणे

---

## (९) श्री. ष. ब्र. १०८ श्री. महालिंग शिवाचार्य

( मठ संस्थान वर्दापूर, अंबाजोगाई, बीड )

श्री. का. शि. संकार्य यांना कृतानेक शुभाशीर्वाद;



आपण लिहिलेला " **विश्वधर्म** " हा ग्रंथ मी वाचला. या ग्रंथात श्रीजगद्‌गुरु व पंचपीठ स्थापनेसंबंधी स्पष्ट उल्लेख नाही. प्रत्येक धर्मात स्थापक गुरूला प्रथम स्थान पाहिजे. आपल्या ग्रंथात आपण स्पष्टपणे व छातीठोकपणे लिहिले नाही. त्यामुळे हा ग्रंथ, ' मालकाविणे घर, ' किंवा ' पतिविना पत्नी ' सारखा वाटतो. आपण या बाबीची सुधारणा करून घ्याल अशी अपेक्षा आहे.

या ग्रंथांत हिंदुधर्माविषयी भरपूर माहिती आहे.

हा ग्रंथ संग्राह्य, पठणीय, विमर्शणीय आहे. सर्व शिवभक्तांनी संग्रह करावा असा आहे.

श्री. ष. ब्र. महालिंग शिवाचार्य.



८

## (१०) सौ. जं. ज. घाणेकर

(सेवानिवृत्त मुख्याध्यापिका व समाजकार्यकर्त्या, वार्शी)



मी एक सेवानिवृत्त शिक्षिका 'विश्वधर्म' ग्रंथावर काय अभिप्राय देणार? पण ग्रंथ वाचल्यानंतर माझ्या मनाला जे आवडले आणि मला जे वाटले ते येथे नमूद करीत आहे.

'श्री. संकाये यांनी, श्रीगुरू परंडकर महाराजांकडे ग्रंथाबाबत वेळोवेळी येऊन चर्चा केली. त्यामुळे या व्यक्तीचा जवळून परिचय झाल्यानंतर मी आश्चर्यचकीत झाले. त्यांची चिकाटी व त्यांचा अहोरात्र चालू असलेला प्रयत्न पाहिल्यावर ते नुसते विचार करणारे नसून बोध घेण्यासारखे व कोणाच्या कशालाही मिंधे होणारे नाहीत, हा एक त्यांच्या स्वभावातील विशेष गुण मला जाणवला. मनाला येईल ते, मनाला पटेल ते करण्याची व लिहिण्याची त्यांची जिद्द असते, मग ते दुसऱ्याला आवडो वा न आवडो! मात्र ती कसोटी कसाला लावून स्वीकारतात हेहि तितकेच सत्य आहे.

आधाराशिवाय काही बोलणे नाही किंवा लिहिणे नाही, हाहि एक त्यांचा विशेष गुण म्हणता येईल. त्याकरिता त्यांना ज्या ज्या ठिकाणी जे जे पुस्तक अथवा जो ग्रंथ मिळाला तो विकत घेऊन त्याचे वाचन, मनन करून मनःपूर्वक अभ्यास करून त्यावरील निवडक टिप्पणे काढण्याची त्यांची वृत्ती उल्लेखनीय आहे. अशा अनेक प्रयत्नांनी त्यांनी 'विश्वधर्म' ग्रंथाचा विस्तार केला. त्यात त्यांनी मांडलेले विचार परखड पण सत्य स्थितीला धरून आहेत आणि म्हणून त्यांना विशेष महत्त्व आहे.

आतापर्यंत आम्ही धर्माकडे अंधश्रद्धेने पाहात आलो. पण त्यांनी या ग्रंथाद्वारे झणझणीत अंजन घालून डोळस दृष्टी दिली असे मला वाटते. 'विश्वधर्म' ग्रंथातील विवेचन सरळ आणि सोप्या बोली-

भाषेत असून, वाचन करणाऱ्या साध्या व्यक्तिलाही ते पटेल असे आहे. उदा.—श्रीशिव, श्रीकृष्ण, द्रौपदी, पांडव, खंडोबा वगैरे सारख्या देवतांच्या बाबतीत, महाधूर्त वैदिक आर्य हिंदू पुरोहितांनी केलेल्या काल्पनिक आणि असत्य विधानांवर मार्मिक प्रहार करून, जगाला खरे स्वरूप दाखविण्याचे धाडस त्यांनी केले आहे; अहिंसावादी असलेल्या आपल्या भारत देशात हिंसा केव्हा, कोणी, कशा पद्धतीने सुरू केली याचे विवेचन प्रकरण सहामध्ये करून वेदांचे निंद्यत्व सिद्ध केले आहे. त्याबाबतचे त्यांचे विचार वाचून आज काही देव-देवींच्या पुढे निरपराध प्राण्यांना बळी देण्याची जी प्रथा आहे, ती किती चुकीची आहे, हे प्रकार समजून घेऊन, त्याला आळा घालण्याची तसेच ही प्रथा बंद करण्याची आज मोठी गरज आहे. अशा अनेक गोष्टी त्यांनी ग्रंथात विचारपूर्वक व साधार नमूद केल्या आहेत. अशा प्रकारच्या विचारांचा आजवर कोणत्याही पौर्वात्य अगर पाश्चिमात्य विचारवंतांनी इतका मूलगामी शोध घेण्याचा प्रयत्न केलेला नाही, असे मला वाटते.

विश्वारंभापासून मानवताधर्माचे श्रेष्ठत्व गाणारा आणि सर्वश्रेष्ठ मानवतावादी 'विश्वधर्म' म्हणजेच वीरशैव धर्माबद्दलचे श्रेष्ठत्व सांगणारा हा 'विश्वधर्म' ग्रंथ अखिल पुरुषांबरोबर अखिल महिलांनीही वाचावा व त्याचा प्रचार व प्रसारही करावा, अशी मी अखिल भगिनीवर्गाला अत्याग्रहाची विनंती करते.

श्री. गुरुवर्य परंडकर महाराजांची प्रस्तावना लाभलेल्या या 'विश्वधर्म' ग्रंथास, अनेक विद्वानांचे अभिप्राय अनुकूल असेच येतील. गुरुवर्यांचे, जगदाचार्यांचे आशीर्वाद लाभतील आणि घरोघरी या ग्रंथाचे वाचन होईल, असा मला विश्वास आहे. अखिल मानवसमाजाने या ग्रंथाचे स्वागत करावे व धन्य धन्य व्हावे अशी सदिच्छा व्यक्त करून श्री. संकाये यांच्या या धाडशी कृतीला धन्यवाद देते.

दि. १७-३-८४

सौ. जं. ज. घाणेकर

## (११) श्री. ना. वि. रुकारी यांचा अभिप्राय

(महाराष्ट्र वीरशैव सभा, पुणे या संस्थेचे अध्यक्ष)

श्री. ना. वि. रुकारी हे प्रस्तुत ग्रंथाबद्दल आपला अभिप्राय कळविताना लिहितात : "श्री. का. शि. संकाये, आळंदी देवाची यांसी सप्रेम शिवशरणार्थ. आपण लिहिलेल्या 'विश्वधर्म' ग्रंथाचे आम्ही परिपूर्ण वाचन केलें. ते वाचून आम्हास अत्यानंद झाला. आपण वीरशैव धर्माचा फार मोठा सखोल अभ्यास व संशोधन करून त्याचे प्राचीनत्व अति दूरवर असल्याचे व त्याचे संस्थापक श्री. ज. रेणुकादी पंचाचार्य असल्याचे साधार सिद्ध केले आहे. ही महत्त्वपूर्ण कामगिरी पार पाडल्यावद्दल प्रथम आपले अभिनंदन करीत आहोत. आपण वीरशैव धर्म हाच विश्वधर्म असल्याचे निक्षून प्रतिपादन केल्यामुळे आम्हा वीरशैवांचा आनंद द्विगुणित झाला आहे. हा धर्म अत्यल्प मतांत येण्याची कारणे शोधून ती आपण जनतेसमोर मांडली आहेत. त्यामुळे वीरशैव समाज खडबडून जागा होईल यांत संदेह नाही.



**'जहींचा शिव तहींचा शिवाचार'**— हे तत्त्व श्रीसंत शिरोमणी-मन्मथस्वामींनी ठामपणे सांगितले आहे. पण तिकडे समाजाचे लक्ष गेले नाही. त्या आधी कर्नाटकांत शस्त्र आणि शास्त्रधुरंधर श्री. बसवेश्वरांनी, श्री. ज. रेणुकाचार्यांच्या शिवाद्वैत सिद्धांताचा कन्नड वचनांतून प्रचार केला. इतकेच नव्हे तर आपल्या गुरूकडून अनेकानेक लोकांना शिवदीक्षा देववून धर्मप्रसार केला, हे सर्वश्रुत आहेच. पण त्यांना कांहीं अज्ञ लोक धर्मसंस्थापक संबोधतात ते निराधार असल्याचे आपण स्पष्ट केल्यामुळे समाजबंधूंचे आता डोळे उघडतील असे वाटते.

आम्हा महाराष्ट्रीय वीरशैवांना गुरूला गुरू, आईला आई, बापाला बाप म्हणण्याचे ज्ञान पूर्वीपासून मिळत आले आहे, आणि ते तत्त्व

आमच्या रोमरोमांत बिंबले असल्याने त्यात बदल होणार नाही.

आपल्या चिकित्सक व संशोधनात्मक अमोल कार्याबद्दल नितांत आदर ठेवून सारा महाराष्ट्रीय वीरशैव समाज ऋणी राहील आणि अखिल मानवालाही बोध होईल, असे वैशिष्टचपूर्ण लिखाण झालें आहे. ते अत्यंत कष्ट घेऊन प्रकाशांत आणल्याबद्दल आपणाला हृत्पूर्वक धन्यवाद.

सर्व महाराष्ट्रांतील वीरशैवांच्या घरी हा ग्रंथ राहिला पाहिजे. तो त्यांनी घ्यावा व त्याचे वाचन, मनन करावे असे आमचे स्पष्ट मत आहे."

दि. ७–९–८३ ना. वि. रुकारी

-- --



## (१२) डॉ. शिवमूर्ती बसप्पा शाहीर

एम्. बी. बी. एस्; डी. सी. एच.

(चीफ मेडिकल ऑफिसर, श्री भवानी हॉस्पिटल, सोलापूर;



उपाध्यक्ष–महाराष्ट्र वीरशैव सभा, पुणे; अध्यक्ष–वीरशैव सभा संस्था, सोलापूर; ट्रस्टी – शिद्धेश्वर कॅन्सर हॉस्पिटल, सोलापूर; ट्रस्टी–सिद्धेश्वर देवस्थान, सोलापूर; ट्रस्टी–एम्. एम्. सभा विराजदार, वसतीगृह, सोलापूर; डायरेक्टर–सिद्धेश्वर को. ऑप. बँक, सोलापूर आणि डायरेक्टर–महाराष्ट्र को. ऑप. रवा कारखाना, सोलापूर.)

हे लिहितात की, श्री. का. शि. संकाये यांनी लिहिलेला ".विश्वधर्म" हा ग्रंथ केवळ वीरशैवांनीच नव्हे तर सर्वधर्मीयांनी वाचण्यासारखा आहे. वीरशैव हाच खरा धर्म आहे व तो अनादी कालापासून चालत आला आहे, हे सिद्ध करण्याकरिता त्यांनी महाप्रयासाने प्रयत्न करून हा ग्रंथ लिहिला आहे.

एक सामान्य माणूस स्वतःच्या धर्माचा सखोल अभ्यास करण्याच्या प्रेरणेने झपाटल्यानंतर केवढे असामान्य कार्य करू शकतो, याचे हे उत्तम उदाहरण आहे. त्यासाठी श्री. संकाये यांनी घेतलेले परिश्रम व त्यांची जिद्द कौतुकास्पद आहे.

'वीरशैव धर्म' हा ग्रंथ मराठी वाङमयात मोलाची भर घालून विद्वानांच्या विचारांना चालना देणारा ठरेल. श्री. संकाये ह्यांना मी सुयश चिंतीतो.

डॉ. शि. ब. शाहीर

———

## (१३) श्री. चंद्रकांत. बा. कसबेंकर शास्त्री

(२१७ कसवा पेठ, पुणे ११. कार्याध्यक्ष–वीरशैव सभा, पुणे.)

आपल्या अभिप्रायात म्हणतात : आपला ' विश्वधर्म ' ग्रंथ पूर्ण वाचल्यावर असे दिसून आले की, अशा प्रकारचे संशोधन आतापर्यंत कोणीच केलेले नाही. तसेच ठामपणे अभिप्रायही कोणी मांडलेला नाही, हे प्रस्तुत ग्रंथकर्ते, श्री. का. शि. संकाये, यांनी लिहिलेल्या ग्रंथावरून दिसून आले. तो योग्य की अयोग्य यावावत संशोधक आपले मत मांडतील ते निराळे. पण अशा ग्रंथाची आज फारच गरज होती. आपण कोण आहोत, याचे खरे ज्ञान अद्याप इतरांप्रमाणे, वीरशैवांनाही झालेले नाही. कारण ठिकठिकाणीं, आचार, विचार वेगवेगळेच दिसून येतात.



श्री. संकाये यांनी एकेश्वरी उपासनेवर फार मोठा भर देऊन, आपण कोण आहोत, कसे वागले पाहिजे, आपले आचरण कसे असले पाहिजे या विषयावर वीरशैवांच्या डोळ्यात ज्ञानांजन घालून फार मोठे उपकार केले आहेत, असे मला वाटते. या ग्रंथाला माझे धर्मविद्यागुरू, श्री ष. ब्र. गुरुवर्य परंडकर महाराज, बार्शी, यांची " प्रस्तावना " लाभल्याने त्यांस एक आगळे महत्त्व प्राप्त झाले आहे.

या ग्रंथांमुळे सर्वधर्मीयांच्या भावनेला तडा जाईल असे कोणालाही वाटणे शक्य आहे; पण ओघाने, मननपूर्वक वाचल्याने सद्विचारांनी त्या शंका दूर व्हाव्यात असे मला वाटते. सर्व धर्मांच्या शुद्ध अशुद्धतेचा तसेच वेदांच्याही शुद्धाशुद्धतेचाही विचार या ग्रंथात केला आहे.

श्री. संकाये यांनी महाप्रयासाने हा ग्रंथ पूर्णत्वास आणला व प्रकाशित केला म्हणून मला अत्यानंद वाटत आहे. त्यांना किती जरी धन्यवाद दिले तरी ते थोडेच होणार आहेत. असे असूनही मी त्यांना गुणग्रहणपूर्वक धन्यवाद देत आहे.

हा ' विश्वधर्म ' ग्रंथ प्रत्येक वीरशैवांचे घरी संग्रही असावा व तो अभ्यासला जावा अशी माझी इच्छा आहे.

पुणे, दि. २२–८–८३ चंद्रकांत. बा. शास्त्री

(१४) श्री. मल्लप्पा सोलापुरे
बी. ए.
(सरचिटणीस, महाराष्ट्र वीरशैव सभा, पुणे.)

(१५) श्री. अण्णासाहेब जंगम
एम. ए. (लंडन)
(संपादक, वीरशैव दर्शन मासिक, पुणे.)





हे आपल्या संयुक्त अभिप्रायात लिहितात: " आपल्या देशात प्राचीन कालापासून, धर्मांचा भरपूर अभ्यास झाला आहे. त्याबाबत, ग्रंथसंपत्तीही विपुल प्रमाणात उपलब्ध आहे. आज धर्मासंबंधी जे तणाव व प्रश्न निर्माण होत आहेत ते सोडविण्यास ' विश्वधर्मा 'सारख्या ग्रंथातून मार्गदर्शन मिळू शकेल. म्हणून अशा ग्रंथाची उपयुक्तता आहे. वीरशैव धर्माची ओळख मराठी वाचकांपर्यंत पोहोचविण्याचे कार्य ह्या ग्रंथामुळे होणार असल्याने लेखकास शतशः धन्यवाद.

सर्वसामान्यपणे मराठी साहित्यात व विशेषतः वीरशैव साहित्यात ही एक मोलाची भर आहे. पानामागून पाने व प्रकरणे वाचत असतांना वाचकांना आपल्याला माहित नसणाऱ्या ' वीरशैव धर्मा 'च्या अनेक पैलूंचा उलगडा होत जातो. श्रीमत् जगद्गुरू रेणुकाचार्यापासून सुरू झालेल्या वीरशैव धर्माचा प्रवास आधुनिक काळापर्यंत कसा झाला, या काळांत कोणकोणते बदल झाले याचा तपशील देत देत लेखकाने वीरशैव धर्माचे पूर्ण दर्शन घडविले आहे.

प्रस्तुत ग्रंथातील विवेचन उद्‌बोधक व मार्गदर्शनपर असून विचारांना चालना देणारे आहे. लेखकाची मते न पटणाऱ्यांच्याही विचाराला व अधिक संशोधनाला चालना देणारे ठरावे असे लेखन या ग्रंथांत झाले आहे. ग्रंथ खंडन-मंडनात्मक असल्यामुळे संशोधकांना आव्हान देणारा आहे. वाचकालाही विवेचन उद्‌बोधक वाटेल. ग्रंथांत ठिकठिकाणी संदर्भ व उतारे दिले आहेत. आणि म्हणून ते मूळ ग्रंथ वाचण्याची प्रेरणा देणारे आहेत असे आम्हास वाटते. शेवटी दिलेली ग्रंथांची यादी पाहिली तर लेखकाने याविषयावरील उपलब्ध असलेले अनेक ग्रंथ हाताळलेले दिसत आहेत.

वीरशैव धर्म श्रेष्ठ व जेष्ठ आहे, तो विश्वधर्म होण्यास कसा योग्य आहे, याचे विवेचन लेखकाने उदाहरणांसह स्पष्ट केले आहे. त्यांनी काढलेला हा निष्कर्ष सर्वांना पटेलच असे नाही. धर्माचा अभ्यास करतांना त्या त्या काळांतील समाजाचे विचार, इतिहास, संस्कृती आणि स्थिती समजून घ्यावयास हवी. या ग्रंथाचा सूक्ष्म अभ्यास केला तर आजही कांही मार्गदर्शन मिळेल. अशाप्रकारे वीरशैव धर्माचे संशोधनात्मक साहित्य समाजापुढे आणण्याचा याही पुढे लेखकाने प्रयत्न करावा ही अपेक्षा. "

दि. १ ऑगस्ट १९८४. मल्लप्पा सोलापुरे, पुणे.
अण्णासाहेब जंगम, पुणे.

-----



(१६) श्री. सुरेश मारुती वाळके, बी. ए. (ऑनर्स)



(देहू गांव, ता. हवेली, जि. पुणे. सहचिटणीस-पुणे जि. महाराष्ट्र वीरशैव सभा, पुणे.) लिहितात, श्री. का. शि. संकाये, यांनी लिहिलेला 'विश्वधर्म' हा ग्रंथ म्हणजे वीरशैव साहित्यक्षेत्रांत उचललेले एक धाडसी पाऊलच म्हणावे लागेल. त्यांनी ह्या ग्रंथांत वीरशैव धर्मामध्ये मानवता धर्माचा आविष्कार असल्यामुळे, तो धर्मच सर्वश्रेष्ठ ठरविला आहे; वीरशैव धर्माचे स्वरूप, भव्यता, दिव्यता, श्रेष्ठत्व सिद्ध केले आहे. तसेच हा धर्म एकेश्वरी, निराकारी, अहिंसावादी तत्त्वावर आधारित असून, मानवतेत जातपात, भेदभाव नाहीं, अशी मानवतावादी तत्त्वे वीरशैव धर्मात आहेत. म्हणून हा धर्म सर्वश्रेष्ठ असा सिद्धांत त्यांनी काढला आहे. तसेच वेदांचेही शुद्धाशुद्ध स्वरूप दाखविले आहे.

हा ग्रंथ वीरशैव बांधवांना अमूल्य मार्गदर्शन करणारा दीपस्तंभच ठरेल यांत शंका नाही. कारण त्यांत शिवलिंग उपासना, आचार-विचार, लिंगसंस्कार इत्यादींचे समग्र विवेचन शास्त्राधारे केलेले आहे. सध्या समाजात खऱ्या धार्मिक भावनेचा ऱ्हास होत चालला आहे. समाजात अन्याय, असत्य, अनीती, अत्याचार, विषमता वाढत असून सामाजिक स्वास्थ्य विघडत चालले आहे. वीरशैवांचीही धार्मिक भावना कमी होऊ लागली आहे. हे लक्षात घेऊन त्यांनी वीरशैवधर्माचे सिद्धांत, धर्माचे श्रेष्ठत्त्व, अनादित्व इत्यादींचे समग्र ज्ञान व्हावे म्हणून हा सारा खटाटोप केला आहे. त्यांचा हा प्रयत्न धर्माचरणाला प्रेरणा देणारा, बळकटी आणणारा, समाजात नवचैतन्य निर्माण करणारा ठरेल असे मला वाटते.

'विश्वधर्म' हा ग्रंथ वीरशैवांकरिताच आहे असे कोणालाही

वाटणार नाही. कारण या ग्रंथातील ' अगोदर हे वाचा ' येथपासून ते संपूर्ण पहिले प्रकरण सर्वधर्म, मत, पंथीय मानवांना कल्याणकारी मार्गदर्शन करणारे ठरेल असे माझे स्पष्ट मत आहे. लेखकास धन्यवाद.

लेखकाने असेच मानव. कल्याणकारी धर्मग्रंथ लिहावेत व त्यांना परमेश्वरी सहकार मिळावा ही ईशचरणी प्रार्थना. "

१५-८-८३ सुरेश मारुती वाळके

---

(१७) श्री. शांतितीर्थ संगय्या स्वामी

(कार्यकारी संपादक–' कपिधार ' मासिक, लातूर)

हे आपल्या अभिप्रायांत लिहितात, " आमचे एक ज्येष्ठ स्नेही श्री. का. शि. संकाये, आळंदी देवाची, यांनी अत्यंत कष्ट घेऊन, कसलाही आर्थिक लाभ डोळ्यासमोर न ठेवता, केवळ जिज्ञासेपोटी व धर्माभिमानाने उद्युक्त होऊन ' विश्वधर्म ' हा ग्रंथ सिद्ध केला आहे, त्याबद्दल मी त्यांना मनापासून धन्यवाद देतो.

हा ग्रंथ वीरशैव मताचे प्राचीनत्व व श्रेष्ठत्व सिद्ध करणारा आहे. तसेच अखिल मानवाला बोध देणारा आहे. यात लेखकाने घातलेली मौलिक भर नोंद घेण्यासारखी आहे. विशेषत: त्यांनी पृ. ७९–८२ ' जगातील सर्व धर्मांपेक्षा हिंदुधर्म कनिष्ठ आहे,' पृ. १४९–१५४ ' वेदांत हिंसा व अहिंसा असे दोन प्रकार का ?' पृ. १८७–१९५ ' भारतीय आर्यांचा शैव–वीरशैव धर्म व वैदिक आर्यांचा हिंदू धर्म ' तसेच तुलनात्मक विचारांचे इतरही लेख या ग्रंथात आहेत ; ते सर्व विचारास चालना देणारे, बुद्धीला पटणारे व सर्वमान्य व्हावेत असेच आहेत ; आणि पृ. १५८–१७० ' भारतीय आर्यांनी (वीरशैवांनी) निर्माण केलेल्या वेदांची शिकवण ' या लेखांत चारी वेदांतील मानवकल्याणकारी सारच आहे. त्या शुद्ध वेदाला उत्तरध्रुवीयांनी निंद्य बनवलेल्या वेदांचे निंद्य स्वरूप सहाव्या प्रकरणात सिद्ध करण्याचे महान् धाडस केले आहे.

वीरशैव धर्माच्या वाङमयात, आगमांना अनन्यसाधारण महत्त्व आहे. या दृष्टीने या ग्रंथात आगमांची निर्मिती वेदकालापूर्वी झाल्याचे

संकाये यांनी प्रतिपादन केले आहे, ते योग्यच होय. ( पहा. पृ. १५६–१५७ )

श्री. संकाये यांनी आपला ग्रंथ सिद्ध करण्यासाठीं ३१२ ग्रंथाचा उपयोग केला असून, कोणत्याही विद्यापीठाच्या पदवीचा आधार नसताना त्यांनी केलेले हे कार्य अत्यंत मोलाचे आहे. या ग्रंथांतील काही मते आग्रही वाटतील पण कोणी तरी हे यापूर्वीच मांडायला हवे होते. ते महान् धाडसाचे कार्य, श्री. का. शि. संकाये यांनी केले याबद्दल त्यांचे पुनश्च अभिनंदन करतो.

दि. १५–१२–८३ शांतितीर्थ स्वामी

---

(१८) डॉ. निर्मलकुमार फडकुले यांचा अभिप्राय

(प्राध्यापक, संगमेश्वर महाविद्यालय, सोलापूर)

" विश्वधर्म ' हे पुस्तक लेखकाने विशेष परिश्रम घेऊन लिहिले आहे. धर्माचा इतिहास, धर्माचा मनुष्यजीवनावरील प्रभाव, धर्माची आवश्यकता, त्याची अंगे इत्यादींबद्दल लेखकाने केलेले विवेचन चिंतनीय आहे. या पुस्तकातून जी मते व्यक्त झाली आहेत, तीं सर्व मान्य होतील असे मात्र नव्हे. मतभेदाची काही स्थळे संभवतात. पण लेखकाने अभ्यासातून आपले निष्कर्ष काढले असल्यामुळे ते विचारास चालना देतात.

श्री. संकाये यांच्या व्यासंगाची, परिश्रमशीलतेची प्रचिती आणून देणारे हे त्यांचे धार्मिक साहित्य अवश्य वाचावे अशा योग्यतेचे आहे. वाचकांचा या लेखनाला योग्य तो प्रतिसाद मिळेल असा मला विश्वास वाटतो.

२९–१२–८३ (प्रा.) डॉ. निर्मलकुमार फडकुले

---

(१९) प्रा. डॉ. राजशेखर हिरेमठ,
(वीरशैवदर्शन मासिकाचे संपादक व प्राध्यापक,
संगमेश्वर महाविद्यालय, सोलापूर)

हे आपला अभिप्राय कळविताना म्हणतात, "श्री. का. शि. संकाये यानी लिहिलेला 'विश्वधर्म' हा ग्रंथ वाचनीय आहे. त्यांनी मोठ्या परिश्रमाने विविध माहिती संग्रहित करून ग्रंथलेखन मोठ्या भाविकतेने केले आहे. वीरशैव धर्माचे प्राचीनत्व, श्रेष्ठत्व व वैशिष्ट्य त्यांनी विस्ताराने विशद करून, जगातील सर्व धर्मांमध्ये वीरशैव धर्म हाच आपल्या विश्वव्यापक, समतावादी आचार-विचारामुळे कसा श्रेष्ठ आहे हे पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे. यातील काही विचारांशी मतभेद होण्याचा संभव असला व काही मते एकांगी व आग्रही वाटली तरी, ती विचारांना प्रवृत्त करणारी आहेत. वीरशैव धर्म तत्त्वज्ञानाची उपेक्षा झाल्याने लेखकाला आलेला सात्त्विक संताप या लेखनातून व्यक्त होतो व ते स्वाभाविकही आहे.

अल्प शिक्षण असतांनाही श्री. संकाये यांनी वीरशैव धर्माच्या अभिमानापोटीं मोठ्या पोटतिडिकीने केलेले हे ग्रंथ-लेखन वीरशैवांना अस्मिताप्रेरक वाटेल व इतर धर्मीयांनाही विचारप्रवर्तक ठरेल. त्यांच्या ह्या उपक्रमाबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो व त्यांना धन्यवाद देतो."

दि. १४-१२-८३ प्रा. डॉ. राजशेखर हिरेमठ

---

(२०) प्रा. डॉ. भि. शि. स्वामी

(कुमार स्वामी महाविद्यालय, औसा, जि. लातूर) म्हणतात कीं, श्री. का. शि. संकाये यांनी प्रस्तुत 'विश्वधर्म' हा ग्रंथ मोठ्या परिश्रमाने तयार केला आहे. त्यांच्याच शब्दात सांगावयाचे तर गेल्या तीस पस्तीस वर्षांपासूनचा त्यांचा हा प्रयत्न आहे. एखाद्या विषयाचा असा पाठपुरावा करणारी माणसेच काहीतरी करून दाखवू शकतात. वाचकांना लेखकाच्या परिश्रमाची कल्पना प्रस्तुत ग्रंथ-वाचनाने सहजच येईल.

या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणातील भाग एक मध्ये 'भारताचा अशुद्ध इतिहास' दिला आहे. त्यात, वैदिक आर्य हिंदू धर्मातील अयोग्याचार व उपासना मानवाना किती घातक आहेत व सहाव्या प्रकरणात वेद किती निंद्य आहेत ते सांगून, दुसऱ्या भागात 'शुद्ध इतिहास' दिला आहे. यात भारताचे अनादित्व व श्रेष्ठत्व आणि शुद्ध संस्कृती कशी होती हे साधार दाखविले आहे, ते योग्यच वाटते. दुसऱ्या प्रकरणात "शैव-वीरशैवांचे अनादित्व व श्रेष्ठत्व याचे साधार विवेचन केले आहे. तिसरे व चौथे प्रकरण विशेष महत्त्वपूर्ण झाले आहे, असे मला वाटते. या दोन प्रकरणांतील लेखकाने उल्लेखिलेले पुरावे महत्त्वाचे आहेत. मराठी बोलभाषेतून वीरशैवांच्या तत्वज्ञानाविषयी, आचारधर्मा-विषयी प्रसिद्ध झालेले साहित्य अत्यंत अपुरे आहे; आणि तेही सहजो-पलब्ध नाही. अशा परिस्थितीत श्री. संकाये यांचा हा ग्रंथ मोलाची कामगिरी करू शकणारा आहे. लेखकाच्या हातून या ग्रंथाच्या निमित्ताने महाराष्ट्रातील वीरशैव-पंथीयांच्या वाङमयात महत्त्वाची भर पडली आहे आणि त्यासाठी श्री. संकाये धन्यवादास पात्र आहेत.

श्री. संकाये यांनी आपल्या ग्रंथाची रचना आपण सर्वसामान्य माणसाला जे सांगत आहोत तो सामान्य माणूस अध्यात्माचा, सांस्कृतिक ज्ञानाचा, परंपरेच्या माहितीचा भुकेला आहे, परंतु त्याला सत्य कोणी सांगत नाही, त्याच्या अंधश्रद्धाच जोपासल्या जातात, आपल्याला गव-सलेले, आकलन झालेले सत्य आपल्या परीने त्याच्या पदरात टाकावे, अशा शुद्ध हेतूने केली असावी. त्यांचा हा हेतू नक्कीच सफल होईल. सर्वसामान्य भक्तांच्या मनावर परिणाम व्हावा, त्याला सत्य समजून घेण्याची इच्छा व्हावी इतकी परिणामकारकता श्री. संकाये यांच्या 'विश्वधर्म' ग्रंथात नक्कीच आहे. संकाये यांनी ग्रंथ प्रथमच लिहिला आहे. त्यात विषयाची मांडणी आणि मुद्रण-दोष आहेत ते पुढच्या प्रकाशनात लेखक दुरुस्त करतीलच. धन्यवाद !

दि. ६-४-८४ भि.शि. स्वामी

---

(२१) डॉ. बळवंत बंडप्पा संकाये,
एम्. एस्‌सी; पीएच् डी.
(प्रमुख : प्राणिशास्त्र विभाग, महात्मा गांधी महाविद्यालय, अहमदपूर.)

डॉ. संकाये अभिप्राय देताना लिहितात, "श्रीयुत का. शि. संकाये नांदगावकर (देवाची आळंदी) यांसी सप्रेम नमस्कार वि. वि. आपला "विश्वधर्म" ग्रंथ वाचला. मानवी नैतिक मूल्ये हीच कोणत्याही धर्माची अधिभूत मूल्ये असू शकतात, हे आपले विवेचन पटले. आपण आधारभूत म्हणून घेतलेले ग्रंथ हे दुर्मिळ धर्मग्रंथ आहेत. धार्मिक ग्रंथांचे माझे वाचन मूळातच कमी, कारण मी एक विज्ञानाचा विद्यार्थी; त्यामुळे आपल्या ग्रंथावर अभिप्राय देणे माझ्या अधिकाराच्या बाहेरचे. मी विज्ञाननिष्ठ असल्यामुळे समाजाची वैज्ञानिक दृष्टी जागवण्यासाठी अंधश्रद्धा, भाकडकथा, वाईट प्रघात यांवर नेहमी टीका करतो; तरीही मला आपला ग्रंथ वाचवासा वाटला. याचे कारण असे की, आपल्या ग्रंथात असलेले 'भारताचा अशुद्ध इतिहास' हे पहिले प्रकरण आणि त्याला मिळालेली पुष्टी हे सहावे प्रकरण. तसेच धार्मिक ग्रंथामध्ये आलेल्या काल्पनिक भाकडकथा यावरील आपला हल्ला. या गोष्टी कशा खोटया आहेत हे आपण छान पटवून दिले आहे.

अंधश्रद्धेत अडकलेल्या समाजास विज्ञानाच्या निकषावर गोष्टी समजावून पटत नाहीत, तो एकेरीस येऊन हे धर्माच्या विरोधात आहें असे मानू लागतो आणि विज्ञानापासून दूर धावू लागतो. म्हणून प्रथम धार्मिक ग्रंथांचा हवाला देऊन धर्मग्रंथातील रचलेल्या काल्पनिक कथा, प्रसंग, व्रतवैकल्ये सर्व कसे खोटे आणि अंधश्रद्धा वाढवणारे आहे हे पटविणे सोपे नसते. हे महान् कार्य आपल्या ग्रंथाने साधले आहे.

त्यासाठी विज्ञाननिष्ठ माणसाने आपला ग्रंथ वाचल्यास भोळ्याभावड्या समाजाबरोबर संवाद साधणे सुकर होईल.

या ग्रंथातील, भारतीय आर्य निराळे व उत्तर ध्रुवीय आर्य (हिंदू) निराळे, वेदाचे शुद्धाशुद्धत्व, शैवागमाचे श्रेष्ठत्व, आणि तुलनात्मक विचार इत्यादी विवेचन विशेष महत्त्वाचे आहे. मानवतेची शुद्ध मूल्ये धर्ममार्तंडांनी, धर्मग्रंथ रचना करून नष्ट भ्रष्ट केलीं होती. त्याचे नागडे उघडे प्रदर्शन दाखवून धर्मग्रंथांच्याच आधाराने आपण

मानवता पुनः प्रस्थापित केली आहे. म्हणून तुम्ही तुमच्या पिढीतील धर्म-सुधारक ठरला आहात. **मानव हाच आपला धर्म आहे, आणि तोच विश्वधर्म आहे.**

काल्पनिक कर्मकांडांत, व्रतवैकल्यात अडकलेले धर्ममार्तंड आपल्यावर तुटून पडतील हे ओघानेच आले. ते सर्व सहन करण्यास, भोळ्या-भावड्या गरीब माणसात असलेला देव आपणास सामर्थ्य देवो व पुढेही असेच मानवोपकारी ग्रंथ-निर्मितीस सामर्थ्य देवो ही सदिच्छा."

दि. १४-८-१९८४ **बळवंत संकाये**

-----

(२२) **प्रा. श. दे. पसारकर :**

( संगमेश्वर महाविद्यालय, सोलापूर. )

कळवितात की, श्री. का. शि. संकाये यांनी लिहिलेल्या 'विश्वधर्म' या ग्रंथावर त्यांच्याच सूचनेनुसार संक्षिप्त अभिप्राय लिहीत आहे. खरे म्हणजे त्यांच्या लेखनाचा व प्रकाशनकार्याचा सहृदयतेने गौरव करून त्यांच्या ग्रंथाचे परीक्षणच करावयास हवे. स्थलाभावी तूर्त संक्षिप्त अभिप्राय लिहीत आहे.

'विश्वधर्म' हा ग्रंथ संशोधनात्मक आहे. ग्रंथाची सहा प्रकरणे असून आर्य-अनार्यांचा संस्कृतिसंघर्ष, पौराणिकांचे इतिहासदुष्ट लेखन, हिंदू धर्मातील नाना दैवते, यज्ञयाग व त्यातील हिंसा, अवतार-कल्पना, सृष्टीनिर्मिती, आगम-निगमांची रचना, शैव-वीरशैव धर्म, लिंग धारणेचे प्राचीनत्व व महत्त्व, आगम पुराणादी ग्रंथांचा पारंपारिक रचनाकाल, इत्यादी अनेक विषयांची माहितीं त्यामध्ये आली आहे. त्याबरोबरच जागोजाग टीका-टिप्पणीही केली आहे.

श्री. संकाये यांची दृष्टी संकलनाची असल्यामुळे संदर्भ ग्रंथ म्हणून जरी ह्या ग्रंथाची भर पडत नसली तरी, माहितीवजा ग्रंथ साहित्यात त्यामुळे निश्चितच भर पडली आहे. लेखकाचा सूर काही ठिकाणी विशेषतः वैदिक धर्मावर टीकाप्रहार करताना बराच आग्रही व असंतुलित जाणवतो. त्यामुळे इतिहासविषयक काही विपर्यस्त विधाने त्यात आढळतात. परमताचे खंडन व स्वमताचे मंडन नेहमीच

अनाग्रही वृत्तीने करावयास हवे. अन्यथा ग्रंथात एकलेपणा येण्याचा संभव नाकारता येत नाही. प्रस्तुत ग्रंथात विवेचनाचा तोल बऱ्याच ठिकाणी ढळलेला आढळेल. परंतु पंचाचार्य लिंगोद्भव नाहीत अशी विधाने करताना लेखकांच्या ठिकाणी असलेला बुद्धिवाद अधुनमधून आपली चुणूक दाखवून जातो.

प्रस्तुत ग्रंथातील वीरशैव सिद्धांत, आचारधर्म, पंचाचार्य व बसवेश्वर ह्या परंपरांमधील साम्य-भेद इत्यादी भाग माहितीपूर्ण असून वाचनीय आहे. लेखकाशी माझे अनेक मतभेद संभवतील, तथापि त्यांचा हा ग्रंथ अग्राहय निश्चितच नाही, असे मला वाटते. विद्यापिठीय पदवीचा कोणताही चिठोरा त्यांनी आपल्या कपाळावर डकवलेला नाही. केवळ कर्तव्यबुद्धीतून आपल्या धर्मबांधवांना स्वधर्माचरणास प्रवृत्त करावे व पंथीय माहिती त्यांच्यापर्यंत पोहोचवावी ह्या सदुद्देशानेच अनेक ग्रंथांचे परिश्रमपूर्वक अध्ययन करून त्यांनी हा ग्रंथ सोप्या भाषेत लिहिला व प्रसिद्ध केला, त्याबद्दल त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन करतो आणि यापुढे त्यांनी अनाग्रही व संतुलित वृत्तीने लेखन करावे असे नम्रपणे सुचवितो. अस्तु.

दि. ६-१०-८३ प्रा. श. दे. पसारकर.

---

## (२३) प्रा. बसवराज कोरे (हरंगुळकर)
### (कला, वाणिज्य महाविद्यालय, जालना)

प्रा. बसवराज कोरे हे कळवितात, "विश्वधर्म' या ग्रंथाचे लेखक श्री. का. शि. संकाये यांचे शिक्षण जरी अल्प असले, तरी त्यांची विचारशक्ती अत्यंत प्रगल्भ आहे. धार्मिक विचाराच्या क्षेत्रात हा ग्रंथ म्हणजे एक स्फोटच ठरावा. श्री. संकाये यांनी जुन्या अवास्तविक दंतकथांचा आणि कल्पनांचा योग्य अर्थ लावून आपल्या स्वतंत्र विचारांच्या आधारे काही तरी नव्याने सांगण्याचा प्रयत्न केला आहे. सत्य हे नेहमीच कटू असते; ते सत्य आगम, उपनिषदे, पुराणादी धर्म-ग्रंथांच्या आधारे सांगितले गेले आहे. ते सांगताना त्यांनी आधुनिक नव्या विचारसरणीचा अवलंब केला आहे. ही विचारप्रणाली सर्वांना

आवडेल असे सांगता येत नाही. विशेषतः ज्यांनी हजारो वर्षे वहुजनसमाजाला सर्व प्रकारच्या गुलामीत ठेवले, त्यांना खचितच आवडणार नाही. परंतु लेखकाने कोणाच्या आवडी–निवडींचा विचार ठेवला नाही; त्यात त्यांच्या मनाचा खंबीरपणा दिसून येतो.

कालाच्या प्रवाहावरोवर वाहत जाणारे पुष्कळ असतात. परंतु वास्तवतचे भान ठेवून उलट दिशेने विचार करणारांची संख्या नेहमीच कमी असते. भारतातील धर्मसंस्थेचा आणि धर्मग्रंथांचा अभ्यास करताना लेखकाने समीक्षकाची चिकित्सक दृष्टी ठेवली आहे. त्यामुळे त्यांच्या प्रत्येक विधानाला तर्कशुद्ध सुसंगती साधली आहे. भारतीय हिंदूधर्मात यज्ञयाग, देव-देवीच्या नावाने, हजारो वर्षांपासून होत असलेली पशुहत्या, मद्यपान हे भारतीय नसून उत्तरध्रुवीय आर्यांनी भारतात आणले आणि त्यांना धार्मिक विधीत स्थान दिले ! भारताच्या हवामानाचा विचार करता या प्रथेची गरज नव्हती आणि नाही. तरी जिवांचे चोजले पुरविण्यासाठी ही प्रथा आजपर्यंत चालू राहिली, याची लेखकाला खंत वाटत असल्याचे जागोजाग दिसून येते.

या प्रथेचे स्पष्टीकरण करताना ते पुढे म्हणतात, ‘ भारतीय आर्यांच्या वेदांत अशा प्रकारच्या वाबींचा कुठेही उल्लेख आढळत नाही किंवा वर्णानुसार समाजातही आढळत नाही. असे असताना आजच्या समाजात हे आले कुठून ? ’ या प्रश्नाचे उत्तर शोधताना त्यांनी उत्तर-ध्रुवावरील आर्यांकडे बोट दाखविले आहे.

त्यांनीच मूळच्या भारतीयांना अनार्य किंवा द्रविड वनविले आहे आणि सर्व प्रकारची गुलामी त्यांच्यावर लादली आहे. हे सांगताना त्यांनी तत्संबंधी सवळ पुराव्याचा आधार घेऊन ते सिद्ध केले आहे, ही विशेष उल्लेखनीय वाव होय. संदर्भ देत असतांना लेखकाने आधुनिक संशोधन-पद्धतीचा वापर केला आहे. संदर्भग्रंथाची सूची आणि विषयाची मांडणी पाहता ग्रंथ संशोधन-प्रबंधाच्या तोडीचा वाटतो.

श्री. का. शि. संकाये यांची अभ्यासवृत्ती, चिकाटी, नवे जाणून घेण्याची जिज्ञासा आणि वृद्धवयांतही कठोर परिश्रम करण्याची तयारी ह्या गुणांची जिवंत साक्ष म्हणजेच त्यांचा विश्वधर्म हा ग्रंथ होय. या निमित्ताने ‘ विश्वधर्म ’ या ग्रंथाच्या प्रकाशनास माझ्या हार्दिक शुभेच्छा.”

दि. ४–१–८४ (प्रा.) [illegible] कोरे (हरंगुळकर)

## (२४) शिवाजी निवृत्ती मोहिते यांचे विचार

एम्. ए; एम्. एड्. साहित्याचार्य.
(न्यू ज्युनियर कॉलेज, दापोडी, पुणे १५. निवास : सुदर्शन निवास,
कासारवाडी, पुणे ३४)

प्रा. शि. नि. मोहिते कळवितात की 'विश्वधर्म' हा ग्रंथ संपूर्ण वाचला. सहा प्रकरणात्मक ह्या ग्रंथात लेखकाने ( श्रीमान् का. शि. संकाये ) विश्वधर्माची कल्पना अत्यंत विस्ताराने मांडली आहे. ती साधार मांडण्याचा त्यांचा प्रयत्न स्तुत्य वाटतो. कारण इतक्या व्यापक विषयाला अल्पशिक्षित व्यक्तीने हात घालणे धाडसाचे कर्म होय. पण विषयाची आवड; ह्या आवडीने धाडस केले व विषय पूर्ण हाताळण्याचा प्रयत्न झाला.

प्राचीन काळापासून समाजामध्ये सातत्याने दोन प्रवृत्ती दिसतात. चांगली - वाईट, पाप - पुण्य, सदाचार - दुराचार, सज्जन - दुर्जन, धर्म-अधर्म, सत्य - असत्य, सद्गती - अधोगती, नीती - अनीती, हिंसा - अहिंसा व त्यातून निर्माण होणारे सुख - दुःख. मानवाच्या निर्मितीं काळापासून जग हे प्रवाही बनलेले आहे. प्रवाहामध्ये बदल होत आलेले आहेत. बदल किंवा परिवर्तन हे सामाजिक जिवन्तपणाचे लक्षण आहे. समाजात केवळ जिवन्तपणाच राहिला, पण सामाजिक अशांतीचे मूळ जी राक्षसी प्रवृत्ती तिचा कोणीही समूळ नाश करू शकला नाही. विश्व- एकोप्याची, कल्याणाची कल्पना अनेक धर्मनेत्यांनी, महामानवांनी मांडली. पण ती निष्फळ ठरली. खरे म्हणजे मानवानेच स्वतःच्या अन्तःकरणात मानव शोधला पाहिजे. म्हणजे मानवातला मानव त्याला दिसू शकेल व पशुतुल्य आचरणापासून तो परावृत्त होईल. पण आजतागायत बहुसंख्य मानव त्यापासून परावृत्त झालेला नाही आणि त्यामुळेच तो सुख, शांती व समृद्धी यापासून वंचित राहिला.

श्री. संकाये यांनी आपल्या ग्रंथात अनेक धर्मांचा विस्ताराने तौलनिक अभ्यास केला आहे. रामायण, महाभारत, पुराणादी ग्रंथांतून कथा, दंतकथा, पुराणकथा, प्रसंग, घटना, व्यक्तिरेखा या रूपाने परंपरागत चालत आलेल्या विचारांना व समजुतींना काहीसा नवा दृष्टिकोन देऊन सामाजिक प्रबोधन करण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. आपण 'देव'

कुणाला म्हणतो? समर्थशील अशा उच्च गुणांचा ज्या व्यक्तीमध्ये अन्तर्भाव असतो, अशा महामानवाला समाज देवत्व देतो. पण पूर्वी तो आपल्या-सारखाच मानव होता, हे समाज पुढे विसरतो व महामानवाची व्यक्तिपूजा सुरू होते, नंतर देव पूजा होते. त्यातूनच कर्मकांडाला सुरुवात होते.

प्रत्येक मानव हा कोणत्या ना कोणत्या धर्माचा आश्रय घेत असतो व त्या धर्मातील आचार, विचार व उच्चार यांच्या बंधनांत अडकतो. वस्तुतः मानव हा स्वतंत्रवृत्तीचा व प्रवृत्तीचा असतो. लेखकाचे मते मानवाने विश्वाला पालाण घालणारा विश्वधर्मच स्वीकारावा, ज्यामुळे आपण मानवी जातीचे कल्याण करू शकू. विश्वकल्याण ही भावना हृदयाच्या कातळात रुजविली पाहिजे व हीच लेखकाची भूमिका आहे.

श्रीसंत ज्ञानेश्वरांना विश्वव्यापक भावनेने खालील ओवीत असाच एक विचार सांगावयाचा आहे.

**।। हे विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।**
**किंबहुना चराचर । आपण जाहला ।।** (ज्ञानेश्वरी)

मानवाने जगातील चरसृष्टीतील प्रत्येक जीवाणुबद्दल व्यापक अंत:करण ठेऊन विश्व हे माझे आहे व मी विश्वाचा आहे, असा विशाल आणि प्रगल्भ दृष्टिकोन ठेवावा. ज्ञानेश्वरांना यातून विश्वधर्मच व्यक्त करावयाचा होता ना ?

लेखक अल्पशिक्षित असल्याने ग्रंथातील काही उणीवा बाजूस ठेवल्या तर ग्रंथ खरोखरच वाचण्यासारखा व अभ्यासण्याजोगा झाला आहे. माझ्यासारखे अनेक वाचक रसिकतेने हा ग्रंथ वाचतील अशी मला आशा आहे. धन्यवाद !

दि. २०–५–८४ **शिवाजीराव मोहिते.**

---

**(२५) प्रा. बा. म. चमके, एम. ए.**
**(प्रमुख तत्त्वज्ञान विभाग, श्री. भाऊसाहेब झाडबुके महाविद्यालय बार्शी)**

**प्रा. चमके लिहितात,** " मा. श्री. का. शि. संकाये नांदगावकर (आळंदी देवाची) यांना स. न. वि. वि. आपण मला भेटून आपल्या आगामी, 'विश्वधर्म' या धर्मतत्त्वज्ञान विच्छेदात्मक ग्रंथाविषयी

अभिप्राय लिहून पाठविणेविषयी सांगितले होते; आणि मी ते मान्यही केले होते; तथापि प्रकृति अस्वास्थ्यामुळे मला ते करता आले नाही ! तूर्त मी आपल्या या मौलिक ग्रंथास शुभेच्छा व्यक्त करितो. हा ग्रंथ जेव्हा प्रकाशित होऊन समाजात येईल, तेव्हा या ग्रंथाचे मी परीक्षण लिहीन. येवढी सेवा जरूर करीन. आपल्या या थोर कार्याला मी सुयश चिंतितो."

२१-८-१९८४ बार्शी, जि. सोलापूर बा. स. चमके

---

(२६) श्री. सुभाष नाइकरे; एम्. ए. डिप. एड्. (आळंदी देवाची)

हे लिहितात–" आदरणीय श्री. का. शि. संकाये महाराज यांसी स. न. वि. वि. आपण अत्यंत कष्टपूर्वक लिहिलेला ' विश्वधर्म ' ग्रंथ संपूर्ण वाचला. ग्रंथ वास्तव होण्यासाठी आपणाला ज्या दुर्मिळ ग्रंथांचा आधार घ्यावा लागला, त्यासाठी परिश्रमाबरोबरच चिकाटीची-ही आवश्यकता होती. तीही आपल्या ठिकाणी दिसून येते. विशेषतः कोणाचेही लक्ष जाणार नाही, अशा विषयावर आपण माहितीपूर्ण ग्रंथ लिहिला याचे मोल मला फार वाटते.

' विश्वधर्म ' ग्रंथाचे आपण दोन विभाग करून भारताच्या अशुद्ध इतिहासाचे शुद्ध स्वरूप दाखविले आहे. अभिप्राय देण्याची पात्रता माझ्यात आहे किंवा नाही हे निदान मला तरी सांगता येणार नाही. पण ग्रंथाची समीक्षा करणे वेगळे आणि अभिप्राय लिहिणें वेगळे.. यातील फरक ध्यानात असल्यामुळे संपूर्ण ग्रंथाच्या गुणावगुणाचे तपशीलवार परीक्षण करणे अभिप्रायात शक्य नसते. इतिहासलेखन ' जसे घडले तसे लिहिणे ' या तत्त्वास धरूनच असले पाहिजे. इतिहास–लेखनांत कोणत्या विषयाचा समावेश होऊ शकतो याची काळजी लेखकाने घेतली तर शुद्धाशुद्धतेच्या वादात पडण्याची पाळी येणार नाही. पण आपणच म्हटल्याप्रमाणे स्वार्थावर दृष्टी ठेवून लिहिलेला इतिहास वास्तवतेला सामोरा जाऊ शकत नाही. असे लिखाण ' इतिहास ' या संज्ञेस पात्र ठरू शकत नाही. लिखित घटनांवर विश्वास ठेवण्याची भारतीयांची वृत्तीच त्यांच्या अज्ञानास

कारणीभूत ठरते. उत्क्रांतीचा सिद्धांत मान्य असणाराला अवताराची दैवी संकल्पना मान्य होणे कठीणच.

धर्म, स्वधर्म यांमधील फरक करता येणार नाही, असा जो पौराणिक ग्रंथकर्त्यांचा दृष्टिकोन, रूढार्थाने धर्माला आणि धर्मकल्पनांना धर्माच्या नावाखाली विकृत वळण देण्याचा चाललेला प्रकार निरक्षर जनतेने खरा मानला, तर तो जनतेचा दोष असू शकत नाही. अभ्यासानेच चिकित्सक वृत्ती माणसात येते. पण अभ्यासाची साधनेच वापरण्याचे ज्ञान नसेल तर सत्यासत्याचे परिशीलन न होता पूर्वसूरींनी जे सांगितले आहे, ते सत्य मानण्याची वृत्ती निर्माण होते, आणि तत्कालीन धूर्त मंडळी आपल्या स्वार्थासाठी इतरांच्या अज्ञानाचा परिपोष होईल, याची काळजी घेत असतात !

भारतीय आर्यांच्या स्वतःच्या काही संकल्पना होत्या. त्यांची स्वतंत्र संस्कृती होती. त्यांच्या संस्कृतीवर वैदिक आर्य संस्कृतीने आक्रमण केले. पुढील काळात मिश्र संस्कृती निर्माण झाली. पण मूळची भारतीय आर्य संस्कृती श्रेष्ठ होती. कला, शिक्षण, विज्ञान, विवाहादीं नियम आदर्श होते वगैरे. " आदर्श " हे समाजसापेक्ष असतात. चांगले-वाईट समाज कल्पनेवरच आधारीत असतात. फक्त आचरण आणि विचार यांच्यात तफावत पडली की विसंगती निर्माण होते. अशाप्रकारच्या विसंगतीवर आपल्या ग्रंथलेखनात अचूक बोट ठेवले गेले आहे.

ग्रंथ–निर्मितीच्या काळात आपणास जी जाणीवपूर्वक आराधना करावी लागली ती अनेक अडचणीतूनच. त्यातून एक अभ्यासपूर्ण ग्रंथ निर्माण करण्याचे सर्व श्रेय आपणालाच देणे क्रमप्राप्त आहे. संदर्भ ग्रंथाची मालिका पाहिल्यावर आपला ध्येय–वाद उत्कट असल्यामुळेच येवढे परिश्रम घेणे शक्य झाले. वाचकांची ज्ञानपिपासा पूर्ण करण्यास 'विश्वधर्म' ग्रंथ उपयुक्त ठरल्याशिवाय राहाणार नाही. माणूस अंतराळ युगात वावरत असला तरी आपला भूतकाळ कसा सांगितला गेला आहे, याची उत्सुकता असतेच. वाचकाची उत्सुकता पूर्ण करण्यास 'विश्वधर्म' ग्रंथ पुरेसा आणि उपयुक्त साधन म्हणूनच त्याचा स्वीकार व्हावा इतका मौल्यवान आहे. अभिप्रायाशी लेखक सहमत

असतातच असे नव्हे. तो अभिप्राय केवळ वाचकांचीच मते व्यक्त करणारा असतो. इति– ”

सुभाष नाइकरे

दि. १८–८–८४

-----

(२७) आचार्य शिवमूर्ती स्वामी

(‘नदीश,’ पश्चिम रोड, प्रवासी मंदिर, भालकी ५८५३२९
जिल्हा विदर – कर्नाटक)

लिहितात : “सद्धर्मसेवी श्री. का. शि. संकाये (नांदगावकर), आळंदी, यांना अनंत मंगलाशीर्वाद. आपण पाठवलेला ‘विश्वधर्म’ ग्रंथ, त्याबरोबरचे पत्र मिळाले. पत्र व ग्रंथ वाचून आनंद झाला. आपल्या विनंतीमुळे ‘विश्वधर्म’ ग्रंथावर अभिप्राय (यथामती) पाठवीत आहे.

‘विश्वधर्म’ हा ग्रंथ एक वस्तुसत्य निदर्शन असून केवळ मानवतेच्या पृष्ठभूमीवरच आधारलेला आहे. मानवाच्या अंगी मानवता असावी, देवाअंगी देवत्व आणि धर्माअंगी-धर्माचे शुद्धांत:करण, तरच पशुत्वाचा नाश होऊन पशुपतीत्व लाभते, ही गोष्ट सर्वमान्य आहे.

“मन एव मनुष्याणां कारण बंध-मुक्तये.” मानवाच्या शुद्ध अंत:करणावरच जीवनाची मुक्ती आधारलेली आहे. यासाठी शुद्ध अंत:-करणाची जाणीव करून देण्याचा प्रयत्न या ‘विश्वधर्म’ ग्रंथात आढळतो. ज्या ठिकाणी परिशुद्ध भाव नाही, त्या ठिकाणी मुक्ती असाध्यच जाणावी.

विश्वाठायी कित्येक धर्म आहेत. प्रत्येक धर्माचा सिद्धांत निर-निराळ्या भूमिकेवरच आधारलेला दिसतो. परंतु प्रत्येक सिद्धांताच्या मुळाशी प्रेमादर व शील–सद्भाव उघड दिसले तरी मानव–मानवात असलेली भेददृष्टी स्पष्ट दिसून येते. उदाहरणार्थ–वैदिककालीन चातुर्वण्य व्यवस्था. हिंदुधर्माचा विरोधच मुसलमानी धर्माचा सिद्धांत! वास्तविक पाहता जात कोणतीही असो, तो मानवच आहे. मानव धर्माचे मूळ प्रेमात आहे, आदरातिथ्यात आहे. यासाठी ‘अतिथी देवो भव’ असा उपदेश विश्वधर्म ग्रंथात आढळतो. कोणत्याहीं जातीची व्यक्ती दारापुढे येवो, ती देवस्वरूपी मानली गेली आहे.

हा ग्रंथ मानवाच्या एकात्मस्वरूपावरच आधारलेला आहे. कोणत्याही जातीचा तिरस्कार यात नाही, परंतु मानवाच्या अमानुष कृत्याबद्दल मात्र उघड उघड खंडन केलेले आहे. मानवाच्या जीवनमुक्तीला जीवदया, मानव-प्रेम व सद्भावना सहकारच कारण आहेत. धर्माच्या आडमार्गात अथवा व्यर्थ अवडंबरात फसलेल्या व्यक्तीला केव्हाच मोक्ष मिळत नाही; म्हणजे या जीवनात आनंद व आत्मसुख लाभत नाही. 'विश्वधर्म' ग्रंथात संपूर्ण वेदागम व शास्त्रांचा उल्लेख श्लोकान्वये केला गेला आहे. आज अशा ग्रंथाची आवश्यकता भासते. आजचा मानव जुन्या धर्माच्या पातळीवरून घसरत चालला आहे. त्याला कोणताही मार्ग योग्य वाटत नाही. अशा निधर्मी स्वभावाच्या पक्षाला मानवतेच्या मार्गावर आणून सोडणे हा या ग्रंथकर्त्याचा सदुद्देश्य आहे. या ग्रंथातील गोष्टी पंडित व पामरालासुद्धा सरळरीत्या लक्षात येण्यासारख्या आहेत. या ग्रंथापासून सर्वांना ज्ञान-प्रकाश लाभेल, अशी माझी अंत:प्रेरणा आहे.

लेखकाची ही कृती सफल झाली आहे. लहान-सहान चुका नगण्य आहेत. लेखकाला अनंतकालीन आयुरारोग्य लाभो व अशा प्रकारच्या ग्रंथ-निर्माणासाठी भावी जीवनात यश प्राप्त होवो. इति सर्वं मंगलम्."

दि. ३०-५-८४ आचार्य शिवमूर्ती स्वामी

-----

(२८) श्री. महेश हिरेमठ

(बी. कॉम; .जगद्गुरु विश्वाराध्य विद्यार्थी निलय, सदाशिवपेठ, पुणे.)

'विश्वधर्म' या महान् ग्रंथावर अभिप्राय देण्याइतका माझा अभ्यास नाही; याची जाणीव असूनही या ग्रंथाचे लेखक श्री. का. शि. संकाये यांच्या आग्रहाखातर मी यावर चार शब्द लिहिण्याचे धाडस करीत आहे.

प्राचीन उत्तम धर्मतत्त्वे, उत्तम संस्कार यांचा विसर पडलेल्या नैतिक मूल्यांचा ऱ्हास झालेल्या आणि मानवतेचा विसर पडून एकमेकांपासून दुरावलेल्या या विज्ञानयुगातील मानव जातीला खऱ्या धर्माची नितांत आवश्यकता आहे.

आणि अशा या योग्य कालांत ग्रंथकर्त्याने हा ग्रंथ लिहून एक मोठेच समाजकार्य केले आहे. हा ग्रंथ लिहून अनादिसिद्ध अंधश्रद्धेला

**(३०) डॉ. गंगाधर विरसंगप्पा उपे, एम. बी. बी. एस.**

(प्रमुख-वैद्यकीय अधिकारी, त्वचा व गुप्तरोग वैद्यकीय विद्यालय, औरंगाबाद; सरचिटणीस–मराठवाडा वीरशैव विद्यावर्धक संघ, औरंगाबाद.)

डॉ. गं. वि. उपे आपल्या अभिप्रायात लिहितात: "' विश्वधर्म ' हा श्री. का. शि. संकाये, नांदगांवकर (आळंदी) यांनी लिहिलेला पहिलाच ग्रंथ आहे. संकाये यांची ही कृती जितकी प्रेरक तितकीच स्फोटक असल्याचे वाचकांच्या ध्यानीं येईल. प्रस्तुत ग्रंथाचे लेखक अशी व्यक्ती आहे की, कोणत्याही भयाला, लाभाला संकटे वा विपत्तीला न जुमानता सत्याच्या प्रकाशांत शांत व दृढ निश्चयाने जीवनमार्गाचे मार्गक्रमण धाडसी वृत्तीने करीत राहणार !

श्री. संकाये यांचा प्रत्येक शब्द प्रामाणिक व म्हणूनच प्रभावी आहे. लौकिक जीवन व उपासना यातील समज व अपसमज यांवर त्यांनी परखड व प्रखर प्रकाशझोत टाकला आहे. सध्याच्या क्रांतीकाळी अशा ग्रंथाची, अशा प्रत्ययकारी विचाराची समाजाला अत्यंत आवश्यकता आहे. असद्धर्माचे खंडन व सद्धर्माचे मंडन केल्यामुळे अंधःश्रद्धेचे उच्चाटन होऊन अखिल मानवजातीचे कल्याण या ग्रंथाने साधणार आहे.

श्री. संकाये हे साहित्यिक नव्हेत–साधक आहेत. त्यांच्या लेखनांत साहित्य गुणाचा अभाव कोठे कोठे आढळेल, पण अनुभवाची सखोलता, मानवकल्याणाची तळमळ, आणि व्यवहारी दृष्टिकोन याचा आढळ होईल. त्यांचे लेखन सर्वसामान्यांसाठी अनुभवामृत ठरेल असा विश्वास वाटतो.

लेखकाने ' विश्वधर्म ' हा ग्रंथ ' अहिंसा परमो धर्मः ' व ' आचारः परमो धर्मः ' ही सर्वश्रेष्ठ धर्म-तत्त्वे उराशी बाळगून लिहिला आहे. असद्धर्माचे खंडन, सद्धर्माचे मंडन, असद्देवतेचे खंडन, सद्देवतेचे मंडन; असदुपासनेचे खंडन, सदुपासनेचे मंडन; अशुद्धेतिहासाचे खंडन, शुद्धेतिहासाचे मंडन; असदाचाराने अधोगती, सदाचाराने उर्ध्वगती; बहुदेव उपासना घातक, एकेश्वरी उपासनेने मोक्ष; अशा खंडन मंडनाचा उहापोह संकाये यांनी त्यांच्या लिखाणातून केला आहे, तो मार्मिक व चिंतनीय असून पटणारा आहे.

उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांनी, भारतीय आर्यांचीं विश्वारंभापासूनची सर्वश्रेष्ठ शुद्ध संस्कृती नष्टप्राय करून यज्ञयागादि हीन प्रकार निर्माण केले. आपल्या अशुद्ध कल्पनेतून अनंत देवदेवी निर्माण करून हिंसाचार, भ्रष्टाचार, अत्याचार, पापाचार अशा मानवाला अधोगतीला नेणाऱ्या कथांचे चित्रण चितारले आहे. लेखकाने ते मोठ्या धाडसानें आपल्या लिखाणाचे द्वारा प्रगट करून अखिल मानवजातीच्या हाती दिले आहे.

आगम ग्रंथ परशिवाच्या (परमेश्वराचे) मुखातून निघाले नाहीत, पंचाचार्य शिवलिंगोद्भव नाहीत, पंचाचार्यांनी वीरशैव मत (धर्म) स्थापन केला नाही, शैवाचार पंचाचार्यांच्या अगोदरचा आहे, या गोष्टी बुद्धिजीवी विचारवंत विद्वानांना पटणाऱ्या असून त्या योग्य आहेत.

पंचाचार्यांनी वीरशैव धर्माचा प्रचार, प्रसार तसेच संरक्षण केले आहे. श्री. बसवेश्वरांनीही तेच कार्य केले आहे. वीरशैव आगमोक्त आहेत. वेदोक्त नाहीत. वेदातील आगम सिद्धांती मंत्र तेवढे वीरशैवांना मान्य आहेत, नव्हे ते वीरशैवांनीच निर्माण केले आहेत, हे या ग्रंथांतील पान क्रमांक १५८ ते १७१ मध्ये सिद्ध केले आहे. तरी एवढ्यावरून वीरशैव वैदिक होऊ शकत नाहीत. लेखकाची ही विधाने पटणारी आहेत. कारण लेखकाने अशुद्ध इतिहास व प्रकरण सहामध्ये वेदाचें कनिष्ठत्व वेदाच्याच आधाराने सिद्ध केले आहे. ते वाचल्यास असे वाटते की वेदोक्त म्हणवून घेणे फारच निंदत्वाचे आहे.

जगद्गुरु पंचाचार्यांसह सर्व गुरुवर्ग व वीरशैव समाज आपणाला वैदिक मानतात. चार आचार्यांना चार वेद जुनेच आहेत आणि ते अति कनिष्ट आहेत. पाचव्या आचार्याकरिता अस्तित्वात नसलेला 'अजप वेद' नवीनच मानला आहे. हे अगदी अयोग्य आहे असे वाटते.

श्री. संकाये यांनी हा ग्रंथ वीरशैव (मानवता) धर्माच्या सिद्धांताकरिता लिहिला आहे. असे जरी वाटत असले तरी अखिल मानवजातीचे कल्याण होईल असे या ग्रंथातील सिद्धांत आहेत, असे माझे स्पष्ट मत आहे. हा 'विश्वधर्म' ग्रंथ विसाव्या शतकांत विश्वकल्याणाकरिता लिहून लेखकाने विश्वातील सर्वश्रेष्ठ धार्मिक इतिहास वाच-

कांच्याच नव्हे तर अखिल मानवाच्या हाती अमृतच दिले आहे. अमृताचा गुण (स्वभाव) जीवाला अमर करणे हा आहे. त्याप्रमाणे ‘विश्वधर्म’ ग्रंथ मानवाला खचितच अमर (मोक्ष) पद देणारा आहे असे माझे मत आहे.

या ग्रंथात काही किरकोळ चुका आहेत त्या पुनर्मुद्रणांत राहाणार नाही याची काळजी लेखक घेतीलच.

‘विश्वधर्म’ ग्रंथ लेखक श्री. का. शि. संकाये यांना हार्दिक शुभेच्छा व शतशः धन्यवाद.”

दि. २९-९-८३ (डॉ.) जी. व्ही. उपे

---

(३१) श्री. आर. आर. चितकोटी

बी. ए., एल्एल्. बी., ॲडव्होकेट, औरंगाबाद.

(संस्थापक सचीव – महात्मा बसवेश्वर ग्रंथालय, औरंगाबाद; सचीव–श्री संगमेश्वर मठ, औरंगाबाद; सचीव–महाराष्ट्र वीरशैव सभा-पुणे; शाखा औरंगाबाद. अध्यक्ष–आंतरराष्ट्रीय प्रार्थनामंडळ (श्री कुमारस्वामीप्रणित), शाखा औरंगाबाद. कोशाध्यक्ष–टिळक लॉ इंस्टिट्यूट, औरंगाबाद. सक्रिय सभासद–मराठवाडा वीरशैव विद्यावर्धक वसतीगृह, औरंगाबाद.)

‘विश्वधर्म’ ग्रंथाविषयी थोडक्यात लिहिताना श्री. चितकोटी म्हणतात: “भारताच्या प्राचीन व अर्वाचीन ऐतिहासिक घडामोडी स्थूल व सकृद्दर्शनी वाचत असता वास्तवतेचा एकच ओघ दिसून येत नाही आणि म्हणूनच आज प्रत्येक भारतीय मानव संभ्रमावस्थेत आढळतो. अशा संभ्रमावस्थेतून निर्माण झालेल्या धार्मिक भावनेत विसंगती निर्माण होते व त्यामुळे आचार–विचारांची एकसूत्रता दिसून येत नाही. म्हणूनच अर्वाचीन युगांत नेते, संत, सत्पुरुष, दिव्य व्यक्तिमत्व असणाऱ्या व्यक्ती, धर्माधर्माचा सखोल अभ्यास करून, प्राचीन व अर्वाचीन इतिहासांतील विसंगती दूर करण्यासाठी सत्य परिस्थितीचे संशोधन करीत. सत्यफल जे की, प्राचीन व अर्वाचीन परिस्थितीत एकसूत्रीकरण असेल अशीच प्रात्यक्षिक भावना, मानव श्रेष्ठ समजून, मानवापुढे ठेवतो.

मानवाला सत्याची जाणीव करून देणे व अधर्मापासून विन्मुख करून, सत्यसृष्टीतील परंपरेनुसार वास्तवरूपतेनें आलेल्या आचरणाचे पालन करून, मानवमनाची धार्मिक भावना दृढ करणे हाच लेखकाचा एकमेव उद्देश आहे. तो योग्य असून सद्धर्मशास्त्राला अनुसरूनच आहे; तसेच भारतीय आर्य, उत्तरध्रुवीय वैदिक आर्य आणि भारताचा अशुद्ध इतिहास व शुद्ध इतिहास या दोन गोष्टी लेखकाने स्वकल्पनेतून प्रगट केल्या आहेत पण त्या योग्यच आहेत.

अशाच प्रकारातून अनेक हालअपेष्टा सहन करून, अनेक धर्मग्रंथांची उलथापालथ करून आगम, निगम, पुराणे, शुद्ध रामायण, शुद्ध महाभारत, ब्राह्मणे, वेदांगे, स्मृती, उपनिषदे, तंत्रे, अनेक परधर्मीय ग्रंथ, अनेक सांप्रदायी ग्रंथांचे आलोडन करून मानवधर्माचे धर्माधर्म, जाती, उपजातीचा वेडेपणा (अंधश्रद्धा) दाखवून दिला आहे. तसेच अनेक दुर्मिळ ग्रंथांची प्राप्ती करून, त्यातील सत्य व उचित तेच घेऊन स्वार्थी, ढोंगी, असत्य, वाममार्गांनी निर्मित केलेल्या साहित्यावर, तसेच काल्पनिक देवदेवींच्या कल्पनांवर ताशेरे ओढले आहेत. नव्हे त्यांचे साधार खंडन करून विश्वधर्म कसा होता व आज त्याची आवश्यकता किती आहे, याचे शुद्ध बोलभाषेत प्रतिपादन ' विश्वधर्म ' या ग्रंथात लेखकाने स्पष्ट केले आहे. आणि ते मानवासमोर मार्गदर्शनार्थ ठेविले आहे. यावद्दल मी त्यांच्या धाडसाचे व वंदनीय कष्टाचे स्वागत करतो.

एकंदरीने यांच्या आगामी प्रकाशित होणाऱ्या ' विश्वधर्म ' ग्रंथाचे अवलोकन केले असतांना, त्यांची बुद्धिमत्ता, अभ्यासुवृत्ती व लेखन करण्याची शैली आजच्या परिस्थितीनुसार अनुपम अशी वाटते. आजचा मानव त्रस्त व गांगरलेला आहे. त्यांस सन्मार्ग मिळण्याचे साधन कोणते, या प्रश्नाची उकल व मार्गदर्शनपर उत्तर ' विश्वधर्म ' ग्रंथात अत्यंत सुलभतेने मिळतात. पण सर्वसामान्य जनांनी अर्थात वाचकांनी या ग्रंथाशी एकरूप होऊन तो वाचणे हे महत्त्वाचे आहे. मानवी जीवनाची मूल्ये प्राप्त करण्याची साधने पूर्वी जी होती तीच आज अवलंबावित व तेही या ग्रंथात दाखवलेल्या पूर्वपरंपरेनुसार आलेली साधने यांचा उपयोग यथोचितपणे करावा हेच सार या ग्रंथाचे आहे व ते मानव कल्याणकारी आहे.

लेखकाने ह्या आपल्या ग्रंथात सृष्टी उत्पत्तीपासून ते आजपर्यंतच्या भारतीय इतिहासातील संघर्षमय धर्मकल्पनांचे सिंहावलोकन करून मानवी जीवनमूल्ये प्राप्त करण्याचे मार्ग दाखविले आहेत. पूर्वीच्या समाजात जातीभेद नव्हता. आजच्या समाजात कसा आला, त्यामुळे सामाजिक दुर्बलता कशीं वाढली याचा खुलासा अत्यंत स्पष्टपणे लेखकाने केला आहे. याचा मानवाने गंभीरपणे विचार करावा व समाजसुधारणेच्या हेतूने आपले कर्तव्यपालन करावे. लेखकाने प्रस्तुत ग्रंथरूपाने सूक्ष्म विचाररूपी महाप्रसादच आपल्या समोर ठेविला आहे.

श्री. संकाये यांनी आपल्या ग्रंथात पान क्रमांक १५८ ते १७१ मध्ये भारतीय आर्यांच्या (वीरशैवांच्या) वेदाचे शुद्ध स्वरूप लिहिले आहे, आणि पहिल्या प्रकरणाच्या पहिल्या भागांत अशुद्ध इतिहास व सहाव्या प्रकरणांत प्रत्यक्ष वेदाधारे वेदाचे कनिष्ठत्व दाखवून, 'आम्ही वैदिक आहोत' म्हणून म्हणविणाऱ्या वीरशैवांना आपली चूक दाखवून दिली आहे. ह्या धाडसाबद्दल लेखकाचे कितीही कौतुक केले तरी ते थोडेच होणार आहे.

या शुद्धाशुद्ध इतिहासाने उत्तरध्रुवीय वैदिक आर्य (हिंदू) धर्मीयांवर तसेच अखिल मानव समाजावर महान् उपकार केले आहेत, असे मला वाटते. सारांश 'विश्वधर्म' या ग्रंथाची मध्यवर्ती कल्पना मानवाने माणुसकीची जोपासना करावी, देवाधर्मांच्या नावाखाली सामान्यजनाची दिशाभूल करू नये, अंधश्रद्धेला झिडकारावे व नैतिक दृष्टया प्रबळ होण्यासाठी 'अहिंसा परमो धर्मः,' 'आचार.परमो धर्मः' व अखंड शिव (ईश्वर) भक्ती याची मानवाने अंमलबजावणी करावी. हा मला एक सर्वश्रेष्ठ गुरुमंत्रच वाटतो. पथभ्रष्ट झालेल्या मानवाला मानवी जीवनाच्या साफल्याची दिशा दाखवून आजच्या समाजात आचाराने–विचाराने मानवमनाचे शुद्धीकरण कसे करता येईल याचा उलगडा या ग्रंथांत झाला आहे. शेवटी तात्पर्य हे की, शुद्धाचारच स्वर्ग, अनाचार हाच नरक या महात्मा बसवेश्वरकालीन उद्भवलेल्या उद्गारांचे पुनरुज्जीवन या ग्रंथात दिसून येते. एवढीच माझ्या सदरहू ग्रंथाच्या अवलोकनातून निर्माण झालेली विचारांची ठेव लेखकाचे मनःपूर्वक आभार मानून सादर करीत आहे. धन्यवाद."

दि. १–३–८४

(अँड.) आर. आर. चिंतकोटी

( ३२ ) श्री. महेशशंकरप्पा मल्लिकार्जुनप्पा नागुरे, वकील, (लातूर.) लिहितात; “ माझे मित्र श्री. का. शि. संकाये, नांदगावकर (आळंदी) यांनी ‘ विश्वधर्म ’ नावाचा ग्रंथ मराठीत लिहिला आहे. प्रथम ओळखीनंतर त्यांनी ग्रंथाचे टंकलिखित व नंतर छापील प्रत मला वाचण्यास दिली व नंतर अभिप्राय विचारला. मी म्हणालो, ‘मजसारख्या मामुली माणसाचा अभिप्राय काय कामाचा ? चांगल्या नामवंताचा घेतल्यास बरे ! ’ पण त्यांच्या प्रेमापुढे मला ना म्हणवेना. कसे तरी दोन शब्द वेडेवाकडें लिहून दिले. (ते ‘ अभिप्राय ’ संज्ञेला किती उतरतील हे वाचकांनीच ठरवावे.) संपूर्ण ग्रंथ वाचून पाहिल्यानंतर असे वाटले की, महाराष्ट्रात असा सडेतोडच नव्हे तर विनतोड विचारांचा ग्रंथ आणि तोही महाराष्ट्रांतील लिंगायतात कांहीं भीडभाड न ठेवता फक्त लिंगायतांचेच डोळे उघडणारा नव्हे तर, सर्व मानवसमाजाला रुचेल असा व विश्वधर्मा (मानवता)-कडे ओढ लावणारा हा ग्रंथ लिहिणारे हे पहिलेच लेखक आहेत, असे म्हणावे लागेल. ‘ योजकस्तत्र दुर्लभः ’ या म्हणीप्रमाणे मागे जे कांही वीरशैवपर ग्रंथलेखक झाले त्यांनी पुष्कळ खुलासेवजा, समजूतदार वा टोणपेवजा ग्रंथ लिहिले असतील, पण इतका सखोल अभ्यास करून, आपण जास्त शिकलेले नाही हे नम्रतेने कबूल करून, एक नवदृष्टी-द्योतक व सुसूत्र ग्रंथ लिहिणारे श्री. संकाये हे एकमेव सद्गृहस्थ होत ! ह्या त्यांच्या कर्तृत्वाबद्दल मी साधारण मनुष्य त्यांचे काय व किती आभार मानू ! कित्येक नामवंत ज्ञान्यांनी आश्चर्याने तोंडात बोटे घालून त्यांचे आभार मानले आहेत.

खरे पाहता या ग्रंथाला अभिप्रायाची आवश्यकताच नाही. स्वतः लेखकाने ‘ अगोदर हे वाचा ’ हे शिर्षक देऊन आपले मत-हृदय उघडे केले आहे व आपला सद्हेतू कळवला आहे. ग्रंथातील सडेतोड विचार मांडताना थोडी बोच भाषा असणे आवश्यक असतेच, ती त्यांनी वापरली आहे. त्यायोगे प्रथम थोड्या सोवळ्या सनातनीयांना वाईट वाटेल, पण विचारक्रांतीला हे आवश्यक आहे, असे पटल्यावर त्यांना लेखकाचे उतराईच व्हावे लागेल. आज भारतातच नव्हे तर जगात धर्माच्या नावाखाली किती अधर्म होत आहे व अनादी कालापासून ते होतच आले आहे. पहा, आमचे आगम ग्रंथ काय म्हणतात (यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भ-

वति भूतले) वगैरे जगांतच धर्मग्लानीचा जेव्हा जेव्हा प्रसंग येतो त्या-वेळी कोणी एक महान् आत्मा धर्मजागृती करतो. अशा तऱ्हेने विश्वधर्म (शिवधर्म – लिंगायत धर्म – मानवता धर्म) सांभाळण्यास आचार्य, महात्मा जन्मतात. तत्पूर्वी व नंतर म्हणजे बाराव्या शतकात असेच झाले होते. म्हणून बसव आदि प्रमथांनी सर्व अंधश्रद्ध, मूढ, वेडगळ समजुती व रीतीरिवाजांचे खंडन करून म्हणजे धर्मातील वेडगळ बंधनाची सुधा-रणा करून लिंगायत (विश्वधर्म) धर्मांचा शुद्ध आदर्श असा पुतळा-अर्थात आष्टावरण हे त्याचे शरीर, पंचाचार त्याचा प्राण व षट्स्थल त्याचा आत्मा तयार केला व जातपात लिंगभेदादि दूर करून सरांस सर्वांना धर्मद्वार मोकळे केले.

‘विश्वधर्म’ हा ग्रंथ एक नवीन विचार घेऊन आला आहे. म्हणजे श्री. संकाये यांनी भारतीय आर्य व वैदिक आर्य ही विचारकल्पना स्वतः कल्पून प्रस्तुत ग्रंथाची उभारणी केली आहे. ती फार स्पृहणीय व विचा-रणीय आहे. वीरशैव धर्म (विश्वधर्म) म्हणजेच आगमोक्त धर्म, वेदालाही सामावून घेऊन व उपनिषदांचे महत्त्व दाखवून, वीरशैव वेद-बाह्य आहेत असा टेंभा मिरवणाऱ्यांना चांगला धडा शिकवितो.

त्यांनी आपल्या या ग्रंथांत पूर्वी बावीस कोटी शैव आणि तीन कोटी वीरशैव होते असे सांगितले आहे. ते सर्व आज कमी का झाले? तर वीरशैवाचार्यांनी फक्त गुरूच सर्वश्रेष्ठ म्हणून आडव्या पालखीमध्ये मिरवण्याच्या सोसांत धर्माच्या संख्याबलाकडे व गुणबलाकडे अगदी दुर्लक्ष केले, हेच त्याचे मुख्य कारण होय. इतर धर्मीयांना आपल्या धर्माचे द्वार खुले न करता म्हणजे त्यांना धर्ममहती समजावून, लिंग दीक्षा देऊन, म्हणजेच लिंगधारी करून, धर्म वाढवला नाहीं. आपल्या लोकांनाही खरे धर्मज्ञान न देता फक्त ‘गुरु श्रेष्ठ–गुरु श्रेष्ठ’ हाच एक रट्ट उपदेश ऐकवित आले. इतर आवश्यक गोष्टींकडे दुर्लक्ष केले. तोच धडा खालच्या गुरुवर्गाने म्हणजे पटाधिकारी, मठपती यांनी गिरवला. त्यामुळे जगात वीरशैवांची संख्या (संख्याबल) न वाढता आमच्या अज्ञानाने व इतर धर्मियांच्या अतिक्रमणाने व अतिक्रमाणाचा कशाही प्रकारे विरोध न केल्याने संख्याबल भलतेच रोडावले. त्यायोगे आम्ही सुखाला मुकून जगांत आज अगतिक झालो आहोत. एवढेच नव्हे तर कोणत्याही

सामाजिक, धार्मिक व राजकीय बाबतीत अग्रेसर म्हणून गाजत नाही. सध्या जगाची लोकसंख्या चार अब्जापर्यंत गेली आहे. त्यात मुसलमानांनी एक अब्ज, ख्रिश्चनांनी एक अब्जापर्यंत जनसंख्या गाठली आहे असे म्हणतात. पण आमच्या वीरशैवांची काय स्थिती आहे ? या प्रश्नाचा विचार केल्यावर ओढून ताणून फार झाले तर अखिल जगात वीरशैवांची संख्या जेमतेम दोन कोटी भरेल. ओढून ताणून म्हणण्याचे कारण यात विरक्त पार्टी, पुष्कळशा जाती–उपजाती यांच्या शिष्य शाखेत, शिकलेले म्हणजे सुशिक्षित, त्यातही अर्धवट, कित्येक धर्मज्ञानापासून दूर, लिंगधारण म्हणजे जवळ इष्टलिंग न ठेवणारे, आधुनिक विचारांचा बाऊ दाखवून ' मनःपूतम् समाचरेत् ' या उक्तिनुसार नामधारी (आडनाव लिंगायत वा वाणी म्हणवून घेणारे) मर्दूमसुमारीचे लिंगायत, तसेच केवळ अडाणीं, अविद्य पण परंपरेने धार्मिक म्हणवणारे अशी एकूण वर्गवारी जमवली तर संख्या दोन कोटी होईल. हे सर्व वीरशैव वा लिंगायत एका वाळूच्या ढिगाऱ्याप्रमाणे आहेत ! त्यात सिमेंटिंग नसल्याने एक लहानसा खडा व दगड पडला तर फिसकणारे ! तर अशा स्थितीत लिंगवंत धर्म, की जो विश्वधर्म आहे, तो कसा टिकेल, याचा विचार की लिंगायत धर्म काय पंचाचार्य वाढवू शकतील ? खरे तर केदार व काशी पीठ नुसत्या बोगस हालतीत आहेत. त्या प्रांती वीरशैवच ( म्ह. वस्ती लिंगायतांची ) राहिले नाहीत. इकडे महाराष्ट्रात एकही पीठ नाही. कर्नाटक व आंध्रमध्ये तीन पीठे आहेत. पण ते काय कार्य करीत आहेत ते आपण प्रत्यक्ष पाहतच आहोत. किती लोकांना उपदेश करून लिंगायतांची किती लोकसंख्या वाढविली, असा जर त्यांना कोणी प्रश्न केला तर त्याचे उत्तर नकारार्थीच द्यावे लागेल. इतर जगातील धर्म व त्यांच्या कार्याच्या तुलनेने यांचे कार्य निव्वळ शून्य.

आता महासभा घ्या. यांत हे जगद्गुरू व यांचे इतर मठ येत नाहीत. फक्त थोडे शिकलेले, जाणते जंगम व भक्त म्हणविणारे. ही संस्था नुसत्या सभा करून दिवस घालवते. इतर सर्वसाधारण जनतेबद्दल काय म्हणावे. अशा संस्थेने धर्मजागृतीचे, विकासाचे कार्य हाती घेतले पाहिजे. मुख्य साधन ग्रंथांचा विकास, नवीन धर्मग्रंथ निर्माण करणे, कोण्या धर्मश्रद्धाळूने एखादा धर्मग्रंथ लिहिला असेल तर, संस्थेने सर्व खर्च करून तो

प्रकाशित करणे. पण दुःखाची गोष्ट अशी की, ही संस्था असे विधायक कार्य कांहींहीं करीत नाही. भारतात अजिवात नसलेला निंद्य आचार-विचारांचा ख्रिस्ती धर्म आज केवढा विस्तारला आहे. पहा ! धर्मविकासाकरिता दरवर्षाला ते कोटयवधी रुपये खर्च करतात. हजारो धर्मोपदेशक, हजारो प्रार्थनामंदिरे भारतात त्यांनी निर्माण करून धर्मविकास चालविला आहे. आणि विश्वारंभापासून भारतीय असलेल्या, आचारविचाराने जगात श्रेष्ठ असलेल्या वीरशैव धर्माचा किती ऱ्हास झाला आहे ! याची कारणे वर दिलीच आहेत. थोडक्यात सांगायचे म्हणजे जुन्या परंपरेला चिटकून असलेल्या अंधश्रद्ध वीरशैवातील भावडचा नरनारींनी हा धर्म टिकवून धरला आहे. नसता वीरशैव धर्म नामशेषच झाला असता असे मला वाटते.

वीरशैव समाजातील सर्वांची मिळून एक जबरदस्त मध्यवर्ती अशी संस्था पाहिजे, की जीत सर्व समाज विचाराच्या एका धारेवर येऊन, म्हणजे एक अभिनव अनुभव मंडप स्थापून समाजाची उन्नती करण्याचे कार्य करील. तरच या तुफानी जगांत आमचा (वीरशैव) धर्मदीप नव्हे नंदादीप तेवत राहिल. तोपर्यंत कळकळ असणाऱ्यांनी काहीतरी करून म्हणजे वृत्तपत्रे, शाळा, कॉलेजे, औद्योगिक कारखाने, पतपेढचा, बोर्डिंग असे अनेक उपाय करून, समाजाला नुसते जगवून नव्हे, उन्नती करून वाढविण्याची अत्यंत जरुरी आहे. असे अनेक झरे चालू करून समाजाची विहीर भरून काढली पाहिजे. सध्याच्या किरकोळ बाबी–विरक्त आचार्यवाद, तू मोठा की मी मोठा म्हणून समाजांत एकमेकांचे हेवेदावे करून कोणालाही पुढे न सरकू देण्याची बुद्धी सोडून, उच्चनीच भेद गाडून टाकून, आम्ही सर्व एक म्हणून राहावे. याबद्दल जे मनापासून प्रयत्न करीत आहेत त्यांची नावे वृत्तपत्रांत न गाजली तरी तेच धन्यवादास पात्र आहेत. समाजाला कांहीतरी जाग यावी, अभिमान वाटावा व समाज कार्यप्रवृत्त व्हावा म्हणून श्री. संकाये यांनी 'विश्वधर्म' हा ग्रंथ लिहून वीरशैवांच्या दुर्बल विचारांवर एक 'ॲटमबॉंब' च टाकला आहे. आणि 'भारताचा अशुद्ध इतिहास' व सहाव्या प्रकरणांत वेदातील ऋषी व देवतांचे आचार – विचाराचे आणि अगणित निरपराध पशुहत्येचे, तसेच मानवहत्याकांडाचे, त्याबरो-

वरच वेदाचे कनिष्ठत्व, निंद्यत्व साधार लिहून, आम्ही वैदिक आहोत म्हणविणाऱ्या वीरशैवांना त्यांचे अज्ञानत्व स्पष्ट आणि निर्भीडपणे दाखविले आहे. त्यावद्दल खरोखरच ते धन्यवादाला पात्र आहेत. त्यांच्या विचाराने समाज थोडा तरी वैचारिकदृष्ट्या जागृत झाला तर त्यांच्या या महान् कृतीचे सार्थक होईल, आणि वीरशैवांचेच नव्हे तर अखिल मानवसमाजाचे कल्याण होईल असे मी समजतो.

समाजाने तसेच वीरशैव महासभेने यावेळी अशा अनुपम, मानव-कल्याणकारी, संग्राह्य ग्रंथावद्दल सक्रीय आर्थिक साहाय्य केले तर ग्रंथाचीं किंमत कमी ठेवता येऊन ह्या महान् गंथ पुष्कळांच्या हाती पडेल व विचारक्रांतीला जोर मिळेल. अशा अनुपम, अद्वितीय 'विश्वधर्म' ग्रंथाचे लेखक श्री. संकाये यांना शुभ आशिर्वाद व पुनश्च धन्यवाद."

दि. २१-१२-८४ महेश शंकरप्पा मल्लिकार्जुनप्पा नागुरे.

---

## (३३) श्री. आण्णप्पा रामशेट्टीप्पा खानापुरे

(पूस, आंबेजोगाई, बीड.)

श्री. संकाये, आपण पाठवलेला 'विश्वधर्म' हा संपूर्ण ग्रंथ मी दोन वेळा वाचला. आपण आपल्या जीवनांतील अस्थिर परिस्थितीत अखिल मानवजातीच्या उद्धारार्थ अभ्यासपूर्ण परिश्रमाने, 'विश्वधर्म' हा ग्रंथ सोप्या सुलभ बोलभाषेतून लिहिल्यावद्दल प्रेमपूर्वक अभिनंदन. ह्या ग्रंथाचा गौरव करावा तितका थोडाच होणार आहे.

कोणाही विचारवंत सूज्ञाला या ग्रंथाविषयी आदरच वाटेल. कांही अल्पज्ञान्यांना थोडचा फार शंका येतील. त्यांनी श्रीज्ञानेश्वरी अध्याय ९ ओव्या १३९–२७० पर्यंत मननपूर्वक एकाग्र चित्ताने वाचल्यास सर्व शंकानिरसन होईल. या ग्रंथातील अमूल्य सिद्धांत बुद्धिजीवी जिज्ञासूंना फारच आवडतील. वैदिक, पुरोहित, मूर्ख व धूर्त लोकांनी स्वार्थापोटी निर्माण केलेल्या कपट–कारस्थानांचे प्रदर्शन लेखकाने वाचकांच्या हाती देऊन, वैदिक आर्यांच्या मानवघातकी प्रकाराला धाडसाने प्रकाशांत आणले आहे. त्यांची ही कृती प्रेरक व स्फोटक आहे. श्री. संकाये ही व्यक्तीच अशी आहे की, कसल्याही विपत्तीची पर्वा न करता दृढनिश्चय-

पूर्वक सत्याच्या आश्रयाने, शुद्ध जीवनमार्गानें प्रवास करीत रहावयाचे. त्यांची अनुभवाची सखोलता, मानवकल्याणाची तळमळ आणि व्यवहारी दृष्टिकोण विशेष अभिनंदनीय आहेत. लेखकाचा प्रत्येक शब्द प्रभावी व प्रामाणिक आहे. जीवन व उपासनेतील अपसमज व समज यांवर लेखकाने परखड, प्रखर प्रकाशझोत धाडसाने टाकला आहे !

हा " विश्वधर्म " ग्रंथ " अहिंसा परमो धर्मः " या सर्वश्रेष्ठ जगन्मान्य धर्मसूत्राधारे लिहिला आहे. हे धर्मसूत्र प्रत्येक पहिल्या पानावर शिर्षक-स्थानी छापले आहे आणि पुढच्या पानावरील शिर्षक " विश्वधर्म " छापले आहे. ह्याचे तात्पर्य '**अहिंसा हा विश्वधर्म (मानवधर्म) आहे.**' या अहिंसा तत्त्वाधारे लेखकाने वेदांनाही अधर्मग्रंथ बनवले आहेत. या कटू सत्याला कोणीही विचारवंत नाकारणार नाही.

हा ग्रंथ वीरशैव धर्माचे अनादित्व, श्रेष्ठत्वाच्या सिद्धांताकरिता लिहिला आहे आणि भ्रामक कल्पनांचे योग्य रीतीने साधार खंडनही केले आहे. आगम परशिवाच्या पांच मुखातून, पंचाचार्य परशिवाच्या पांच मुखातून व पार्थिव शिवलिंगातून निर्माण झाले. पंचाचार्य वीरशैव मतसंस्थापक आहेत, वेद अपौरुषेय आहेत, आणि वीरशैव वैदिक आहेत, या पंचाचार्य व वीरशैवांच्या भ्रामक, अयोग्य कल्पनांचे लेखकाने खंडण केले आहे, ते योग्यच आहे. पण कांही गोष्टी या ग्रंथात आलेल्या नाहीत. माझ्या काही शंका आहेत. नव्हे काही सूज्ञ विचारवंत वीरशैवांच्याहि असतीलच. कोणाच्या असो किंवा नसो त्या माझ्या मात्र आहेत. आणि उपसंहार या लेखांत त्यांचे निरसन होईल या अपेक्षेनें माझ्या शंका येथे मांडीत आहे.

लेखकाने आपल्या " विश्वधर्म " ग्रंथात पृ. ५५ ते ५९ वेदांतील शिव व रुद्र महापापाचारी, क्रूर आहे, असे साधार सिद्ध केले आहे. वेदातील शिव, रुद्र ' परशिव ' नाही आणि मानवदेव शंकरही परशिव नाही, हा लेखकाचा सिद्धांत योग्य वाटतो. पण आम्हीं (वीरशैव) आज चालू कालांत पार्वतींचा पति, कार्तिक, गणेश, वीरभद्र यांचा पिता असलेल्या शिवाची (शंकराची) उपासना करतो, तो मोक्ष देणारा आहे का ? वेदांतील रुद्राला प्रसन्न करण्याकरिता निर्माण केलेल्या वेदातील रुद्रस्तोत्राने त्याची स्तुती करावी का ? कोणीच तर तीं

त्याला (शंकराला) आवडेल का ? आमचा उपास्य शंकर मोक्ष देणारा नसल्यास त्याची उपासना करावी का ? तसेच वेदातील रुद्र स्तोत्राने परशिव परब्रह्माची स्तुती करावी का ? केली तर त्याला आवडेल का ? आणि तो प्रसन्न होईल का व ती आम्हाला मोक्षसुख देईल कां ? आणि पांचव्या आचार्याकरिता मानलेला पाचवा अजपवेद अस्तित्वात आहे का ? आणि आम्ही वीरशैव वैदिक आहोत कां ? या प्रश्नांची उत्तरे उपसंहारात मिळावीत ही अपेक्षा.

या ग्रंथात लेखकाचा हेतू कुठल्याही धर्माला, पंथाला, मताला, धर्मग्रंथाला हीन, कनिष्ट आहे असा उपमर्द करण्याचा दिसून येत नाही. तर जीवाचा शिव, मानवाचा महादेव, नराचा हर, आणि भक्ताचा भगवान कसा होईल या शुद्ध सात्त्विक तळमळीने लिहिला आहे, असे वाटते. या ग्रंथाच्या मननपूर्वक वाचनानुकरणाने अखिल मानवाचे खचितच कल्याण होईल, असे माझे स्पष्ट मत आहे.

लेखकाने ३२० ग्रंथांचे मंथन करून ३८० शिर्षकाचा सुमारे ५५० पानांचा सर्वश्रेष्ठ, अनमोल, अजोड असा 'विश्वधर्म' ग्रंथ कोणाचेही अर्थसहाय्य न घेता स्वखर्चाने छापून प्रकाशित केल्याबद्दल श्री. संकाये यांना शतशः धन्यवाद.

असेच संशोधन करून मानवोद्धारार्थ विद्वत्तापूर्ण ग्रंथ-निर्मितींची लेखकाला स्फूर्ति द्यावी अशी ईशचरणी प्रार्थना.

दि. १८-८-८३ अण्णप्पा रामशेट्टीप्पा खानापुरे.

-----

(३४) श्री. शंकर वीरभद्रप्पा मिसाळ

(परळी वैजनाथ, जि. बीड)

श्री. का. शि. संकाये आळंदी (नांदगावकर) यांनी लिहिलेला "विश्वधर्म" हा ग्रंथ संपूर्ण वाचला, बऱ्याच माहीत नसलेल्या गोष्टींची माहिती झाली. श्री. संकाये यांच्या 'विश्वधर्म' ग्रंथाची निर्मिती त्यांच्या अनेक ग्रंथवाचनातून झाली आहे असे वाटते. हा ग्रंथ वीरशैवांना उपयुक्त ठरणारा तर आहेच, पण अखिल मानवालाही बोध देणारा आहे. त्याहीपेक्षा वैदिक आर्य हिंदू धर्माला अधिक उपयुक्त आहे हिंदू धर्मा-

तील काल्पनिक देवदेवींच्या व यज्ञयागांच्या नावानें हिंसाचार, मद्य-पान अत्याचारादि मानवाला घातक चालीरीती कशा त्याज्य आहेत, ते पटवून दिले आहे. तसेच मानवकल्याणकारी एकेरी उपासना, अहिंसाचार, काल्पनिक देवदेवीचे सत्यस्वरूप आणि अहिंसा धर्माचे श्रेष्ठत्व सांगून मानवाला मोक्षाचा खरा मार्ग दाखवला आहे.

सर्व धर्म मानवनिर्मित असून ज्या धर्मात मानवी मूल्यांची जप-णूक होते तो धर्म श्रेष्ठ होय असे मला वाटते. श्री. संकाये यांनी १२० ग्रंथांचा उहापोह करून वीरशैव धर्माचे अनादित्व, प्राचीनत्व, अहिंसा, एकेश्वरी, एकनामी उपासना या सर्व गोष्टी सर्वश्रेष्ठत्वाने सिद्ध केलेल्या आहेत. अशा या सर्वश्रेष्ठ आद्य धर्माची आजची अवस्था एखाद्या गलितगात्र झालेल्या मानवासारखी झालेली आहे. लेखकाने ५००० वर्षापूर्वी भारतात ३ कोटी वीरशैव होते असे साधार सिद्ध केले आहे. आज ही संख्या किती वाढली .याचा विचार केल्यास वाढ तर दिसत नाही, उलट घट मात्र झाली आहे. या सर्व अधोगतींचे मूळ कारण शोधले तर याला मुख्य जवाबदार धर्मप्रचारक, प्रसारक, संरक्षक असलेले मुख्य पंचाचार्य व गुरुवर्य आहेत असे माझे स्पष्ट मत आहे.

अकार्यक्षम व्यक्तींच्या हातात धर्मप्रचार व प्रसाराचे, बागदोर गेल्यामुळे धर्माची ही दीन, हीन अवस्था निर्माण झाली आहे. वेद अपौ-रुषेय नाहीत, तसेच धर्मग्रंथही नाहीत. असे असून पंचाचार्य म्हणतात की, आम्ही (वीरशैव) वैदिक आहोत. शैवागमापेक्षा वेदाला श्रेष्ठ मान-णाऱ्या पंचाचार्यांनी चार आचार्यांना चार वेद मानून पाचव्या आचार्यां-करिता अस्तित्वात नसलेला पाचवा "अजप वेद" मानला आहे. तसेच शैवागम परशिव मुखोदभव, पंचाचार्य परशिवमुखोद्भव व शिव-लिंगोद्भव नाहीत हे लेखकाचे विचार कोणालाही पटण्यासारखे आहेत असे मला वाटते.

असा हा मानव कल्याणकारी "विश्वधर्म" ग्रंथ अखिल मान-वाला मार्गदर्शक ठरो हीच शुभेच्छा ! लेखकाला धन्यवाद.

दि. ३०-१०-८४ शंकरप्पा वीरभद्रप्पा मिसाळ

(३५) श्री. शंकर वीरभद्र गिडनवर
(मु. पो. यमकन मर्डी, ता. हुक्केरी, जि. बेळगांव; (कर्नाटक.) ह. मु. मुंबई)
लिहितात : प्रिय. का. शि. संकाये नांदगावकर (आळंदी) यांना स. नमस्कार.

"विश्वधर्म" ग्रंथ निर्माण कार्यात आपण ज्या ग्रंथांचे आधार घेतले आहेत, ते पाहता इतक्या प्रखरपणे विचार मांडण्याचा आतापर्यंत कोणीच प्रयत्न केलेला नाही, असेच म्हणावे लागेल, इतके हे महान् कार्य झाले आहे.

मी काही त्या सर्व ग्रंथांचे अवलोकन केलेले नसले तरी आपला हेतु शुद्ध आहे. अंधश्रद्धेवर विश्वास ठेवणारा मानव हिंसाचाराला प्रवृत्त होतो. त्याला कांहीं अंशाने का होईना आळा बसेल आणि अहिंसातत्त्वाकडे वळून तो सदाचारसंपन्न कसा होईल, या संबंधीचे आपल्या ग्रंथातील विचार विचारार्ह वाटतात.

संशोधकांनी त्याबाबत अधिक संशोधन करणें अगत्याचे झाले आहे असे मला वाटते.

आपल्या धैर्यधर ग्रंथास माझ्या शुभेच्छा व्यक्त करून आपणास धन्यवाद देत आहे. जयहिंद ! जय महाराष्ट्र !!

शंकर वीरभद्र गिडनवर

---

(३६) श्री. प्रशुअप्पा विरभद्रप्पा मिसाळ.
(परळी वैजनाथ, जि. बीड)

'विश्वधर्म' ग्रंथाचे लेखक का. शि. संकायें यांनी वैदिक आर्यांचा हिंसाचार व देवादिकांचे माजविलेले अवडंबर इत्यादिवर तीव्र प्रहार करून त्यांचे वस्त्रहरण केले आहे. मूर्तिपूजेस ते अधर्म मानतात. धर्म, पंथ, वर्णभेद, जातपात इत्यादि त्यांना मान्य नाही. कल्पित ईश्वराचे अस्तित्व अमान्य करून यज्ञयागावर त्यांनी प्रचंड प्रहार केला आहे. वैदिक आर्यांनी भारताची सर्वश्रेष्ठ संस्कृती नष्ट केली हा लेखकाचा

 

सप्रमाण आरोप आहे. या गोष्टी काय दर्शवितात ? या अंधश्रद्धेचे मूळ अज्ञान हेही लेखकास अमान्य आहे. या सर्वांच्या निषेधाकरिता, वेदादि विकृत धर्मग्रंथाचे संशोधन करून त्यांतील सर्वश्रेष्ठ तत्त्वांचा आधार घेतल्यामुळे, लेखकाचे निष्कर्ष योग्य वाटतात. त्यामुळे भोंदू धर्म-रक्षकांना हा ग्रंथ बोचणार हेही तेवढेच खरे.

कोणतीही समाजरचना चिरंतन टिकली नाही. कालपरत्वें ती बदलली आणि हा बदल अनैसर्गिक नाही. म्हणून बदलत्या परिस्थितीत त्याचा परिणाम समाजाच्या आर्थिक, सामाजिक संस्कृतीवर व राजकीय परिस्थितीवर होतो आणि त्या अनुषंगानेच समाजोन्नतीचा विचार होणे आवश्यक आहे. हाच ग्रंथ लेखकाने वैज्ञानिक दृष्टिकोनांतून लिहिला असता तर फारच चांगले झाले असते. लेखकाचा आगम-निगम, पुराणे, उपनिषदादि धार्मिक ग्रंथाचा सखोल अभ्यास, चौकस दृष्टी आणि सत्याकडे झेप घेण्याचा प्रामाणिक प्रयत्न पाहिल्यास त्यांच्या विचारास शास्त्रीय आधार भक्कम आहेत असे दिसून येईल.

सृष्टी-उत्पत्ती, मानव-निर्मिती व त्यांचा विकास यांची वैज्ञानिक दृष्टिकोनातून शास्त्रीय मीमांसा धार्मिक ग्रंथकारांना करता आली नाही, म्हणून त्यांनी धर्मपंथाची निर्मिती केली. अर्थहीन रुढी, बोजड धर्म-कर्म कांड, मूर्तिपूजा इत्यादि भ्रामक कल्पना रूढ केल्या. मोक्ष, अवतार इत्यादि अंधश्रद्धा दृढमूल करून वर्णभेदाच्या दरी निर्माण केल्या आणि त्यांतूनच पुढे अनैसर्गिक विचार प्रसवले. श्रेष्ठ-कनिष्ठ भावांचा उगम, स्वर्ग-नरकाचे उगमस्थान म्हणजे ऋषी-मुनींचे मेंदू. कालमान, देशपरत्वे सुपिक डोक्यांतून हाच धागा धरून प्रचंड ग्रंथ-निर्मिती झाली. आणि त्याचा परिणाम आज दिसतो तो हा–' श्रेष्ठ-कनिष्ट भेदभाव पराकोटीस जाऊन, संस्कृतीच्या नावाखाली धर्मपंथांना ऊत आला. काल्पनिक स्वर्गप्राप्तिसाठी भावनिक अंधश्रद्धा गाढ होत गेली. वर्णभेदाने कळस गाठला; आणि हे सर्व प्रकार मानवाच्या कल्याणाकरिता, या गोंडस नावाखाली, धार्मिक भावना जागृत ठेऊन, अंतर्गत कलहाची ज्योत तेवत ठेवली. कालानुरूप धर्ममार्तंडानी त्या ज्योतीवर धर्मपंथाचे तेल ओतून अग्नि पेटवत ठेवला. त्याच्या ज्वालेत आजही मानव होरपळून निघत आहे. धर्मशास्त्राच्या भाषेत सांगायचे तर त्या यज्ञांत मानवाची आहुती

पडत आहे.'

जुन्या काळांतील ऋषीमुनी असोत की, मध्ययुगांतील दरबारी बखरकांड असो, किंवा आजचे ढोंगी धर्माधिकारी. समाजाला अज्ञानांत ठेवल्याशिवाय ऐहिक सुखे भोगता येणार नाहीत म्हणून मोक्षप्राप्ती, स्वर्गसुखे इत्यादी खुळचट कल्पना जन–मानसात रुजवून त्यांनी समाजास विकृत अध्यात्मवादी प्रवाहात खिळवून ठेवले. वरिष्ठ सामाजिक बांधिलकीत जखडल्यामुळे, त्या सर्वांनीच अनिष्ट पुरातन परंपरा व अंधःश्रद्धा दृढ करण्यासाठीच केवळ ग्रंथपसारा केला. परंतु भूतकाल समजावून घेण्याच्या दृष्टीने या गोष्टी गौण आहेत. धार्मिक ग्रंथ मग ते कोणत्याही धर्माचे किंवा संस्कृतीचे पुरस्कर्ते असोत, विकृत अध्यात्मवादी मार्गाचेच भिन्न प्रवाह आहेत.

लेखकाने आपल्या कल्पनाचातुर्याने जनमानसांतील अंधश्रद्धेस जबर धक्का देऊन प्रचलित धर्मगुरूंचे थोतांड व भोंदू संस्कृतीचे सोनेरी बुरखे यांच्या चिंधड्या उडविल्या आहेत. धर्ममार्तंडांच्या दुष्ट कारस्थानांचे सत्य स्वरूप अखिल मानवाला साधार दाखविले आहे. लेखकाने आपल्या साधार कल्पनाचातुर्याने 'विश्वधर्म' ग्रंथाची मांडणी दोन विभागात केली आहे. शुद्ध–अशुद्ध, भारतीय आर्य–उत्तरध्रुवीय वैदिक आर्य, शुद्ध ग्रंथ-अशुद्ध ग्रंथ. ही सर्व मांडणी साध्या सोप्या तुलनात्मक विचाराने केली असून, त्यांत लेखकाने संपूर्ण ग्रंथाचे तात्पर्यच साधले आहे. प्रकरण सहावे वाचले म्हणजे असे वाटते की, जगातील सर्व धर्मांपेक्षा श्रेष्ठ मानलेला वैदिक हिंदुधर्म व त्याचे सर्वश्रेष्ठ मानलेले आद्य धर्मग्रंथ 'वेद', त्यांतील हजारो काल्पनिक देवता, त्यांचे उपासक ऋषिमुनी, त्यांचे आचार-विचार, आहार-विहार हे पार्शी, मुसलमान, ख्रिस्ती, दैत्य, दानव, राक्षस, चार्वाक लोकायत या सर्वांच्या आचार, विचारापेक्षा व त्यांच्या धर्मग्रंथापेक्षा कनिष्ठ आहेत. हिंदू धर्माइतका कनिष्ठ हिंदूधर्मच ! तसेच वेदग्रंथाइतके कनिष्ठ–वेदग्रंथच ! अशा कनिष्ठ वेदांना वीरशैव श्रेष्ठ मानून स्वतःला वैदिक म्हणवितात. या भ्रामक कल्पनांचा त्यांनी त्याग करावा असे माझे स्पष्ट मत आहे. 'विश्वधर्म' हा ग्रंथ अखिल मानवाला बोधपर ठरेल असा झाला आहे.

मृत्यु, पाताळ हे आपण राहतो त्या पृथ्वीवरच आहेत. ब्रह्मा, विष्णु, महेश, चंद्र, सूर्य, मंगळादि नावे प्रथम निर्माण झालेल्या मानवांची आहेत. ते दिव्य गुणयुक्त होते, म्हणून त्यांना देव म्हणत. ते स्वर्गात (हिमालयावर) राहत होते. त्यांच्या राजधान्याही हिमालय पर्वतावर होत्या. आपणाला निर्माण करणारीं कोणीतरी सर्वश्रेष्ठ, अदृश्य शक्ती आहे; तिने आपणाला सुखी ठेवावे म्हणून, त्या शक्तीला आनंद वाटण्याकरिता, त्यांची स्तुती करण्याकरिता, त्या शक्तीचे नाव ' शिव ' ठेवले. त्याची पूजा अर्चा करण्याकरिता, विश्वाचे प्रतिक " शिवलिंग " निर्माण केले. त्याच्या उपासनेकरिता, स्तुति-स्तोत्रे गाण्याकरिता आणि मानवाने कसे वागावे, काय करावे या शिकवणीकरिता " आगम " नावाचे ग्रंथही निर्माण केले. ती शिवोपासना आतापर्यंत आगमाच्या शिकवणीप्रमाणे कोणी सांभाळली, ती किती ज्येष्ठ आणि श्रेष्ठ आहे, याची योग्य माहिती देणारा ग्रंथ आतापर्यंत पहायला, वाचायला मिळाला नव्हता. नव्हे कोणी लिहिण्याचे धाडसच केले नाही ! श्री. संकाये यांनी मात्र धाडसाने तो लिहिला आहे.

या ग्रंथातील श्रेष्ठ-कनिष्ठ तुलनात्मक विचार विशेष महत्त्वाचे, अज्ञान्यांना पटणारे, विद्वानांनाही नाकारता न येणारे, चांगल्या-वाईटांचे चित्र दाखवणारे आहेत. वेद अपौरुषेय नाहीत. पंचाचार्य परशिव मुखोद्भव व शिवलिंगोद्भव नाहीत. आगम मानवदेवांनी विश्वारंभी निर्माण केले आहेत. नंतर ऋषीमुनींनी वेद लिहिले. वेदांत बहुदेव उपासना व हिंसाकर्म असल्यामुळे वेद धर्मग्रंथ नाहीत. ह्या गोष्टीचे साधार विवेचन या ग्रंथात वाचायला मिळते. ते साधार असल्यामुळे चुकीचे वाटत नाही. या ग्रंथातील सहावे प्रकरण वाचल्यास असे वाटते की, वेदांइतके कनिष्ठ ग्रंथ फक्त वेदच आहेत. या प्रकरणाने वेदाचे श्रेष्ठत्व गाणारे वाङमय अगदी चुकीचे असल्याचे सिद्ध केले आहे. त्याला कोणीही विचारवंत नाकारणार नाही, असे मला वाटते.

जनजागृती करणारा, मानवकल्याण सांगणारा, विद्वानांना चकित करणारा, सनातन्यांना धक्का देणारा, विचारवंतांना अधिक विचार चक्रात गुंतवणारा, संशोधकांना अधिक संशोधनाला प्रवृत्त करणारा, मानवतेचे ज्ञान देऊन, मानवाचा महामानव बनवणारा,

परमेश्वराची ओळख करून देणारा, परमेश्वर कोठें आहे ते सांगणारा, सुमधुर गोडीचा, अजोड आणि एकमेवाद्वितीय 'विश्वधर्म' ग्रंथ श्री. संकाये यांनी प्रथमच लिहिला आहे. त्यांच्या पुढच्या आयुष्यात त्यांच्याकडून असे मानवकल्याणकारी पुष्कळ ग्रंथ निर्माण होवोत अशी प्रभुचरणी प्रार्थना. श्री. संकाये यांना धन्यवाद व अनेक उत्तम आशिर्वाद."

दि. ६-१०-८३ विठ्ठलप्रसाद महाराज तिवारी

-----

(३८) ह भ. प. श्री. गणपतराव पांडुरंग जाधव.

(नाथपंथी शैव; सांप्रदायी श्रीज्ञानेश्वरानुग्रही परंपरेतील वारकरी सांप्रदायी कीर्तन व प्रवचनकार; सरचिटणीस – श्रीज्ञानेश्वर सेवा मंडळ, मुंबई.)

माझे परमप्रिय मित्र श्री. का. शि. संकाये (आळंदी देवाची) यांनी 'विश्वधर्म' नावाचा ग्रंथ तयार केला आहे. सदर ग्रंथ लिहिण्यापूर्वी जवळ जवळ तीन तपे त्याविषयावरील अनेक धर्मग्रंथांचा (स्वधर्मीय व परधर्मीय) अभ्यास केला. संदर्भ ग्रंथांच्या यादीत आधारभूत ग्रंथ सुमारे ३२० दिले आहेत. अनुक्रमणिकेत सर्व विषय दिले आहेत. त्या ग्रंथांचे अभ्यासपूर्वक परिशीलन करून व मनन करून त्यांनी हा ग्रंथ लिहिला आहे. ग्रंथ संकलनात्मक आहे. वरील ३१२ ग्रंथांचे आधार देऊन त्या त्या ग्रंथाच्या लेखकाचे मत ग्राह्य धरून हा ग्रंथ तयार झाला आहे.

कोटयवधी वर्षांपूर्वीचा म्हणजे आदिमानव उत्पन्न झाला तेथपासूनचा भारतीय आर्यांचा इतिहास, त्यांचा आचारधर्म इत्यादि विषय आगम-निगम, पुराणादि धर्मग्रंथात आहेत. नंतर उत्तर ध्रुवीयांनी भारतात येऊन पूर्वीच्या भारतीय आर्यांच्या आगम-निगम या ग्रंथात चुकीचे आचारधर्म व अनेक विचित्र देवतांच्या पूजाअर्चा घातल्या: त्यामुळे भारतीयांचे आचार-विचार पुढे पार बदलून गेले व खरा मानवधर्म लोप पावला. मूळ आगम-निगमांना मान्य नसलेले धर्म, म्हणजे अनेक देवी-देवतांच्या सकाम व हिंसात्मक पूजा-अर्चा सुरू झाल्या, असे लेखकाने आपले विचार प्रस्तुत ग्रंथात स्पष्टपणे मांडले आहेत; ते

योग्य आहेत असे मला वाटते.

मूळ आगम-निगमांत भेसळ केल्यामुळे मूळ भारतीय आर्यांच्या उपासनेंत भेसळ झाली. मूळ आगम-निगमात अनेक देव, देवी व हिंसा नाही. मूळ भारतीय आर्यांना अहिंसा मान्य होती व त्याप्रमाणे त्यावर आधारलेले धर्म प्रमाण होते, असे लेखकाचे प्रामाणिक मत आहे व ते त्यांनीं साधार प्रमाणे देऊन सिद्ध केले आहे.

या ग्रंथात अध्यात्म व तत्त्वज्ञान यांचा फारसा विचार केलेला नाही. चालू काळातील सत्य परिस्थिती व आचार-विचारांचाच तौलनिक विचार मांडला आहे, तो विशेष चिंतनीय व मननीय आहे. सदर ग्रंथात उत्तरध्रुवीय वैदिक आर्य व भारतीय आर्य यांच्यातील मतमतांचा फार विचारपूर्वक साधार व सप्रमाण उहापोह केला आहे. या ग्रंथात सत्य सनातन आगम-निगम प्रतिपादित मानवधर्मांचे सिद्धांत उत्तम तऱ्हेने मांडण्यात आले आहेत. दत्त उपासक, गाणपत्य, वैष्णव, वारकरी आदि अहिंसातत्त्वी अनेक पंथ आणि बौद्ध व जैन धर्म वीरशैवांतूनच निर्माण झाले, असे लेखकाचे स्पष्ट मत आहे व त्याला योग्य ते आधारही त्यांनी दिले आहेत. 'अगोदर हे वाचा' व 'लेखकाचे हृद्गत' यात सुरुवातीलाच हा ग्रंथ लिहिण्याचा हेतु स्पष्ट केला आहे.

ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणात भाग एकमध्ये 'भारताचा अशुद्ध इतिहास' देताना अनेक हिंसात्मक कनिष्ट देव-देवींचा व अवतारी श्रेष्ठ देव-देवींचा यथायोग्य समाचार घेतला आहे. तो वाचून मनाला धक्काच बसतो. निंद्य सकाम उपासनेचे व काल्पनिक अवतारी देव-देवींच्या उपासनेचे मार्मिक वर्णन ग्रंथात आहे. त्यातील हिंसात्मक रूढाचार वाचून किळस येते. लेखकाची भाषा कडक आहे, परंतु अंतःकरणात मानव-जातीचा कळवळा धरून त्यांनी आपले विचार मांडले आहेत. सध्या मानव जात योग्य मार्ग सोडून अयोग्य मार्गाकडे जात आहे. त्यांनी योग्य मार्ग धरावा म्हणजे त्यांना जीवनांत सुख, शांती व अंती मोक्ष लाभावा म्हणून लेखकाचा हा सारा प्रपंच. देवी उपासनेतील 'भैरवी चक्रा'-बद्दलची माहिती वाचतांना मानव जात कोठे वाहून जात आहे, याबद्दल खंत वाटते. वरील माहिती लिहिताना लेखकाने अनेक ग्रंथांचे आधार देऊन उपरिनिर्दिष्ट उपासनेचा धिःकार केला आहे. अशा निंद्य उपासनेने

मानव जातीचा उद्धार कसा होणार व काय साध्य होणार हे ते उपासकच जाणोत !

प्रकरण एक मधील भाग २ व प्रकरण २-३-४ मध्ये भारताचा शुद्ध इतिहास लिहिला आहे. त्यांत प्रथम प्रकराणातील भाग २ मध्ये प्रथम सृष्टी, प्रथम मानव, भारतातच निर्माण झाले व कालांतराने ते सर्व जगभर पसरले. सृष्टीनिर्मितीचा व मानवनिर्मितीचा काल या सर्व विषयावरील भारतीय व पाश्चात्य विद्वान् यांच्या मतांचा उहापोह साधार केला आहे. दुसऱ्या प्रकरणांत शैव-वीरशैवांचे श्रेष्ठत्व व अनादित्व सिद्ध केले आहे. शैव-वीरशैवांची शिवलिंग उपासना सृष्टीवर प्रथम निर्माण झालेल्या दिव्य मानवदेवांनी निर्माण केलीं व ती निराकार, एकेश्वरीं, एकनामी आणि अहिंसातत्त्वी आहे, हे लेखकाने साधार सिद्ध केले आहे.

प्रकरण तीन मध्ये वीरशैवांच्या शरीरावर शिवलिंग धारण करण्याचे प्राचीनत्व सिद्ध करताना संस्कृत धर्मग्रंथांचा फारच मोठ्या प्रमाणांत आधार घेतला आहे. चौथ्या प्रकरणांत ' वीरशैवांचा लिंगाचार व लिंगसंस्कार ' लिहिला आहे. प्रकरण तिसरे व चौथे विशेष वाचनीय व मननीय आहे. चौथ्या प्रकरणासाठीही अनेक ग्रंथाचे व शैव शरणांचे (संतांचे) स्वानुभवी आधार घेतलेले आहेत. वीरशैवांचे आचार, विचार, उपासना किती शुद्ध आहेत व ते आगम ग्रंथावर कसे आधारलेले आहेत ते सिद्ध केले आहे. लिंग-संस्कार यांत ' त्राटक ' हा विधि कसा करावा याबद्दलची माहितीही योग्य नि वाचनीय आहे.

पाचव्या प्रकरणांत आगम–निगम, पुराणादि ग्रंथांचा रचनाकाल तसेच बौद्ध, जैन, महानुभावादि धर्मांचे उगमकाल आणि दत्त-उपासक, गाणपत्य, वारकरी, वैष्णवादि पंथांचे उदय दिले आहेत, ते फारच महत्त्वाचे आहेत.

सदर ग्रंथाचे चारच दिवसात धावते अवलोकन केल्यामुळे, त्यावर अधिक विस्ताराने अभिप्राय लिहिणे शक्य झाले नाही, याचे वाईट वाटते. परंतु भारतीय आदिमानव निर्माण झाला तेव्हांपासून ते द्वापार युगांतापर्यंत भारतीयांचा मानवधर्म कसा श्रेष्ठ नि श्रेष्ठ होता व पुढे उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांनी तो कसा भ्रष्ट केला, याचे निवेचन अनेक

धर्म-ग्रंथाचे संदर्भ देऊन सिद्ध केले आहे. ते वाचून हाडाचा वाचकवृंद चकीत होतो यात नवल नाही. सहाव्या प्रकरणांत निंदवीय चित्र दाखवून वैदिकांनाच नव्हे तर अखिल भारतीयांनाच धक्का दिला आहे. विचारवंताना अधिक विचारांत गुंतवणारा, संशोधकांच्या संशोधनाला अधिक चालना देणारा, सनातन्यांना चक्रावून सोडणारा, मानवाला महामानव बनवणारा हा 'विश्वधर्म' ग्रंथ आहे असे माझे स्पष्ट मत आहे.

हा ग्रंथ एखाद्या विशिष्ट धर्माचे श्रेष्ठत्व गाणारा नसून अखिल मानवाला मानवत्व दाखवणारा आहे. प्रत्येक मानवाला हा ग्रंथ अतिशय वाचनीय, मननीय व संग्राह्य वाटेल. सदर ग्रंथास अनेक मान्यवर वीरशैवाचार्यांचे, जगद्गुरूंचे, विद्यापिठीय पदवीधरांचे, काही विद्वान मंडळींचे, बौद्ध व जैन धर्मियांचे, खंडोबा, देवी-उपासकांचे, तसेच वारकरी सांप्रदायी कीर्तन-प्रवचनकार मंडळी, या सर्वांचे अनुकूल अभिप्राय आले आहेत. त्यामुळे हा ग्रंथ अखिल मानवजातीचे लक्ष वेधून घेईल यांत शंका नाही.

शेवटी श्री. संकाये यांनी अपार कष्ट घेऊन 'विश्वधर्म' ह्या अमोल ग्रंथाची निर्मिती केली याबद्दल त्यांना जेवढे धन्यवाद द्यावेत तेवढे थोडेच होणार आहेत.

दि. ९-६-८४ ग. पां. जाधव

----

(३९) ह. भ. प. श्री. स. भा. कदम
(३५, ए, भिमडीवाला बिल्डिंग, वरळी नाका, मुंबई-४०००१८)

(१) श्रीसंत चोखामेळा चरित्र व अभंगगाथा, (२) भक्त पुंडलीक, (३) श्रीसंत कान्होपात्रा, (४) संत जनाबाई, (५) संत मीराबाई, (६) गुरुदेव दत्त, (७) वाचा आणि विचार करा, (८) श्रीकृष्ण, (९) सती सावित्री, (१०) राजा हरिश्चंद्र, (११) गीतासार, (१२) श्रीमद् भगवद्गीता (तोंडओळख), (१३) ज्ञानेश्वरीचे पसायदान, (१४) सुखसमाधान व शांति, (१५) नामजप साधना, (१६) श्री विठ्ठलोपासना (१७) ज्ञानेश्वरीच्या सावलीत, तसे अनेक देवांची स्तोत्रे, आदि ग्रंथांचे लेखक ]

" श्री. का. शि. संकाये हे श्रीक्षेत्र आळंदी येथे एका धर्मशाळेच्या व्यवस्थापनेचे कार्य करीत असतात. तसेच व्यवहारी सहा कला व पारमार्थिक सहा कला यांत ते चांगले वाकबगार आहेत. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे त्यांचे शालेय शिक्षण अगदी बेताचे असून, कुठल्याही हायस्कूल किंवा कॉलेजमधील शिक्षणाचा त्यांना गंधही नाही. संशोधनाच्या फंदात कधीही न पडणारा असा हा माणूस आळंदीसारख्या एका खेड्यात राहून, सभोवतालच्या वातावरणावर नजर ठेवून होता. विश्वाच्या विद्यालयात राहून निसर्गाकडून धडे गिरवीत होता. सत्य-असत्य, धार्मिक-अधार्मिक, चांगला-वाईट यांसारख्या अनेक तात्त्विक बाबींवर सूक्ष्म नजर ठेवून होता. जागोजागी धर्माच्या नावाखाली होत असलेले अन्याय, सामान्य लोकांची होणारी दिशाभूल इत्यादि अनेक गोष्टी त्यांनी जवळून अवलोकन केल्या. खऱ्या धर्माचे शुद्ध तत्त्वज्ञान सामान्य जनतेपर्यंत कसे पोचेल, या विवंचनेत ते अहर्निश गढून जात. गेली सुमारे ३०–३५ वर्षे त्यांनी पाहिजे त्या गोष्टींच्या संदर्भात मिळेल ते ग्रंथ विकत घेऊन, त्यातून आपली टाचणे तयार केली. तसेच त्याच संदर्भात पाहिजे असलेल्या ग्रंथांच्या शोधात ते असत. अशा रीतीने, त्यांनी पाहिजे तेवढी नसली तरी बरीच उपयुक्त माहिती गोळा केली. आपल्या विचाराच्या, चिंतनाच्या व आत्मविश्वासाच्या बळावर त्यांनी त्या माहितीची आपल्या बुद्धिनुसार मांडणी केली व अशा तऱ्हेने ' विश्वधर्म ' ग्रंथ साकार केला. नियतीचे डाव उमजणें मानवाना कठीणच; परंतु नियतीने श्री. संकाये यांच्यासारख्या एका सामान्य माणसाच्या हातून ' विश्वधर्म 'सारख्या एका अलौकिक ग्रंथाचे लिखाण करून घेतले ही वस्तुस्थिती आहे.

ह्या ग्रंथात सहा प्रकरणे आहेत. साधार ग्रंथ तिनशे वीस आहेत. आणि ग्रंथात ३०० पेक्षा अधिक शिर्षकें आहेत. श्री. संकाये हे लेखनकुशल विद्वान् नाहीत, त्यामुळे त्यांच्या लेखनाचा प्रकार ललितसाहित्याची रुची असलेल्यांना मानवेलच असे म्हणता येत नाही. तथापि जो कोणी हा ग्रंथ मर्मजिज्ञासेने नजरे खालून घालण्याची तसदी घेईल, त्याला योगायोगानें श्री. संकाये यांनी अंगावर घेतलेले किचकट काम किती आस्थेने व प्रयासानें पूर्ण केले आहे, याची साक्ष पटण्यास हरकत नाही.



श्री. संकाये हे स्वतः वीरशैव आहेत. शैव-वीरशैवाचे प्राचीनत्व

त्यांनी सिद्ध केले असून, वीरशैवांच्या लिंगधारणेचे अनादित्व सिद्ध करताना संस्कृत वाङ्मयाचा फार मोठचा प्रमाणांत आधार घेतला आहे. त्यामुळें त्यांनी वीरशैवांना तसेच जगद्गुरू पंचाचार्यांना विलक्षण धक्का दिला आहे. त्यांनी दिलेली शिवलिंगाविषयींची विस्तारपूर्वक माहिती अत्यंत उपयुक्त आहे. सर्व देवतांपेक्षा 'शिव' ही देवता श्रेष्ठ असून शिवलिंग प्रतिकोपासना, वर्णभेद, अहिंसातत्त्वी जातपात उच्चनीचभाव नसलेल्या मानवधर्माची श्रेष्ठ मूल्ये शिरोधार्य मानणारा वीरशैव धर्मच. सर्वश्रेष्ठ कसा आहे, हे त्यांनी दाखवून दिले आहे.

भारतीय आर्य सृष्टीच्या उत्पत्तिपासून भारतातच राहत व त्यांची संस्कृतीही श्रेष्ठ होती. तथापि सुमारे ६००० वर्षापूर्वी वैदिक आर्य (हिंदू) भारतात आले. त्यांची संस्कृती हीन दर्जाची होती. त्यांच्यां संस्कृतीचा भारतीय आर्यांवर किती विपरीत परिणाम झाला, ईश्वरनिर्मित, ईश्वरप्रेरित मानल्या गेलेल्या आद्यग्रंथावर सुद्धां त्याच्या संस्कृतीची दुष्ट छाया पडल्याशिवाय राहिली नाही. श्री संकाये यांनी या संदर्भात मांडलेले सिद्धांत वाचकवृदांना अंतर्मुख करतील. वैदिक हिंदू धर्मातील दाखविलेल्या दोषाबरोबरच वीरशैव धर्मांतील दोषही त्यांनी दाखविले आहेत. लेखकाची विचारसरणी समतोल स्वरूपाची दिसून येते. व तसेच त्यांनी श्रेष्ठ-कनिष्ठ प्रकारांत मांडलेले सिद्धांत लहानथोरांना विचार करावयास लावतील अशा स्वरूपाचे आहेत.

वैदिक आर्यांनी निर्माण केलेल्या काल्पनिक देव-देवींच्या भ्रष्ट चरित्रांचा सारांश, त्याला आधारभूत असलेल्या ग्रंथांची नावे हे सर्व ग्रंथात देण्यात आले आहे. तसेच भारतीय आर्यांच्या शुद्ध ग्रंथांची नावे ही दिली आहेत. देव या शब्दाचा अर्थ, देव कोणाला म्हणावे, देव मानवच होते पण ते दिव्यगुणसंपन्न होते. त्यांच्या दिव्य गुणांची माहितीं ५४ प्रकारात दिली आहे. वैदिकांच्या भ्रष्ट देव-देवींचे सत्य स्वरूप, ही विशेष माहिती ही अप्रतिम अशीच आहे. अमृत, कल्पवृक्ष, कामधेनू, चिंतामणि, परिस वगैरे गोष्टी काल्पनिक असून त्या खोटचा आहेत. तसेच त्या गोष्टी निसर्गनियमाच्या विरुद्ध आहेत असे लेखकाचे म्हणणे आहे. वाचकांनी ती प्रकरणे मुळातून वाचून समाधान करून घ्यावे.



पहिल्या प्रकरणांत अशुद्ध व खोटा इतिहास भाग १ मध्ये आहे.

त्यामध्ये वैदिक आर्यांनी शुद्ध संस्कृती कशी नष्टभ्रष्ट केली, त्याचा परिणाम मानवाला कसा घातक झाला, अधोगतीला नेणारा झाला, वैदिक हिंदूंना पापाचरण करायला लावून आपणही कसे पाणी जीवन जगले, याचे योग्य ते मर्मग्राही वर्णन लेखकाने केले आहे. आतापर्यंतच्या कोणत्याही लेखकाने येवढे कठोर पण यथोचित प्रहार केले असतील असे वाटते. प्रथम प्रकरणातील भाग दोन मध्ये भारताचे अनादि आर्यत्व, प्रथम सृष्टी, प्रथम मानव, भारतातच निर्माण झाले; भारताचा विकास म्हणजेच प्रचलित जग आहे. त्यातच स्वर्ग–नरक, मृत्यु–पाताळ, देव–मानव, ऋषी–मुनी आदींचा समावेश होतो. ऋषी–मुनींनी निर्माण केलेली मानव कल्याणकारी वाङ्मय–रचना, दैत्य, दानव, राक्षस, त्यांचे आचार–विचार यांचा तपशीलही त्यांतच आहे. श्रेष्ठ–कनिष्ठ धर्माधर्म व उपासनेचे मार्ग आदी गोष्टींचे विचार–संशोधनही अभ्यासपूर्ण असल्याचे दिसून येते. या ग्रंथाद्वारे श्री. संकाये यांनी वाचकांना, महापंडितांना, बुद्धिवाद्यांना, संशोधकांना आव्हानच दिले आहे, यात शंका नाहीं.

भारतीय आर्य वीरशैवांनी निर्माण केलेल्या वेदाची शिकवण ह्या प्रकरणात चारही वेदातील ३०३ विषयाची जंत्री दिली आहे. वेदानुक्रम देऊन चारही वेदांचे मानवहितकारी असे सारच वाचकांच्या हाती सोपविले आहे.

जगांतील सर्व धर्मांमध्ये वैदिक हिंदू धर्म कनिष्ठ, आद्य वीरशैवधर्म व नूतन रामानुजांचा वैष्णव पंथ, साकारापासून निराकाराचे ज्ञान, देह कनिष्ठ, आत्मा श्रेष्ठ, लिंगपूजा श्रेष्ठ पण मूर्तिपूजा कनिष्ठ इत्यादी अनेक प्रश्नावर अत्यंत उपयुक्त अशी साधार चर्चा केली असून ती मननीय आहे.

लेखकाने सहाव्या प्रकरणांत लिहिले आहे ते वाचून वैदिक आर्यांनी मूळ भारतीयांच्या शुद्ध वेदांना कनिष्ठ व निंद्य कसे व केव्हा बनवले ते स्पष्ट व साधार दिसून येते; आणि ते वाचून वाटते की, वेदांइतके कनिष्ठ ग्रंथ फक्त वेदच आहेत. त्यातील देवतांची ऋषी-मुनींची चमत्कारिक उत्पत्ती, त्यांचे हिंसात्मक आचार आणि यज्ञ-यागांतील पशूहिंसा, मानवबळींची प्रथा व अती अश्लील संभोग–संवादांचे विवेचन वाचल्यावर वेद हे वाचनीय नाहीत, असे माझे स्पष्ट मत झाले आहे. अशा कनिष्ठ

वेदांची, अनेक विद्वानांनी अनेक धर्मग्रंथांनी आणि अनेक संतांनी थोरवी गाऊन स्तुती केली आहे हे कसे? या प्रश्नाचे उत्तर त्याच प्रकरणांत लेखकाने दिले आहे. ते असे की, ही थोरवी त्या ग्रंथकारांनी स्वार्थमूलक व दूषित विचारांनी गायिली आहे. संतांना व वेदविरोधी विद्वान् पंडितांना वेद हे ग्रंथ पहायला अगर वाचायलाही मिळाले नाहीत. त्यांनी गायिलेली थोरवी–स्तुती, त्यांच्या अगोदरच्या थोरवी गाणाऱ्या वाङमयाधारे गायिली आहे. लेखकाचे हे समर्थन योग्य वाटते. हें वेदाविषयक हे कटूसत्य दाखवून लेखकाने भारतीयांवर महान् उपकारच केले आहेत असे म्हणावेसे वाटते.

श्री. संकाये यांनी ह्या अमोल ग्रंथात जागोजाग मांडलेले सिद्धांत, तात्त्विक बाबी, केलेल्या चर्चा, दिलेले संदर्भ, येवढया प्रचंड स्वरूपात आहेत की, त्या साऱ्यांचा गोशवारा येथे थोडक्यांत देणे अशक्य आहे. जिज्ञासू वाचकांनी ते मूळातच पहाणे योग्य ठरेल. धर्ममार्तंडांनी व सनातन्यांनी वेळोवेळी शुद्ध धर्मांत, शुद्ध ग्रंथात नको ती भेसळ घातल्याने जनता शुद्ध अशा धर्मज्ञानापासून वंचित झाली आहे, याचे वाईट वाटते.

शेवटी श्री. संकाये यांचे मी मनापासून आभार मानतो व त्यांनी केलेल्या ह्या महान् कार्याबद्दल त्यांचे अभिनंदन करतो."

दि. २–४–८४

स. भा. कदम
(चोखोबा चरित्रकार)

---

## (४०) ह. भ. प. जगन्नाथराव गणपतराव गावडे

(चिंचवड, पुणे)

"परमपूज्य श्री. संकाये यांसी, आपला 'विश्वधर्म हा ग्रंथ संपूर्ण वाचल्यावर मनाची अवस्था थोडी फार बैचेन झाली निं त्यावर नेमकी प्रतिक्रिया व्यक्त करणे मुळातच कठिण होऊन बसले. ग्रंथ लिहिण्यामागची आपली भूमिका उदार आहे व परिश्रम देखील प्रशंसनीय आहेत. त्यामुळे आपली प्रेरणा वादातीत असली तरी, ग्रंथातील आपली

मते मात्र वादग्रस्त ठरतील असें मला वाटते. कारण धर्म आणि त्याविषयींचे गैरसमज यावर आपण जे विचार व्यक्त केले आहेत ते योग्यच असले तरी भारतीय जनमानसात धर्मांच्या विपुलतेमुळे आपापल्या धर्माबद्दलचे संभ्रम पिढयान्‌पिढया रुजलेले आहेत. त्याबद्दल आपण सोदाहरण सविस्तर विवेचन केले आहे. तरीही ते वादग्रस्त ठरेलसे वाटते; आणि त्याला कारण जनमानसातील परंपरेबद्दलची अंधश्रद्धा.

वास्तविक मानवाचा धर्म– 'मानवता' येवढाच असावा. परंतु प्रत्यक्षांत तसे आढळत नाही. धर्मांध श्रद्धेतून निर्माण झालेल्या, हजारो वर्षे जोपासलेल्या, हजारो जाती-पोटजातींची पाळेमुळे जनमानसांत पक्की रुजली आहेत व हें वर्षानुवर्षे चालत आले आहे. या धार्मिक परंपरा, रूढी, देव-देवतांचे सोहळे आम्ही पिढयानं पिढया निमूटपणे पार पाडत असतो ! अशा वृत्तीत आदर कमी, पण आदरयुक्त भीतीच जास्त असते. पाप–पुण्याच्या कल्पना व तथाकथित दैवयोगावर भरवसा ठेवल्याने, अंधश्रद्धेला विश्वासाचे खतपाणी मिळत जाते व माणूसकीला कालिमा फासणारी विघातक कर्मे धर्माच्या नावाखाली केली जातात. धर्मगुरू, धर्मग्रंथ, धर्मपरंपरा यांनी केवळ कर्मकांडातच लक्ष केंद्रित केल्याने, सर्व समाजाची श्रद्धा निरनिराळया धर्म–प्रवाहात विभागली गेली आहे व कित्येक शतके, तेच अधोगामी धार्मिक संस्कार आमचेवर दृढ केले गेले. प्रत्यक्षात कुठल्याही धर्माच्या संहितेत डोकावले असता त्यांत 'हे विश्वची माझे घर' असाच उदार मानवतावाद सारांश रूपाने जागोजाग आढळतो. परोपकार, परस्परसहिष्णुता व शुद्ध प्रेम हाच धर्माचरणाचा खरा मार्ग आहे. पसायदानांत, श्री ज्ञानेश्वर माऊलींनी देखील 'भूतां परस्परे जडो। मैत्र जीवांचे' असेच दान मागितले आहे.

झपाटयाने बदलत चाललेल्या आजच्या विज्ञानयुगांत देखील कर्मकांड, धर्मांधता टिकून आहे, हे आमचे दुर्दैव होय. तरीही या 'विश्वधर्म' ग्रंथासारखे धाडसाने लिहिलेले ग्रंथ लोकांपर्यंत पोहचले तर, तथाकथित धर्मपरंपरा व कर्मकांडांत गुंतून पडलेल्या समाजाचे गैरसमज व अंधश्रद्धा दूर होणे अशक्यप्राय वाटले तरी, त्यांना धक्के मात्र निश्चितच पोहोचतील. आपला हा ग्रंथ त्या दृष्टीने महत्वाचा ठरेल.

आपल्या या धाडशी लिखाणाने आमच्यासारख्या श्रद्धाळू व धार्मिक लोकांना, अंतर्मुख व्हावयास लावील इतके सामर्थ्य ह्या 'विश्वधर्म' ग्रंथांत नक्कीच आहे, असे माझे ठाम मत आहे. अभिनंदन!"

जगन्नाथ गणपतराव गावडे

----

(४१) ह. भ. प. सखाराम सिताराम खेंगले यांचा अभिप्राय

(दर महिन्याचे आळंदी पंढरीचे वारकरी; मा. अध्यक्ष–पुणे जि. सहकारी दूध उत्पादन संघ; सदस्य–तालुका पंचायत समिती, खेड; जि. पुणे.)

"श्री. का. शि. संकाये यांनी लिहिलेल्या 'विश्वधर्म' ग्रंथातील 'अगोदर हे वाचा' या लेखांत त्यांची मानवकल्याणाची तळमळ दिसून येते. 'लेखकाचे निवेदन' या लेखातील 'देव' या शब्दाचा त्यांनी दिलेला अर्थ, रामायणातील व महाभारतातील पात्रपरिचय वाचल्यास वाचणाऱ्याला धक्काच बसतो, गोंधळल्यासारखे होते. तोच लेख पुनः मात्र वाचल्यास तो आनंद होतो, तो शब्दांकित करणें अशक्य आहे.

भारतीय आर्य व वैदिक आर्य (हिंदू), भारताचा अशुद्ध इतिहास आणि शुद्ध इतिहास, भारतीयांचे आचार–विचार, उपासना, आणि वैदिक हिंदूंचे आचार–विचार, उपासना, हिंसाचारी वृत्ती, पारशी, मुसलमानादी धर्म श्रेष्ठ, वैदिक हिंदू धर्म कनिष्ठ, शैव–वीरशैव धर्म श्रेष्ठ, हिंदू धर्म कनिष्ठ, असे या ग्रंथात श्रेष्ठ–कनिष्ठ प्रकार वरेच दाखविले आहेत; त्यांचा विचार केल्यास हे चुकीचे आहेत असे वाटत नाही.

रामायण, महाभारत पुराणादि ग्रंथातील ब्रम्हा, विष्णु, महेशादी देव व पार्वती, लक्ष्मी, सावित्री, आदी देवी व त्यांचे अवतार, त्यांच्या भ्रष्ट चरित्राचे रसभरीत वर्णन, 'भारताच्या अशुद्ध इतिहासा'चे चित्रही अखिल मानवाला दाखवून लेखकानें चकित केले आहे; आणि ते योग्यच आहे असे कोणालाही मानावे लागेल.

श्रीकृष्णाला पूर्ण ब्रम्हावतार मानून त्याची उपासना अखिल भारतात, आणि विठोबालाही कृष्णाचाच अवतार मानून त्याचीही उपासना महाराष्ट्रात प्रामुख्याने चालू आहे. हजारो ग्रंथांनी व कोटचवधी मानवसमाजाने सर्वश्रेष्ठ मानलेल्या अशा श्रीकृष्णाचे आजतागायत रंगविलेले

चरित्र किती भ्रष्ट आहे, हे श्रीकृष्ण उपासकाला दाखवून, फार मोठ्या मानवसमाजाच्या सात्त्विक श्रद्धेला लेखकाने जबरदस्त धक्का दिला आहे. श्रीकृष्णाचे सत्य स्वरूप दाखविताना श्री. संकाये लिहितात, " **कृष्ण हा अवतारी देव नव्हे. तो ऐतिहासिक दिव्य गुणयुक्त महामानव होता. त्याला एकच पत्नी व एकच मुलगा होता आणि त्याचें चरित्र सूर्यासारखे निष्कलंक होते.**" श्रीकृष्णचरित्र हा शुद्ध प्रकार वाचून वाचकाला तसेच दुखावलेल्या समाजाला आश्चर्यानंदच होईल, असे मला वाटते.

अशुद्ध इतिहासांतील देवदेवीप्रमाणे महाराष्ट्रातील वारकऱ्यांच्या उपास्य देवाचे (श्रीविठ्ठलाचे) भ्रष्ट चरित्र लेखकाला सापडले नसावे असे दिसते. ते म्हणतात, " **विठ्ठल हा भ्रष्टाचारी कृष्णाचा अवतार नाही. तो शिवभक्त शिवलिंगधारक वीरशैव आहे.** " त्याला भ्रष्टाचारी कृष्णाचा अवतार मानून चालू काळांत कीर्तन, प्रवचनांद्वारे फारच मोठ्या प्रमाणात अंधश्रद्धेच्या मानवसमाजाचे मनोरंजन करतात. प्रस्तुत लेखाने वारकरी सांप्रदायी समाज दुखावेल असे वाटते. तसेच 'वारकरी संप्रदायी पंडित, महापंडित, फडकरी, कीर्तनकार, प्रवचनकार आणि दर महिन्याची वारी करणारे साधे वारकरी चालू कालांत परान्नावर व परधनावर जगतात, हे एक प्रकारचे महापाप आहे,' हे त्यांचे मतही वारकरी समाजाला खटकल्याशिवाय रहाणार नाही. परंतु विचारांती वरील विधान खरे आहे असेच मानावे लागेल. तथापि वारकरी सांप्रदायाची एकेश्वरी उपासना व संतांचे श्रेष्ठत्व याविषयी लेखकाची अत्यादराची भावना दिसून येते.

'विश्वधर्म' ग्रंथातील प्रचलित देवदेवींचे भ्रष्ट चरित्र आणि त्यांचे प्राचीन सत्य स्वरूप याचा सारासार विचार केल्यास वाटतें की, अखिल मानवांकरिता आद्य ग्रंथ आगम-निगमाची शिकवण, अहिंसातत्त्वी निराकारी, एकेश्वरी, एकनामी उपासना, एकपत्नीव्रत, एकपतिव्रत, सदाचार, प्रतिमापूजेचा निषेध या सर्व गोष्टींचा आणि प्रचलित भ्रष्ट चरित्री देवदेवींचा, त्यानुकूल ग्रंथांचा सारासार विचार केल्यास श्री. संकाये यांनी लिहिलेला 'अशुद्ध इतिहास' खरोखरच भ्रष्ट व निंद्य

आहे, असे कोणाही विचारवंताला मानावेच लागेल.

पृष्ठ नं. १५८ ते १७१ या तेरा पानांत श्री. संकाये यांनी लिहिलेल्या ‘ भारतीय आर्यांनी ( वीरशैवांनी ) निर्माण केलेल्या ‘ वेदांची शिकवण ’ या विस्तृत लेखात, चार वेदांतील अखिल मानवाचे कल्याण करणाऱ्या ३०३ विषयांची नावे, प्रत्येक विषयाला मुख्य असलेल्या मंत्राचे अंकानुक्रम देऊन चार वेदांचे सारच वाचकांचे हाती दिले आहे, अशा प्रकारे ‘ चार वेदांचे सार ’ दाखवणारा ‘ विश्वधर्म ’ हा पहिलाच ग्रंथ आहे. ‘ शुद्ध इतिहास ’ तर संपूर्ण नवीनच आहे असे प्रथम वाटते; पण श्री. संकाये यांनी तो साधार दिल्यामुळे तो चुकीचा मानता येणार नाही. आधुनिक इतिहासकारांना व संशोधकांना विचारांत गुरफटविणारा आहे. प्रकरण २, ३, ४ मध्ये शैव-वीरशैवांच्या श्रेष्ठतेचे, प्राचीनत्वाचे महत्त्व वर्णन केले आहे, ते शैव- वीरशैवांनाच कळेल. त्याची मला विशेष माहिती नाही.. पाचव्या प्रकरणांत आगम-निगम, उपनिषदे, पुराणादि ग्रंथांचे उगम, संदर्भ ग्रंथांची यादी देऊन नंतर सहाव्या प्रकरणात वेदांचे आधारेच अति निंद्य स्वरूपाचे विवेचन वाचून ३२० ग्रंथांचे मंथन करून, तीनशेपेक्षा अधिक विषय असलेला हा ‘ विश्वधर्म ’ ग्रंथ श्री. का. शि. संकाये यांनी लिहून अखिल मानवाचे कल्याण दाखविणारा ग्रंथरूपी ‘ ज्ञानारसा ’ वाचकांच्या हाती दिल्याबद्दल मीं त्यांचे आभार मानून त्यांना धन्यवाद देत आहे.

दि. १२-११-८३ **सखाराम सिताराम खेंगले**

-----

(४२) **श्री. बबनराव काशिनाथ घनवट,** वाडा, खेड, पुणे.

( अध्यक्ष- बॉम्बे टिफिन बॉक्स चॅरिटी ट्रस्ट, मुंबई. )

श्रीक्षेत्र आळंदीचे माझे मित्र श्री. का. शि. संकाये यांनी लिहिलेला त्यांचा पहिलावहिला ग्रंथ नुकताच ‘ विश्वधर्म ’ मला आणून दिला. हा ग्रंथ वाचून, त्यावर अभिप्राय लिहायला सांगितले. प्रथम या ग्रंथात आपल्या उपास्य देवाचे (खंडोबाचे) काही लिहिले आहे कां, ते पाहिले. पान ६० वर ‘ कोटयवधी पशूंचे मांस खाणारा तसेच कोटयावधी बायका करणारा शंकरांचा अवतार खंडोबा ’ हे वाचून मला एकदम धक्काच बसला आणि लेखकाचा खूप राग आला. असे वाटले की हा ग्रंथ

जाळून टाकावा. रागाने पुस्तक फेकून दिले. थोड्या वेळाने त्यांत काय लिहिले आहे ते वाचून तरी पहावे म्हणून खंडोबाविषयीचा संपूर्ण लेख तीन चार वेळा वाचल्यावर असे वाटले कीं, खंडोबाची उपासना अधोगतीला नेणारी आहे. ' विश्वधर्म ' ग्रंथाने सर्वश्रेष्ठ पूजनीय, उपासनीय, मोक्षाला नेणारी, मानवाचे कल्याण करणारी, निराकार, एकेश्वरी एकनामी, अहिंसाचारी शिवोपासना सर्व मानवजातीचे कल्याण करणारी आहे असे त्यात सिद्ध केले आहे. आणि ते योग्य आहे असे वाटले; नंतर अथपासून इतिपर्यंत संपूर्ण ग्रंथ वाचल्यावर फारच आनंद झाला. पहिल्या प्रकरणांतील पहिल्या भागांत ' भारताचा अशुद्ध इतिहास ' लिहिला आहे. त्यात वैदिक हिंदू धर्मांतील उपास्य ब्रह्मा, विष्णु, महेश, इंद्रादी देव व त्यांच्या बायका, त्या देव-देवींचे अवतार, त्यांचे दूषित चरित्र, तसेच स्वर्ग, मृत्यु, पाताळाविषयीच्या भ्रामक कल्पना, त्यांच्या हिंसाचार अत्याचाराचे, या सर्व प्रकारांच्या आधारग्रंथांचे, भ्रष्ट भयासूर चित्र लेखकाने उत्तम प्रकारे रेखाटले आहे. त्यांचे सयुक्तिक साधार खंडन केले आहे. हे सर्व वाचून हिंदू धर्मीयांच्या सात्विक अंधश्रद्धेला धक्का दिला आहे; आणि ' लेखकाचे निवेदन ' या लेखांत त्या देवदेवींचे सत्य स्वरूप दाखवून श्री. संकाये यांनी हिंदू धर्मीयांवर महान् उपकार केले आहेत असे वाटले.

दुसऱ्या भागांत ' भारताचा शुद्ध इतिहास ' लिहिला आहे. त्यांत पृथ्वीनिर्मितीचे, भारताचे, भारतीय आर्यांचे, भारतीय आद्य धर्मग्रंथ आगमनिगमांचे, भारतीय उच्च संस्कृतीचे, संस्कृत भाषेचे, भारताच्या शुद्ध इतिहासाचे श्रेष्ठत्व सिद्ध करून, सनातनी व आधुनिक विचारवंतांना चकित केले आहे. वेदांच्या अपौरूषेय व धर्मग्रंथत्वाला वेदाधारे बाधित करून सनातनी वैदिकांना दिङमूढ केले आहे. शेवटी सहावे प्रकरण लिहून वेदाचे कनिष्ठत्व, निंद्यत्व सिद्ध केले व ते वैदिक आर्यांना दाखवून त्यांचेवर महान् उपकारच केले आहेत असे मला वाटले.

दुसऱ्या प्रकरणांत शैव – वीरशैवांचे प्राचीनत्व सिद्ध केले आहे. तिसऱ्या व चौथ्या प्रकरणांत लिंगायतांच्या शिवलिंग उपासनेची उत्तम आणि सविस्तर माहिती आहे. श्री. संकाये यांनी मानवकल्याणकारी ' विश्वधर्म ' ग्रंथ लिहून अखिल मानवावर अनंत उपकार केले आहेत,

असे माझे स्पष्ट मत झाले आहे. श्री. संकाये यांच्या या अजोड धाडसाचे मी अभिनंदन करतो आणि यापुढेही त्यांनी अशीच मानवकल्याणकारी ग्रंथरचना करावी असे सुचवून त्यांना धन्यवाद देतो.

दि. २४-११-८३ बबनराव काशिनाथराव घनवट (मुंबई)

---

**(४३) श्री. विश्वनाथराव हणमंतराव सोळुंके.**

(नांदगाव, अहमदपूर; लातूर.)

माझे बालमित्र श्री. का. शि. संकाये यांनी प्रथमच लिहिलेला, विद्वान् पंडितांना आव्हान देणारा, मानवाला खरा मोक्षमार्ग दाखवणारा 'विश्वधर्म' हा ग्रंथ वाचून मला जे वाटते ते खाली लिहित आहे.

'विश्वधर्म' या ग्रंथरूपाने लेखकाने अधर्म, अनीती, अत्याचार, पापाचार, हिंसाचाररूपी धूर्त पुरोहितांनी निर्माण केलेल्या महांधकाररूपी महाखड्ड्यांत पडणाऱ्या मानवजातीला वर काढण्याचा प्रयत्न केला आहे, तो चिंतनीय, विचारणीय आणि स्तुत्य आहे. लेखकाने हा ग्रंथ लिहून अधोगामी मानव समाजाला, सन्मार्ग दाखवून मानवकल्याण दाखविणारा दिव्य आरसा मानवाचे हाती दिला आहे. निर्मळ आरशांत मुखावलोकन केल्याने मुखावलोकन केल्याचा आनंद मिळतो. त्याप्रमाणे 'विश्वधर्म' ग्रंथावलोकनाने मानवाला अंतिम सुख (मोक्ष) मिळेल, अशी माझी खात्री आहे.

लेखकाने असेच मानव कल्याणकारी ग्रंथ निर्माण करावेत असे सुचवून त्यांना धन्यवाद देतो.

दि. १७-१-८४ विश्वनाथ हणमंतराव सोळुंके

---

**(४४) ह. भ. प. गंगाराम लक्ष्मण तळेकर, मुंबई.**

(अध्यक्ष–दुर्गेश्वर प्रासादिक भजनी मंडळ, गडद, खेड, पुणे; खजिनदार–बाम्बे टिफीन बॉक्स सप्लायर्स चॅरिटी ट्रस्ट; प्रवर्तक–दख्खन मावळे सहकारी पतपेढी मर्यादित, मुंबई)



आळंदीचे डबेवाले धर्मशाळेचे व्यवस्थापक श्री. का. शि. संकाये

यांनी लिहिलेला 'विश्वधर्म' नावाचा ग्रंथ वाचून अत्यानंद झाला. 'अगोदर हे वाचा' या लेखांत जगातील आद्य ग्रंथ 'आगम–निगम' प्रतिपादित सर्वश्रेष्ठ अहिंसा, निराकार, एकेश्वर, एकनाम याचे श्रेष्ठत्व एकपतिव्रत, एकपत्नीव्रत, मृत माता-पित्यांचे श्राद्धतर्पण या सर्व गोष्टी साधार लिहिल्या आहेत. 'लेखकाचे निवेदन' या लेखांत भारतीय हिंदूंच्या देवदेवींचे सत्य स्वरूप लिहून वैदिक आर्य धर्मी हिंदू समाजावर महान् उपकार केले आहेत असे मला वाटते.

वैदिक आर्य हिंदूंनी निर्माण केलेल्या कपोलकल्पित मानवघातक प्रकाराचे ब्रह्मा, विष्णु, महेशादी देव आणि पार्वत्यादी अनंत देवींच्या भ्रष्ट चरित्रांचे, त्यांच्या आधार ग्रंथांचेद्वारें श्री. संकाये यांनी साधार खंडन करून हिंदूधर्मीय समाजाच्या अंधश्रद्धेला फारच धाडसाने धिक्कारले आहे. हजारो वर्षांपासून जोपासलेल्या, श्रेष्ठत्वाची मान्यता पावलेल्या, पूर्ण ब्रह्म आहे, मोक्षदाता आहे, महाविष्णूचा अवतार आहे, असे म्हणून भ्रष्टाचारी कृष्णाचे, त्याच्या उपासनेचे व त्यानुषंगिक अगणित ग्रंथांचे, तसेच अगणित श्रीकृष्णभक्तांचे श्री. संकाये यांनी कृष्णाचे भ्रष्ट चरित्र साधार देऊन आणि श्रीकृष्णाचें सत्य स्वरूप दाखवून, समाजाला दिव्य दृष्टी देऊन त्यांचें अनादि कालाचे अज्ञान दूर केले आहे.

श्रीकृष्णाला अवतारी देव मानून त्यांच्या पाषाणप्रतिमेची पूजा-अर्चा केल्याने मानवाला मोक्ष मिळणार नाही. तर त्याच्या श्रेष्ठ चरित्राचाराचे अनुकरण केल्याने मोक्ष मिळेल. हा सिद्धांत आणि विश्वधर्म ग्रंथाची शिकवण श्रीकृष्ण अनुयायांना तसेच सर्वच देव-देवी उपासकांना कल्याणकारी आहे.

अशुद्ध इतिहास, शुद्ध इतिहास, भारतीय आर्य, उत्तर धृवीय वैदिक आर्य हा प्रकार लेखकाने नवीनच निर्माण केला आहे आणि तो योग्य आहे. अतापर्यंत असे कोणीही धाडस करून लिहिले नाही. तसेच भारतीय आर्य आणि वैदिक आर्य (हिंदू) च्या आचार-विचारांचे श्रेष्ठ-कनिष्ठ प्रकार, वेदाधारे वेदांचे अपौरुषेयत्व व धर्मग्रंथत्वाचे खंडन केले आहे ते योग्यच आहे. तसेच सहावे प्रकरण लिहून वेदांइतके कनिष्ठ वेदच आहेत, असे सिद्ध केले आहे.



भारतीय आर्यांच्या विस्तारमायासून श्रेष्ठत्वाने चालत आलेल्या,

निराकारी, एकेश्वरी, एकनामी, अहिंसातत्त्वी शिव-उपासनेच्या श्रेष्ठत्वाचे श्री. संकाये यांनी केलेले विवेचन सर्वश्रेष्ठ आणि योग्यच आहे. विश्व-प्रतिक शिवलिंग उपासनेचे श्रेष्ठत्व सांगणारा हा ' विश्वधर्म ' ग्रंथ अखिल मानवाचे कल्याण करणारा आहे, असे माझे स्पष्ट मत आहे. लेखक श्री. संकाये यांना धन्यवाद देऊन विनंती करतो की, त्यांनी असे अनेक ग्रंथ निर्माण करावेत.

दि. २३-११-८३ गंगाराम लक्ष्मण तळेकर, (मुंबई)

— ---

(४५) श्री. रामभाऊ लक्ष्मण निंबाळकर

(अध्यक्ष-बॉम्बे टिफीन बॉक्स असोसिएशन, मुंबई)

श्री. का. शि. संकाये यांचा ' विश्वधर्म ' ग्रंथ वाचून फारच आनंद वाटला. पहिल्या प्रकरणात, पहिल्या भागात 'भारताचा अशुद्ध इतिहास' लिहून हिंदू धर्मातील देवदेवींच्या उपासनेचे व त्याला आधार असलेल्या धर्मग्रंथांचे श्री. संकाये यांनी खंडन करून, हिंदूधर्मीय समाजाला दुखावले आहे आणि ' लेखकाचे निवेदन ' या लेखात देवदेवीचे सत्य स्वरूप दाखवून दुखावलेल्या समाजाला दिव्य दृष्टी देऊन मोक्षाचा मार्ग दाखविला आहे.

' मी देवी उपासक आहे. देवी म्हणजे जगन्माता, विश्वशक्ती, सर्व देवांपेक्षा श्रेष्ठ, ती प्रसन्न झाल्यावर ती भक्ताला मागेल तो वर देते आणि मोक्षही देते,' असे देवीभक्तांना वाटते. त्याला आधार वेद-पुराणादि तंत्र-ग्रंथ हजारो आहेत. त्या देव-देवींचे भ्रष्ट चरित्र, निंद्य उपासना, हिंसाचार, अत्याचार, मद्यपान, स्वतःची मुले खाणारी अशा निंद्य देवी-उपासनेचे वर्णन वाचून किळस वाटते, घृणा येते आणि मी देवी-उपासक आहे असे सांगायला लाज वाटते, मन धजत नाही, जीभ लुळी पडते. श्रीं. संकाये म्हणतात त्याप्रमाणे, देवदेवी, दैवते, त्यांची उपासना, धूर्त पुरोहितांनी अल्पज्ञानी देवभोळचा, अंधश्रद्धेच्या मानव-समाजाला लुबाडण्यासाठी, दूषित कल्पनेने निर्माण केली आहे हे मला खरे वाटते.

देवी-उपासकांइतके महापाप राक्षससुद्धा करीत नाहीत असे कोणाही विचारी मानवाला वाटल्याशिवाय राहाणार नाही. 'विश्वधर्म'

ग्रंथाच्या वाचनानुकरणाने अखिल मानवाचे कल्याण होईल असे माझे स्पष्ट मत आहे. लेखकाला शतशः धन्यवाद !

दि. २४-११-८३ — रामभाऊ लक्ष्मण निंबाळकर (मुंबई)

----

(४६) श्री. सदानंद टाकसाळे

(उपाध्यक्ष–मध्य मुंबई लोकदल, चिटणीस–जागृत जनता मुंबई; सरचिटणीस–मुंबई जेवण डबे वाहतूक मंडळ)

श्री. का. शि. संकाये, आळंदी यांनी लिहिलेला 'विश्वधर्म' हा ग्रंथ मी संपूर्ण वाचला. त्यावर मला असे वाटले की, या ग्रंथाने अखिल मानवाला खालील शिकवण दिली आहे; देव कोठे आहे, मानव कोणाला म्हणावे, धर्म म्हणजे काय, उपासना कोणाची करावी, मोक्ष कसा मिळवावा, इत्यादि प्रश्नासंबंधी मानव मनाच्या तळमळींचे समाधान 'विश्वधर्म' ग्रंथात सापडेल. तसेच विश्वमान्य वेदांचे निंद्यत्वही वाचायला मिळेल.

अमूल्य मानव धर्मतत्त्वाचे ३२० ग्रंथांचा उहापोह करून ३८० पेक्षा अधिक विषय लिहून लेखकाने काढलेले सिद्धांत अखिल मानव हितकारी आहेत. या 'विश्वधर्म' ग्रथांने ज्ञान-अज्ञान, धर्म-अधर्म, पाप-पुण्य, हिंसा-अहिंसा, उपास्य देव–अ-उपास्यदेव, सद्ग्रंथ-असद्ग्रंथ, सद्गती अधोगती अशा श्रेष्ठ, कनिष्ठ तत्त्वांचे तौलनिक वर्णन साध्या सोप्या बोलभाषेत मानवाच्या हाती देऊन अखिल मानवांवर महान् उपकार केले आहेत. असे मानव कल्याणकारी अनेक ग्रंथ प्रस्तुत लेखकाकडून निर्माण होवोत असा आशीर्वाद देऊन त्यांना धन्यवाद देतो.

दि. ९-१०-८३ — सदानंद टाकसाळे

----

(४७) श्री. पंडितराव कृष्णाजी कुऱ्हाडे

विशेष कार्यकारी दंडाधिकारी (स्पेशल एक्झिक्युटिव्ह मॅजिस्ट्रेट), आळंदी व (४८) श्री. तुकाराम भाऊसाहेब कुऱ्हाडे (गुरुजी),

आळंदी, खेड, पुणे.

श्री. का. शि. संकाये आळंदी देवाची यांनी आपले मनोगत 'विश्वधर्म' ग्रंथातून प्रगट केले आहे. ते वाचून आम्हाला जे वाटले ते नमूद

करीत आहों. पाठीशी काही पूर्वपुण्य असेल तरच कवीच्या अंत:करणातील विचार साकार होतात. ते बाहेरून येणारे नसतात. अंत:स्फूर्तीतील आगळ्या चिंतनाने ते रसीले बनून प्रगट होतात. कवीच्या मनांतील भावनांचा आविष्कार त्याच्या कवितेनेच होत असतो, किंबहुना कवीचे लेखन त्यांच्या सत्त्वगुणाचे दर्शन घडविते.

श्री. संकाये यांचा 'विश्वधर्म' ग्रंथ आम्ही वाचला. तो वाचनीय, मननीय व संग्राह्य आहे. तो कवीच्या कोमल हृदयाची साक्ष देत आहे. कवी मनात कोठेतरी आतल्या कोपऱ्यात, अखंड सुरू असलेले तत्त्व-चिंतन शब्दात प्रतिबिंबित होतांना कवी मनाच्या कोमल भावनांचा साक्षात्कार घडतो. श्री. संकाये यांच्या ग्रंथाच्या बाबतीत हे सत्य प्रतीत होते. भोग, विरक्ती, साधना, संस्कृती असे कठीण विषय लेखकाने मार्मिक शब्दात मांडले आहेत. ते सांगताना लिहिलेले विचाररूपी शब्द वाचकाच्या काळजाला जाऊन बिलगतात. त्या शब्दांमागे अर्थ धावत राहातो व म्हणूनच वाचनाची ओढ कायम राहते.

ह्या "विश्वधर्म" ग्रंथावलोकनाने विश्वधर्मांचे (मानवता धर्माचे) ज्ञान वाचकाच्या मनीं दृढमूल होईल आणि तो नराचा हर बनेल असा आम्हाला विश्वास वाटतो.

विचारवंतांना विचार चक्रांत गुंतवणारा; निरर्थक कर्मकांडी सनातन्यांना धक्का देणारा, विश्वधर्म म्हणजे मानवता धर्म सांगणारा, अंधश्रद्धेच्या ओघ बदलून डोळस श्रद्धेकडे वळवणारा, मानव-तेंचे ज्ञान देऊन, मानवाचा महामानव बनवणारा, सत्याचा मार्ग दाखवणारा, परमेश्वराची खरी ओळख करून देणारा हा "विश्वधर्म" ग्रंथ श्री. संकाये यांनीं प्रथमच लिहिला आहे. त्यांच्या पुढच्या आयुष्यात त्यांच्याकडून असे अनेक ग्रंथ निर्माण व्हावेत व ते साध्या कवीचे महा-कवी व्हावेत, अशी प्रभुपदीं विनम्र प्रार्थना व लेखक श्री. संकाये यांना धन्यवाद.

दि. २-४-८४

पंडितराव कृष्णाजी कुऱ्हाडे,
तुकाराम भाऊसाहेब कुऱ्हाडे.

---

## (४९) श्री. विठ्ठल हरी रंधवे, (गुरूजी)

आळंदी देवाची, ता. खेड, जि. पुणे

(अध्यक्ष-भारतीय बौद्ध महासभा, आळंदी देवाची (अशोकनगर), ता. खेड, जि. पुणे; अध्यक्ष–प्राथमिक शिक्षकसंघ, नगरपरिषद शिक्षण मंडळ, आळंदी देवाची, भारतीय बौद्ध महासभा, जि. पुणे; हिशेब-तपासणीदार; आळंदी विविध कार्यकारी शेती सहकार सोसायटी सभासद)

ह. भ. प. श्री. संकाये महाराज, नांदगावकर (आळंदी देवाची) यांसी सा. न. वि. वि. श्रीज्ञानेश्वर महाराजांचे पवित्र पुण्यभूमीमध्ये समतेचा विचार मांडणारे, ज्ञानेश्वर माउलीनंतर आपण ' विश्वधर्म " हा ग्रंथ लिहून फार चांगला विचार मांडला आहे. हिंदू धर्मातील दगड-धोंडचांचे देव-देवतेपासून दशावतारांचे विवेचन सडेतोड मांडून उजेडात आणले आहे.

आगम–निगम, पुराणादि ग्रंथातील मानवाचे स्थान निश्चित सांगितले आहे. म. फुले, डॉ. आंबेडकर, संत गाडगे महाराज यांचे विचारांशी, धर्मकार्याशी जुळते–मिळते विचार मांडून हिंदू धर्म हा मानवाचे उद्धारासाठी कसा होता, त्यामध्ये इतर काही घाण घुसडून तो टाकाऊ कसा केला गेला, यावद्दलचे विचार स्पष्ट व निर्भीडपणे मांडले आहेत. सहाव्या प्रकरणांत वेदांचे कनिष्ठत्व दाखविण्याचे महान् धाडस केले आहे; त्याला तोड नाही.

देवदासी, वाघ्यामुरळी याबद्दल सद्यःपरिस्थितीतील सामाजिक चळवळीला शोभतील असेच विचार आपण निर्भीडपणे मांडले आहेत.

आळंदीचे वास्तव्यांत अव्याहत आगम-निगम, पुराणादि ग्रंथांचा सखोल अभ्यास करून तुलनात्मक विचाराने आवर्जून सडेतोडपणे कोणाच्याही रागालोभाची पर्वा न करता, समाजाची बांधिलकी हा एकच विचार मनात ठेवून, चिंतन व मनन करून, "विश्वधर्म" हा अलौकिक ग्रंथ लिहून खऱ्या धर्माची जाणीव करून दिलीत, त्याबद्दल आपले शतशः आभार मानले तरी ते कमीच होतील.

दि. ८-४-८४ विठ्ठल हरी रंधवे



---

(५०) श्री. मुकुंद नामदेव वाघमारे
(आळंदी देवाची, खेड, पुणे. मालक, प्रकाशक, मुद्रक व सह-संपादक "जागते रहो" (सजग भवतु) मासिक)

**'विश्वधर्म' ग्रंथाचे थोडक्यात स्वरूप**

श्री. वाघमारे लिहितात, "धर्माचे थोतांड माजविणाऱ्या पाखंडी लोकांचे, तत्त्वाला धरून खंडन व मानवतेचे मंडन करणारा हा ग्रंथ आहे.

माझ्यासारखा सामान्य माणूस या ग्रंथाचा पूर्ण अभ्यास केल्याशिवाय अभिप्राय लिहितो. (समुद्रमंथन केल्याशिवाय रत्ने मिळत नाहीत.) तरीही मंथनाशिवाय बुडी मारून रत्ने मिळविण्याचा प्रयत्न म्हणजे "आत्माहुती" याचा अर्थ की, टिटिभू चाचूवरी । माप सूये सागरी । मी नेणतु त्यापरी । प्रवर्ते येथ ॥ (ज्ञानेश्वरी १–१६८) या ज्ञानेश्वर महाराजांचे प्रमाणाप्रमाणे मी धाडस करीत आहे.

हा ग्रंथ संस्कृतीच्या (परंपरांच्या) नावाखाली माणसाच्या मानेवर, बैलाच्या मानेवर असलेल्या 'जुवा' (जोखडा)प्रमाणे विकृत धर्मरूढींना विरोध करणारा असला तरी 'सर्वधर्म समभाव' व 'मानवता' या भावनेतून श्रेष्ठतम मानवतावाद निर्माण करील अशी आशा वाटते.

या ग्रंथावर ओझरती नजर टाकल्याने कै. 'राजाराम मोहन रॉय' (सतीची चाल बंद पाडणाऱ्या) या महान् व्यक्तीचीं आठवण येते.

कट्टर सनातनी, कर्मठ व देवदेवतांचे भय असणाऱ्या हळव्या मनाच्या अज्ञानी हिंदूंनी हा ग्रंथ वाचून मनाला लावून घेण्यापेक्षा (दुःख करीत बसण्यापेक्षा) हा ग्रंथ वाचण्याचा अट्टाहास करू नये, ही प्रांजळ विनंती.

या ग्रंथाच्या प्रकाशित होणाऱ्या उरलेल्या पानामध्ये 'वेदांचा' (वेदविकृतींचा) थोडासा अभ्यास असावा असे मला वाटते. (सत्य शोधून विचार करावयास लावून) सायुज्यतेकडे नेणारा हा ग्रंथ आहे. जरी या ग्रंथांत माझ्या 'गुरव' जातीच्या धंद्याच्या (धर्माच्या नावाखाली केल्या जाणाऱ्या कर्माच्या) विरुद्ध उल्लेख असला तरीसुद्धा पटवून दिलेल्या मुद्द्यामुळे 'मौन' धारण करावे लागत आहे.

मी शैव सांप्रदायी (शैव ब्राह्मण) असलो तरी माझ्या धर्मांत 'विकृती कशी आली?' याचा अभ्यास मी केला नसल्याने या गोष्टींचा

शैव ब्राह्मण ज्ञातीच्या बांधवांनी अभ्यास करावा ही विनंती.

खोटे कधी लिहिणार नाही, असा बाणा असलेल्या 'जागते रहो' (सजग भवतु) या मासिकाकडून, लेखक श्री. का. शि. संकाये नांदगावकर (आळंदी देवाची) यांना हार्दिक शुभेच्छा व धन्यवाद.

दि. २५-८-१९८४

श्रावण व. १४ शके १९०६ मुकुंद नामदेव वाघमारे (आळंदी).

-----

## (५१) "नाहीं गा श्रुतिपरौती माउली जगा"

आळंदीचे ह. भ प. श्री. काशिनाथबुवा संकाये यांच्या अभ्यासु व चिकित्सक वृत्तिबद्दल मला आदर आहे. ते सद्वृत्त, सडेतोड आणि तितकेच धाडसी वृत्तीचे आहेत. त्यांच्या ह्या गुणांमुळे मी प्रथम त्यांच्याकडे आकर्षित झालों. तसा त्यांचा माझा लोभ फारा दिवसांचा, म्हणजे सुमारे पंचवीस तीस वर्षांचा तरी आहे. त्यावेळी मी 'ज्ञानप्रकाश' ह्या प्रख्यात दैनिकांत सहसंपादक होतो. तथापि संशोधक वृत्तीचे थोर लेखक म्हणून काही कारणानिमित्ताने अलिकडेच कळले व त्यांचे-बद्दलचा आदर वृद्धिंगत झाला. त्यांनी 'विश्वधर्म' नांवाचा ग्रंथ लिहिला असून त्याकामीं अल्पसे सहाय्य मजकडून झाले. तदनंतर मीं त्यांचे ग्रंथावर अभिप्रायवजा काही लिहावे अशी त्यांची इच्छा दिसल्यावरून, त्यांचा ग्रंथ पाहून जें वाटलें, जे विचार मनात आले ते थोडक्यात दिले आहेत :—

ह. भ. प. श्री. काशिनाथबुवा संकाये ह्यांनी 'विश्वधर्म' नांवाचा एक अपूर्व ग्रंथ लिहिला असून तो प्रकाशनाच्या वाटेवर आहे. श्री. संकाये हे स्वतःला वीरशैव म्हणवितात व त्यांनी वीरशैव धर्म हा सर्वांत प्राचीनतम व सर्वश्रेष्ठ कसा आहे हे प्रस्तुत ग्रंथांत सिद्ध करून दाखविले आहे. तसेच वीरशैव धर्मप्रणित संस्कृति ही सर्व धर्मांचे मुळाशी आधारभूत कशी आहे हेहि साधार दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यावरून त्यांची संशोधन व अभ्यासुवृत्ति दिसून येते. भारतीय आर्यांचे काळांत वेद धर्मग्रंथ शुद्ध स्वरूपांत होते व ते सर्वांना शिरोधार्य होते, हे श्री. संकाये ह्यांना मान्य आहे. परंतु नंतरच्या कालखंडात उत्तरध्रुवीय आर्य भारतांत आले व त्यांची धर्मनीति, संस्कृति, चालीरीती यांचा पगडा मूळ शुद्ध वैदिक संस्कृतीवर पडून, वेदांचे मूळ स्वरूप अशुद्ध व भ्रष्ट झाले,

असा त्यांचा दावा आहे. ह्या संक्रमण-काळांत संस्कृतीची जी देवाण-घेवाण झाली, वेदग्रंथांत सरमिसळ झाली, यज्ञकांड सुरू झाले, त्यामुळे धर्माचा मुख्य आत्मा जो अहिंसाधर्म तो मागे पडून सर्वत्र हिंसाचार बोकाळला, एकेश्वरी विचारसरणीची पिछेहाट झाली, अनेक देव–देवतांचे बंड माजले ! अनेक भ्रष्ट प्रकार वेदग्रंथांत घुसडले जाऊन कालांतराने त्यांना प्रामाण्य प्राप्त झाले. तेथून वेदग्रंथ व त्यांत प्रतिपादिलेला आचार-धर्म अशुद्ध व भ्रष्ट झाला, म्हणून ' वेद-धर्मग्रंथ सर्वस्वी त्याज्य ' असे त्यांचे मुख्य प्रमेय आहे, ते बरोबर वाटत नाही. शरीरांतील रक्त अशुद्ध होऊन मांडीवर गळू झाले तर, कोणी सबंध पाय कापून टाकीत नाही. तसे करणे वेडेपणाचे ठरेल ! शस्त्रक्रिया करून फक्त गळू कापून टाकले की झाले. तद्वत मूळ शुद्ध वेदग्रंथांत कांही अनिष्ट प्रकार अगर रूढी धर्माच्या नांवाखाली घुसडल्या गेल्या असल्यास त्या काढून टाकल्या म्हणजे झाले. धर्म–संशोधकांनी हे कार्य जरूर हाती घ्यावे. लेखकांनीहि प्रस्तुत ग्रंथात तसे आवाहन केले आहे. त्यासाठी सर्व जगांत थोर म्हणून ज्या वेदग्रंथांचा गाजावाजा झाला आहे, संत–महंतांनीहि ' पै अहितापासूनि काढिती । हित देऊनी वाढविती । नाही गा श्रुतीपरौती । माऊली जगा ।। (ज्ञानेश्वरी : १६–४६२) असे म्हणून वेदग्रंथांना अग्रमान दिला, ते 'निंद्य,' 'भ्रष्ट' म्हणून झिडकारणे अविचारीपणाचे, नव्हे, आत्मघात-कीपणाचे ठरेल. वेदैकनिष्ठेने अनिष्ट तर काही होणार नाहीच, उलट ती निष्ठाधारकाची ब्रह्माशी गांठ घालून देईल ! आणि तेच मनुष्यजन्माला येऊन सुसाध्य करण्याचे ध्येय असले पाहिजे. त्याविना मनुष्यजन्माचे सार्थक नाही. मनुष्यजन्म वाया गेला असे होईल.

ह्या प्रश्नाकडे पाहण्याचा आणखीहि एक दृष्टीकोन असू शकतो. एखाद्या धर्मावर जेव्हां जबरदस्त घाला येतो, सत्ताधारी राजेलोकही धर्मरक्षणाचे कामीं असमर्थ ठरतात, हतबल होतात, सबंध संस्कृतीच नष्ट होण्याची वेळ येते तेव्हां, सर्वनाश टाळण्यासाठी विचारवंत, समाज-धुरीण एकत्र येऊन ' सर्वसंमत मधला मार्ग' शोधून काढतात. धर्मावरील प्रत्येक परचक्राच्या वेळी, अथवा बहुजनसमाज कमालीचा उन्मत्त व स्वार्थांध होतो, धर्माला जुमानेसा होतो, अशा वेळी हेंच होत आलें आहे. अशा बदलाच्या मागे नेहमीच कोणाचा स्वार्थ अगर दुष्ट भाव

असतो असे मानण्याचें कारण नाहीं.

वेदांना, गीतेला मुख्यतः निर्गुण उपासना, एकेश्वरी मतप्रणालीच अभिप्रेत आहे. भगवान् श्रीकृष्ण गीतेंत म्हणतात, '**मामेकं शरणं व्रज**'. असें आहे तर धर्मांत अनेक देव-देवता कां निर्माण केल्या गेल्या, असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचें थोडक्यांत उत्तर असें कीं, सर्वसामान्य जनांना निर्गुणोपासना झेपत नाही. त्यांना सन्मार्गावर तर ठेवले पाहिजे, मग त्यांच्या श्रद्धेला धक्का न देता त्यांना त्यांच्या आवडीची उपासना करू द्यायची. सगुण उपासनेचा वेग वाढला की, ती भक्ति आपोआप निर्गुणांत परिणत होते. म्हणून पूर्वसूरींनी व संतमंडळींनी सगुण भक्तीला, अनेक देव-देवतांच्या उपासनेला विरोध केला नाही. खरे पाहतां त्यांना निर्गुण भक्ति, एकेश्वरी मतच अभिप्रेत आहे. याबावत साधु-संतांच्या वाङमयातून अनेक प्रमाणें दाखविता येतील. त्यांची खरी पूजा "केला पाषाणाचा विष्णु। परि पाषाण नव्हे विष्णु। विष्णुपूजा विष्णूशी अर्पे। पाषाण राहे पाषाण रूपें॥" अथवा "पूजा अंबेचो अंबेला घेणें। कांसे राहे कांसेपणे॥" (श्रीतुकाराम) अशी असते. त्यांना मूर्तींत पाषाण किंवा कांसे दिसत नाही, तर प्रत्यक्ष त्यांची इष्ट देवता दिसते. तिची ते पूजा करतात. त्याचे फळहि त्यांना मिळते, त्यांचे अभीष्ट जो मोक्ष तो त्यांना प्राप्त होतो. मूर्ति वेगवेगळ्या दिसल्या तरी त्यांना त्या एकरूपच वाटतात. याचीहि अनेक उदाहरणे सांगता येतील, पण विस्तारभयास्तव तो मोह टाळणे आवश्यक आहे. 'हरि हरा भेद। नाही, नका करू वाद। एक एकाचे हृदयीं। गोडी साखरेच्या ठायीं॥' असे त्यांचे धोरण असते. ते पुढे म्हणतात, "काय आम्ही भक्ति करणे कैसी। काय वहावे तुम्हांसी। अवघा भरोनिया उरलासी। वाणीं खाणीं रूपीं गंधीं रसीं॥ असा त्यांचा अनुभव असतो. पूजा करता करता ही स्थिती प्राप्त कां होऊ नये? इष्टदेवतेची पूजाअर्चा करता करता मन इष्टदेवतामय होऊन जाते. सामान्य पार्थिव पूजेतूनच शेवटी श्रीतुकोबाराय म्हणतात, त्याप्रमाणे 'तुका म्हणे अवघाची विरालो विठ्ठलची झालो दर्शनानें'॥ असे घडते. येथे 'दर्शनाने' हा शब्द लक्षात घेतला पाहिजे. त्याचे दर्शन येवढे थोर, व्यापक असते. पार्थिव पूजेंने अंतरीची आच्छादिलेली ज्योति प्रकाशमान होते. मग त्याचा आनंद काय

वर्णावा ? देवापाशी मोक्षाचे गाठोडे नाही, हे त्यांना माहीत असते. परंतु भगवद्भावाच्या, प्रेमाच्या प्रभावावर 'मोक्षाची सोडीबांधी' करण्याचा अधिकार त्यांना प्राप्त झालेला असतो. सगुण मूर्तिपूजेंचे पर्यवसान असे लीलया निर्गुणांत होते, अद्वैतात होते. शिवलिंगाची पूजा ही तरी श्री-शिवाच्या कल्पिलेल्या प्रतिकाचीच पूजा नव्हे काय ? शैव-वीरशैवांनाहि 'लिंगपूजा' व तद्द्वारा मोक्ष हे तत्त्व मान्य आहेच. 'देव देऊळ परिवारू । कीजे कोरूनि डोंगरू । तैसा भक्तीचा व्यवहारू । कां न व्हावा ॥ (अमृतानुभव ९-४१)

येवढी तयारी झाल्यावर सर्वांभूती समभाव, मानवता हे गुण आपोआपच येतात, त्यासाठी वेगळे प्रयत्न करावे लागत नाहीत. शेवटी ह. भ. प. श्री. काशिनाथबुवा संकाये ह्यांनी प्रस्तुत ग्रंथ लिहून विचारवंत व धर्ममार्तंड यांच्या विचारांना धक्का, चालना दिली, त्यांच्या पुढे एक आव्हान उभे केले, त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करतो व परमेश्वर उत्तरोत्तर त्यांना समाजाला जेणेकरून 'जीवनाला सन्मुख होण्याचे बळ अंगी येईल' असे ग्रंथ निर्माण करण्याची स्फूर्ति देवो, अशी प्रार्थना करून माझे विचार येथेच थांबवितो !

ब. श्री. रुद्र

दि. १०–९–८४ (माजी सहसंपादक 'ज्ञानप्रकाश')

॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥



# ह. भ. प. काशिनाथबुवा संकाये यांचे जीवनचरित्र

(लेखक: श्री. विठ्ठल गंगाधर कोटगिरे, मु. नांदगांव, ता. अहमदपूर, जि. लातूर, हल्ली मु. सातारा, जि. सातारा.)



'**विश्वधर्म**' या ग्रंथाचे लेखक श्री काशिनाथ शिवमूर्तीअप्पा संकाये, नांदगावकर यांचे व माझे गाव एकच आहे. हा माझ्यापेक्षा वयाने लहान आहे. हा आपल्या आई-वडिलांना जेवढा आवडता होता, त्यापेक्षा मला अधिक आवडायचा. कारण लहानपणी हा फार हुषार व कुशाग्र बुद्धीचा मुलगा होता. आनंदी व मनमिळाऊ स्वभाव आणि परमार्थाची आवड यामुळे घरांत, भजन-पूजनांत व गावातील प्रतिष्ठित मंडळींना तो फारच आवडायचा.

याचा जन्म उच्च खानदानी व वतनदार घराण्यात झाला आहे. याचे पणजोबा तीन भाऊ होते. त्यांचे वतन (पाटीलकी) तीन गावांत होते – (१) भातांगळी, (२) महरंगळा, (३) नांदगांव. पहिल्या दोन गावांत पाटीलकी अनादि कालापासून आजतागायत चालू आहे. सरकारी अधिकारी लोकांना हिंसान्न द्यावे लागे म्हणून याच्या पणजोबांनी पाटीलकीचे वतन सोडून दिले. त्या हिंसेचे पाप आपल्याला भोगावे लागेल म्हणून पाटीलकी सोडून दिली. पणजोबा, आजोबा व वडील (शिवमूर्तीअप्पा गौरप्पा संकाये) हे सर्व अत्यंत सात्विक, सदाचारी, स्वधर्माचारी, गुणवान, शीलवान, ज्ञानवान, धनवान, स्वकष्टार्जित अन्नधानावर निर्वाही व परोपकारी होते. लिंगायत धर्माचे आचार काटेकोरपणे सांभाळून वारकरी सांप्रदायी भजन करणे, कीर्तन, प्रवचन, श्रवण करणे, यथाशक्ती दानधर्म करणे हे या घराण्याचे परंपरागत

वैशिष्ठ्य आहे. यांच्या घराण्याचे दुसरे वैशिष्ठ्य असे की, या घराण्यातील स्त्री किंवा पुरुष मरणसमयी आजारी पडत नाहीत. तिसरे वैशिष्ठ्य, यांच्या घराण्यात पुनर्जन्माचे धार्जिणे आहे. माझ्या हयातीत यांच्या घराण्यांतील कमीतकमी चाळीस माणसे स्वर्गवासी झाली असतील. त्यातील एकही मरणसमयी आजारी पडून स्वर्गवासी झाला नाही. पुरुष दिवसभर शेतीत कामधंदा करून, संध्याकाळी भोजन झाल्यावर, दररोजच्या नियमाप्रमाणे भजनाला जाऊन, भजन करून परत घरीं येताना, सर्व भजनी मंडळींना भजनी साहित्यासह आपल्या घरी आणून, रात्रभर वारकरी सांप्रदायी भजन करून, सकाळी भजनाच्या शेवटी 'पुंडलिक वरदे' या गजरांतील काळात त्यांचे प्राणोत्क्रमण होते ! यांचे एका चुलत्याचे देहावसान चैत्री वारीला पंढरपुरात दर्शनाला गेल्यावेळी एकादशीचे दिवशी ... संध्याकाळी पांडुरंगाचे दर्शन घेऊन, गरुड मंडपात बसून, पांडुरंगाचे मुखावलोकन करीत करीतच झाले. लेखकाची जन्मदातीं आई आळंदीत कार्तिक वद्य त्रयोदशी, श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या पुण्यतिथी दिवशी सकाळी सूर्योदयाचे वेळी स्वर्गवासीं झाली.

**पुनर्जन्म :** याची पत्नी पूर्वजन्मी याची सख्खी थोरली चुलती होती. याचा सख्खा धाकटा भाऊ पूर्वजन्मी याचा थोरला चुलता होता. याची मुलगी पूर्वजन्मी याची आजी (वडिलांची आई) होती. यांचा नातू–मुलीचा मुलगा याचे जन्मदाते वडील होते.

लेखकाचे वडील श्री. शिवमूर्तीअप्पा संकाये हे त्यांच्या कालातील सर्वश्रेष्ठ पुरुष होते. आजुबाजूच्या दहावीस गावात त्यांना मानमान्यता होतीं. तें न्यायी, दयाळू, सार्वजनिक कार्यात तन, मन, धनाने सहकार्य करीत. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे त्यांच्या घराण्याची परंपरा उत्तम आहे. अशा सर्वश्रेष्ठ घराण्यात यांचा जन्म झाला आणि आपली पूर्वपरंपरा त्याने यथायोग्य चालविली आहे.

आमचे गाव अगदी लहान खेडेगाव आहे. गावास शाळा म्हणजे काय आणि कशी असते, हे अजिबात माहीत नव्हतें. म्हणून काशिनाथाला त्याच्या वडिलांनी त्याच्या मामाकडे शिकण्यासाठी लातूरला नेऊन सोडले. त्यावेळी त्यांचे वय अवघे तीन वर्षांचे होते. लातूर हे गाव त्यावेळी मोठी बाजारपेठ होतीं. आताही आहे. मामा व्यापारी होते. ते व्यवहारी

गणितात फारच तज्ज्ञ होते. त्या काळात त्यांना लातूरच्या व्यापाऱ्यात गणिततज्ञ म्हणून बहुमान होता. मामाकडे असताना त्या काळातील शिक्षण पद्धतीप्रमाणे प्रथम उजळणी, अंक, पाढे, आकरक्या, एकोत्र्या, रेघांची उजळणी म्हणजे पावकी, निमकी, पाउणकी, सवाकी दीडकी, अडीचकी, औटकी अशी उजळणी प्रथम शिकवीत असत. उजळणी शिकवीत असतांनाच गणितातील प्रकार–बेरीज, वजावाकी, गुणाकार, भागाकार... त्यावरोबर रेषांची बेरीज, वजावाकी, गुणाकार, भागाकार शिकवीत असत. मिळवण्या, भाजण्या हे सर्व व्यवहारी गणिताला उपयुक्त प्रकारही शिकवत असत. त्यावेळी गणितात पाच प्रकार होते. धान्याचे गणित, गूळ, तेल, तूप, लोखंड हा वजनी प्रकार वेगळा, कापसाचे वजनाचा प्रकार वेगळा, चांदी-सोने वजन प्रकार वेगळा. शिवाय नाण्यातील वट्टा हा प्रकार वेगळा. हे सर्व गणिताचे प्रकार फारच अवघड होते. हे सर्व प्रकारचे गणित ह्याला फारच अवगत होते.

हा सर्व प्रकार काशिनाथ दीड वर्षात शिकला. शाळेतील मास्तर आणि मामा या दोघांकडून हे ज्ञान मिळाले आणि अवघ्या पाच वर्षे वयाच्या आत ते सर्व प्राप्त झाले. तितके ज्ञान वयोवृद्ध व्यापाऱ्यालाहीं नसायचे. उजळणी, गणिताचे सर्व प्रकार शिकून झाले. पुढे बाराखड्या शिकायच्या होत्या. तेवढ्यात याची मामी वारली. त्यानंतर काशिनाथचे शहरी वास्तव्य संपले आणि शिक्षणही खुंटले. तो गावी परत आला.

त्या काळात आमच्या गावात एका सुवर्णकाराचे घर मोठे श्रीमंत आणि पारमार्थिक समजले जाई. त्यांच्या घरी दररोज भजन, दर गुरुवारी व दर एकादशीला कीर्तन व रात्रभर जागर होत असे. त्यांच्यात श्रीमती हरीबाई नावाची स्त्री चांगली शिकलेली होती. या हुषार मुलाला ग्रंथ वाचण्याइतके तरी आपण शिकवावे असे तिला वाटले; म्हणून तिने काशिनाथला बाराखड्या व पुस्तक वाचायला शिकवले. एक वर्षाचे आतच तिसरे पुस्तक शिकून झाले. या काळात त्या बाईंनी काशिनाथला धार्मिक ग्रंथही वाचायला शिकवले. सोनाराच्या घरीं पुष्कळ ग्रंथ होते. ते सर्व काशिनाथ चांगल्या प्रकारे वाचीत होता.

त्याच काळात भजन करणे, हेही अनायासें शिकायला मिळाले. कीर्तन, प्रवचन व श्रवणही भरपूर झाले. हा पारमार्थिक प्रकार काशिनाथनें उत्तम प्रकारे आत्मसात केला. त्याच काळात त्याला नामजपाचाही छंद लागला. वरील सर्व प्रकार वयाच्या पाच वर्षात अवगत झाले; तेही अगदी उत्तम. हा मुलगा एवढ्या लहानपणी पारमार्थिक प्रकारात येवढा ज्ञानी आमच्या गावात नव्हे, आजूबाजूच्या पाच दहा गावातही नव्हता, असे म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही. ती सत्य परिस्थिती होती.

काशिनाथचे व्यवहार ज्ञान व पारमार्थिक ज्ञान सात वर्षांच्या वयात जेवढे होते तेवढे त्या काळात प्रौढांत नव्हते. याची प्रगती चालू असताना सोनाराच्या घरचे भजन-कीर्तन काही कारणाने बंद पडले आणि ते कार्य माझ्या घरी चालू झाले. जुनी भजनीं मंडळी भजनाला येत होतीच; काशिनाथच्या आनंदी आणि मनमिळाऊ स्वभावामुळे त्याच्या वयोगटातील पंचवीस तीस मुलेही दररोज भजनाला येत. काशिनाथचे भजन, वाचन, नामस्मरण आणि कीर्तन-प्रवचनोपयोगी पाठ–पाठांतर अत्यंत चिकाटीने चालू होते. यावेळी त्याचे वय अवघे सात वर्षांचे होते.

गावात शाळा नव्हती. गावकरी प्रतिष्ठित मंडळींनी खाजगी शाळा सुरू केली. त्यामुळे काशिनाथचे शालेय शिक्षण पुढे चालू झाले. त्याला शाळेत शिकायचे होते फक्त मोडी लिपी व उर्दू लिपी; दोन वर्षात मराठी सातवी, मोडी पाचवी आणि उर्दू चौथी शिकून झाले आणि शाळा सोडली. त्या काळात निजामच्या राज्यात मराठीला काहीच महत्त्व नव्हते. फक्त पोथी पुस्तक वाचायला आले म्हणजे झाले. मोडीला व्यवहारात व सावकारी व्यवहारात महत्त्व होते, आणि उर्दू सरकारी राज्यलिपी होती. त्यामुळे उर्दू भाषेला मात्र फारच महत्त्व होते. भूगोल, इतिहास, व्याकरण, संस्कृत, तसेच दीर्घ-ह्रस्व, अर्धविराम, प्रश्नविरामाचे ज्ञान मास्तरलाच त्या काळात नव्हते. मग ते विद्यार्थ्यात कोठून येणार? बरे, त्या काळात त्याची गरजही नव्हती. त्या कालातील शिक्षणाची परिस्थिती वाचायला–लिहायला येणे, कामापुरती बेरीज-वजाबाकी आणि व्यवहारापुरते गणिताचे ज्ञान मिळाले की झाले! परंतु काशिनाथचे शालेय शिक्षण त्या काळात आणि त्या भागात मराठी

सातवी, मोडी पाचवीं, आणि उर्दू चौथी येंवढे झाले होते. तसेच व्यवहारी गणित, भजन, धर्मग्रंथ-वाचन, नामस्मरण आणि पाठपाठांतर, या सर्व प्रकारात याच्या इतका गुणी, ज्ञानी, एकपाठी, धूर्त, हजरजबाबी, धाडसी व आनंदी स्वभावाचा मुलगा आमच्या आजुबाजूच्या दहापाच गावांत तरी नव्हता. हे सर्व ज्ञान त्याने वयाच्या दहा वर्षांतच साध्य केले.

वयाच्या अकराव्या वर्षी याचे लग्न झाले. पुढे चार वर्षांत धार्मिक ग्रंथवाचन, भजन, नामस्मरण, आणि कीर्तन-प्रवचनोपयोगी पाठपाठांतरात प्रशंसनीय प्रगती झाली. तदनंतर शेतीव्यवसाय सुरू केला. याची शेतीतील प्रगतीही फारच उत्तम झाली. मुरलेल्या शेतीतज्ञ शेतकऱ्यापेक्षाही जास्त प्रगती झाली. घरातील ९९ टक्के कारभार वडिलांनी त्याच्यावर सोपावला होता. प्रपंच व परमार्थ उत्तम रीतीने चालला होता. धार्मिक ग्रंथवाचन आणि ग्रंथसंग्रह वाढविला होता. सर्व ठींक चालले होते. ग्रंथवाचन आणि मनन, हा त्याचा आवडता छंद. लहानपणापासून एकपाठी तर होताच. याचे कुटुंब लहान होते. आई-वडील, भाऊ, पत्नी, एक मुलगी, भावजय, भावाची दोन मुले अशी लहान मोठीं एकूण ८ माणसे घरांत होती. घरातील संपूर्ण कारभाराची जबाबदारी वडिलांनी यांचेवर टाकली होती. सर्व काही आनंदात चालले होते. अशा प्रकारे आनंदाच्या शिखरावर असताना काशिनाथचे वडील शिवमूर्ती गौरप्पा संकाये कैलासवासी झाले व घरातील सर्व जबावदारी खऱ्या अर्थाने याच्या अंगावर पडली. प्रापंचिक संपूर्ण जबावदारी वडिलांनी पूर्वीपासूनच याचेवर टाकली होती व ती काशिनाथ उत्तमप्रकारे सांभाळीत होता. कुटुंबातील सर्वांचे सहकार्यही चांगले मिळत होते. सर्व काही आनंदी आनंद होता. अशा आनंदी काळात याच्या धाकट्या भावाने त्याच्या काही इष्ट मित्रांच्या सल्ल्याने कोणालाही कळू न देता दुसरे लग्न केले. मुलीच्या आई–वडिलांनी आमच्या अज्ञान मुलीला फसवून लग्न केले असा फौजदारी गुन्हा पोलिसांकडे दाखल केला. त्या गुन्ह्यात भावाचे काही मित्र आणि स्वतः काशिनाथलाही गुंतविले होते, त्या गुन्ह्यातून भावाला आणि त्याच्या मित्रांना निर्दोष सोडविण्यासाठी विरोधी पक्षातील लोकांवर अनेक प्रकारचे आरोप करून दोन

जिल्ह्यात आणि तीन तालुक्यात याने फौजदाऱ्या चालू केल्या ही फौजदारी प्रकरणे तीन वर्षे चालू होती. शेवटी भावाला व त्याच्या मित्रांना फौजदारी गुन्ह्यातून निर्दोष ठरवून अपूर्व विजय मिळवला. त्या फौजदारी प्रकरणात याला आपली वडिलार्जित सर्व स्थावर–जंगम इस्टेट घालवावी लागली. सर्व इस्टेट हातून गेल्यावर जन्मभूमी सोडून आळंदीला गेला. आळंदीला गेला तेव्हा याची परिस्थिती निष्कांचन आणि निर्धन अशी होती.

आळंदीला गेल्यावर थोडयाच दिवसांत आळंदींत त्याने आपला जम चांगला बसविला. आळंदीच्या फेऱ्या अगोदरपासूनच होत होत्या. त्याचे भजन चांगले होते. त्यामुळे आळंदीतील जुन्या भजनीमंडळींची चांगली ओळख झाली व भजनामुळे भजनीमंडळात मानाचे स्थान मिळवले. थोडयाच दिवसांत आळंदीत प्रतिष्ठित लोकांतही मानाचे स्थान प्राप्त झाले. तो गावी असताना वर वर्णन केलेले सर्व गुण त्याचे ठायी होतेच, नंतर तो शिंपीकाम शिकला व तेही त्याला चांगले येत होते. आळंदीत आल्यावर त्याने प्रथम शिंपीकाम दुसऱ्या शिंप्याकडे आर्धलीने करायला सुरुवात केली व खाली उदधृत केलेल्या कला अल्पावधीतच हस्तगत केल्या:

(१) उत्तम शेती काम (२) उत्तम शिंपी काम (३) वारकरी सांप्रदायी भजन, (४) तबला–मृदूग मृदंन शायी भरून तयार करणें, (५) कीर्तन-प्रवचन करणे. हे पाच गुण गावी असतानाच त्याला चांगले अवगत होते. आळंदीत आल्यावर (६) गवंडी काम, (७) सुतार काम, (८) लोहार काम, (९) पाण्याचे नळ फिटिंग करणे, (१०) वीज वायर फिटिंग करणे, (११) भांडयाला कल्हई लावणे, (१२) बारावा गुण (कला) म्हणजे शास्त्रशुध्द संगीत गाणे. आळंदी परिसरांत अनेक कला अवगत असलेला, उत्तम कलावंत म्हणून त्याने चांगला लौकिक संपादन केला असून सध्यां ज्ञानेश्वर महाराजांच्या पुण्यनगरीत आळंदींत आनंदाने वास्तव्य करून आहे.

आळंदीला हा इ. स. १९५४ साली गेला. आळंदीला आल्यापासून त्याचे धार्मिक वाङ्मयवाचन बदलत गेले. त्याचे गावी होता तेव्हा प्रथम शिवलीलामृत, पांडवप्रताप, रामविजय, भावार्थरामायण

अशा प्रकारातील पुष्कळ ग्रंथ वाचले होते. नंतर वारकरी सांप्रदायातील संपूर्ण वाङमयाचा त्यांनी अभ्यास व मनन केले. ग्रंथ–संग्रह पुष्कळ वाढविला. आळंदीला आल्यावर तो वेदांताकडे आकर्षित झाला. वेदग्रंथही पुष्कळ वाचले. नंतर महाभारत, पुराणे, उपनिषदे, स्मृतिग्रंथ, सहा शास्त्रे, चार वेद, वेदान्त-विद्वानांचे अनेक ग्रंथ, वीरशैव धर्माचे सिद्धांतग्रंथ, जैन, बुद्ध, महानुभाव, शाक्त, आर्यसमाज, बायबल, कुराण, अशा अनेक धर्मग्रंथांचा संग्रह, वाचन आणि मनन करणे चालू होतेच. हा त्याचा छंद लहानपणापासून होता व तो अजूनही आहे. याचे स्वतःचे कुटुंब अगदी लहान होते. आपण स्वतः, पत्नी व एक मुलगी असे तीनच माणसांचे कुटुंब ! मुलीचे लग्न झाले असून ती आपल्या घरी आनंदात आहे. तीन वर्षांपूर्वी त्यांची पत्नी स्वर्गवासी झाली. त्यांनी दुसरे लग्न करावे असे त्याच्या नात्यातील वडिलधाऱ्या मंडळींनी सांगण्याचा प्रयत्न केला. पण त्यांनी त्याला साफ नकार दिला. नंतर मी स्वतःही त्यांना खूप आग्रह केला व माझे तो ऐकेल असे वाटत होते. पण तो म्हणाला, 'परान्न विषसमान, परधन मातीसमान, आणि परस्त्री कन्या, भगिनी, मातेसमान मानून आजपर्यंत मी जगलो, त्यांत बदल होणे अशक्य आहे. कन्या, बहीण, माता मानलेल्या स्त्री जातींला पत्नी मानणे महापाप आहे. ते मी करणार नाही.'

प्रथम मामी वारली तेव्हा शहरी वास्तव्य संपले व शिक्षणाची प्रगती खुंटली, नंतर ग्रामीण गावात शिक्षणाची, व्यवहार ज्ञानाची, पारमार्थिक ज्ञानाची प्रगती करून नावलौकिक मिळविला. तशात पितृछत्र गेले. स्वतंत्रता मिळाली. भावाने गुन्हा केला. त्याला निर्दोष करण्याकरिता वडिलोपार्जित स्थावर-जंगम इस्टेट गेली, आणि तीर्थवास मिळाला. पत्नी वारली, संसारपाश तुटला आणि संसारातून मोकळा झाला. त्याच्या व्यवहारी जीवनात परस्परविरोधी अनेक घटना घडल्या; त्या वर उद्धृत केल्याच आहेत. विरुद्ध घटना घडल्या तरी त्याचा लहानपणीचा आनंदी व समाधानी स्वभाव आजही जसाच्या तसा आहे. (१) स्वधर्माचार, (२) सद्धर्माचार, (३) सत्य, (४) अहिंसा, (५) न्यायी वृत्ती, (६) दया, (७) क्षमा, (८) शांती, (९) पापभिरुता, (१०) धाडस, (११) हजरजबाबीपणा, (१२) निर्भीड वक्तृत्व, (१३)

व्यवहारज्ञान, ( १४ ) पारमार्थिक ज्ञान आणि ( १५ ) आनंदी जीवन हे सर्व गुण त्यांचे अंगी असून त्याच्या घराण्याची ती थोर परंपराच आहे. हे सर्व गुण त्यांचे वडील शिवमूर्तीअप्पा यांचे ठायी होते. काशिनाथ संकाये यांनी त्यांत परमोच्च बिंदू गाठला आहे.

संसारपाशातून मोकळा झाल्यावर गेल्या तीन वर्षांत स्वतःच्या हिंमतीवर मानवजातीच्या कल्याणाकरिता " विश्वधर्म " नावाचा एक महान् ग्रंथ लिहिला. गेल्या वर्षी इ. स. १९८५ साली मी चातुर्मासा-निमित्ताने चार महिने आळंदीत सहकुटुंब राहिलो होतो. त्यावेळी त्याचा ग्रंथ लिहून तयार झाला होता. त्या ग्रंथाच्या टंकलिखित १२ प्रती तयार करून, धार्मिक निबंध घेऊन डॉक्टर झालेल्या आधुनिक सुशिक्षित लोकांना व विद्वान् धर्मगुरूंना वाचायला दिल्या. एक प्रत त्याच्या-जवळ होती. मी दररोज एक तास त्याचेकडे जात होतो. त्यावेळी मी तो ग्रंथ पाहिला. त्या ग्रंथातील खंडण-मंडणात्मक प्रकार, धर्मा-धर्माची श्रेष्ठ-कनिष्ठता (तुलना), देव-देवींचे खंडन, धार्मिक ग्रंथांचे खंडन, वेदशास्त्र, पुराणे, रामायण, महाभारत इत्यादी ग्रंथांचे खंडन-मंडन, ब्रह्मा, विष्णू, महेश हे देव व त्यांचे अवतार यांचे खंडन, सावित्री, लक्ष्मी, पार्वती आदी देवींचे खंडन, शंकराचार्यांच्या वेदांताचे खंडन हा सर्व प्रकार वाचून मला वाईट वाटले आणि रागही आला होता.

त्याला मी म्हटले, " काय रे काशिनाथ, तुझ्याविषयी मला फार अभिमान वाटत होता की, तू पवित्र घराण्यात उत्तम पुरुष जन्मलास आणि तुझ्या बेचाळीस कुळचांसह तू आपला उद्धार केलास ! परंतु तू लिहिलेले हे पुस्तक वाचून मला वाटले की, तू आणि तुझ्या पवित्र बेचाळीस कुळचा तू नरकात घातल्या ! हे पुस्तक जाळून टाक. " हे माझे बोलणे ऐकून तो हसला आणि म्हणाला (तो मला अण्णा म्हणतो), " अण्णा, हा ग्रंथ अपूर्ण आहे. भारताचा अशुद्ध इतिहास व उपासना आणि शिव-उपासनेचे श्रेष्ठत्व त्यात थोडक्यात लिहिले आहे. भारताचा शुद्ध इतिहास आणि सर्वश्रेठ शिव-उपासना लिहायची आहे. संपूर्ण लिहून झाल्यावर, छापून तयार करून प्रथम तुम्हाला वाचायला देतो. तुम्ही वाचून चांगली आहे असे वाटल्यास आशीर्वाद द्या. वाईट आहे

असे वाटल्यास आणि ते मला पटवून दिल्यास, तुम्ही म्हटल्याप्रमाणे छापून झालेली सर्व पुस्तके तुमच्या समक्ष जाळून टाकीन. तेव्हापासून पाच-सहा वेळा त्याची व माझी भेट झाली, पण त्याने व मीही त्या पुस्तकाचा विषय अजिबात काढला नाही. गेल्या महिन्यात तो सातारला माझ्याकडे आला. मला नमस्कार करून, नवीन छापून तयार केलेले एक पुस्तक माझ्या हातात देऊन आनंदाने हसत हसत मला म्हणाला, " अण्णा, गेल्या वर्षी तुम्ही जाळून टाकायला सांगितलेले पुस्तक तुम्हाला वाचायला देत आहे. ते चांगले वाटल्यास अभिप्रायरूपी आशीर्वाद द्या. ग्रंथ चांगला नाही असे तुम्हाला वाटल्यास गेले वर्षी कबूल केल्याप्रमाणे तुमच्या समक्ष खरोखरच सर्व प्रती जाळून टाकीन. पण हा ग्रंथ तुम्ही एकटयाने वाचू नका. एक-दोन धार्मिक विद्वान् आणि तुम्ही एकत्र बसून विचारपूर्वक वाचा ! असे सांगून लगेच आळंदीला जायला निघाला.

त्याला मी सांगितलें की, तुझा ' हा ग्रंथ योग्य आहे ' असे मला वाटल्यास, तुझे जीवनचरित्र लिहून पाठविन. ते छापून पुस्तकात घाल. लगेच तो म्हणाला की, मी लिहिलेल्या पुस्तकात माझी स्तुती नको. मला ते आवडणार नाही. मी त्याला सांगितले की, तुझ्या जीवनचरित्रात तुझी स्तुती नसेल. तुझ्या जीवनातील सत्य प्रकार फक्त नमूद करीन. असे सांगून त्याच्याकडून कबूल करून घेतले.

त्याचा स्वभाव मला चांगला माहीत आहे. ' स्वकीर्ती कानी नायकावी, स्वकीर्ती मुखें न वर्णावी ' ह्या वर्गातला तो आहे. असत्याची चीड, सत्याची आवड, अनितीची चीड, नीतीची आवड, पापाची चीड, पुण्याची आवड, परस्त्री मातेसमान, परधन मातीसमान, परान्न विषासमान, स्वकष्टार्जित अन्न अमृतासमान, असे मानून तसे आचरण करणारा आहे. त्याला त्याची कोणी निंदा केली तर ती आवडेल, परंतु स्तुती आवडणार नाही. असा लहानपणापासून ते आजपर्यंतचा त्याचा स्वभाव आहे. त्याने लिहिलेला ' विश्वधर्म ' ग्रंथ फारच उत्तम आहे असे मला वाटते. म्हणून मी त्याचे अती अल्पचरित्र लिहिले आहे व त्याला आशीर्वाद देत आहे, ' आयुष्यमान् भव !'

' तुझे पुढचे आयुष्य मानवकल्याणाकरिता धर्मग्रंथ लिहिण्यात

जावो ' असे माझे तुला अनेक उत्तम आशिर्वाद आणि परमेश्वर चरणी मागणी.

' विश्वधर्म ' ग्रंथ लेखकास शतश: धन्यवाद !

विठ्ठल गंगाधर कोटगिरे
(नांदगांवकर, सातारा)

माझे जीवन-चरित्र लिहिणारे परम पूजनीय ह. भ. प. श्री. विठ्ठल गंगाधर कोटगिरे, यांना मी अण्णा म्हणतो. हे माझे अण्णा नावाप्रमाणे महान् विठ्ठलभक्त आहेत. व्यापार हा त्यांचा मुख्य व्यवसाय आहे. उपजीविकेकरिता व्यापार आणि आत्मोद्धाराकरिता परमार्थ, ही त्यांची पौत्रिक परंपरा आहे. त्यांचा स्वभाव साधाभोळा आहे. व्यवहारात आणि परमार्थात मात्र फारच चतुर आहेत. वारकरी सांप्रदायी भजन-पूजन, कीर्तन-प्रवचन हे गुण त्यांच्या ठायी विशेष प्रकर्षाने आहेत. आता ते वयोवृद्ध झाले आहेत, त्यांची संतती व सांपत्तिक स्थिती उत्तम आहे. ते इ. स. १९४८ साली सातारला गेले. त्यांच्या जन्मभूमी गावांत व त्या परीसरातील पंचवीस तीस गांवात आणि हल्ली साताऱ्यात त्यांची महान विठ्ठलभक्त व कीर्तन-प्रवचनकार म्हणून ख्याती असून चांगला बहुमान आहे. यांच्या सान्निध्यात मी लहानाचा मोठा झालो. त्यांच्या मार्गदर्शनाखाली धार्मिक ज्ञान मला मिळाले. मी लिहिलेला (संकलित केलेला) ' विश्वधर्म ' ग्रंथ हा त्यांचाच कृपाप्रसाद आहे. माझ्या अंत:करणात त्यांचे स्थान ' गुरु ' म्हणूनच आहे. अशा ह्या प. पू. महान् विठ्ठलभक्त अण्णांना माझे सविनय सप्रेम नमस्कार.

अण्णांचा कृपाभिलाषी
का. शि. संकाये

---

## जन्म घेणे लागे वासनेच्या संगे ॥

**काशिनाथ शिवमूर्तीअप्पा संकाये,**

(जन्मभूमी–नांदगाव, ता. अहमदपूर, जिल्हा–लातूर. (इ. स. १९५४ पासून आळंदी देवाची, ता. खेड, जि. पुणे येथे राहात आहे.)

**श्री. संकाये यांच्या घरातील पुनर्जन्माच्या सत्य घटना**

माणसाच्या वासना अपुऱ्या राहिल्या म्हणजे त्याला पुनर्जन्म घ्यावा लागतो. श्रीसंतमंडळी तेच सांगतात. त्याच्या पुष्टचर्थं श्रीसंत एकनाथमहाराज यांची अभंगोक्ती वर उद्धृत केली आहे. माझ्या स्वत:-च्या कुळीत अशा घटना फार घडल्या आहेत. किंवहुना ते माझ्या कुळींचे वैशिष्ठच आहे, असे म्हणावयास हरकत नाही. अशा घटनांपैकी काहीं वाचकांच्या माहितीसाठी खाली देत आहे :–

माझा सख्खा धाकटा भाऊ गुंडप्पा हा पूर्वजन्मी माझा थोरला चुलता होता. धाकटचा भावावर (माझ्या वडिलांवर) फारच प्रेम होते. म्हणून भावाचे पोटी जन्म घेतला. त्यांचे नाव गुंडप्पा होते.

माझी धर्मपत्नी कै. काशिबाई ही पूर्वजन्मी माझी थोरली चुलती होती. माझे सासरे यांचे पोटी जन्म घेतला. तिचे नाव काशिबाईच होते. माझे सासरे माझ्या वडिलांचे सख्खे भाचे होते. ते लहानपणी १५–१६ वर्षांचे वयापर्यंत मामाकडेच (आमच्या घरीं) राहात असत. मामी-भाच्यात अतिशय प्रेम होते. मामीने अंतकाल समयीं भाच्याला सांगितले की, मी तुमच्या पोटी जन्म घेणार आहे. माझे नाव चालवा. भाच्याला (माझे सासरे) प्रथमच मुलगीं झाली. पाळण्यात नाव दुसरे काहीतरी ठेवले. मूल रात्रंदिवस सारखे रडत होते. हा प्रकार तीन दिवस चालला. नंतर सासऱ्यांना मामीची आठवण आली आणि तिचे नाव बाळाला ठेवले व मुलगी रडायची थांबली. त्या बाळंतपणाला माझी आई गेली होती. ती आम्हाला ही हकीकत सांगे. माझी मुलगी सौ. गिरीजा उर्फ कमल गताटे ही पूर्वजन्मी माझी सख्खी आजी (वडिलांची आई) होती.



माझा नातू (मुलीचा मुलगा) पूर्वजन्मी माझे वडील होते. चुलत्याने, चुलतीने, आजीने फक्त नांव मागून घेतले. त्यांनी कोणीही

पूर्वजन्मातल्या आठवणी सांगितल्या नाहीत. तसे त्यांना कोणी विचारलेही नसेल. पण माझ्या वडिलांनी पुनर्जन्म घेतल्यावर पूर्वजन्मातील आठवणी नव्हे त्यांच्या हयातींतील आठवणी सांगितल्या. त्या थोडक्यात अगदी संक्षिप्तपणे पुढे देत आहे :—

माझ्या स्वतःच्या जन्माची हकीकत निराळीच आहे. मी माझ्या आईच्या गर्भात (गर्भ नऊ महिने पोटात असतो) तीन वर्षे होतो. देवधर्म, यंत्र, मंत्र तंत्रादी अनेक उपाय केले, परंतु काही उपयोग झाला नाही. त्यावेळी आमच्या गावाजवळ, चार मैल अंतरावर एक सत्पुरुष राहात होते. ते अंतर्ज्ञानाने सर्व कांही पहात असत. त्यांना बोलवून आणले. त्यांनी एका कोऱ्या कागदावर पुढील मजकूर लिहिला :—

'बाळ तू जन्माला घाबरून किती दिवस असा गर्भात थांबणार आहेस ? तुझ्या संचितात जन्म घेणें आहे. म्हणूनच तुला गर्भात यावे लागले आहे. तू गर्भात थांबल्यामुळे तुझ्या मातेला किती दुःख होत आहे! मातेला दुःख देणे महापाप आहे. तरी तू गर्भाबाहेर ये.' असे लिहून तो कागद जाळून त्याची राख पाण्याबरोबर प्यायला सांगितली. पुढे नऊ दिवसांनी माझा जन्म झाला.

या माझ्या घरातील पुनर्जन्माच्या घटनांचा उल्लेख माझे जीवनचरित्रलेखक श्री. वि. गं. कोटगिरे ह्यांनी आपल्या लेखात केला आहे.

माझ्या मुलीचे पाळण्यात नाव ठेवले ते दुसरे होते. नाव ठेवल्यापासून ती सारखी रडायला लागली. स्तनपानही बंद केले. ती सतत तीन दिवस एक सारखी रडतच होती. माझ्या वडिलांनी त्या बाळाला पाहिले आणि म्हणाले की, ही माझी आईच जन्मली आहे. हा पहा, हिच्या दंडावर काळा ठिपका आणि डोक्यात हे पांढरे पाचसहा केस आहेत. ह्या खुणा आईच्या शरीरावरील आहेत. त्यांनी बाळाचे नाव बदलून आपल्या आईचे नाव गिरिजाबाई असे ठेवले. हे नांव ऐकताच बाळ रडायचे थांबले. स्तनपान सर्व काही ठीक चालू झाले.

माझ्या मुलीचा मुलगा मंदार दोन वर्षांचा झाल्यावर बोलू लागला. तेव्हांपासून आपल्या पूर्वजन्मीची इत्थंभूत माहिती सांगतो. तो ह्या जन्मी माझा नातू असला तरी पूर्वजन्मी ते माझे वडील होते. आमचे गाव फार दूर आहे. त्याचा जन्म पुण्यात झाला. त्याला आमच्या गावा-

कडची काहीही माहिती नाही. तरीही आपल्या गावाची, तालुक्याची, जिल्हाची नावे व घराण्यातील चार पिढ्यांपासूनची माहिती बिनचूक सांगे. पूर्वजांची नावे, कुटुंबातील, गावातील, शेजारच्या गावांतील पाहुण्या-रावळचांच्या गावांची नावे, त्यांची नावे, नाते-गोते, त्यांचे आचारविचार, चांगले-वाईट, भजनपूजन करणारे, पंढरीची महिन्याची, अथवा वर्षवारी करणारे, लबाड बोलणारे, अशी सर्व माहिती बिनचूक सांगत असे.

हे सर्व सांगत असताना त्याच्या शरीराचे हावभाव, बोलण्याची पद्धत, वस्तूंची नावे त्या भागातील, भाषेतील, खेड्यातील बोलायचा-सांगायचा. वस्तूची नावे :– घमेले–टोपले, पाटी–डाल, फावडे–खोरे, काँट–बाज, काथ्या–सुंभ, दार–कवाड, पेटी–संदूक, गोठा–कोटा, गव्हाण–दावण, म्हैस–मईस, पार्डी–वगार, कालवड–कारवड, तपकीर –नस, पिशाच्च–भूत. पहिली नांवे या भागातील आहेत; दुसरी नावे आमच्या (मराठवाडा) भागातील आहेस. तो बोलताना दुसऱ्या प्रकारा-तील नावाने बोलत असे. बोलताना तो लहान मुलाप्रमाणे न बोलता म्हाताऱ्या माणसाप्रमाणे बोलत असे.

त्याला आम्ही आमच्या बरोबर पंढरपूरला नेले होते. संध्याकाळी आम्ही पंढरपूरला पोहोंचलो. आम्ही उतरलेली धर्मशाळा त्याच्या पूर्व-जन्मीच्या ओळखीची नव्हती. तो म्हणतो, 'आजोबा हे पंढरपुर दुसरे आहे का ?' आजोबा म्हणाले, 'अरे तेच आहे.' त्यावर तो म्हणाला, 'आम्ही पूर्वी पंढरपूरला जात होतो ते हे नाही. आम्ही रहात होतो ते घर विठोबाच्या देवळाजवळ होते. ते घर, तेथील रस्ते सर्व दगडांचे होते. आम्ही आगीनगाडीने येत होतो. पुलावर आल्यावर पैसे टाकून पाया पडत होतो. ते पंढरपूर कुठे आहे ? त्या पंढरपुरला वस नाही !' त्याच्या बोलण्यातील अर्थ मला समजला. त्याला सांगितले की, अरे, आपण पूर्वी आपल्या गावाकडून येत होतो; तिकडून आल्यावर आगगाडीने यावे लागते; पूल लागतो आणि आपण पूर्वी रहात होतो ते घर उद्या तुला दाखवतो. सकाळी आंघोळीला जाताना आम्ही त्याला त्याच्या पूर्वजन्मीच्या ओळखीच्या भागात नेले. प्रथम त्याला हरिदास वेस दिसली. ती पहाताच त्याला खूप आनंद झाला व म्हणाला की, आजोबा हेच आहे ते पंढरपूर. आता या पंढरपुरातील सर्व काही मी तुम्हाला दाखवतो. असे म्हणून तों

पुढे आणि आम्ही मागे चालू लागलो. प्रथम काल्याचा वाडा. लागला. त्या समोरच्या गल्लीतील बाबासाहेब वडव्यांचा वाडा दाखवून तो म्हणाला, 'आम्ही या घरात रहात होतो.' तेथून गल्लीतून चंद्रभागेकडे निघालो. कवठेकरांचे जुने वाडे, कुंभारघाटाने चंद्रभागेत गेलो. आंघोळी करून, पुंडलिकाचे दर्शन करून पूर्वाभिमुख नंदी, लहू दंडक्षेत्र, दगडाची नांव हे सर्व पाहून पुंडलिकाचे आई वडिलांचे देऊळ, चंद्रभागेच्या घाटाने वर निघालो. वासकरवाडा पाहून नगरप्रदक्षिणा रोडने प्रदक्षिणा सुरु झाली. त्या रोडला जेवढी मठ-मंदिरे आहेत ती सर्व त्यांच्या माहितीसह तो अगदी बिनचूक सांगत होता. मंडई, चौफळा, तेथून विठ्ठल मंदिराच्या कळसाचे दर्शन, नाथ चौक, नाथमंदिर, ज्ञानेश्वर मंडप, घोंगडे गल्लीने लालमारुती, उद्धवाचे दर्शन, उद्धव घाटावरून चंद्रभागादर्शन करून महाद्वाराकडून रस्त्याने मंदिराकडे. त्या रस्त्यावरील मंदिरांच्या नावांसह तो सर्व माहिती सांगत होता चोखामेळा, नामदेव पायरीचे दर्शन घेऊन आत गेलो. पांडुरंगाचे दर्शन, गरुड खांबाचे दर्शन, कान धरून नाचत, साष्टांग नमस्कार करून थोडी विश्रांती घेऊन लक्ष चौऱ्याशी देवांचे दर्शन, रुक्मिणीसह सर्व देवदेवींचे दर्शन–हे सर्व करीत असतांना त्या त्या देवदेवीचा इत्थंभूत माहिती तो बिनचूक सांगत होता.

एकदा माझ्या गावचे माझे मित्र सह–परिवार आळंदीला आले होते; त्यांच्या बरोबर सात–आठ माणसे होती. आम्ही मंदारला विचारले की, या मंडळीत तुझ्या ओळखीचे कोणी आहे का ? त्याने माझ्या मित्राकडे बोट दाखवून सांगितले की, हे माझ्या ओळखीचे आहेत.

एकदा त्याच्या आजीने त्याला विचारले की, मामंजी तुम्ही मोक्षाला किंवा वैकुंठाला गेला असाल असे आम्हाला वाटत होते. पण तुम्ही तर जन्माला आलात हे कसे ? तो म्हणाला, ' अगं, तसेच काहींतरी झाले असते, पण वासनेने मला जन्म घ्यायला लावला. मी गेलो तेव्हा माझ्या मनांत तुझ्या पोटी जन्म घ्यावा असे आले. कारण पहिले तू माझी मोठी वहिनी होतीस. तेव्हांही तू माझ्यावर मुलाप्रमाणें प्रेम केले. दुसऱ्या जन्मी माझी सून झालीस तेव्हाही तू माझ्यावर बापाप्रमाणे प्रेम करीत होतीस. माझ्या पहिल्या मायीचे माझ्यावर असेच प्रेम होते. अजून एकदा मायीच्या प्रेमाचा आनंद घ्यावा म्हणून तुझ्या पोटाला यायची वासना होती. पण ते जमले नाही.' तिने विचारले, ' कां

जमले नाही '? तो म्हणाला की, तुला मुलं व्हायची वाट बंद केली आहे. आतापर्यंत ती वाट मोकळी होईल म्हणून वाट पाहिली; ती वाट कोणीही मोकळी केली नाही. आतापर्यंत वाट पाहून माझ्या पहिल्या मायीच्या पोटाला गेलो '. तिने विचारले की, आतापर्यंत तुम्ही कुठे रहात होता ? काय खात होता ? तो म्हणाला, ' आगं मी वर अंतराळात भटकत होतो. खायला तूच देत होतीस.' ' मी तुम्हाला कधीही पाहिलेलं नाही. खायला दिले नाही ; ' ' आगं तू अमावास्येला–पूनवेला मला खायला देत होतीस. ते मला खायला मिळत होते.' ' महिन्यातून दोन वेळा खाल्ल्याने तुमचे कसे भागत होते ?' यावर तो म्हणाला, ' आगं, अंतराळात राहा-णाऱ्याला एकदा खाल्ले की पंध्ररा दिवस भूक लागत नाही '. हे ऐकून आम्हाला आश्चर्य वाटले. पुढे तो म्हणाला, ' तू पहिली माझी मोठी वहिनी होतीस. तू पहिली गेलीस तेव्हा तुलाही माझ्यासारखच झालं. तुझ्या भाच्यावर पोटच्या मुलाप्रमाणे तुझे प्रेम होते. जातांना तू त्याला म्हणाली होतीस की, मी तुझ्या पोटी जन्म घेणार आहे. मग तू माझ्या भाच्याच्या पोटाला गेलीस. तुला पाळण्यात घालून नाव ठेवले. तेव्हा तू तीन रात्रंदिवस सारखी रडत होतीस. माझ्या भाच्याने तुझे पहिले नाव काशिबाई ठेवले, तेव्हा तू रडायची थांबलीस. '

' माझ्या पहिल्या मायीनं नांव मागून घेतले. मोठ्या वहिनीने नाव मागून घेतले. मोठ्या भावाने नाव मागून घेतले. मला मंदार हे नांव आवडले म्हणून मी मागितले नाही. तसेच माझ्या बाळ्याने नांवबीव काही मागितले नाही. तो त्याच्या मायीच्या पोटात नऊ महिन्याऐवजीं तीन वर्षे लपून बसला होता. एक शिवगीर बाबा गोसावी आला. त्याने त्याला गर्भाच्या बाहेर यायला सांगितले, तेव्हा तो जन्मला. ' आजीने विचारले, ' बाळ्या कोण आहे ? ' ' आंग तुझा तो दादला. आता माऊलीच्या (ज्ञानेश्वरांच्या) पाया पडायला गेला आहे. ' ' त्यांचे नाव काशिनाथ आहे आणि तुम्ही त्यांना बाळ्या कसे म्हणता ? ' ' आगं, मी त्याला पहिलं बाळ्या, बाळू, बाळ असंच म्हणत होतो. ' असा हा माझा नातू. तो आता १० वर्षांचा आहे. त्याची आजी (माझी पत्नी) चार वर्षांपूर्वी स्वर्गवासी झाली तेव्हापासून आम्ही त्याला पूर्व-जन्मातील आठवणी अजिबात विचारीत नाही. ह्या आमच्या घरातील पुनर्जन्माच्या सत्य घटना आहेत.

का. शि. संकाये.

# उपसंहार

(१) 'अहिंसा परमो धर्म.' (२) आचारः परमो धर्मः ' (३) निराकार, एक ईश्वर, एकनामी उपासना ' या तीन तत्त्वाला सर्वश्रेष्ठ मानून मी हा 'विश्वधर्म' ग्रंथ लिहिला आहे. या विरुद्ध असेल त्याचे खंडन केले आहे.

'विश्वधर्म' ग्रंथ लिहिण्याचा मी विचार केला तेव्हा, मला असे वाटले होते की हा ग्रंथ भारतातील कोणाही धर्मपंथीय वाचकांना पट-णार नाही, आवडणार नाही. कारण यात मी प्रचलित सर्वश्रेष्ठत्व प्राप्त असलेल्या, वैदिक आर्य हिंदूधर्मातील हिंसावादी आचार विचार उपासना उपास्यदैवते आणि अहिंसावादी आचार, विचार, उपासना-उपास्यदैवते याचे खंडन केले आहे. हिंसावाद हा त्याज्यच आहे आणि अहिंसा वादा-तील देव-देवींचे आचार विचार आणि चरित्रे भ्रष्ट केली गेली आहेत. म्हणून ती अज्ञमानवापेक्षाही कनिष्ट झाली आहेत, असे माझे स्पष्ट मत आहे, आणि माझ्या त्या मताला धर्मग्रंथांचा आधार ही भरपूर आहे. ह्यालाच मी 'भारताचा अशुद्ध इतिहास' असे नाव दिले आहे. ते प्रकरण एक भाग एकमध्ये आले आहे.

भारताचा हा अशुद्ध इतिहास उत्तर ध्रुवीय वैदिक आर्य हिंदूंनी कलियुगारंभापासून चालू करून, त्याचा आतापर्यंत केलेला विकास, हजारो धर्मग्रंथांच्या प्रचार-प्रसाराने धष्टपुष्ट महाकाय बनवून, भारतीय सर्वधर्मपंथीय जनमानसात पक्का रुजवलेला आणि म्हणून भारतीय जनमानसाने सर्वश्रेष्ठ मानलेला, विश्वांतापर्यंत कोणालाही त्याचा भेद (वदल) करता येणार नाही असा दृढमूल झाला आहे. प्रस्तुत ग्रंथात मी त्याचे साधार खंडन केले आहे. म्हणूनच भारतातील कोणाही धर्म-पंथीयांना हा ग्रंथ आवडणार नाही असे मला वाटले होते. परंतु भारतातील सर्व धर्मपंथीय विद्वान पंडितांनी संत-महातांनी धर्मगुरू-जगद्गुरूंनी हिंसावादी, अहिंसावादी देव-देवी उपासकांनी या तसेच मुसलमान-बौद्ध जैन पंथियांनी 'विश्वधर्म' ग्रंथावर, अनुकूल अभिप्राय दिले त्यावद्दल मला आनंद होत आहे.



(२) भारताला इतिहासच नाही, असे इंग्रज व युरोपियन लोक

म्हणतात; व त्यांच्या ह्या मतानुसार त्यांनी भारताचा इतिहास लिहिला, हें आमचे भारतीय आधुनिक इतिहासकार, विद्वान्, पंडित, विद्यापीठीय पदवीधर त्याचीच 'री' ओढतात. महादाश्चर्यं होय. पण भारताला इतिहास आहे व तो ग्रंथबद्ध आहे. तो आम्ही डोळे उघडून बघतच नाही! भारताचा इतिहास, इंग्रजाप्रमाणे २००० वर्षांचा नसून तो दोन अब्ज वर्षांचा आहे. विश्वारंभापासूनचा भारताचा शुद्ध इतिहास, वेद पुराणादि ग्रंथाचे संशोधन करून श्री. पंडित प्रेमाभिक्षु यांनी 'भारत वर्षका शुद्ध इतिहास' या नावाचा ग्रंथ, इ. स. १९८२ मध्ये लिहून आमच्या हाती दिला आहे. तसेच 'शुद्ध रामायण', 'शुद्ध महाभारत', 'शुद्ध गीता', 'शुद्ध कृष्णचरित्र', 'शुद्ध हनुमान-चरित्र', 'शुद्ध मनुस्मृती' असे अनेक ग्रंथ महर्षी दयानंद सरस्वती अनुयायी विद्वान पंडितांनी लिहिले आहेत. त्यात त्यांनी भारतीय आर्यांची शुद्ध संस्कृती कशी होती, याची यथार्थं माहिती दिली आहे.

जेमतेम दोन हजार वर्षांचाही ज्यांचा इतिहास नाही, अशा इंग्रजांच्या मताधारे निर्माण केलेल्या इतिहासाला श्रेष्ठ मानणाऱ्या भारतीय इतिहासकारांनी दोनशे कोटी वर्षांच्या भारतीय इतिहासाचा, असंभाव्य चमत्कारांनी, काल्पनिक भाकड कथांनी बृहत्काय बनविलेल्या, रामायण, महाभारत पुराणादी ग्रंथांचा, हिंसातत्त्वी ग्रंथांचा विचार करावा आणि भारताची शुद्ध संस्कृती कशी होती ते शोधून काढून, हजारो वर्षांची दृढमूल केलेली मानव घातकी अंधश्रद्धा व भ्रष्टचरित्री देव-देवींच्या निंद्य उपासनेचा विचार करावा असे मला वाटते. प्रकरण एक भाग दोनमध्ये भारताचा शुद्ध इतिहास अगदी थोडक्यात मी दिला आहे.

(३) काही विषयांना ग्रंथाधार द्यायचे राहिले आहेत. ते खाली लिहीत आहे. भारतीय आर्य मास खात नव्हते, तसेच मद्य पीत नव्हते. न राघवो मांस भुङ्क्ते न चैव मधु सेवने ।। शुद्ध वाल्मिकी रामायण. सुंदरकांड ३६।४१ ।। भारतीय आर्य राजे मृगया (शिकार) करीत होते. पण ते मासाहार करीत नव्हते. वनातील हरिणादी गरीब पशू आदि प्राण्यांचे आणि ऋषीमुनींचे संरक्षणाकरिता व्याघ्रादी हिंस्र व क्रूर पशू मारीत होते. याची सविस्तर माहिती शुद्ध वाल्मिकी रामायण

ग्रंथात पृष्ठांक ६३९ ते ६४१ मध्ये आहे. भारतीय आर्यांच्या या शुद्धाचाराला बाजूला सारून, वैदिक आर्य हिंदूंनी, भारतीय आर्य राजे स्वतःच्या मासाहाराकरिता मृगया करीत होते असे रसभरीत, सविस्तर वर्णन रामायण, महाभारत, पुराणादी ग्रंथात केले आहे. तसेच यज्ञ यागात पशू बळी देणे, मद्य पिणे, असे निंद्य व मानवघातकी प्रकार वैदिक आर्यांनी आपल्या भ्रष्टाचार, हिंसाचाराच्या समर्थनाकरिता वेदादि सर्व ग्रंथात घुसडले आहेत.

(४) वि. ध. पृष्ठांक १३१ ते १३५ मानव देवांची व मानवांची आयुष्य मर्यादा १०० वर्षांची आहे. वेदातील बहूदेव उपासना या विषयाला 'वेदप्रकाश पंचमहाभूते' या ग्रंथाचा आधार आहे. वेद अपौरुषेय नाहीत, पुरुषकृत आहेत याला आधार डॉ. दप्तरींचा 'धर्म-मीमांसा' 'वेदित संस्कृतीचा विकास,' 'मानवाने केलेला ईश्वराचा शोध' 'भारतीय इतिहास' या ग्रंथांचा आहे. या शिवाय अनेक ग्रंथात याला आधार आहेत.

'विश्वधर्म' ग्रंथातील पान क्र. १०१ मध्ये प्रथम मानवाचे शरीर लहान बालकाप्रमाणे नव्हते. ते तरुण अवस्थेत होते असे लिहिले आहे त्याला आधार ऋग्वेदात आहे.

**मनुर्वैवस्वत-ऋषि-विश्वेदेव, देवता, गायत्री-छंद.**
**नहि वो अस्त्यर्भको देवासो न कुमारकः ।**

विश्वे सतोमहान्त इत् ॥ ( ऋ. ८।३०।१ ) ( लघुऋग्वेद, कोलंगडे कृत ) अर्थ-देव हो, तुम्हामध्ये कोणी बालक नाही आणि कोणी कुमारही नाही. तुम्ही सर्व सारखेच नित्य तरुण आहां.

वेदमंत्र अनेक ऋषीनी वेगवेगळ्या काळांत लिहिले आहेत. ती मानवाच्या मनाची भाषा आहे.

वेद धर्मग्रंथ नाहीत याला आधार वेदातच आहे. अहिंसा हा धर्म आहे. हिंसा अधर्म आहे. आणि वेदांत हिंसा आहे. त्यामुळे वेद धर्मग्रंथ नाहीत.

(५) व्यासांपूर्वी एकच पुराण होते. याला आधार कल्याण मासिकाचा विशेषांक 'संक्षिप्त शिवपुराण' मध्ये पृ. २८ 'शिवपुराणाचा-परिचय या लेखात, पूर्वकाळी शिवाने एक लक्ष श्लोकाची 'शिवपुराण'

रचना केली होती. पुढे द्वापार युगात व्यासाने त्याचा संक्षेप करून चोवीस हजार श्लोक केले. व्यासाच्या अगोदर एकच पुराण होते. याला आधार 'धर्मशास्त्राचा इतिहास' ले. डॉ. काणे, 'महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळा'ने प्रकाशित केला आहे. त्यात खंड १ पृ. ५३ पूर्वयुगात एकच पुराण अस्तित्वात होते असे दर्शविणारे पुराणात अनेक श्लोक आहेत. ।। पुराणमेकमेवासी तदा काल्पांतरेनघ ।। (मत्स्यपुराण अ. ५३) खंड २ पृ. ३४८ (मत्स्य पुराण ५३. ३-११); वायुपुराण (१.६०-६१) यांच्यासारख्या पुराणातील अनेक श्लोक आहेत, की आरंभी एकच पुराण होते, असे त्यात प्रतिपादिले आहे.

त्या एका पुराणाचे २४००० श्लोकाचे व्यासांनी १० भाग केले. याला आधार–

अष्ठादश पुराणेषु देशभिर्गीयते शिवः।
चतुर्भिर्गीयते विष्णु द्वाभ्यां शक्तिश्च विघ्नपः ।।

(स्कंदपुराण के. खं. अ. १)

सध्या प्रचलित असलेल्या १८ पुराणांत १० शिवपर आहेत. त्यांची प्रचलित नावे वेगळीच आहेत. त्यात मत्स्य-कूर्मादी अवतारी देवांची नावे आहेत. व्यासाच्या काळात अवतार हा प्रकार नव्हता आणि त्यात अवतारी नावे नव्हती. व्यासांनी ठेवलेली नावे शिवपर आहेत ती अशी : (१) शिवपुराण, (२) लिंगपुराण, (३) स्कंद पुराण, (४) शिवधर्म पुराण, (५) पशुपति पुराण, (६) नंदिकेश्वर पुराण, (७) सांव पुराण, (८) माहेश्वर पुराण, (९) आदि पुराण, (१०) ब्रह्मांड पुराण. या दहा पुराणांची श्लोकसंख्या फक्त २४००० व्यासांची होती. 'संक्षिप्त शिवपुराणांक'मध्ये पृ. ३१३ मध्ये पुराणे चार प्रकारची दाखविली आहेत. (१) महा पुराण, (२) पुराण, (३) अति पुराण, (४) उप पुराण. या प्रत्येक प्रकारांत १८ अशी संख्या दाखवली आहे. व्यासानंतर व्यासांची १० पुराणे सोडून ६२ पुराणे वैदिक आर्यांनी व्यासांच्या १० पुराणांधारेच निर्माण केली आहेत. एकंदर ७२ पुराण संख्या होती. त्यातील २४ पुराणे उपलब्ध आहेत आणि अधिक १९ पुराणांची फक्त नावे आहेत. बाकीची नावे,

किंवा ग्रंथ उपलब्ध नाहीत.

अवतार-वाद, निरर्थक पुराण-वाद, चमत्कार-वाद, मूर्ति-पूजा, पितृतर्पण, अशौच अशा मानवघातकी प्रकारांचे खंडन वेदाधारे करणारे महर्षि दयानंद सरस्वती व त्यांच्या आर्य समाजातील अनेक पंडित महापंडितांनी लिहिलेले शेकडो ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यातील बरेच ग्रंथ माझेकडे आहेत. त्याची नावे 'विश्वधर्म' ग्रंथात साधार ग्रंथाच्या यादीत आहेत.

## मोक्ष विचार

(६) 'विश्वधर्म' ग्रंथात पृ. १४२–१४३ मध्ये 'शैवागमाचा मोक्ष' हा छोटा लेख श्री. बा. मा. खुपेरकरशास्त्री (कोल्हापूर) यांनी लिहिलेल्या 'शैवागम आणि ज्ञानेश्वर' ग्रंथातील पृ. ६९–७० च्या आधारे लिहिला आहे. त्याचा थोडा विस्तार, वेद, शास्त्रे, उपनिषदे या ऋषीमुनींनी लिहिलेल्या व संत-महात्म्यांच्या वचनाधारे करीत आहे.

जीव कोणतेही सुख भौतिक शरीराधारेच भोगतो; त्याचप्रमाणे मोक्षसुखही भौतिक शरीराधारेच भोगतो.

### १. ऋग्वेद

ये यज्ञेन दक्षिणाया समक्ता इंद्रस्य सख्यममृतत्व मानश ।।
तेभ्यो भद्रमाङ्गिरसो वो अस्तु प्रति गृभ्णीत मानवं सुमेधसः ।।
(ऋ. ८।२।१।१)

जे (यज्ञेन) ज्ञानयज्ञ करून (दक्षिणा) सर्वस्व परमेश्वराला अर्पण करतात, ते मुक्त झालेले लोक आनंदात रममाण असतात. ज्यांचे (इंद्रस्य) परमेश्वराशी सख्य होऊन जे मोक्षाला गेलेले असतात, त्यांनाही (भद्रम्) अत्यंत सुख मिळते; (अंगिरसः) मुक्त झालेल्यांचे प्राण (सुमेधसः) बुद्धीची शक्ती वाढविणारे होतात; असे पूर्वमुक्त झालेले पुरुष (मानवम्) आता मुक्त होणाऱ्या पुरुषाला (प्रतिगृभ्णीत) आपल्या जवळ घेतात.

### २. यजुर्वेद

स नो बंधुर्जनिता स विधाता धामानि वेद भुवनानि विश्वा ।।
यत्र देवा अमृतमानशानास्तृतीये धामन्नध्यैरयन्त ।। (यजु. ३२/१०)

तो परमेश्वर आमचा हितकर्ता, सुखाचा उत्पादक, जगत्कर्ता व आमचा पालक आहे. तोच सर्वांची उत्पत्ती करणारा व सर्वांना यथायोग्य रीतीने जाणणारा असा आहे. त्याच (तृतिये) अत्यंत सुखदायी परमेश्वराच्या आश्रयाने विद्वान लोक मोक्षसुखाचा उपभोग घेतात.

### ३. शतपथ ब्राह्मण कांड (१४-६-८)

स होवाच ।। एतद्वै तदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिदन्त्यस्थूलमनण्व ह्रस्वमदीर्घमलोहितमस्नेहमच्छायमतमो ऽ वाय्वनाकाशमसङ्गमस्पर्शमगंधमरसमचक्षुष्कमश्रोत्रमवागमनो ऽ तेजस्कमप्राणममुखमनामागोत्रमजरममरमभयममृतमरजोऽशब्दमविवृतमसंवृतमपूर्वमनपरमनन्तरमबाह्यं न तदश्नाति कञ्चन न तदश्नाति कश्च न ।।

याज्ञवल्क्य म्हणतो- हे गार्गी परब्रह्म हे नाश, स्थूल, सूक्ष्म, लघु, लाल, स्निग्ध, छाया, अंधःकार, वायु, आकाश, शब्द, स्पर्श, गंध, रस, नेत्र, कर्ण, मन, तेज, प्राण, मुख, नाम, गोत्र, वृद्धावस्था, मरण, भय, आकार, विकार, संकोच, पूर्व, अपर, आत व बाहेर इत्यादी दोष व गुण याहून भिन्न आहे. ते कोणाला साकार वस्तुप्रमाणे प्राप्त होऊ शकत नाही, किंवा कोणाला ते मिळणारही नाही. कारण ते इंद्रियांना अविषय आहे.

### ४. योगदर्शन

अविद्यास्मितारागद्वेषाभिनिवेशाः पंच क्लेशाः ।।१।।
अविद्याक्षेत्रमुत्तरेषां प्रसुप्ततनुविच्छिन्नोदाराणाम् ।।२।।
अनित्याशुचि दुःखानात्मसु नित्यशुचि सुखात्मख्यातिरविद्या ।।३।।
दृक्दर्शन शक्त्योरेकात्मते वास्मिता ।।४।। सुखानुशयी रागः ।।५।।
दुःखानुशयी द्वेषः ।।६।। स्वरसवाही विदिषोऽपितथारूढोऽभिनिवेशः ।।७।।
योग द. १।२ सूत्र ३ ते ९

अविद्या, गर्व, प्रीती, द्वेष व अभिनिवेश या पाच क्लेशांच्या योगाने जीवाला बंधन झालेले असते. ।।१।। हे पाच प्रकारचे क्लेश जीवाच्या बंधाला कारण आहेत. म्हणून यथार्थ ज्ञान मिळवून अविद्यादीं क्लेशांचे निराकरण करण्याचा जीवाने प्रयत्न करावा ।।२।। ज्यावेळी अविद्यादिक क्लेश दूर होऊन ज्ञान मिळते, तेव्हा जिवाची सर्व दुःखे नाहीशी होऊन त्याला मोक्ष मिळतो. ।।३।। ऐहिक सुखाविषयी जीव

विरक्त झाला असता ह्या सर्व दोषांचा नाश होतो व त्याला मुक्ती मिळते. ।।४।। बुद्धी व जीव यांची पूर्ण शुद्धी झाली म्हणजेही मोक्ष प्राप्त होतो. ।।५।। ज्यावेळी आत्मा विवेकाने सर्व दोषांपासून दूर राहून ज्ञानाच्या बाजूला जातो तेव्हा त्याचे चित्त मोक्षातील आनंदाच्या संस्कारांनी पूर्ण होऊन जाते. ।।६।।

**मोक्षाचें लक्षण:**– पुरुषार्थाच्या योगाने सत्त्व-रज-तम हे गुण व त्यांची कार्ये यांचा नाश करून, आत्म्यामध्ये विकास करणे व त्याला त्याच्या स्वरूपामध्ये ठेवणे, या स्थितीला मोक्ष-मुक्ती- कैवल्य असे म्हणतात.

## ५. न्यायदर्शन

दु:ख-जन्म-प्रवृत्ति दोष मिथ्याज्ञानानामुत्तरोत्तरापाये तदनंतरापयादपवर्ग: ।।१।। बाधना लक्षणं दु:खमिति ॥२।। तदात्यन्त विमोक्षोऽपवर्ग: ।।३।। न्यायदर्शन १।१ सू. २।२१।२२ ॥

मिथ्या ज्ञानाचा नाश झाला असता सर्व दोष नाहीसे होतात. दोषांचा नाश झाला म्हणजे (प्रवृत्ति) अधर्म, अन्याय, विषयासक्ती इत्यादींचा नाश होतो. प्रवृत्तिमूलक वासना नाश पावल्या म्हणजें सर्व दु:खांचा नाश होतो. सर्व दु:खांचा पूर्ण अभाव यालाच मोक्ष असे म्हणतात.

## ६. कठोपनिषद

यदा पंचावतिष्टन्ते ज्ञानानि मनसासह ।। बुद्धिश्च न विचेष्टते तामाहु: परमां गतिम् ।।१।। तां योगमिति मन्यन्ते स्थिरामिंद्रिय धारणाम् ।। अप्रमत्तस्तदा भवति योगोहि प्रभवाप्ययौ ।। २ ।। यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदिश्रिता: ।। अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ।।३।। यदा सर्वे प्रभिद्यंते हृदयस्नेह ग्रंथय: ।। अथ मर्त्योऽमृतो भवत्येवावदनुशासनम् ।।४।। कठोप. व. ६ मंत्र १०–११–१४–१५.

ज्यावेळी मनासह पंच ज्ञानेंद्रिये परामात्म्याचे ठिकाणी स्थिर होतात व तेथेच रममाण होतात व जेव्हा बुद्धीही इतर चेष्टा करीत नाही त्या स्थितीला परागती अर्थात मोक्ष असे म्हणतात. ।। १ ।। या इंद्रियाच्या स्थिरतेला योग असे विद्वान् लोक म्हणतात; या स्थितीत प्रमाद होत नाहीत. कारण योगापासून शुद्ध व उत्तम गुणांची उत्पत्ती

व अशुद्ध दोषाचा नाश होतो. ॥ २ ॥ हृदयातील सर्व वाईट वासना नाहीशा होतात, त्या वेळीच मनुष्य मोक्षाला मिळवतो. मोक्षासाठी देशांतरी जाण्याची मुळीच गरज नाही. (अत्र ब्रह्म.) परमेश्वर सर्वत्र व्याप्त झालेला व तोच मोक्षरूप आहे. अर्थात सर्वत्र मोक्षपद भरलेले आहे. (ते मिळवण्याचा प्रयत्न मात्र झाला पाहिजे.) ॥ ३ ॥ ज्यावेळी हृदयातील अविद्यादी बंधनांच्या सर्व गांठी तुटून नाहीशा होतात तेव्हाच मोक्ष मिळतो. ॥ ४ ॥

### ७. मुंडकोपनिषद

जीवाला मुक्ती एकाच जन्मात मिळते का अनेक जन्मात ?

भिद्यते हृदयग्रंथि च्छिद्यंते सर्व संशयाः ॥
क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ मुंडको. १।२।२८ ॥

जेव्हा जीवांच्या हृदयातील अविद्या व अज्ञान नष्ट होते, सर्व संशय दूर होताव व जेव्हां दुष्ट कर्मांचा नाश होतो तेव्हाच तो मुक्त होतो.

### ८. तैत्तिरीय संहिता

सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म । यो वेद विहितं गुहायां परमे व्योमन् ॥
सोऽश्नुते सर्वान् कामान् सह । ब्रह्मणा विपश्चितेति ॥ तैत्ति. आनंद. ॥

जो जीवात्मा आपल्या बुद्धिमध्ये व आत्म्यामध्ये असणाऱ्या सत्य, ज्ञान व अनंत आनंदयुक्त परमात्म्याला जाणतो, तो त्या सर्व व्यापक ब्रह्मामध्ये स्थिर होऊन, त्या अनंत विद्यायुक्त ब्रह्मासह सर्व कामनांची प्राप्ती करून घेतो. अर्थात ज्या ज्या आनंदाच्या कामना त्याला होतात त्या त्या त्याला अडथळ्यावाचून प्राप्त होणे, यालाच मुक्ती असे म्हणतात. यालाच सुख विशेष स्वर्ग म्हणतात, आणि यालाच मोक्ष म्हणतात.

### ९. परम रहस्य

परम रहस्य अध्याय ४ मध्ये शिव पार्वतीला मोक्षाचे स्वरूप सांगतात .

विकल्परहित शांतो निरहंकार एवच ।
तद्रूपो ब्रह्मसंबंधी मुक्तात्मा भवति ध्रुवम् ॥ ४।२ ॥

सर्व संकल्प-विकल्प जेथ निमती । निरहंकार सदा शांति ॥
तद्रूप ब्रह्मचि होऊनी असती । तोचि मोक्ष पै देवी ॥ ३ ॥
मी परब्रह्म निश्चयेंशी । नास्ती देखे भेदासी । आपणाविण न देखे

कवणासी । तोचि मोक्ष जाणावा ॥ ४ ॥ इंद्रियव्यापारा बोळवण । ध्यान धारणा निमाले साधन । निमाली बुद्धी मन होय उन्मन । तोचि मोक्ष जाणावा ॥ ५ ॥

**शंका (प्रश्न)**: मुक्तावस्थेत जीव ईश्वरात मिळून जात नाही का ?

**उत्तर** : नाही, तो वेगळाच राहातो. कारण तो परमेश्वरांत मिळून गेला तर मुक्तीचे सुख कोण भोगणार ? जीवानें मुक्ती मिळवण्याकरिता अनेक जन्मांत अनेक साधने करून जर तो मुक्तीच्या फलाचा उपभोग घेण्यास वेगळा राहिला नाही तर, त्याने केलेल्या साधनांचा, कष्टांचा उपयोग तरी काय ? ईश्वरात जीवाचा लय होणे ही मुक्ती नसून तो त्याचा प्रलयच होय. जीवाचा असा प्रलय होत नाही. मुक्तावस्थेतही तो वेगळाच राहून मुक्तीचे सुख भोगतो. जीव धर्माचरण व उत्तम कर्म करतो म्हणून त्याला मुक्ती मिळते. जीवाची दुःखमुक्त सुखावस्था तोच मोक्ष.

**शंका (प्रश्न)**: ज्याला कैवाल्यप्राप्ती झाली आहे, जे मुक्त झाले आहेत, त्यामध्ये अविद्यादी क्लेश नसल्यामुळे त्यांना ईश्वर असे म्हणता येईल की नाही ? **उत्तर**: नाही. कारण मुक्त होण्यापूर्वी ते बंधनामध्ये होते. मुक्ती सुख भोगताना ते दुःखनिर्मुक्त सुख भोगतात. तात्पर्य ते तीनही कालांमध्ये मुक्त नसल्यामुळे त्यांना ईश्वर असे म्हणता येणार नाही.

जीवाचा आणि कर्मांचा अन्योन्य संबंध आहे. प्रत्येक जीव कर्म करीतच असतो. त्या कर्माचे बरेवाईट फल भोगतच असतो. बद्धतेतील दुःख व मुक्तावस्थेतील सुख भोगण्याकरिता देहाशिवाय साधनच नाही. हा साधासोपा अल्पज्ञान्याला सुद्धा पटणारा मोक्षाचा प्रकार शैवागमाचा तसाच वेदोपनिषदांचा, ऋषिमुनींचा, संतमहात्म्यांचा आहे. अनादी कालच्या ऋषीमुनींनीही देहाधारेच मोक्ष सुख भोगले आहे. म्हणून त्यांनी मोक्षाची साधने लिहून ठेवली आहेत. वेदांत्यांच्या मताप्रमाणे ईश्वरांत विलीन झालेल्यांना मुक्तीची साधने लिहिता येतील का.? कारण तो भौतिक शरीरधारी नाही. वेदांत्यांचा मोक्ष ज्ञानेश्वर-तुकारामादी संतांनाही मान्य नाही.

मोक्षपदे तुच्छ केलिया कारणें । मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा

काय सायुज्यता मुक्तीची ही चाड. मोक्षसुखा हाणू लाथा.
नलगे देवा तुझे आम्हासी वैकुंठ सायुज्यता पद न लगे मज
मोक्ष आम्हाघरी कामारी या दासी. न करावे मुक्त आता मज.
मोक्ष देवापासी नाही । लटिक्या घाई विव्हळत.

शेवटी तुकाराम महाराज म्हणतातः याची देही, याची डोळा। भोगू मुक्तीचा सोहळा ॥ मुक्तीचा आनंद भोगीत भोगीत, तो दुसऱ्यालाही मुक्तीचे मार्ग दाखवतो (शिकवतो), आणि लिहूनही ठेवतो. सारांश वेदांत्याचा मोक्ष चुकीचा आहे.

दुःखमुक्त होण्याकरिता जीव श्रेष्ठांनी सांगितलेले कर्म करतो. चांगल्या कर्माचे फल चांगलेच मिळते असा अनुभव आहे. त्याच्या चांगल्या, वाईट कर्माचे फल तो स्वतःच निर्माण करतो आणि स्वतःच भोगतो. त्याच्या चांगल्या-वाईट कर्माचे फल दुसरा कोणीही देत नाही. हाही सिद्धांत कोणी नाकारू शकणार नाही. वाईट कर्माचे फल दुःख आहे. त्यात कोणीही हस्तक्षेप करू शकत नाही. त्याचे माता-पिता, पुत्र-पत्नी, इष्ट-मित्र, सगे-सोयरे, सर्वांत श्रेष्ठ मोक्ष-मार्ग दाखवणारा गुरूही त्याला दुःखमुक्त करू शकत नाही. तसेच चांगल्या कर्माचे फल दुःखमुक्त सुख दुसरा कोणीही देऊ शकत नाही. हा व्यवहारी सिद्धांत आहे. त्याप्रमाणेच ऋषिमुनींचा, धर्मशास्त्रांचाही सिद्धांत आहे. ज्याने करावे त्यानेच भोगावे; जसे करावे तसे भोगावे.

भौतिक देहाशिवाय जीवाला, परमात्म्याला, मनाला, इंद्रियांना तसेच सुखदुःख भोगायला अस्तित्वच नाही. असे असता जीवांना सुखदुःखाचे फल देणारा कोणी तरी 'ईश्वर' नावाची सर्वश्रेष्ठ वस्तू आहे आणि ती जीवांच्या बऱ्या वाईट कर्माचे फल सुख-दुःख देते म्हणणे योग्य वाटत नाही. सदाचाराने मोक्ष, अनाचाराने नरक. कर्म करायला जीव स्वतंत्र आहे. सत्कर्म करील तो मोक्ष मिळवील. असत्कर्म करील तो अधोगती मिळवील. अधोगती अथवा मोक्ष देणारा दुसरा कोणीही नाही.

वेदांत्यांची मुक्तीची कल्पना, दुःख भौतिक देहाने भोगतो आणि सुखरूपी मोक्ष जीवांना भौतिक देहाने भोगायला मिळत नाही. ते भोगायला अशरिरी अदृश्य वस्तू 'ईश्वर' त्यात विलीन व्हावे लागते. हे

सद्सद्विवेक बुद्धीला पटत नाही; नव्हे हे चुकीचे आहे.

## द्विरुक्ती दोष विचार

(७) कुठल्याही ग्रंथात द्विरुक्ती असणे हा दोष आहे, असे मानण्याची पद्धत आहे. माझ्या मते द्विरुक्ती म्हणजे, एक विषय दुसऱ्या ठिकाणी जसाचा तसा मांडणे दोष होय. परंतु चालू विषयाला मागील विषयाचा आधार घ्यायचा प्रसंग आल्यास, सारांश रूपाने घेतला तर त्याला द्विरुक्ती दोष मानता येणार नाही. अशी द्विरुक्ती केल्याशिवाय एकही ग्रंथ सिद्ध करणे जमणार नाही. कुठलाही ग्रंथ पहा, त्यात द्विरुक्ती आढळून येतेच. रामायण, महाभारत, उपनिषदे, पुराणे या सर्व वाङ्मयात द्विरुक्ती आलेली आहेच. परंतु सर्वश्रेष्ठ ईश्वरमुखोद्भव, ईश्वरप्रेरित, ईश्वरनिश्वसीतच नव्हे तर, सृष्टी निर्माण व्हायच्या अगोदर परमेश्वराने निर्माण केले आहेत, असे मानलेल्या वेद वाङ्मयातही, वर उल्लेखिलेल्या वाङ्मयापेक्षा अधिक द्विरुक्ती आहे. द्विरुक्तीला दोष मानल्यास वेद निर्माण करणारा परमेश्वरही दोषी आहे असे मानावे लागेल. द्विरुक्ती केल्याशिवाय ग्रंथ सिद्ध करता येत नाही. द्विरुक्तीशिवाय ग्रंथ नाही आणि द्विरुक्तीशिवाय ग्रंथ सिद्ध होत नाही.

## वेदविचार

(८) वेद हे मोठे सोयीचे ग्रंथ आहेत. भिन्न भिन्न ऋषींनी भिन्न-भिन्न काळी, भिन्न भिन्न विषयांवर त्यांच्या शुद्ध अशुद्ध मनाला वाटले ते लिहिले, आणि पुढच्या पिढ्यांना आधाराची व्यवस्था करून ठेवली. पूर्व मीमांसक, उत्तर मीमांसक, नैयायिक, वैशेषिक, सांख्य वगैरे सर्वांना आपल्या मतांना—परस्पर विरुद्ध मतांनाही वेदांत बैठक सापडते. जैन, बौद्धांनाही अहिंसा, कर्म वगैरे भानगडी तिथे सहज मिळतात. शेवटी नास्तिक, चार्वाकांनाही वेदांची कवाडे उघडी आहेत !

भ्रष्टाचाराला, बेताल वागणुकीला, मांसाहाराला, मद्यपानाला, परस्त्रीगमनाला, सत्ता मिळवण्याकरिता हजारो गावे लुटण्याला, मोठ्या शहरापासून ते लहान लहान खेडी उध्वस्त करून राखरांगोळी करण्याला, लाखो स्त्रिया भ्रष्ट करायला, काल्पनिक स्वर्गादी सुखे मिळविण्या-करिता कोटयवधी निरपराधी पशुहिंसेला, वैदिक आर्य हिंदुधर्मातील

देव-देवींच्या नावाने कोटचवधी पशुहिंसेला, हिंसाचारी जाती, धर्म, पंथांना, जादुटोण्याला, ब्रह्मा, विष्णु, महेशादी पापाचारी देवांना, शाक्तांना, मत्स्य-कूर्मादी अवतारांनाही वेदांत आधार आहे. वर उद्धृत केलेल्या सर्व गोष्टी वैदिक आर्य हिंदू धर्मात आहेत आणि त्याला आधार वेद आहेत.

धर्म म्हणजे मानवाने ऐहिक सुख मिळविण्याचे व ईशप्राप्तीचे व्यवहार्य साधन आहे. जगातील सर्व धर्म-पंथांच्या ईशप्राप्तीच्या साधनांत निराकार, एकेश्वर, एकनाम आणि अहिंसा ही तत्त्वे प्रामुख्याने आहेत, हे सर्व जगाला माहीत आहे; आणि वेदांत बहुईश्वर, बहुनाम, आणि हिंसा असल्यामुळे हिंदू-धर्म सोडून जगातील हिंसाचारी धर्म, पंथ व भारतांतील अहिंसाचारी धर्म, पंथांचे वेद हे धर्मग्रंथ नाहीत.

वर उद्धृत केलेल्या मानवघातकी सर्व गोष्टींना वेदांत आधार आहे. अशा वेदांना अपौरुषेय, ईश्वरनिश्वसित, ईश्वरप्रेरित, ईश्वरमुखोद्भव, धर्मग्रंथ, ईश्वरी ज्ञान आहे आणि ते सर्व जगांतील धर्म ग्रंथापेक्षा श्रेष्ठ आणि आद्य ग्रंथ आहेत, असे वैदिक आर्य (हिंदू) म्हणतात. तसेच वेदोद्धारक विद्वान् पंडित, आधुनिक महर्षी दयानंद सरस्वतीहीं म्हणतात की, वेद ईश्वरप्रेरीत, अपौरुषेय, ईश्वरी ज्ञान आहेत. आणि त्यांनी निर्माण केलेला 'आर्य समाज,' त्या आर्य समाजातील महान विद्वान पंडित महर्षी दयानंदांचाच कित्ता गिरवतात.

असे मानवघातकी वेद अपौरुषेय, ईश्वरप्रेरित, ईश्वर निश्वसित, ईश्वर मुखोद्भव असू शकतील का? मानवाशिवाय कोणता तरी ग्रंथ निर्माण झाला आहे का? श्वासोच्छ्वास करायला ईश्वर शरीरधारी आहे का? हिंसा करायला ईश्वर प्रेरणा देईल का? उत्तर—असे होणे शक्य नाही.

वेद अपौरुषेय नाहीत, ईश्वरनिश्वसित नाहीत, ईश्वरप्रेरित नाहीत, तसेच ईश्वर मुखोद्भव नाहीत. ते मानव मनाचे शुद्धाशुद्ध विचार आहेत व मानवमनाची शुद्धाशुद्ध भाषा आहे. वेदांत हिंसा आहे. हिंसा ही अधर्म असून मानवघातकी आहे, हे कोणाही विचारवंताला मानावेच लागेल.

मानवघातकी हिंसादी अनेक प्रकाराला प्रेरणा देणाराला ईश्वर

मानावे का ? अशा मूर्खं ईश्वराला विश्वनिर्माता, विश्वपिता, विश्व-व्यापक, विश्वंभर, विश्वात्मा म्हणता येईल का ? नाही, नाही, नाही. त्रिवार नव्हे, सहस्रवार नाही. वेदात काही वंदनीय, मानवकल्याणकारी विचार आहेत पण वेद धर्मग्रंथ नाहीत. म्हणूनच वीरशैवांना वेद मान्य नाहीत.

वेदात जे वंदनीय आहे, ते अखिल मानव जातीचे कल्याण कर-णारे आहे. 'नीतीतत्त्वे' ती मला ही (लेखकाला) मान्य आहेत ते 'विश्वधर्म' ग्रंथात पृ. - १५८ ते १८१ मध्ये लिहिले आहे. निंदनीय, मानवघातकी आहे ते 'बहुदेव, बहुनामी उपासना व काल्पनिक स्वर्गादी सुखे मिळविण्याकरिता यज्ञयागांत निरपराध पशू बळी देणे इत्यादी प्रामुख्याने असल्याने वेद धर्मग्रंथ नाहीत व वीरशैवांना ते मान्य नाहीत.

## (९) यज्ञ-विचार (थोडक्यात)

| | भारतीय आर्य | | उत्तरध्रुवीय आर्य |
|---|---|---|---|
| १ | यांची यज्ञ कल्पना श्रेष्ठ आहे. | १ | यांची यज्ञ–कल्पना कनिष्ट आहे. |
| २ | यांच्या यज्ञाने मानव, पशू-पक्षादी प्राण्यांचे कल्याण होते. | २ | यांच्या यज्ञ–कल्पना सर्वंच प्राण्यांना घातक आहेत. |
| ३ | यांची यज्ञकल्पना कल्पित स्वर्गादी सुखे मिळविण्याची नाही. | ३ | यांची कल्पना कल्पित स्वर्गादी सुखे मिळविण्याची आहे. |
| ४ | यांच्या यज्ञाने रोगजंतू नष्ट होतात. | ४ | यांच्या यज्ञाने रोगजंतू निर्माण होतात. |
| ५ | यांच्या यज्ञांत मानवाच्या निरोपयोगी झालेले अन्न-धान्य, तूप, वनौषधींचे वाळ-लेले काष्ट आणि काही सुगंधी वस्तूंचा उपयोग करीत होते. ते मानवादी प्राण्यांना कल्याण-कारी होते. | ५ | यांच्या यज्ञांत जिवंत निर-पराधी पशू मारून त्यांच्या विविष्ट ठिकाणचे काही थोडे मांस व मद्यादी पदार्थांचा उपयोग करीत होते, ते मान-वादी प्राण्यांना घातक होते. |

| | |
|---|---|
| ६ यांचे यज्ञ वैदिक आर्यांनी बंद पाडले. त्याला आज ५००० (पाच हजार) वर्षे झाली. | ६ यांचे यज्ञ प्रथम उपनिषदांनी कमी केले. नंतर बौद्ध-जनांनी बंद पाडले. |

वैदिक आर्यांची यज्ञ-कल्पना अग्नीत अर्पण (जाळलेली) केलेली वस्तू कल्पित स्वर्गातील कल्पित देवतांना स्वर्गात मिळते. आणि त्या देवता यज्ञ करणाऱ्या यजमानांना आपल्या मृत्युलोकांत अनंत पटीने फले देतात अशी भ्रामक स्वरूपाची आहे.

ज्याप्रमाणे कल्पित अंतराळातील पितृलोकात, मृत्युलोकांत मरण पावलेल्या पितरांना, मृत्युलोकांतील ब्राह्मणांना दान दिलेल्या वस्तू अंतराळात मिळत नाहीत; त्याप्रमाणे यज्ञात जाळलेली वस्तू स्वर्गातील देवतांना मिळत नाहीत. अंतराळात पितृलोक, स्वर्ग, स्वर्गात देवता, त्या देवतांना अग्नीने वस्तू नेऊन देणे, त्या वस्तूंच्या अनंतपट फले स्वर्गीय देवता मृत्युलोकातील मानवांना देतात, या सर्व कल्पना उत्तर ध्रुवीय धूर्त वैदिक आर्य पुरोहितांनी मांसाहार मद्यपानाच्या समर्थना-करिता निव्वळ कपोलकल्पित भ्रामक कल्पना निर्माण केल्या आहेत.

अग्निविषयी विचार केला तर, अग्नी ही वस्तू मानव, पशू, पक्षी आदी प्राण्यांप्रमाणे हालती, चालती, बोलती, जिवंत देहधारी, धावणारी, उठणारी वस्तू नाही. त्यामुळे अग्नीत जाळलेली (अर्पण केलेली) वस्तू, पृथ्वीवरील किंवा कल्पित अंतराळातील देवतांना नेऊन पोहोचती करता येणार नाही. अग्नीचा नैसर्गिक धर्म (स्वभाव) त्यांत टाकलेली कसलीही वस्तू जाळून भस्म करणे. याशिवाय अग्नी दुसरे कोणतेही कर्म करू शकत नाही. अग्नीत मद्यमांसादी दुर्गंधयुक्त वस्तू जाळल्याने, वायू दूषित होऊन, रोगजंतू निर्माण होऊन, मानवादी सर्व प्राण्यांच्या नाशाला कारणीभूत होतो. दुर्गंधी वस्तूपासून रोगजंतू निर्माण होतात असा सर्वत्र अनुभव आहे.

अंतराळात स्वर्गादी ठिकाण नाही. तसेच देवता वगैरे काहीही नाहीत. आणि त्या देवतांना अग्नी कोणतीही वस्तू नेऊन देत नाही. यज्ञाचा, अग्नीचा विचार केल्यास कोणाही अज्ञ माणसाला कळेल की, हे सर्व खोटे आहे.

भारतीय आर्यांच्या यज्ञांत अन्नधान्य, घृतादी आणि वनौषधीं, काष्ट, काही सुगंधी वस्तू जाळल्याने, त्या वस्तूंच्या धूम्रादी पदार्थांचे वायूच्या संगतीने, अशुद्ध वायू शुद्ध होऊन, रोगजंतू नष्ट होऊन मानवादी सर्व प्राण्यांचे रोगराईपासून रक्षण होते. ही भारतीयांची शुद्ध यज्ञ-प्रथा वैदिक आर्यांनी बंद पाडली. त्याला आज ५००० (पाच हजार) वर्षे झाली. ती प्रथा गेल्या १९ व्या शतकात महर्षी दयानंद सरस्वती यांनी पुन्हा प्रस्थापित केली. परंतु बहुजन समाजाने त्याचा अंगिकार केला नाही. ती प्रथा आर्य समाजातील काही थोड्या लोकांनी चालू ठेवली आहे. त्याची प्रगती संपूर्ण भारतात व्हायला पाहिजे. ती होईल तो सुदिन. 'वैदिक आर्यांचे यज्ञकर्म स्वत:ला निरपराध पशूंचे मांस खाण्याचे साधन आहे' 'भारतीय आर्यांचे यज्ञकर्म आरोग्य रक्षण करण्याचे साधन आहे.' या दोन्हीही यज्ञकर्मांना वेदात आधार आहे.

## अवतार–मीमांसा

(१०) अवतार ही कल्पनाच घातक आणि चुकीची आहे. 'विश्वधर्म' ग्रंथातील 'भारताचा अशुद्ध इतिहास' यात, ब्रह्म, विष्णू, महेश, पार्वती, या श्रेष्ठ देवांचे भ्रष्ट चरित्र लिहिले आहे. त्यांच्या अवतारांतील यशापयशाविषयी विचार करू.

**ब्रह्मदेव** – याने कन्यागमनाचा प्रयत्न केला होता. त्यात त्याला यश मिळाले नाही. पण महापापाचारी दैत्य, दानव, राक्षसादी दुष्ट लोकांना वर देऊन महाभयंकर अगणित सज्जनांची हिंसा, भ्रष्टाचार, अत्याचार, अधर्माचाराला बळकटी देऊन महापापाचार निर्माण करण्यात मात्र फारच यश मिळविले होते. त्याने कलियुगात मात्र काही केल्याच्या कथा उपलब्ध नाहीत. तसेच त्यांचा अवतारही कोठें आढळत नाही.

विष्णू व त्याचे दशावतार यांचा विचार केल्यास, पहिल्या तीन अवतारांचा (मत्स्य, कच्छ, वराह) विचार करण्याची आवश्यकता नाही. हे जलचर प्राणी होते. ते काहीच करू शकत नाहीत. नृसिंहाचीही तीच परिस्थती. तो ना पशू ना मानव. पण हजारो ग्रंथांनी बळकट केलेल्या ईश्वरांश विष्णु-अवतारी देवांचा विचार केल्यास, त्यातील वामन, परशुराम, (परशुरामाने २१ वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली हे चुकीचे आहे.)

असे होणे अशक्य आहे. एकदा निःक्षत्रिय केल्यास दुसऱ्या तिसऱ्या वेळीं मारायला क्षत्रिय आले कोठून ? त्या काळांतील सहस्रार्जुनाचे साथीदार २१ क्षत्रिय राजांना मारले. राम हे दिव्य पुरुष होते त्यांचे चरित्र व कार्य फारच उत्तम आहे. यांनी सज्जनांच्या व धर्माच्या रक्षणाकरिता फक्त दुष्टांचाच संहार करून, सज्जनांचे व धर्माचे रक्षण केलेल्या महान् कार्यात यांनी मोठा विजय मिळविला आहे. तसा कृष्णाला मात्र मिळवता आला नाही. वामन, परशुराम, रामासारखाच कृष्णही दिव्य पुरुषच होता.

कृष्ण असा होता – आप्त पुरुष कृष्ण, भगवान कृष्ण, योगेश्वर कृष्ण, युगनायक कृष्ण, महामानव कृष्ण, दिव्य पुरुष कृष्ण, युगप्रवर्तक कृष्ण, चक्र सुदर्शनधारी कृष्ण, आणि गीतागायक कृष्ण.

कृष्ण असा नव्हता – १६ हजार स्त्रियांचा भ्रतार, दानलीला, मानलीला, रासलीला, चीरहरण लीला, चोर, जार, (व्यभिचाराचा सरदार) आणि त्या बरोबरच ईश्वरावतारी बनवलेला.

श्रीकृष्ण हा ईश्वर अवतारी म्हणणे किती अज्ञान आहे ते पहा' तो ईश्वरावतारी असता तर भारतीय युद्धच होऊ दिले नसते. अगणित मानवसंहार झाला नसता. त्यावेळच्या मानवसंहाराने भारताची राख-रांगोळी झाली. भारताचे सर्वश्रेष्ठत्व नष्ट झाले. जगावरील सार्वभौमत्व नाहीसे झाले. भारताची २०० कोटी वर्षांची मानवधर्म संस्कृती लयाला गेली. त्याला आज ५००० (पाच हजार) वर्षे झाली. तरी भारतातील विश्वारंभापासून ते द्वापारयुगांतापर्यंतची मानवधर्म संस्कृती आतापर्यंत परत आली नाही. नव्हे विश्वन्तापर्यंतही येईल असे वाटत नाहीं.

वामन, परशुराम, राम यांनी धर्म-रक्षणकार्यांत फक्त दुष्टांचाच संहार केला होता, पण कृष्णाच्या कार्यात मात्र, दुष्टांपेक्षा लाखोपटीने अधिक सज्जनांचाच संहार झाला आहे. ते कसे ? पांडव सज्जन होते, त्यांच्या बाजूचे राजेमहाराजे सर्व सज्जनच होते. कौरव मात्र दुष्ट होते. परंतु त्यांच्या बाजूचे सर्वच लोक दुष्ट नव्हते. मुख्य राजा दुर्योधन व त्यांचे साथीदार कर्ण, शकुनी, जयद्रथ आदी असे तीनचार माणसेंच तेवढी दुष्ट होती. बाकी सर्व सज्जनच होते, असे म्हटले तर ते चुकीचे होणार नाही; ते अगदी योग्यच ठरावे.

या महाआघातानें भारत दुबळा झाला नसता तर, उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांना भारताची उरलीसुरली मानव-धर्म-संस्कृती नष्ट करायला वावच मिळाला नसता.

कौरव-पांडव युद्धाच्या अगोदर कृष्णाने कंस, शिशुपालादी व भीमाने हिडिंब, बकासूर, जरासंधादी महाबलाढ्य दुष्टांचा संहार केला होता. त्याबरोबर एका दुर्योधनाला मारले असते तर, भारतयुद्ध झालेच नसते; येवढा मोठा मानवसंहार झाला नसता. येवढे मोठे अपयश कृष्णाच्या पदरी पडले नसते. आणि भारताची सर्वश्रेष्ठ मानवधर्म संस्कृती नष्ट झाली नसती. तीच परंपरा आजपर्यंतच नव्हे, तर विश्वान्ता-पर्यंत टिकून राहिली असती. परंतु ते कृष्णाला करता आले नाही. हे काम भीमाने मात्र सहज केले असते आणि ते सती द्रौपदीच्या विटं-बनेच्या वेळीच झाले असते व भारत युद्धच झाले नसते. परंतु त्याला तशी धर्माची आणि कृष्णाची आज्ञा नव्हती. त्यामुळे भीमाला ते करता आले नाही. दुर्दैव पांडवांचे, भारताचे, त्यावरोवरच श्रीकृष्णाचे! अभागी श्रीकृष्ण, अभागी भारत!!

वरील प्रकाराचा सारासार विचार केल्यास, भारत युद्धांतील मानवसंहार कृष्णाच्या आटोक्याबाहेरचा होता. तो अनर्थ टाळण्यासाठी कृष्णाने महान प्रयत्न केले. पण त्यांत त्याला यश आले नाही. कारण तो ईश्वर नव्हता. त्याच्या मागच्या परंपरेतील विष्णू व त्याचे अवतार हेही ईश्वर अवतारी नव्हते.

भारतयुद्धात किती मानवसंहार झाला आहे ते पहा. कौरवांचे ११ अक्षौहिणी सैन्य होते, त्यांतील फक्त तीनच लोक शिल्लक राहिले. आणि पांडवांकडचे ७ अक्षौहिणी सैन्यांतून सातच लोक शिल्लक राहिले होते. वाकीचे १८ अक्षौहिणी सैन्य नष्ट झाले!

भारतयुद्धातील मानवसंहार कृष्णाला थांबवता आला नाही; त्याप्रमाणे यादवांचाही संहार थांबवता आला नाही. ५६ कोटी यादवांतून फक्त ४ लोक शिल्लक राहिले होते. इतका मानवसंहार विश्वारंभापासून ते द्वापारयुगांतापर्यंत झाला नव्हता; आणि पुढे विश्वा-न्तापर्यंत भारतात होईल असे वाटत नाही. ईश्वरी नियम (सृष्टीनियम) बलवत्तर आहे ते कोणालाही टाळता येणे शक्य नाही. ' गहना

कर्मणोगतिः ' :।

याशिवाय कृष्णानें आपल्या सामर्थ्यानें किती मानवसंहार केला आहे ते पहा :–

## ईश्वरावतारीं श्रीकृष्णाचें मानवसंहारक चरित्र

(११) कृष्णाने कंसाला मारल्यावर कंसाचा सासरा जरासंधह्यानें कृष्णाला मारण्यासाठी सतरा वेळा मथुरेवर स्वाऱ्या केल्या. प्रत्येक वेळी जरासंधाचे मांडलीक ४० राजे त्याच्याबरोबर आपापल्या सैन्यासह सहा य्याला होते. याच्या बरोबर प्रत्येक वेळी २३ अक्षौहिणी सैन्य होते असे विष्णु पुराणात (विष्णु पु. ५।२२) म्हटले आहे. हरिवंश पुराणात २० अक्षौहिणी (हरिवंश २।२६) सांगितले आहे. हरिवंशाप्रमाणे वीस अक्षौहिणीचा विचार केल्यास आणि महाभारतात सांगितल्याप्रमाणे युद्धशास्त्राच्या नियमाप्रमाणे एका योद्धयाला दहा सहाय्यक असतात (म. स्त्री. २६।९।१०) भारतातील वर्णनाप्रमाणे एक अक्षौहिणीत २१,८७,००० सैनिक असतात. हरिवंश पुराणाच्या मताप्रमाणे वीस अक्षौहिणीचाच विचार करू. वीस अक्षौहिणीत ४३,७४,००० (त्रेचाळीस लाख चौऱ्याहत्तर हजार) सैन्य असते. इतके सैन्य घेऊन जरासंधाने सतरा वेळा स्वाऱ्या केल्या होत्या. सतरा वेळेचा आकडा सात कोटी, बेचाळीस लक्ष, अठ्ठावन्न हजार इतका होतो. हे संपूर्ण सैन्य मारले गेले नसेल; त्यातील अर्धे मात्र सहज मारले गेले असेल, त्याचा आकडा ३,७५,००,०००. सारांश जरासंध युद्धात पावणेचार कोटी मानवसंहार झाला !

जरासंधाचा मित्र कालयवन जरासंधापेक्षाही सामर्थ्यशाली महाबलाढ्य होता. जरासंधाने कालयवनाला कृष्णाला मारण्याची विनंती केली. संधी मिळताच कालयवनाने कृष्णावर स्वारी करण्याचे ठरविले. ही वार्ता कृष्णाला दूतांकरवी कळली. कालयवनाला कृष्णाने फसवून मुचकुंद ऋषीकडून जाळून मारले आणि यादवांनीं कालयवनाचे सर्व सैन्य मारलें. कालयवनाचे सैन्य कृष्णापेक्षा फारच जास्त होते, असा अनेक पुराणांत उल्लेख आहे. कृष्णाइतकेच धरले तरी त्यातील अर्धे २८ कोटी तरी मारले गेले असतील. जरासंधाच्या आणि कालयवनाच्या भीतीने कृष्णाने रातोरात मथुरेतून सर्व यादवांसह स्थलांतर करून पश्चिम समुद्र किनारी डोंगराळ भागात द्वारका नावाची राजधानी स्थापन केली, आणि

सर्व यादव द्वारकेत राहू लागले. शेवटच्या वेळी जरासंधाने द्वारकेवर स्वारी केली त्यावेळी जरासंधाला चुकवण्यासाठी आपण एकटाच ' प्रवर्षण गिरी ' पर्वतातील गुप्त गुहेत लपून बसला. जरासंधाने तेथेही त्याचा पाठलाग करून त्या पर्वतास आग लावून दिली आणि तो परत आपल्या राजधानीस आला. कृष्णाकडून जरासंध मेला नाही. नंतर त्याला भीमाने मारले.

जरासंध किती बलाढ्य होता याचे वर्णन भागवतात सांगितले आहे. जरासंधाने एकूण २०,८०० (वीस हजार, आठशे) राजाना आपल्या कैदेत टाकले असून यापैकी एकेका राजाला हा क्रमाने कृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं शिवाप्रित्यर्थ बळी देत होता; यावरून कृष्णापेक्षा जरासंध सामर्थ्यवान होता असे स्पष्ट दिसते.

जरासंध व कालयवनापेक्षाही महाबलाढ्य नरकासुर होता. त्यानें वीसहजार राजे आपल्या कैदेत ठेवले होते (यज्ञात बळी देण्याकरिता) आणि देवकन्या, गंधर्वकन्या, अप्सरा, राजकन्या, ऋषी कन्या, सोळा-हजार, एकशे जमवल्या होत्या; त्यांच्याबरोबर एकाच वेळीं लग्न करणार होता. त्यालाही कृष्णाने मारून वीस हजार राजांना मुक्त करून सोळा-हजार एकशे कन्यांबरोबर लग्न केले. या नरकासुर लढाईत कृष्णाच्या छपन्न कोटी यादवांवरून विचार केला तर कमीतकमी वीस कोटी मानव संहार झाला असे मानले तर ती अतिशयोक्ती होणार नाही.

कौरव-पांडवांच्या संदर्भात मानवसंहाराचा विचार केल्यास अर्जुनाने दोन वेळा दिग्विजय केला होता. प्रत्येक वेळी चार चार कोटी तरी मानवसंहार झाला असावा. आणि कर्णाने एकादा दिग्विजय केला होता त्यावेळीही चार कोटी मानव मारले गेले असतील.

कौरव-पांडव युद्धाच्या वेळी कौरवांचे अकरा अक्षौहिणी, व पांडवांचे सात अक्षौहिणी सैन्य मारले गेले. एक अक्षौहिणीत २१,८७,००० (एक्याऐंशी लक्ष, सत्त्याऐंशी हजार) इतके सैन्य असते. अठरा अक्षौहिणींचे सात कोटी, छत्तीस लक्ष, त्र्याऐंशी हजार होतात. ते सर्वच्या सर्व मारले गेले. त्यातील कौरवांकडचे तीन व पांडवांकडील सात असे दहा लोक शिल्लक राहिले होते.

याशिवाय भारतीय युद्धाच्या अगोदर कृष्णाने आठ मानवराजे व

सहा असुर राजे मारले होते (यात कंसवध नाही), आणि सात मानव राजांना जिंकले होते. पहा त्यांची नावे :– १) भौमासूर, २) आहूती, ३) क्राथ, ४) शैव्य, ५) दंतवक्र, ६) शतधन्वा, ७) इंद्रद्युम्न, ८) कशेरुमत, ९) गोपती १०) तालकेतू, ११) जंभ, १२) ऐरावत, १३) विरुप, १४) शंबर, १५) वासुकी (नागराजा) यांना मारले होते आणि १६) द्युमत्सेन, १७) पांड्य, १८) पौंड्र, १९) कलिंग, २०) मत्स्य, २१) अंगराज यांना जिंकले होते. हे सर्व राजे कृष्णापेक्षा सामर्थ्यवान, बलवान होते. कृष्णाला अत्यंत त्रास देणारे होते. परंतु कृष्णाइतके बुद्धिवान नव्हते. म्हणून कृष्णाच्या हस्ते काही मेले, काही हरले. त्या सर्वांना माहीत होते की, कृष्ण आणि त्याचे सहकारी छप्पन कोटी यादवांबरोबर आपणाला झुंजायचे आहे. या एकवीस राजांच्या युद्धात कमीतकमी प्रत्येक राजाच्या युद्धात दोन दोन कोटी मानवसंहार झाला असावा; म्हणजे बेचाळीस कोटी मानव मारले गेले असतील.

बाणासुराने कृष्णाच्या नातवाला 'अनिरुद्धा'ला कैदेत ठेवले होते. हा जरासंध कालयवनापेक्षा महाबलाढ्य होता. याला एक हजार हात होते. तो एकटा लढत असतांना पाचशें महायोध्यांइतके युद्ध करीत असे आणि त्याचे सेनाबलही कृष्णापेक्षा अधिक होते. हा महान् शिवभक्त होता. आपल्या नातवाला सोडवण्याकरिता छप्पन कोटी यादवांसह कृष्ण गेला होता. या युद्धासारखे युद्ध त्याअगोदर व त्यानंतर आतांपर्यंत कधीच झाले नसेल. बाणासुराची पडती बाजू पाहून त्याच्या साह्याला कैलासावरून स्वतः शंकर आपल्या अगणित सैन्यासह आला होता. त्या वेळी कृष्णाचे व शंकराचे तुंबळ युद्ध झाले. त्यात अगणित सैन्य मारले गेले. कमीतकमी वीस (२०,००,००,०००) कोटी धरले तर चुकीचे होणार नाही.

आता शेवटी यादवसंहाराचा विचार करू. यादव छप्पन्न कोटी होते व ते सर्व महायोद्धे होते. युद्धशास्त्राच्या नियमाप्रमाणे प्रत्येकी दहा सहाय्यक धरून पाचशेसाठ कोटी होतात. या प्रत्येकाला पांच पांच मुले धरल्यास अठ्ठावीसशे कोटी, आणि एकट्या कृष्णाला ऐंशीहजार एकशें मुले होती. २८०० (अठ्ठावीसशे) कोटी, ८० हजार, १०० एकशे. यातील काहीं थोडे आपसात लढाया करून नेले. बाकी सर्व यादवांचा

संहार कृष्णाने केला. त्यातील फक्त चारच लोक शिल्लक राहिले होते.

| | |
|---|---|
| ३,७५,००,००० | जरासंध : तीन कोटी पंच्याहत्तर लक्ष. |
| २८,००,००,००० | कालयवन : अठ्ठावीस कोटी. |
| २०,००,००,००० | नरकासूर : वीस कोटी. |
| ८,००,००,००० | अर्जुन : दोन वेळा दिग्विजय-आठ कोटी |
| ४,००,००,००० | कर्ण : दिग्विजय चार कोटी. |
| ७,३६,८३,००० | कौरव-पांडव युद्धः सात कोटी, छत्तीस लक्ष, त्र्यायशी हजार. |
| ४२,००,००,००० | एकवीस राजांचे बेचाळीस कोटी |
| २०,००,००,००० | वाणासूरः वीस कोटी |
| १३३,११,८३,००० | एकंदर (यादव सोडून) एकशे तेहतीस कोटी, अकरा लक्ष, त्र्याऐंशी हजार आणि यादव, |
| २८३३,००,८०,१०० | अठ्ठाविसशे तेहतीस कोटी ऐंशी हजार एकशे. |
| २९६६,१२,६३,१०० | एकंदर एकोणतिसशे सहासष्ठ कोटी, बारा लक्ष, त्रेसष्ठ हजार, एकशे. म्हणजेच |

२९ अब्ज् ६६ कोटी, १२ लक्ष, ६३ हजार, एकशे.

जेवढे पुरुष मारले गेले तेवढ्या त्यांच्या स्त्रिया विधवा झाल्या. अगणित निरपराध हत्ती, घोडे मारले गेले. एवढा मानवसंहार, इतक्या स्त्रिया विधवा, इतका निरपराध हत्ती-घोड्यांचा संहार अवघ्या शंभर वर्षात झाला! आणि तो कृष्णाने धर्मसंस्थापनेकरिता केला!! प्रत्येक युगात धर्मसंस्थापनेकरिता मी अवतार घेतो. 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे' या कृष्णोक्तीप्रमाणे कृष्णाने एवढा मानवसंहार, इतक्या स्त्रिया विधवा करून, इतके निरपराध प्राणी मारून धर्म स्थापन केला का नष्ट केला, याचा विचार बुद्धिवंत वाचकवृंद करतील. पण मला वाटते कृष्णाने धर्म नष्ट केला!

वर वर्णन केलेल्या मानवांत दुष्ट, अधर्मी किती असतील! जेवढे राजे होते तेवढेच त्यांचे साथीदार फार फार तर चार पाच लोक असतील. उदा. दुर्योधनाच्या मताला साक्ष देणारे फक्त तीनच लोक होते. धृतराष्ट्र, शकुनी आणि कर्ण. या तिघांशिवाय दुर्योधनाला साथ देणारी व्यक्ती संपूर्ण महाभारतात सापडणार नाही. तर वर उद्धृत केलेल्या अठ्ठावीस

राजांच्या साथीदारासह दुष्ट, अधर्मी दीडशे लोकांपेक्षा अधिक नव्हते. दीडशे लोकांना दुष्टाचारापासून, अधर्मापासून परावृत्त करण्यासाठी त्यांना जीवानिशी मारण्याची गरजच नव्हती, त्यांना व त्यांच्या बरोबर तीन अब्ज म्हणजे तीनशे कोटी मानवसंहार केल्यापेक्षा त्या दीडशे लोकांच्या मनाचे परिवर्तन करायला ईश्वराला अशक्य नव्हते. तरी धर्मसंस्थापने-करिता तीनशे कोटी मानव-संहार केला. तीनशे कोटी स्त्रिया विधवा केल्या. अगणित निरपराध हत्ती-घोडे मारले.

वैदिक आर्य हिंदू कृष्णाला ईश्वराचा अवतार, पूर्ण ब्रह्म, पूर्णावतारी मानतात. तर कृष्णांत ईश्वराइतके सामर्थ्य असले पाहिजे. पहा : ईश्वराचे सामर्थ्य.

> एका तासामाजी कोटी वेळा सृष्टी । होती जाती दृष्टी पाहे तोची.
> (एकनाथ महाराज हरिपाठ)
>
> प्रसवला विश्व तोची सर्व होय जाणता । घडी मोडी हेळामात्रे पाप पुण्य संचिता (तुकाराम महाराज)
>
> आता जयाचेनी संकल्पे । हे लोक परंपरा हारपे
> (ज्ञानेश्वरी अ. ११ ओवी ८२)

येवढे सामर्थ्य कृष्णात असते तर त्याला (कृष्णाला) म्हणजे ईश्वराला जलचर अशा नीच-क्षुद्र प्राण्यांच्या योनीत किंवा मानव-शरीरी अवतार (जन्म) घेऊन एवढा भयंकर मानवसंहार करायची काहीच गरज नव्हती. या मानवसंहाराने भारत देश दुबळा झाला. त्या बरोबर भारतीयांची सर्वश्रेष्ठ मानवधर्म-संस्कृती नष्ट झाली.

वामन, परशुराम, राम यांनी मानवधर्म-संस्कृती बळकट करून चांगला विकास केला होता. पण कृष्णाच्या काळांत-कृष्णाच्या प्रमुखत्वा-खाली मानवत्व व धर्म नष्ट झाला तो कायमचाच. आणि अधर्माचे बीजारा-पण मात्र झाले, असे म्हटले तर चुकीचे होणार नाही. त्या अधर्माचा शंकरावतारी खंडोबा, भिरोबा, जोतिबादि देवांनी व पार्वती अवतारी देवींनी फारच मोठ्या प्रमाणांत विकास करून अधर्माचार, अत्याचार, निरपराध पशुहिंसा, अगणित स्त्रियांचे सतित्व नष्ट भ्रष्ट करणे, याला ऊत आणला आहे.

उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांच्या अवतार, कल्पनेने भारतीयांच्या

दिव्य महामानवांचे दिव्यत्व, श्रेष्ठत्व नष्ट, भ्रष्ट केले आहे. आणि भारत देशाला निंद्य बनवले आहे असे माझे स्पष्ट मत आहे.

वरील अवतार मीमांसेत मी जे लिहिले आहे, त्याचे कारण आमच्या भारतीय आर्य महामानव दिव्य पुरुषांना उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांनी भ्रष्ट बनवले, ते मला योग्य वाटत नाही. त्याची मला चीड येऊन, त्या सात्विक चिडेपोटी मी हे लिहिले आहे. चिडेपोटी आहे, ते द्वेषमूलक मात्र नाही, हे वाचकांना नम्र विनंतीपूर्वक सांगत आहे. याची वाचकवृंद नोंद घेतील अशी अपेक्षा करतो.

## मूर्तिपूजा म्हणजे अभेद्य चक्रव्यूह.

(१२) मूर्तिपूजा हे एक मानवघातकी महान् चक्रव्यूह आहे. उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांनी, भारतीय आर्यांच्या महामानवांना (ब्रह्मा, विष्णु, महेशादि), त्यांच्या पावन व अनुकरणीय चरित्रांसह पाषाणमूर्तीत घालून आणि पाषाणमंदिरात त्यांना कायमचे बंदिवान बनवून आपल्या बंदिवासांत ठेवले आहे. तसेच त्यांना जलचर पशू अशा हीन स्वरूपात अवतारी बनवून, त्यांना चमत्कारिक अलंकारांनी नटवून, सजवून ,भ्रष्ट व निंद्य चरित्राने वंद्य बनवून अज्ञ मानवसमाजाला त्यांची उपासना करायला लावली आहे.

वरील सर्व प्रकाराला सत्यत्व, श्रेष्ठत्व, दिव्यत्व देण्याकरिता भारतीय आर्यांच्या सर्वश्रेष्ठ वेद, रामायण, महाभारत, पुराणे आदि ग्रंथांत हा भ्रष्ट प्रकार आपल्या कल्पनाचातुर्याने समाविष्ट केला आहे आणि वेदांचा विकास या नावाखाली हजारो ब्राह्मणग्रंथ नवीन निर्माण केले. रामायण, महाभारताला महाकाय बनवले. व्यासांच्या लघु दहा पुराणांची ७२ महाकाव्य पुराणे बनविली. यावरील वाङ्मयांतर्गत अगणित धर्मग्रंथ निर्माण करून मानवघातकी एक महान चक्रव्यूहच निर्माण केला ! त्यांत अज्ञ व सनातनी सूज्ञ मानव समाजाला गुंतवून ठेवले. त्या चक्रव्युहातून अज्ञ मानवाला बाहेर पडणे अशक्यच, परंतु सनातनी विद्वान् पंडितानासुद्धा यांचा भेद करणे म्हणजे, महाभारत युद्धाच्या प्रसंगी रचलेल्या चक्रव्यूहातून महावीर अभिमन्यूलाही बाहेर पडता आले नाही. तद्वत् आपली स्थिती होईल अशी भीती वाटते. हा घातकी चक्रव्यूह

असूनही तो मोक्षमार्ग आहे असे मानतात आणि त्यातच गुंतून राहतात!

धर्माच्या नावाखाली धूर्त वैदिक आर्य पुरोहितांनी उदरंभरण, स्वार्थापोटी निर्माण केलेल्या मूर्ति-पूजारूपी चक्रव्युहातून बाहेर पडण्याचा कितीही प्रयत्न केला तरी ते अशक्यप्राय होऊन शेवटी त्यातच गुदमरत राहण्याशिवाय गत्यंतर नाही!

या चक्रव्युहातून अज्ञ व सनातनी सूज्ञ समाजाला बाहेर काढण्याचा प्रयत्न महर्षी दयानंदसरस्वतीने सुरू केला आणि आर्य समाजातील दयानंदानुयायी विद्वान पंडित मंडळी त्याचा विकास करीत आहेत. तसेच प्राज्ञपाठशाळा मंडळाचीच चालू कालातील बुद्धिवादी मंडळीही त्या दिशेने प्रयत्न करीत आहेत. यांच्या प्रयत्नाला यश लाभून ह्या चक्रव्युहातून मानवसमाज बाहेर पडेल तो सुदिन!

## वीरशैव आणि वेद

(१३) चालू काळांत वीरशैव धर्म, वैदिक आहे असे पंचाचार्य, गुरुवर्ग मानतात. अज्ञ वीरशैवही तेच मानतात. वेद चार आहेत. पंचाचार्य पांच आहेत. चौघांना चार वेद आहेत. पांचव्या आचार्यांस पांचवा वेद नाही. त्याकरिता पाचवा 'अजप' नावाचा वेद काल्पनिक निर्माण केला आहे. चार वेद हे धर्मग्रंथ नाहीत आणि पाचवा अस्तित्वात नव्हता. आताही कोणी निर्माण केला नाही. अशा अयोग्य आणि अस्तित्वात नसलेल्या वेदाला श्रेष्ठ मानून आम्ही वैदिक आहोत, असे मानणे योग्य वाटत नाही. नव्हे योग्य नाहीच.

शैव—वीरशैवांकरिता मानवदेव शिवाने आगम-रचना केली आहे. ती वेदांच्याही अगोदरची असून, त्यांत शैव—वीरशैवांचारांची श्रेष्ठ तत्त्वे आहेत. ती तत्त्वे, तो आचार—विचार, उपासना विश्वारंभापासून ते आतापर्यंत सर्वश्रेष्ठत्वाने वीरशैवांच्या आचारात आहेत. त्याला (आगमाला) पंचाचार्य गौण मानतात हे योग्य नाही, असे मला वाटते.

ह्या अयोग्य गोष्टी वीरशैवांनी का मानल्या? ह्या प्रश्नाचा विचार केल्यास असे वाटते की, उत्तरध्रुवीय वैदिक आर्यांनी महापापाचारयुक्त भेसळ, अयोग्य वेदांचा प्रचार मोठ्या प्रमाणांत सुरू केला. त्यात अज्ञ वीरशैव समाज आकर्षित झाला; त्याने स्वधर्म सोडून तो त्यांत समा-

विष्ट होऊ लागला असेल. अशा संकटकाळी सूज्ञ वीरशैवांनी वैदिक आर्यांचे अनुकरण केले असावे. वैदिक आर्यांचे वेद चारच आहेत. आणि ते अपौरुषेय, ईश्वरप्रेरित, ईश्वरनिश्वसित, ईश्वरमुखोद्भव आहेत. तसेच आमचे (वीरशैवांचे) आगम आणि पंचाचार्य परशिवाच्या पांच मुखांतून व पार्थिव व शिवलिंगातून निर्माण झाले आहेत. वैदिक आर्यांचे वेद चारच आहेत. आमचे वेद पांच आहेत. असा वैदिक आर्यांप्रमाणे वीरशैवांनी काल्पनिक प्रकार अज्ञ वीरशैवांना आवरून धरण्याकरिता निर्माण केला असावा. ती अडचण आज नाही. तेव्हा त्या अयोग्य प्रकाराचा वीरशैवांनी अद्यघडीला त्याग केला तर कांहीही विघडणार नाही. या अयोग्य गोष्टीचा विचार वीरशैव, गुरुवर्ग आणि पंचाचार्य यांनी करावा आणि उपरिनिर्दिष्ट प्रथेचा त्याग करावा असे माझे स्पष्ट मत आहे.

## वेदांतील रुद्रस्तोत्र आणि वीरशैव

(१४) वेदातील रुद्रदेवतेचा विचार वर केला आहेच. आता रुद्रस्तोत्राचा विचार करू. कांही वीरशैव विद्वान पंडित आणि गुरुवर्ग–पंचाचार्य वेदातील रुद्रस्तोत्र वीरशैवांना विशेष महत्वाचे वाटते व म्हणून वेदाला मानावे लागते असे ते म्हणतात. रुद्रस्तोत्राचा विचार केल्यास, वेदातील रुद्र वीरशैवांचा परशिव नाही. तसेच देवमानव शिवही नाही. वैदिकांनी निर्माण केलेल्या रुद्राचे 'विश्वधर्म' ग्रंथात पृ. ५५ ते ५९ मध्ये साधार वर्णन आहे. त्या पापाचारी क्रूर रुद्राला प्रसन्न करण्याकरिता वेदातील रुद्र-स्तोत्र आहे. त्या रुद्रस्तोत्र स्तुतीने परशिव तसेच मानवदेव शंकर प्रसन्न होणार नाहीत. त्यांना ते आवडणार नाही. अशा अयोग्य रुद्रस्तोत्राने वीरशैव, परशिव आणि शंकराची स्तुती करणे योग्य नाही. वीरशैवांनीं नवीन स्तोत्ररचना करावी आणि वैदिक रुद्रस्तोत्राचा त्याग करावा.

वेदांतील पापाचारी क्रूर रुद्र वीरशैवांचा ईश्वर नाही. तो उत्तर ध्रुवीय वैदिक आर्यांचा ईश्वर आहे. अशा अयोग्य रुद्रस्तोत्राकरिता वीरशैवांनी वेद श्रेष्ठ मानणें, वैदिक म्हणवून घेणे योग्य नाही. वीरशैवांना वेद मान्य नाहीत. वेदांना मात्र वीरशैव धर्म मान्य आहे. माझ्या त्या विधानाला 'सिद्धांत शिखामणी' ग्रंथांत खालील आधार मिळतो.



रेणुकाणार्य, महर्षी अगस्ती ऋषींना सांगतात कीं,

शक्तिप्रधानं वामाख्यं दक्षिणं भैरवात्मकम् ।
सप्तमातृपरं मिश्रं सिद्धांतं वेद सम्मतम् (सि. प. ५-११)

'वाम' नावाचे तंत्र शक्तिप्रधान आहे. 'दक्षिण' नावाचे तंत्र भैरवी उपासना करणारे आहे. 'मिश्र' नावाचे तंत्र सप्तमातृकाची उपासना करणारे आहे आणि 'सिद्धांत' नावाचे शैवतंत्र वेदांना मान्य आहे.

या ठिकाणी शब्द वीरशैवपर असल्याचे श्रीअगस्ती ऋषींना केलेल्या उपदेशांत जगद्गुरु श्रीरेणुकाचार्यांनी खालील श्लोकांत स्पष्ट केले आहे :-

सिद्धांताख्ये महातंत्रे कामिकाद्ये शिवोदिते ।
निर्दिष्टमुत्तरे भागे वीरशैवमतं परम् ।। (सि. प. ५-१४)

शिवोक्त महातंत्रातील कामिकादि महान् आगम शास्त्रांच्या उत्तर भागांत सिद्धांत नावाने प्रसिद्ध असलेल्या श्रेष्ठ अशा वीरशैव-मताचे वर्णन श्रीशिवांनी केलेले आहे.

वरील दोन श्लोकांचा सारांश असा की, शैव-वीरशैव मत
वेदांच्या अगोदरचे असून ते वेदाला मान्य आहे. यावरून असे सिद्ध होते
की, वीरशैवमत (धर्म) वैदिक नसून, शैवागमोक्त आहे आणि ते
वेदांना मान्य आहे. म्हणजे शैवागम वेदांच्या अगोदरचा आहे.

वेद हे ग्रंथ किती कनिष्ठ आहेत हे सहाव्या प्रकरणांत आपण
पाहिले. अशा कनिष्ठ आणि निंद्य बनवलेल्या वेदांना श्रेष्ठ मानून,
वीरशैव आपणाला वैदिक म्हणवतात. यावरून असे वाटते की, वीरशैवांत
कोणी धर्माभिमानीच नाही आणि विद्वानही नाही. धर्माभिमानी, विद्वान
असते तर, त्यांनी आपणाला वैदिक म्हणनून घेतले नसते. आपल्या
आद्य 'शैवागम' ग्रंथाचे संरक्षण केले असते. त्याचा विकास केला
असता. विकासाकरिता हजारो ग्रंथ निर्माण केले असते. वीरशैव धर्म
सोडून, जगातील व भारतातील सर्व धर्म, पंथाकडे पाहिल्यास असे
दिसून येते की, प्रत्येक धर्मात, पंथात धर्माभिमानी, पंथाभिमानी विद्वान
आहेत. प्रत्येक धर्मातील, पंथातील विद्वानांनी आपापल्या धर्माच्या व
पंथाच्या संरक्षणासाठी, विकासासाठी हजारो नव्हे लाखो ग्रंथ निर्माण
केले आहेत. त्यामुळे त्या त्या धर्माचा, पंथाचा विकास होऊन त्यांना
किती बळकटी आली आहे, हे सर्वश्रूत आहेच.

मानव मनाची नैसर्गिक प्रवृत्ती अशी आहे की, श्रेष्ठाकडे पाहून
आपण श्रेष्ठ व्हावे, विद्वानाकडे पाहून आपण विद्वान व्हावे, ही प्रवृत्ती

वीरशैवांत दिसून येत नाही. ती असती तर त्यांनी इतर धर्म-पंथीयांप्रमाणे हजारो ग्रंथ निर्माण करून वीरशैव धर्माला वळकटी आणली असती. त्याचा विकास केला असता. असे घडून आले नाही, अद्यापहि तसा प्रयत्न नाही, याचे वाईट वाटते.

आज शिक्षणाची प्रगती झाली आहे. नवतरुण समाज सूज्ञ झाला आहे. योग्यायोग्यावद्दल विचार करण्याची त्याची मानसिक पात्रता विकसित झाली आहे. वीरशैव धर्म सोडून इतर धर्मांचा सर्वांगीण विकास झाला आहे. त्यांचा ग्रंथिक, मौखिक प्रचारही दांडगा आहे. वीरशैवांचा मौखिक प्रचार अपुरा पडतो आणि ग्रंथ तर अजिबात नाहीत. पूर्वीच्या अज्ञ वीरशैव समाजांनी स्वीकारलेल्या अयोग्य, काल्पनिक, चमत्कारिक, असंभाव्य गोष्टी चालू विज्ञानयुगांत सुशिक्षित तरुणांना पटत नाहीत. त्यामुळे तरुण वर्गाचे स्वधर्माकडे दुर्लक्ष होऊन ते परधर्माकडे आकर्षित होत आहेत. त्यांना थांबण्याकरिता वीरशैवांनी विपुल ग्रंथरचना करावी. ते ग्रंथ प्रकाशित करून, प्रत्येक शहरांतील, गांवातील ग्रंथविक्रेत्याकडे विक्रीस द्यावेत आणि त्याचा मौखिक प्रचारही मोठ्या प्रमाणात व्हावा. तो लहान लहान खेड्यातील, वीरशैवांच्या घराघरांत पोहोचला पाहिजे. आणि ग्रंथ विकत घेऊन त्यांतील धार्मिक ज्ञानाचा फायदा सहज घेता आला पाहिजे. त्याला असे वाटले पाहिजे की, आपला धर्म इतर सर्व धर्मांपेक्षा श्रेष्ठ आहे.

नवीन ग्रंथरचनेत एकांगीपणा नसावा. आपल्या धर्मज्ञानाबरोबर, दुसऱ्या धर्मांतील गुणदोषांचे दर्शन त्यात असावे. परधर्माकडे आकर्षित झालेल्यांना त्या धर्मांतील दोष सहज दिसावेत, म्हणजे त्यांच्या विचारांत बदल होऊन स्वधर्माविषयी पूज्य भाव निर्माण होईल आणि स्वधर्मांत तो स्थिर होईल.

यावरील गोष्टींचा गुरुवर्य जगद्गुरु (पंचाचार्य), समाज कार्यकर्ते, धार्मिक संस्था, धार्मिक मासिक संस्था या लोकांनी विचार केल्यास धर्माचा विकास होईल यात शंका नाही. येवढे सुचवून लांवत चाललेला हा उपसंहार संपवित आहे. याबरोबरच 'विश्वधर्म' ग्रंथही संपत आहे.

जनताजनार्दनाचा व वाचकवृंदाचा कृपाभिलाषी,

आळंदी (देवाची) — का. शि. संकाये